KÂVYASANGRAHA. 28.

# THE YATHÂRTHADÎPIKÂ

( A COMMENTARY ON THE BHAGAVADGÎTÂ )

OF

## VÂMANA PANDITA.

THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA. )

**PART I.**

CHAPTERS I-IV.

*EDITED WITH*

**CRITICAL AND EXPLANATORY NOTES**

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

Second Edition.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1907.

*Price* 1½ *Rupee.*

काव्यसंग्रह. २८.

महाराष्ट्रकविवर्यवामनपंडितकृत

# यथार्थदीपिका.

## भाग पहिला.

अध्याय १–४.

केली श्रीगीतेची व्याख्या, बहु भक्ति जींत गाजविली; ।
साजविली साधुसभा; भाषा, कविकवनशक्ति लाजविली. ॥

मोरोपंत–वामनपंडितस्तुति.

हा


वामन दाजी ओक,

हेडमास्तर, हायस्कूल, रायपूर,


यांनीं अर्थनिर्णायक, व अवांतर माहितीच्या टीपा देऊन, तयार केला.

दुसरी आवृत्ति.


मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०७.

किंमत १॥ रुपया.

# अनुक्रमणिका.

# वामनपंडितकृत यथार्थदीपिका.

## भाग पहिला.

---

### अध्याय पहिला.

#### मंगलाचरण.

(ओंव्या.)

जय जय भगवन् वासुदेव[1] । जय जय श्रीदेवाधिदेव । जय जय यदुदेव वासुदेव । अर्जुनगुरो ! ॥ १ ॥ जय जय जी ! भगवंता[2] ! । ऐश्वर्यज्ञानवैराग्यवंता ! । धर्मयशश्रीमंता ! । षड्गुणा ! ॥ २ ॥ तूं गुणातीत[3] निर्गुण । तूंचि सगुण तूंचि त्रिगुण[4] । तूंचि तुझे षड्गुण । तूं प्रत्यक्षीं अपरोक्ष[5] ॥ ३ ॥ इंद्रियें आणि इंद्रियगम्य[6] । तूंचि जो इंद्रियां अगम्य । तोचि तूं ध्येय[7] रम्य[8] । शेषशायी[9] ॥ ४ ॥ तूं निर्गुण अनिर्वाच्य[10] । तोचि तूं षड्गुणत्वें वाच्य । वाच्य तितकें अवाच्य । ठाव[11] नुरतां वाचेसि ॥ ५ ॥ तुझें ऐश्वर्य[12] तूंचि । ऐश्वर्यशक्ति ही दुजी कैंची ? । अवघी सत्ताचि साची[13] । घट मृत्पिंड[14] ही मृत्तिका ॥ ६ ॥ परी षड्गुणांचें विवरण[15] । करितां दिसे कार्यकारण । षड्गुणत्वें षड्विधपण । तें भगवद्रूप जग हेंचि ॥ ७ ॥ जी ! श्रीसच्चिदानंदगुरु[16] ! । जें जें वदलासि

---

१. पुढें ओंवी १३६ वी पहा. २. 'भगवान्'शब्दाची व्याख्या आढळते तीः—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' (म्हणजे,—सर्व स्थावर जंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें). किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. येथें सांगितलेल्या सहा गुणांसच 'षाड्गुण्य' असें म्हणतात. ३. गुणापलीकडला. ४. ह्या तीन गुणांचीं नांवें:—सत्व, रज, तम. ५. अदृश्य. ६. विषय. ७. ध्यान करण्यास योग्य. ८. रमण्यास योग्य. ९. शेष नामक जो सर्पराज त्यावर शयन करणारा. १०. वाचेनें वर्णितां येत नाहीं असा. ११. स्थान, जागा, अवकाश, आधार. १२. भगवंताच्या सहा गुणांचें वर्णन पंडितांनीं विस्तारानें केलें आहे. येथें 'ऐश्वर्य' नामक प्रथम गुणाचें विवरण सुरू होतें. १३. खरी, वास्तविक. १४. मातीचा गोळा. १५. स्पष्टीकरण. १६. सत्य, ज्ञान आणि आनंद असा. ईश्वरस्वरूप गुरु. या गुरूची हकीकत पंडितांनीं स्वकृत 'निगमसार' नामक ग्रंथांत दिली आहे (ओंव्या ६–१३). तसेंच 'कर्मतत्व' श्लोक ४ पहा. [कर्मतत्व—अध्याय १ श्लोक ४; वामनकृत स्फुट काव्यें—भाग २ पृष्ठ १०८.]

कल्पतरु । निर्गुण सुवर्ण सगुण **मेरु** । तो भेटलासि यतिरूपें ॥ ८ ॥ तूं श्रीगुरु चिद्घन[1] । **भगवद्गीता** तुझें वचन । प्रत्यक्षीं षड्गुणज्ञान । व्याख्यान तेंचि **गीते**चें ॥ ९ ॥ प्रत्यक्ष तुझे साही गुण । पाहे तोचि भक्त निपुण । आत्मा भगवंत ऐशी खूण । तो अनुभवी **गीते**चा ॥ १० ॥ ऐश्वर्य म्हणिजे समर्थपण । कीं अघटित तेंही घडवणें । विश्व नसोनि मिरवणें । हें ऐश्वर्य ॥ ११ ॥ तूं तंतु विश्व पट । तूं मृत्तिका विश्व घट । ऐश्वर्य तेव्हां निपट[2] । चराचरचि[3] प्रत्यक्ष ॥ १२ ॥ विश्वपटीं जो तंतू । तो निजात्मा प्रकाशहेतू । भक्त **भा**गवत **भ**गवंत तूं । भेद कोठूनि आणावा? ॥ १३ ॥ ऐंवं[4] जगचि ऐश्वर्य जैसें । जगचि तुझें ज्ञान तैसें । एथेंही द्वैत तें कैसें? । सांपडेल अणुमात्र. ॥ १४ ॥ तूं सुवर्ण विश्व नग[5] । निर्गुणत्वीं हा विश्वयोग । परी तूं न कल्पिसी जग । तों हे रचना घडेना ॥ १५ ॥ अधिष्ठान[6] नेणे विवर्ता[7] । तुज निर्गुणत्वीं न प्रपंचवार्ता । तोचि सर्वसाक्षी विश्वभर्ता । जाणूनि कल्पिसि सर्वज्ञा! ॥ १६ ॥ श्रुति बोलती सर्व । कीं धाता कल्पी यथापूर्व । **सांख्य नि**रीश्वर त्यांचा गर्व । एथें हरे ॥ १७ ॥ जाणोनि कल्पिजे नगर । कल्पना तुझी चराचर । जन्मादि[8] साही विकार । कल्पना तुझी साक्षित्वें ॥ १८ ॥ भूत भविष्य वर्तमान । हें कल्पका सर्वज्ञाचें **ज्ञा**न[9] । तेव्हां विश्वरूपेंचि ध्यान । जगत्कल्पकाच्या ज्ञानाचें ॥ १९ ॥ वृत्तिरूप[10] ज्ञान जग । निर्धर्मज्ञानीं त्याचा संयोग । अधिष्ठान कनकीं[11] विवर्त नग । दोन्ही रूपें हेमाचीं[12] ॥ २० ॥ जरी अलंकाररूप । तरी सुवर्णाचें तें स्वस्वरूप । दृष्टीस थिजलें विघरलें तूप । रसनेस[13] रस एकचि ॥ २१ ॥ एवं **ज्ञान** दुसरा गुण । तोहि जगचि देखे निपुण । ज्यास जगदात्मत्वाची खूण । बाणे[14] दृढ ॥ २२ ॥ विश्व नसोनि दावी । हे ऐश्वर्यशक्ति तुझी वदावी । त्याची सिद्धि अनुभवी । या ज्ञानगुणेंचि देखती ॥ २३ ॥ प्राकृत नरें ही केली कल्पना । परी देहप्रारब्धाचा साचा मना । वाटे तुज तो असेना । तो देह तुझा कल्पिसी ॥ २४ ॥ 'पुरुष[15] एवेदं

---

१. ज्ञानघन. २. केवळ. ३. चर+अचर=जंगम+स्थावर. ४. या प्रकारेंकरून. ५. दागिना. ६. आधार. ७. भोंवरा. आभास, भ्रम. ८. जायते (उत्पन्न होतो), अस्ति (राहतो), वर्धते (वाढतो), विपरिणमते (तरुण होतो), अपक्षीयते (वृद्ध होतो) आणि विनश्यति (मरतो) हे सहा विकार आहेत. ९. हें द्वितीय गुणाचें वर्णन आहे. १०. मनोवृत्ति. ११. कनक=सोनें. १२. सोन्याचीं. १३. रसना=जिव्हा. १४. पक्की भासे, दृढ वाटे. १५. हें वचन 'पुरुषसूक्तां'त आहे. [पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् । यावरील भाष्य=यदिदं वर्तमानं जगत् सर्वं तत् पुरुष एव पुरुषसूक्त–ऋचा २.]

सर्व' असें । वेद बोले याचि रसें । मंगलाचरणमिसें । गुह्य अनुभवही बोलतों. ॥ २५ ॥ आपणासि आपण नर । कल्पूनि दावी स्तंभाकार । हे ज्ञानकल्पना चराचर । तरीच अतर्क्य ऐश्वर्य ॥२६॥ ऐसेंचि ऐश्वर्याविण । व्यर्थ[1] जगत्कल्पकपण । स्वप्न प्रपंच कल्पी आपण । मी आपणचि आपणासि ॥ २७ ॥ हस्ती जाला स्वयें । स्वयें पळे त्याच्या भयें । जगत्कल्पक निश्चयें । परी अनीश[3]॥२८॥ ऐसें ऐश्वर्य आणि ज्ञान । जागृतींत करी कल्पूनि ध्यान । परी त्यास न राहे अनुसंधान । विषयवासनेकरितां ॥ २९ ॥ प्रपंच मिथ्या कळला । जरी परमार्थीं वळला । तरी देह आहे खवळला । प्रारब्धकर्में ॥ ३० ॥ जरी बाणलें ध्यान । क्षुधा तृषा ओढी मन । ऐशास विश्वकल्पनानुसंधान । राहेल कैसें ? ॥ ३१ ॥ तुझें अनादि वैराग्य[2] । ज्याच्या लवलेशें आह्मी सभाग्य । त्या वैराग्यें तुज योग्य । करणें कल्पना प्रपंचाची ॥ ३२ ॥ प्रथम संकल्पापासूनि । जों ब्रह्म परार्धें[3] दोन्ही । सृष्टिस्थितिसंहार कल्पूनि । अससी नव्हसी विक्षिप्त[4] ॥ ३३ ॥ एवं ऐश्वर्यहेतुज्ञान । जें जगत्कल्पनारूप चिंतन । त्यास हेतु वैराग्यसंपन्न । स्वतःसिद्ध ॥ ३४ ॥ देवा ! हे आमुची बुद्धि । कीं याकरितां त्याची सिद्धि । स्वतःसिद्धा शक्ति प्रसिद्धि । ऐसी तुझी निगमांत[5] ॥ ३५ ॥ तुज वैराग्यगुण । कल्पावया हेतु हे खूण । तूं तों स्वतःसिद्ध निपुण । सर्वेश्वर ॥ ३६ ॥ आतां वैराग्यही हेंचि जग । रज्जूस न वाटे साच भुजंग[6] । सुवर्णास वासना नग । न उपजवी आपुली ॥ ३७ ॥ प्रपंच वाटता सत्य । तरी वासना उपजती अगत्य । तूं सत्य कल्पिसी असत्य । स्वतःसिद्ध ऐसें वैराग्य ॥ ३८ ॥ ज्यास ठाउकी शुक्ति[7] । त्यास मिथ्या रजतीं[8] विरक्ति । तें रुपेंचि विरक्ति ऐशी युक्ति । कीं जें न उपजवी अनुराग[9] ॥ ३९ ॥ वैराग्य नाशी अनुराग । अनुराग नाशी विराग[10] । रागनाशक मिथ्या भाग । वैराग्य तुझें हें विश्व ॥ ४० ॥ धर्मं[11] तेथें वैराग्य । वैराग्यें ज्ञान ऐश्वर्य भाग्य । तो धर्म तुज असणें योग्य । हें बुद्धिवैभव आमचें ॥ ४१ ॥ लक्षूनि आमुच्या बुद्धी । वेद सांगे तुझ्या स्वतःसिद्धी । निगमागमीं[12] तुझी प्रसिद्धी । आम्हांनिमित्त ॥ ४२ ॥ मुख्य धर्म समता[13] दया । हे दोन्ही तुझे गुण अव्यया[14] ! । कर्मानुरूपें देवराया ! । फळें हरिती वैषम्यें

---

१. असमर्थ. २. हें सहा गुणांतील तृतीय गुणाचें विवरण होय. ३. दोन परार्धें—ब्रह्मदेवाचा आयुष्यकाल. ४. विक्षेपरहित. ५. वेदांत. ६. साप. ७. शिंपी. ८. रजत=रुपें. ९. प्रीति, वासना. १०. वैराग्य. ११. हें सहा गुणांतील चतुर्थ गुणाचें विवरण होय. १२. वेदशास्त्रांत. १३. सर्वांच्या ठिकाणीं सारखा भाव. १४. अविनाशी.

॥ ४३ ॥ दया समान सर्वांवरी । मेघ सर्वत्र वृष्टि करी । [1]जो जैशीं बीजें पेरी । तैशीं फळें तो पावे ॥ ४४ ॥ ज्यां ज्यांस जे जे प्रीति । ते ते तदर्थ कर्में करिती । फळ तें तें त्यां त्यांप्रति । देसी देवा! ॥ ४५ ॥ सकामास देसी काम । [2]मुमुक्षूस [3]कैवल्यधाम । देऊनि मोक्ष आत्माराम । ऋणी म्हणविसी भक्तांचा ॥ ४६ ॥ समर्थ तूं अव्यया! । मुक्ति सकळां द्यावया । आणि नेदिसी कां सदया! । हें निर्दयत्व एथें उडालें ॥ ४७ ॥ [4]मुमुक्षा जया तया मुक्ति । [5]बुभुक्षा तया देसी [6]भुक्ति । इच्छित फळें दे तुझी व्यक्ति । गुण हा कल्पवृक्षाचा ॥ ४८ ॥ ऐसा दयाळू आणि सम । हाचि तुझा स्वतःसिद्ध धर्म । तो धर्मही जगचि हें वर्म । [7]देवाधिदेवा! ॥ ४९ ॥ धर्म दिसे दों रूपें । फलरूपें कीं कर्मस्वरूपें । फलबंध तुझ्या चरणप्रतापें । कर्में अर्पिती नसे त्यांला ॥ ५० ॥ तुज कैंचें धर्मफळ । धर्ममात्र असे केवळ । यज्ञादि रूपें [8]प्रांजळ । दिसे जैसा [9]याज्ञिकांचा ॥ ५१ ॥ तेव्हां जगचि तुझा धर्म । हेंचि समत्व दयालुत्व कर्म । वांछानुरूप प्रातिक्रम । वैषम्य न दिसे ॥ ५२ ॥ अन्नसत्रीं अन्नें नाना । परी आवडे जें ज्याच्या मना । तें तेंच त्या त्या जना । वाढिती अन्न ॥ ५३ ॥ ऐसें अन्नसत्र वसे । तेचि दातयाची समता दिसे । एवं जगचि धर्म असे । [10]भगवच्छब्दवाच्याचा ॥ ५४ ॥ एवं जगचि मुक्तांची मुक्ति । जगचि विषयासक्तांची [11]भुक्ति । समता दयारूपें [12]अभिव्यक्ति । जगचि तुझ्या धर्माची ॥ ५५ ॥ तुझें धर्मरूप जग । दोरीं जैसा भुजग । तो दोर स्वयें [13]उपासक मग । वेगळेपण कैंचें भक्तासि? ॥ ५६ ॥ आतां जेथें धर्म तेथें [14]यश । तेव्हां जगचि तव यशलेश । कीं सम दयाळू [15]हृषीकेश । जगचि ऐसें गर्जतें ॥ ५७ ॥ यावेगळे जे जे गुण । ते यशचि ऐशी खूण । त्या गुणांसहित निपुण । देखती जगचि यशारूपें ॥ ५८ ॥ आतां [16]श्री नामही यशाचें । श्री वेंचूनि यश साधिती साचें । श्री आणि यश [17]परमपुरुषाचें । हेंचि जग ॥ ५९ ॥ दोरीं जैसा भुजग । कीं सुवर्णामाजी नग । तैसें ब्रह्मीं जग । मायामात्र ॥ ६० ॥ [18]साकारलें ब्रह्म सगुण । माया लक्ष्मी जाली आपण । अधिष्ठानीं माया तैशी

---

१. हे शेवटचे दोन चरण सुभाषितरूप होत. २. मोक्षेच्छु. ३. मुक्तिसदन. ४. मोक्षाची इच्छा. ५. खाण्याची इच्छा. ६. अन्न. ७. मुख्य देव. ८. शुद्ध. ९. कर्मठांचा धर्म. १०. भगवंताचा, भगवत् या शब्दानें जो बोलिला जातो त्याचा. ११. भोग. १२. प्रकटपण. १३. भक्त, भजक. १४. हें पंचम गुणाचें विवेचन होय. १५. हृषीक+ईश=इंद्रिय+स्वामी=जितेंद्रिय. (विष्णु. कृष्ण.

निपुण । [1]श्रीधर हृदयीं धरी तीस ॥ ६१ ॥ [2]चित्समुद्रीं मायातरंगा । ते श्री-हृदयीं अंतरंगा । चित्समुद्रा श्रीरंगा! । हृदयीं श्री यापरी ॥ ६२ ॥ एवं माया विश्वरूपें । ते श्री धरिली [3]चित्स्वरूपें । जैशी धरी शुक्ति रुपें । श्री-धरें धरिली श्री तैशी. ॥ ६३ ॥ ऐसा तूं षड्गुण । विश्व तुझे साही गुण । भगवच्छब्दवाच्य विश्वस्फुरण । निजात्मपण याकरितां ॥ ६४ ॥ एवं भगवच्छ-ब्दवाच्य जग । आत्मरज्जूमाजी भुजग । हा भगवदैक्याचा योग । दिधला तुवां भगवंता! ॥ ६५ ॥ जीवत्व आढळे प्रारब्धयोगीं । विश्वात्मत्व या भाग-वतयोगीं । हे तुझी कृपा ईस उपयोगी । **भगवद्गीता** ॥ ६६ ॥ त्या **गी**तेचा अर्थ । तोचि परमार्थ । जिचा वक्ता तूं समर्थ । परमात्मा भगवंत ॥ ६७ ॥ परी अजी भगवंत जी! । या कलियुगामाजीं । जो तो [4]**गी**तार्थ योजी । मता-नुरूप ॥ ६८ ॥ जे योजिती निर्गुणपर । त्यांस सगुणीं अनादर । सगुणींच योजिती जे नर । ते नेणती निर्गुणत्व ॥ ६९ ॥ दोहींत केवळ सगुणवादी । त्यांची निष्ठा अखंड भेदीं । जयांचें भजन वर्णिलें वेदीं । पशुतुल्य ॥ ७० ॥

श्रुति—**अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुः ॥**

श्रुत्यर्थ—देव अन्य मी अन्य । ऐसा भेद अन्योन्य । दाटूनि आणिती [5]जैघन्य । त्यांस ही श्रुति निंदिते ॥ ७१ ॥ म्हणोनि ते केवळ निषिद्ध । निर्गु-णवादी ज्ञानी प्रबुद्ध । जे आत्मा निर्गुण स्वतःसिद्ध । अनुभविती ॥ ७२ ॥ जे सर्वथा मानिती वेद । जे निषेधिती समूळ भेद । जे हरिती खेद । [6]कांड-त्रयाचा ॥ ७३ ॥ चित्तशुद्धीकारणें कर्म । ईश्वरप्रसादार्थ [7]उपासनाधर्म । ज्ञानकांडीं निर्गुण ब्रह्म । अनुभविती आत्मत्वें ॥ ७४ ॥ परंतु त्यांचें मत । जों आत्मा कळे निश्चित । तोंवरीच उचित । सगुणोपासना ॥ ७५ ॥ आणि भगवंता! तुझें मत । कीं निर्गुणात्मक अद्वैत । कळोनि माझे चरणीं रत ।

---

१. लक्ष्मीपति, कृष्ण. 'भूतांची जननी जी लक्ष्मी तिजला उरींच वाहतसे । यास्तव कविजन म्हणती 'श्रीधर' ऐसेंच नाम त्यास असे. ॥' [नामार्थदीपिका–पृष्ठ ६९ गीति १०.] २. चैतन्यसागरांत. ३. चैतन्यस्वरूपानें. ४. गीता ग्रंथ इतका सुप्रसिद्ध आणि प्रिय झालेला आहे कीं याजवर बुद्धिसर्वस्व खर्चून अनेक प्राचीन पंडितांनीं अनेक टीका लि-हिल्या आहेत, व त्यांत परस्पर भिन्न मतांचें प्रतिपादन केलें आहे. ५. अधम. ६. कर्म, उपासना आणि ज्ञान, अशीं तीन कांडें. ७. भक्तिधर्म.

भक्त सकळांत तो थोर ॥ ७६ ॥ ऐसें **गी**तेंत जेथें । ते वाखाणिती विपरीत तेथें । पूर्वापर विचारितां एथें । **गी**ता न साहे तो अर्थ ॥ ७७ ॥ ते तों परम सर्वज्ञ । त्यांस बोल ठेवी तो अज्ञ । तरी कां बोलती ऐसें अभिज्ञ[1] । विरळ समजे हें तत्व ॥ ७८ ॥ श्रीगुरुरूपें देवा ! । मज भेटलासि **वा**सुदेवा ! । तैं हें रहस्य देवाधिदेवा ! । बोलिलासी ॥ ७९ ॥ तुझीं वचनें तुजप्रति । यालागीं बोलतों **श्री**पति[2] ! । कीं श्रोते तुझ्याच मूर्ति । तूं विश्वरूप भगवंत ॥ ८० ॥ कलियुगीं प्रबळले बौद्ध[3] । वेद जाले असिद्ध । ते क्षीणबल होतां प्रसिद्ध । जालीं मतें भेदाश्रितें ॥ ८१ ॥ प्रत्यक्षवादी[4] चार्वाक[5] । ज्यांच्या मतें न स्वर्ग नरक । न कर्मभोग तेव्हां फलदायक । जगदीश कैंचा ? ॥ ८२ ॥ ज्यांच्या मतें वेद असिद्ध । त्यांशीं वाद वेदसिद्ध । न करवे म्हणोनी प्रसिद्ध । तर्कशास्त्र जालें ॥ ८३ ॥ आपला एक सिद्धांत धरावा । तेव्हां वादियांशीं वाद करावा । अन्यथा त्या वादास पराव[6]ा । वितंडवाद म्हणेल ॥ ८४ ॥ स्वसिद्धांत बोलावा अभेद । तरी तो न साधे विना वेद । यालागीं सिद्धांत आपुला भेद । तार्किकें[7] **गौ**तमें[8] धरिला ॥ ८५ ॥ कार्यापुरते नृपती । शत्रुहि घडि एक हातीं धरिती । तथापि अंतरीं चिंतिती । घात त्याचा ॥ ८६ ॥ दुःखबीजें एकवीस । **गौ**तम म्हणे त्यांचा ध्वंस[9] । तोचि मोक्ष तरी हे परमहंस[10] । अद्वैतानुभवीही मानिती

---

१. ज्ञानी. २ भगवान्, कृष्ण. “सोडुनि सर्वां देवां वरिती झाली जया उदधितनया । यास्तव कविजन म्हणती ‘**श्री**पति’ लोकीं असेंच नाम तया. ॥३॥ जीस पराशक्ति असें म्हणती तीचा असे प्रसिद्ध पती । त्या मायापतिला कवि लोकांत ‘**श्री**पती’ असें म्हणती. ॥४॥” [नामार्थदीपिका–पृ० ६८.] ३. बुद्धमतानुसारी जन, वेदप्रतिपाद्य धर्माचा निषेध करणारे जन. ४. प्रत्यक्ष आहे तेंच खरें व दुसरें खोटें असें म्हणणारे. ५. चार्वाक=नास्तिकमतवादी पंडित. [चारुः लोकसंमतो वाको वाक्यं यस्य स चार्वाकः.) चार्वाकमताचें विवेचन ‘सर्वदर्शनसंग्रहांत’ पहा. या दर्शनांतील मुख्य मत असें कीं, स्वर्ग नाहीं, मोक्ष नाहीं, देह हाच आत्मा, तो विनाशी आहे. यांस प्रमाणचतुष्टयापैकीं प्रत्यक्षप्रमाण मात्र मान्य आहे. चार्वाकमतानुयायी नास्तिक आहेत. मरेपर्यंत मनुष्यानें खुशाल वसून कर्ज काढून यथेच्छ गोड गोड खावें, कारण स्मशानांत देहाचें एकदां भस्म झालें म्हणजे हा पुनः कोठून मिळणार ? यांस ‘लोकायतिक’ असें दुसरें नांव आहे. ६. परका. ७. तर्कशास्त्रज्ञें. ८. गौतममतानुसारी जनें. गौतम हा न्यायशास्त्राचा प्रतिपादक मुनि होय. एकंदर सहा शास्त्रें अथवा दर्शनें आहेत. यांस षड्दर्शन असें म्हणतात. सांख्य (कपिलकृत), योग (पतंजलिकृत), न्याय (गौतमकृत), वैशेषिक, (कणादकृत), मीमांसा (पूर्वमीमांसा–जैमिनिकृत) आणि उत्तरमीमांसा (वेदांत–व्यासकृत). ९. नाश. १०. परमहंस=तपाकरितां ज्यानें इंद्रि-

॥ ८७ ॥ जीवांस अखंड ब्रह्मत्व । ब्रह्मचि मोक्षसुख हें तत्व । दुःखनाशें मुक्तत्व । अद्वैतसिद्धांतही ऐसा ॥ ८८ ॥ एवं अंतरीं अद्वैत । बहिरंग कार्यार्थ धरिलें द्वैत । अगत्य वेदविरुद्ध मत । खंडावया ॥ ८९ ॥ परी हें नेणती लोक । गोड वाटती गौतमतर्क । म्हणुनि ते अद्वैतअर्क[1] । न पाहती जाले दिवांध[2] ॥ ९० ॥ श्रद्धा उपजली वेदीं । परंतु जाले कुतर्कवादी । तेही वळले अभेदीं । जसे तसे ॥ ९१ ॥ कळलियाही निर्गुण । मागुतीं भजावा सगुण । ऐसें बोलतां ते तर्कनिपुण । हांसती शास्त्रासीं ॥ ९२ ॥ कीं संसार स्वप्न ज्यांच्या मतें । निर्गुणात्मा ओळखिला जागृतें । पुन्हा मायिक सगुणभक्ति त्यांतें । कां बोलती ? ॥ ९३ ॥ आतां सांगावें त्यांस सार । कीं कळलें जरी निर्विकार । तरी मन झालें पाहिजे तदाकार । या निमित्तें सेव्य गुरुदेव ॥९४॥ निर्गुणात्मा कळल्यावरी । गुरुदेवाची भक्ति करी । तेव्हां अपरोक्ष[3] बरवेपरी । बिंबे हें तों श्रुतिसिद्ध ॥ ९५ ॥

श्रुति—**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥**

श्रुत्यर्थ—श्रुति म्हणे देवाची भक्ति । तैशीच गुरुचरणीं अनुरक्ति[4] । तेव्हां त्या गुरुच्या उक्ति । प्रकाशती याला ॥९६॥ कीं ब्रह्म ओळखे बुद्धि । मग गुरुदेवभक्तीनें स्थैर्यसिद्धि । करावी या रहस्याची[5] प्रसिद्धी । जेव्हां त्यास ॥ ९७ ॥ तेव्हां कठिण वाटोनि मुक्ति । या शास्त्रीं न धरितील अनुरक्ति । म्हणोनि निर्गुण कळे तोंचि भक्ति । शास्त्रकार म्हणती सगुणाची ॥ ९८ ॥ परंतु भाव ऐसा चित्तीं । कीं जे निर्गुणात्मत्व समजती । ते गुरुदेवाची प्रीति । धरितीलचि अत्यंत ॥ ९९ ॥ साकरेच्या औषधीं । रोगनिवृत्तीचीच[6] अवधी । गोड म्हणोनि निरोगीही कधीं । न सोडी साकर ॥ १०० ॥ अमर जाले अमर । तरी पिति अमृत सादर । न सांगतांही हा प्रकार । जीवन्मुक्तही[7] करतील ॥ १०१ ॥ एवं मूर्खसमजावणीकारणें[8] । अगत्य लागलें अंगीकारणें । कीं निर्गुण कळल्या सगुण । कां भजावें ? ॥ १०२ ॥ कीं शास्त्राचा आरंभकाळ । ऐसाच होता

---

यदमन केलें असा संन्यासी. कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस असे भिक्षुजनाचे चार प्रकार आहेत. एकापेक्षां दुसरा, दुसऱ्यापेक्षां तिसरा श्रेष्ठ, असा यांच्या माहात्म्याचा अनुक्रम आहे. ['चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचकबहूदकौ । हंसः परमहंसश्च यो यः पश्चात् स उत्तमः ॥.']

१. अर्क=सूर्य. २. घुबड. ३. प्रत्यक्ष. ४. प्रीति. ५. गुप्त गोष्टीची. ६. रोगाचा परिहार करण्याची. ७. देहांत असून मुक्त. ८. मूर्खांचें समाधान. हा समास चिंतनीय आहे.

कीं लोक सकळ । कुतर्कवादी प्रबळ । जसे तसे आणावे सन्मार्गी ॥ १०३ ॥ हें न कळूनि अंतरंग । शब्दज्ञानीं जे बहिरंग । त्यांस भजनत्यागप्रसंग । प्राप्त जाला ॥ १०४ ॥ जडनिषेधें चैतन्य । इतकेंचि कळतां मानिती धन्य । मनांत थारा जघन्य[1] । विषयवासनेचा ॥ १०५ ॥ सगुणाची अद्वैतभक्ति । करितां पूर्वील विषयविरक्ति । दृढ होतां होय मुक्ति । हें शब्दज्ञानी नेणती ॥ १०६ ॥ पिसाटाच्या करीं कोलित । तैसें त्यांस शास्त्रसंमत । परी त्यांचा अंतरंग सिद्धांत । न कळे त्यांला ॥ १०७ ॥ पशूंस पाजावया पाणी । वडिलीं कूप खारवणी[2] । केला म्हणोनि गोडवणी । न प्यावें काय? ॥ १०८ ॥ असो ते प्रस्तुत शास्त्रवाणी, । ऐसी अर्जी! चक्रपाणी[3]! परी मी न पीं तें क्षार पाणी । वडिलीं केलें म्हणोनि ॥ १०९ ॥ भवद्रुमातें[4] छेदी शस्त्र । ऐसें तुझें गीताशास्त्र । त्याची दाविती पाठ मात्र । धार लपविती ये रीती ॥ ११० ॥ खड्गास मुख्य पाणी । तैशी भक्तिपर तुझी वाणी । गीतेच्या[5] अंतीं चक्रपाणी! । ऐसेंचि बोलिलासि ॥ १११ ॥

**'य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**

**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयम् ॥'**[6] [गीता–अ० १८ श्लो० ६८]

ज्ञान भक्ति वैराग्य । गीतेंत तिन्ही यथायोग्य । त्यांत भक्ति जो सभाग्य । थोर करूनि सांगे ॥ ११२ ॥ गीतासिंधुमथन । करूनि भक्तिसुधेचें कथन । थोर करूनि सांगे जो जन । तो अनायासें मज पावे. ॥ ११३ ॥ याहूनि पुढील श्लोक[7] । त्यांत म्हणसी तूं उत्तमश्लोक[8] । कीं तैसा पाहतां त्रिलोक । प्रिय

१. नीच. २. खाराशीं मिश्रित असें पाणी, गोडवणी=गोडाशीं मिश्रित असें पाणी. [अशीं अन्य उदाहरणें:—चिंचवणी, गुळवणी, पेजवणी, मिठवणी.] ३. कृष्ण. 'चक्रपाणि' हें तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहिसमासाचें उदाहरण आहे. ज्या वर्णिलेल्या गुणाचें संविज्ञान (चिन्ह, खूण) ज्याच्या विशेष्यांत नित्य सांपडतें तो 'तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि' समास होय. येथें हातांत चक्र असणें हा जो गुण सांगितला तो कृष्ण या विशेष्यांत नित्य आढळतो. बहुव्रीहि समासाच्या दुसऱ्या प्रकारास 'अतद्गुणसंविज्ञान' असें म्हणतात. ४. संसाररूप वृक्षातें. ५. अठराव्या अध्यायाच्या ६८ व्या श्लोकांत. ६. जो हें परम गुह्य माझ्या भक्तांना कळवील, तो माझ्या ठायीं दृढ भक्ति करून मलाच येऊन मिळेल, यांत कांहीं संशय नाहीं. ७. 'न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः । भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥' त्यापेक्षां माझ्या अधिक आवडीचें कृत्य करणारा असा सर्व मनुष्यांमध्यें कोणीही नाहीं, व असा पृथ्वीवर दुसरा कोणीही पुरुष होणार नाहीं. [गीता–अ० १८ श्लो० ६९.] ८. उत्तम आहे श्लोक (यश) ज्याचें तो. श्लोक=(१) पद्य (२) यश, असे दोन अर्थ आहेत.

ज्याला न होईल. ॥ ११४ ॥ कोणी येथें आणिक अर्थ । करिती तो नव्हे समर्थ । पुढें विशद[1] होणार एथें व्यर्थ । ग्रंथ कां जी! वाढवूं? ॥११५॥ कोण्या मिसें तरी कोणी । गीतार्थ अन्यथा[2] वाखाणी । मज नावडे ती[3] थोरांचीहि वाणी । काय करूं जी! श्रीकृष्णा! ॥ ११६ ॥ संसारच्छेदक सार । गीताशास्त्राची भक्तिधार । ते झांकूनि नुसतें निराकार । मात्र दाविती. ॥ ११७ ॥ जडदेहनिषेधें निराकार । आत्मा कळला हा प्रकार । [4]व्यतिरेकज्ञान प्रथम विचार । हाचि [5]आत्मज्ञानाचा. ॥ ११८ ॥ उरला प्रपंच देहासहित । हें जड भ्रांतिरूप द्वैत । तेंही ब्रह्मचि कळतां अद्वैत । [6]तत्त्व आलें अनुभवा. ॥ ११९ ॥ जडचैतन्यविवेक । या ज्ञानाचें नांव [7]व्यतिरेक । जडीं अनेकीं पाहणें एक । अन्वयज्ञान या नांवें. ॥ १२० ॥ तें कळतां जग । आत्मरज्जूंत होय भुजग । तथापि आत्मसुवर्णीं नाना [8]नग । श्रुति ऐसें वर्णिती. ॥ १२१ ॥ कीं रज्जू कळलियाउपरी । सर्प दिसों नये वरी । [9]जीवन्मुक्तास तरी । प्रपंच दिसतो. ॥१२२॥ जरी दिसे यथापूर्व जग । तरी सोनेंचि नुसतें जैसे नग । सुवर्णयाचकास [10]उबग । कां आकाराचा येईल? ॥ १२३ ॥ एवं प्रपंच दिसे । तथापि ब्रह्मचि असे । सगुणभक्ति [11]समरसे । ते या प्रकारें. ॥ १२४ ॥ [12]ब्रह्मविद्येचें वैभव । ऐसा सगुणभक्तीचा अनुभव । गीतेंत थोर हा भक्तिभाव । सर्वत्र असे वर्णिला. ॥ १२५ ॥ ऐसें ब्रह्म तेंचि सगुण । ऐसा ज्ञाननिष्ठ भक्त निपुण । भगवंत भागवत ऐशी खूण । जेथें वेगळी न सांपडे. ॥ १२६ ॥ सगुण ब्रह्म [13]चराचर । गीतेंत या ज्ञानाचा आदर । म्हणूनि 'धर्म्य'पद वारंवार । या ब्रह्मज्ञानीं योजिलें. ॥ १२७ ॥

**'[14]प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ।'** [गीता–अ० ९ श्लो० २.]

---

१. स्पष्ट. २. भगवताचा मूळ उद्दिष्ट अर्थ आहे त्याहून भिन्न अशा अर्थाचें प्रतिपादन करतो. ३. गीतेवर व्याख्या लिहिणाऱ्या महापंडितांची. ४. जडचैतन्यविवेक. ५. आत्म्यास जाणण्याचा. ६. सार. ७. निराळेपणा, भिन्नपणा. ८. अलंकार. ९. देहांत असून मुक्त. १०. कंटाळा. ११. ऐक्यभाव पावते. १२. आत्मज्ञानाचें. १३. स्थावरजंगमात्मक जग. १४. 'राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥' सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ अशी विद्या, आणि सर्व गुह्यांमध्यें श्रेष्ठ असें हें गुह्य आहे. हें परम पवित्र, याचें फळ प्रत्यक्ष, हें धर्माला साधक, सुखानें आचरण्याजोगें, आणि अक्षय्य आहे.

**'ये[1] तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।'** [गीता–अ० १५ श्लो० २०.]
**'अध्येष्यते[2] च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।'** [गीता–अ० १८ श्लो० ७०.]

एवं ऐसें 'धर्म्य'पद । **भ**गवान् बोले प्रतिपद । याचा अर्थ विशद[3] । न बोलती कोणी. ॥ १२८ ॥ निर्धर्म म्हणजे निर्गुण । सधर्म म्हणजे सगुण । 'धर्म्य'–पदें दावी खूण । विश्वात्मज्ञानाची. ॥ १२९ ॥ पुढें होईल विशद । जे जे ठायीं 'धर्म्य'पद । हें मंगलाचरणीं **कृ**ष्णपद । स्मरतां आठवे समग्र **गी**ता. ॥१३०॥ याकारणें जी! **भ**गवंता!। यथास्थित हे तुझी **गी**ता । वाखाणावी म्हणोनि होता । बहुतकाळ संकल्प. ॥ १३१ ॥ आणि तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य संत भक्त योगी । ते म्हणती कीं जगदुपयोगी । ऐसी टीका करावी. ॥ १३२ ॥ परंतु **दे**वकीनंदन । जेव्हां देईल अनुमोदन । तेव्हांच करूनि त्यातें वंदन । करीन पोटीं हा भाव. ॥ १३३ ॥ तें अनुमोदन भिन्नत्वें असेना । हृदयीं दाटली **गी**तार्थरचना । बुद्धि[4]प्रेरकाची मना । तेचि आज्ञा वाटली. ॥ १३४ ॥ आत्माचि तूं निखिल[5] । जो बुद्धि प्रकाशी निर्मळ । टीकारंभीं केवळ । तेचि आज्ञा वाटली. ॥ १३५ ॥ करूनि तुझें स्मरण । ध्यानीं चिंतूनि चरण । आरंभिलें मंगलाचरण । प्रथम ओंवी [6]संस्कृत. ॥१३६॥ विश्वरूपें करूनि स्मरण । भगवत्पदें मंगलाचरण । सात ओंविया होतां पूर्ण । आरंभिली ओंवी [7]आठवी. ॥ १३७ ॥ ओंवी लिहितां आठवी । तुज गुरुरूपें आठवीं । यतिरूपीं स्मरतां [8]आठवी । अवतारमूर्ति दीससी. ॥ १३८ ॥ करीं [9]वागोरे सारथीं । बैसला **अ**र्जुनाचे [10]रथीं । तोचि **वा**मनमनोरथीं । टीका करितोसी **गो**विंदा! ॥ १३९ ॥

---

१. 'ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥' पण जे माझ्या ठायीं श्रद्धा ठेवून, आणि मी हेंच सर्वस्व मानून, अमृतासारखा हितकारक असा हा धर्म मीं सांगितल्याप्रमाणें भक्तीनें आचरितात, ते मला अत्यंत प्रिय होत. २. 'अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥' धर्माला अनुकूळ असा जो आमचा दोघांचा संवाद त्याचें जो कोणी योग्य रीतीनें मनन करील त्यानें ज्ञानरूप यज्ञानें माझें यजन केलें असें मी समजतों. ३. उघडा. ४. ईश्वराची. ५. सर्व. ६. 'जय जय भगवन् वासुदेव' ही पहिली ओंवी. ७. 'जी श्रीसच्चिदानंदगुरु' ही आठवी ओंवी पहा. ८. कृष्ण. श्रीकृष्णावतार हा आठवा होय. ९. वागोरे=दोरे, वागुरा, लगाम. १०. विष्णूनें कृष्णावतारीं स्वभक्त जो अर्जुन त्याचें सारथ्य केलें ही कथा पुराणांत सुप्रसिद्ध आहे. पंतांनीं ही कृष्णाची मोतद्दारी अनेक स्थळीं वर्णिली आहेः—(१) 'असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी' (केकावली ७), (२) 'अर्जुनतुरंगमातें जो स्वकरानें करी खरारा जी! । श्रीकृष्ण काय बहुधा निजपददासांसि जो खरा राजी. ॥'

तूंचि लेखणी तूंचि मसी । तूं पत्र विचित्रपदें होसी । तूंचि अर्थ भावार्थ स्फुरसी । तूंचि ऐसा अनुभव. ॥ १४० ॥ तूंचि [२]वामनरूपें दीससी । [३]त्रिविक्रम तूंचि अनुभवीं होसी । स्फुरोनि विश्वरूपें उरसी । अनंतत्वें सर्वदा. ॥ १४१ ॥ हेंचि तुझें मंगलाचरण । आतां स्मरोनि तुझे चरण । गीतार्थाचें विवरण । करीन तुझ्या प्रसादें. ॥ १४२ ॥

---

### गीतारंभ.

धृतराष्ट्राचे पुत्र शत । पांच पांडूचे सुत । सैन्य मेळवून बहुत । झगडों पाहती कुरुक्षेत्रीं. ॥ १४३ ॥ धृतराष्ट्र [४]हस्तिनापुरीं । अंध म्हणूनि राहिला घरीं । त्यास वर्तमान श्रुत करी । संजय शिष्य व्यासाचा. ॥ १४४ ॥ संजयाकारणें ऐसें । त्यास सामर्थ्य दिधलें व्यासें । कीं दों सैन्यांत जें जैसें । वर्तेल तें कळावें तयास. ॥ १४५ ॥ धृतराष्ट्र संजया । प्रश्न करी हे जनमेजया ! । वै[६]शंपायन वदे तेथूनि या । आरंभ भगवद्गीतेचा. ॥ १४६ ॥ व्यासशिष्य वैशंपायन । जनमेजय परीक्षितीचा नंदन । तो त्यास म्हणे संजयाप्रति प्रश्न । करितो राजा धृतराष्ट्र. ॥ १४७ ॥

---

(३) 'हरिजन हो ! हरि करितो आंगें तुमची बरीक सेवा जी । धुतले धनंजयाचे केवळ अश्लाघ्य परि कसे वाजी. ॥' [महद्विज्ञापना.] (४) 'ज्याच्या श्रीपददास्यें पावे तोखा सदा रमा जाया । हरितो मना नराच्या होउनि तो खासदार माजाया. ॥' [द्रोणपर्व—अध्याय १४.] याच प्रकारचें वर्णन इतर कवींच्या ग्रंथांतही आढळतें.

१. शाई. २. विष्णूचें बटुरूप अथवा स्वयें वामनपंडित. ३. विष्णूचें त्रैलोक्यव्यापी रूप. ४. गजपुरी. यालाच 'हस्तिनापुर', 'नागपुर' अशीं अन्य नांवें आहेत. हें शहर पुरुकुलोत्पन्न हस्तिराजा यानें वसविलें, म्हणून यास 'हस्तिनापुर' असें नांव पडलें. दुसरें असेंही आढळतें कीं अत्रिपुत्र सोम हा अरण्यांत फिरत असतां, एका हत्तीला एका विहंगमानें उचलून नेलें असें त्यानें पाहिलें; तेव्हां त्या जाग्यावर त्यानें एक शहर वसवून त्याला या चमत्कारस्मरणार्थ 'हस्तिनापुर' असें नांव दिलें. हें शहर विद्यमान मिरत शहराच्या पूर्वेस गंगाकांठीं असावें असें विद्वानांचें अनुमान आहे. ५. भीष्मपर्व—अध्याय २ यांत व्यासानें संजयाला संगरवृत्त सांगण्याचा वर दिला असें वर्णन आहे. रणांगणीं घडलेली प्रत्येक गोष्ट संजयाला दूर राहून ताबडतोब वरप्रभावानें समजत असे व तो ती गोष्ट जशाच्या तशी धृतराष्ट्राला कळवी. ६. धृतराष्ट्रानें विचारलेले प्रश्न व त्याला संजयानें दिलेलीं उत्तरें हीं व्यासशिष्य वैशंपायन मुनि जनमेजय राजाला सांगतो असा कथोपक्रम आहे. वैशंपायन हा इतिहासनिवेदनपटु अशी याची ख्याति आहे.

धृतराष्ट्र उवाच—**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

**धृ**तराष्ट्र **अं**बिकापुत्र । म्हणे, '**सं**जया ! **कु**रुक्षेत्र[1] । धर्मपिकाचें परम क्षेत्रें[2] । उभय पक्ष **ते**थें मिळाले. ॥ १४८ ॥ युद्धाची अपेक्षा[3] मनीं । ऐसे दोन्ही पक्ष मिळोनी । **कु**रुक्षेत्रभूमी पावुनी । तेथें काय करिते जाले? ॥ १४९ ॥ त्यांत माझेच एक शैंत[4] । **दु**र्योधनादिक सर्वांस विदित । ते पांच **पां**डूचेहि सुत । होतीच कीं. ॥ १५० ॥ **कुं**ती **मा**द्री **पां**डूच्या स्त्रिया । जरी आणिकांपासूनि[5] गर्भ तयां । तरी अगा ! **सं**जया ! । **पां**डूचेचि म्हणोनि मानितों. ॥ १५१ ॥ त्यांत **ध**र्मराज **ध**र्मसुत[6] । तो धर्मीं अत्यंत रत । आणि **कु**रुक्षेत्र धर्माचें शेतें[7] । परी झगडूंच पाहे तो तेथें. ॥ १५२ ॥ आपण पांडूचे क्षेत्रज[8] । हें तों आपल्याच बापाचें बीज । धर्मक्षेत्रीं **ध**र्मगुज । सुचावें हें धर्मराया. ॥ १५३ ॥ धर्मतत्त्व ऐसें असोनि । युद्धाचीच इच्छा धरूनि । माझे आणि **पां**डूचे तेहि मिळोनि । करिते जाले काय सांग ?' ॥ १५४ ॥ या भावें **कु**रुक्षेत्र । त्यास म्हणे **ध**र्मक्षेत्र । 'मामका एव' म्हणिजे माझेच पुत्र । '**पां**डवाश्च' म्हणजे **पां**डूचेही. ॥ १५५ ॥ भावार्थ विशद[9] ऐसा जाला । तो या श्लोकामध्येंच निघाला । पाल्हाळ[10] पदरचा नाहीं घातला । पदें योजूनि पाहणें. ॥ १५६ ॥ 'जिकडे **कृ**ष्ण तिकडे जय । श्री नीति धर्म अव्यय[11]' । उत्तर देईल ऐसें **सं**जय । श्लोकीं [12]अंतीं **गी**तेच्या. ॥ १५७ ॥ प्रस्तुत दोन्ही पक्ष मिळाले । प्रश्न कीं, 'ते काय करिते जाले ?' । त्याचेंचि उत्तर बोले । **सं**जय. ॥ १५८ ॥

संजय उवाच—**दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

[13]व्यूहरचनेनें रचलें । तें **पां**डवांचें सैन्य देखिलें । देखोनि **दु**र्योधनें काय

---

१. कुरुक्षेत्राचा समावेश ब्रह्मर्षि देशांत केलेला आढळतो. [मनु० अ० २ श्लो० १९.] कौरवपांडवांचें घोर युद्ध याच ठिकाणीं झालें. २. शेत. ३. इच्छा. ४. शंभर पुत्र. ५. इंद्रादिदेवांपासून. ६. यमधर्माचा पुत्र. ७. कुरुक्षेत्राला देवयजन (देवांची यज्ञभूमि) असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे यावरून याची पवित्रता समजते. ८. क्षेत्रज=क्षेत्रापासून (पत्नीपासून) ज (झालेले). ९. उघड. १०. या विधानावरून वामनपंडितांनीं गीतेवरील टीका कोणत्या धोरणानें रचिली हें समजतें. ११. अविनाशी ब्रह्मस्वरूप. १२. 'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥' गीता अ० १८ श्लो० ७८. मला निश्चयेंकरून वाटतें कीं, जेथें योगेश्वर कृष्ण, आणि जेथें धनुर्धारी अर्जुन, तेथेंच राज्यलक्ष्मी, तेथेंच विजय, तेथेंच उत्तरोत्तर उन्नति, आणि तेथेंच न्यायनीति ही गोष्ट निश्चित आहे. १३. व्यूह=सैन्यरचनाविशेष.

केलें ? । संजय म्हणे तें आइक. ॥ १५९ ॥ तेव्हां , राजा दुर्योधन । द्रोणाचार्याप्रति हें वचन । जवळी येऊन भाव गहन । बोलता जाला. ॥ १६० ॥

**पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

अजी ! आचार्य ! मोठी हे । पांडुपुत्रांची सेना पाहें । व्यूहरचनेनें रचिली आहे । तुझ्याच शिष्यें. ॥१६१॥ जी ! तुमचा शिष्य परी । तुम्हांपरीस शहाणा भारी । हा भाव धरूनि अंतरीं । बुद्धिमंत म्हणे द्रुपदपुत्र. ॥ १६२ ॥ कीं तुमच्या वधालागीं वैरी । द्रुपदपुत्र उत्पन्न करी । तो तुमचेच पाय धरी । विद्या सांगा म्हणोनि. ॥ १६३ ॥ तो बुद्धिमंत म्हणे द्रुपदपुत्र । तुम्ही शहाणे नव्हां [1]अणुमात्र । कीं आपला मृत्यु तो [2]पात्र । केला शस्त्रास्त्रविद्येशीं. ॥१६४॥ भाव कीं या महत्कार्या । क्षणीं ऐसाच आचार्या ! । असावध होसी गुरुवर्या ! । म्हणोनि [3]व्यंगोक्ति बोलतों. ॥ १६५ ॥ आतां तरी सावध राहें । म्हणोनि म्हणतों हे वीर पाहें । कीं बहुतेक जो तो आहे । महारथी यांत. ॥ १६६ ॥

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**
**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥**
**युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

धनुष्यें ज्यांचीं थोर थोर । या सैन्यांत उभे समोर । ते भीमार्जुनांसमान शूर । या युद्धीं. ॥ १६७ ॥ [4]सात्यकी विराट द्रुपद । हाही महारथ विशद । तो तुझा वैरी दुर्मद । आचार्या! ॥ १६८ ॥ धृष्टकेतु चेकितान । काशीराज [5]वीर्याचें [6]निधान । पुरुजित् कुंतिभोज यांसमान । नरश्रेष्ठ हा शैब्यही. ॥१६९॥ युधामन्यु [7]विक्रमयुक्त । [8]उत्तमौजा वीर्यवंत । अभिमन्यु [9]द्रौपदीसुत । हे महारथी

---

१. किंचिन्मात्र. २. योग्य. ३. टोमणा देतों. ४. युयुधान. हा सत्यकाचा पुत्र असून कृष्णाचा सारथी असे. ५. पराक्रमाचें. ६. संग्रह, संचयस्थान. ७. शूर. ८. युधामन्यु आणि उत्तमौजा हे दोन राजे होते. ९. द्रौपदीच्या मुलांचीं नांवें—'प्रतिविंध्यः सुतसोमः श्रुतकीर्तिस्तथापरः । नाकुलिस्तु शतानीकः श्रुतसेनश्च वीर्यवान् ॥' [ आदिपर्व—अ० ६७ श्लो० २८.]

सकळही. ॥ १७० ॥ दहा सहस्र धनुर्धर । त्यांशीं झगडे एक वीर । शस्त्रास्त्रप्रवीण नर । तो **महारथ** बोलिजे. ॥ १७१ ॥ अगणितांशीं करी युद्ध । शस्त्रास्त्रविद्येनें समृद्ध । तो **अतिरथ** म्हणोनि प्रसिद्ध । या **महाभारतीं**. ॥ १७२ ॥ एकाशींच युद्ध करी । **रथी** म्हणावा यापरी । त्याहूनि उणा जरी । अर्धरथ. ॥ १७३ ॥ हें आइकोनि वीरें । ईणीं ब्राह्मण होय अधीर । म्हणूनि त्यास देतो धीर । वर्णूनि योद्धे आपले. ॥ १७४ ॥

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

आमचे तों विशिष्ट । वीर त्यांहूनि वरिष्ठ । तुज कळावया स्पष्ट । द्विजोत्तमा! सांगतों. ॥ १७५ ॥ माझ्या सैन्याचे पति । कळावे म्हणुनि तुजप्रति । सांगतों म्हणे कुरुचक्रवर्ति । द्रोणातें. ॥ १७६ ॥

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सोमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

तूं **द्रोण भीष्म कर्ण** । विजयी **कृप अश्वत्थामा विकर्ण** । तैसाच **भूरिश्रवा** वीर्यपूर्ण । पुत्र **सोमदत्ताचा**. ॥ १७७ ॥ हे थोर थोर सैन्याचे नायक । यांवेगळे शूर अनेक । तेही म्हणतो ऐक । **दुर्योधन द्रोणातें**. ॥ १७८ ॥

---

१. महारथी—रथांत राहून युद्ध करणाऱ्या वीरांचे महारथ, अतिरथ, रथ आणि अर्धरथ असे चार वर्ग मानले आहेत. त्यांची व्याख्या अशीः—'एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥ अमितान्योधयेद्यस्तु संप्रोक्तोऽतिरथस्तु सः । रथस्त्वेकेन यो योद्धा तन्नूनोऽर्धरथः स्मृतः ॥' याचा भावार्थ—जो शस्त्रविद्येमध्यें प्रवीण असून एकटा दहा हजार धनुर्धर वीरांशीं युद्ध करतो त्यास 'महारथ' असें म्हणतात. जो अगणित धनुर्धारी वीरांशीं युद्ध करतो त्यास 'अतिरथ' असें नांव आहे. जो एकट्या वीराशीं लढतो तो 'रथ' आणि जो त्याहून कमी तो 'अर्धरथ'. यांसच महारथी, अतिरथी, रथी आणि अर्धरथी असें म्हणतात. २. परिपूर्ण. ३. योद्धा. ४. कदाचित्. ५. द्रोणाचार्य. ६. निवडक. ७. द्रोणाचार्या ! ८. दुर्योधन सार्वभौम. [चक्रवर्ती पुरुषाचें लक्षण सामुद्रिक ग्रंथांत आहे तेंः—अतिरक्तः करो यस्य ग्रथितांगुलिको मृदुः । चापांकुशांकितः सोऽपि **चक्रवर्ती** भवेद्ध्रुवम् ॥'. (राघवभट्टकृत 'अर्थद्योतनिका' नामक अभिज्ञानशाकुंतलटीका—अंक ७ श्लोक १६ पृष्ठ २४३.) चक्रवर्ती=चक्रे भूमंडले राजमंडले वा वर्तयितुं शीलमस्य । यद्वा चक्रं सैन्यं वर्तयितुं सर्वभूमौ चालयितुं शीलमस्य । अवश्यं वा चक्रं वर्तयति । असे या शब्दाचे विग्रह आढळतात.] ९. जयशाली, समितिंजय, युद्धामध्यें सदा विजयी.

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

आणिकही शूर बहुत । मजकारणें मरतील निश्चित । जे नानाशस्त्रांसहित । चतुर युद्धीं सकळही. ॥ १७९ ॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

आमचे वीर असे । म्हणूनी तें सैन्य असमर्थ दिसे । भीष्में रक्षिलें असे । समर्थ हें सैन्य आमुचें. ॥ १८० ॥ ज्यांत पूर्वोक्त वीर । आणि **भी**ष्म ज्यांस रक्षणार । तो समर्थ कां न दिसे भार । भाव ऐसा. ॥ १८१ ॥ या **पां**डवांचा भार । त्यास तों **भी**म रक्षणार । तो काय सरी पावणार । या **भी**ष्माची ? ॥ १८२ ॥ **भी**ष्म इच्छामरणें अमर । आणि निःसीम धनुर्धर । **भी**म टोणपा मुष्कर । बलाढ्य जाला तरी काय ? ॥ १८३ ॥ या श्लोकाचा अर्थ । प्रकारांतरें दिसे तो व्यर्थ । कीं आमुचें अपूर्ण असमर्थ । समर्थ सैन्य **पां**डवांचें. ॥ १८४ ॥ कीं **द्रो**ण **भी**ष्मादि मनीं । सख्य करावें म्हणूनी । हा बोलता भय मानूनी । तरि ते म्हणते सख्य करीं. ॥ १८५ ॥ मी जिंकेन हा भरंवसा । म्हणूनि युद्धाचा वेंळसा । तो कां बोलेल ऐसा । कीं समर्थ बळ **पां**डवांचें. ॥ १८६ ॥ आतां समर्थ जरी आपण । तरी म्हणे सावधपणें । तुम्ही असा, हे नीतिनिपुण । नीति सांगे. ॥ १८७ ॥

**अयनेषु च सर्वेषु यथा भागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥**

अजी **भी**ष्म सेना रक्षणार । व्यूहरचना रचणार । परंतु त्यास जतन करणार । तुम्ही सकळ. ॥ १८८ ॥ चुकवूनि **भी**ष्माचीं नयनें । व्यूह भेदायाचीं स्थानें । त्यांस म्हणिजे 'अयनें' । तीं आश्रयस्थळें शत्रूसी. ॥ १८९ ॥ ऐसें जें जें स्थळ । तें यथाविभागें सकळ । सावध राहूनि केवळ । **भी**ष्मातेंचि रक्षणें. ॥ १९० ॥ वृष्टिशीतोष्णपरिहार । करीतसे ज्यांचें घर । ते मिळोनि सर्वेही

---

१. सैन्य. २. बरोबरी, समता. ३. न ठेंचलेला रेडा. ४. मुष्कर=मोठ्या अंडाचा मनुष्य. मुष्क=आंड, अंडकोष; स्थूल, लठ्ठ मनुष्य. ५. घोंटाळा. ६. अयन=युद्धारंभीं पूर्वपश्चिम इत्यादि दिशा साधून जी सैन्याची रचना करावयाची ती; सेनेचें नाकें.

नर । जतन करिती त्या गृहा. ॥ १९१ ॥ ऐसें भीष्माचें गौरव[1] । वाढवूनि बोले कौरव[2] । तें ऐकतां अभिनव[3] । स्फुरण आलें भीष्मातें. ॥ १९२ ॥

**तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥**

पितामह[4] भीष्म कुरुवृद्ध । आणि प्रतापें परम प्रसिद्ध । त्या दुर्योधना हर्ष समृद्ध[5] । करी सिंहनादें[6]. ॥ १९३ ॥ सिंहनादाची आरोळी । आणि शंख वाजवी महाबळी । कीं दुर्योधनाचे हृदयकमळीं । हर्ष उपजो. ॥ १९४ ॥

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥**

भीष्माचा शंख वाजतां । त्याच समयीं न विचारितां । अकरा अक्षौहिणींत[7] अवचितां[8] । वाद्यें वाजलीं. ॥ १९५ ॥ शंख भेरिया[9] पणव[10] । आणखी

१. मोठेपणा. २. दुर्योधन. ३. अद्भुत. ४. मोठा बाप, बापाचा बाप=आजा. [मातामह=आईचा बाप, पितामही=बापाची आई, मातामही=आईची आई.] ५. पूर्ण. ६. सिंहाप्रमाणें नाद. ७. या अकरा अक्षौहिणींचा तपशील भीष्मपर्वाच्या १९ व्या अध्यायांत दिला आहे. तो असा:—

| दुर्योधनपक्षीय सेना. | | | युधिष्ठिरपक्षीय सेना. | | |
|---|---|---|---|---|---|
| राजनाम. | संख्या. | श्लोक. | राजनाम. | संख्या. | श्लोक. |
| भगदत्त | १ | १५ | सात्यकी | १ | ६ |
| भूरिश्रवा | १ | १६ | धृष्टकेतु | १ | ७ |
| शल्य | १ | १६ | जयत्सेन | १ | ८ |
| कृतवर्मा | १ | १८ | पांड्य | १ | ९ |
| जयद्रथ | १ | २० | द्रुपद | १ | ११ |
| कांबोज | १ | २१ | विराट | १ | १२ |
| विंदानुविंद | १ | २५ | इतर भूप | १ | १३ |
| केकय | १ | २६ | | | |
| इतर भूप | ३ | २७ | | | |
| एकंदर | ११ अक्षौहिणी | | एकंदर | ७ अक्षौहिणी. | |

याप्रमाणें अठरा अक्षौहिणी सैन्य होतें. ८. अकस्मात्. ९. नौबद. १०. काळू नांवाचें वाद्य.

नाना वाद्यसंभव । ध्वनि तुंबळ[1] अभिनव । उत्पन्न जाला. ॥ १९६ ॥ ऐसी **संजयाची** वाणी । वर्णूनि **कौरवांची** कहाणी[2] । आतां ज्या दळीं[3] **चक्रपाणी** । ते कथा येथून सांगतो. ॥ १९७ ॥

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥**

त्यानंतर म्हणे **संजय** । ज्यास यशवर्ण[4] श्वेत[5] हय[6] । त्या रथीं **माधवमूर्ति**-द्वय । **पांडवही** दिसे जनदृष्टीं. ॥ १९८ ॥ **माधवाकडे** 'एव'कार । **पांड**वाकडे 'च'कार । लावूनि ऐसा अर्थविचार । सुचवी शिष्य[7] **व्यासाचा.** ॥१९९॥ **'माधव एव'** म्हणजे त्या रथीं । **माधवच** सारथी आणि रथी । **अर्जुन** वाटे जनमनोरथीं । तरी **'पांडवश्च'** म्हणजे तोही. ॥ २०० ॥ कीं हरावया भू-भार । **कृष्णजयशक्ति अर्जुनाकार** । सर्वात्मभावें तो निर्विकार । **माधव एव पांडव.** ॥ २०१ ॥ एवं श्वेताश्वयुक्त[8] रथीं । **श्रीमाधव** भक्तांचा सारथी । आणि **पांडुसुत अर्जुन** रथी । वाजविते जाले दिव्य शंख. ॥ २०२ ॥



**पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।**
**पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥**
**अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥**

नामार्थ शंखांचे क्रूर । ते न सांगतां न होती निष्ठुर । नांवेंचि सांगोनि ऊर । फोडी **धृतराष्ट्ररायाचा.** ॥ २०३ ॥ गुरुपुत्र[9] सागरीं बुडाला । तो **य**मापासूनि **कृष्णें** आणिला । **पंचजननामा** असुर मारिला । समुद्रांत आधीं. ॥ २०४ ॥ समुद्रासी गुरुकुमार । दे म्हणतां, म्हणे सागर, । **'पंचजननामा** शंखाकार । असुर आहे मजमाजी. ॥ २०५ ॥ त्याणें गिळिला असेल' । ऐसा समुद्राचा बोल । आइकोनि सिंधु सखोल । तेथें प्रवेशे **श्रीकृष्ण.**॥२०६॥

---

१. फार मोठा. २. कथा. ३. सैन्यांत. ४. यशाचा वर्ण शुभ्र असा कविसंकेत आहे. ५. पांढरे. ६. घोडे. ७. संजय. ८. पांढरे घोडे ज्यास जुंपले आहेत अशा रथांत. ९. संदीपनिनामक गुरूचा पुत्र. श्रीकृष्ण संदीपनिनामक गुरूपासीं शास्त्राध्ययन करीत असतां त्याचा पुत्र प्रभासतीर्थांत स्नान करितां करितां बुडाला. तो पंचजननामक दैत्यानें पाण्याच्या तळाशीं नेला. कृष्णानें बुडी मारून दैत्याचा वध करून गुरूचा पुत्र त्यास परत जिवंत आणून दिला व दैत्याच्या उदरांतून पांचजन्यनामक शंख आणिला—अशी कथा आहे.

शंखाचें फाडितां उदर । न सांपडतां गुरुकुमार । शंखाकार पंचजनशरीर । जाला पांचजन्य कृष्णाचा. ॥ २०७॥ तो पंचजन वधूनि । गुरुपुत्र यमापासूनि । आणिला हें आइकोनि । धृतराष्ट्र जाणे. ॥ २०८ ॥ कृतांताच्या मुखांतूनी । गुरुपुत्र आणिला जो वधूनी । तो शंख वाजवी म्हणूनी । स्मरण संजय देतसे. ॥ २०९ ॥ जिकडे कृष्ण तिकडे जय । त्यास नाहीं मृत्युभय । पांचजन्य शब्दीं संजय । न बोलतां भाव सूचवी. ॥ २१० ॥ अर्जुनाचा देवदत्त । जो खांडवदाहीं अग्निदत्त । जिकडे तो तिकडे निश्चित । जय ऐसें

१. पांचजन्य=लक्ष्मीपतीचा शंख, विष्णुशंख. [प्रत्येक देवाच्या अथवा वीराच्या शंखास निरनिराळें नांव आहे–अर्जुनाचा देवदत्त, भीमाचा पौंड्र, धर्माचा अनंतविजय, नकुलाचा सुघोष आणि सहदेवाचा मणिपुष्पक असें भगवद्गीतेच्या पहिल्या अध्यायांत (श्लोक १५-१६) वर्णन आहे. पांचजन्य शंखाविषयीं पुढील उतारा वाचण्यालायक आहे. "पांचजन्य–पंचजननामक दैत्यापासून कृष्णास हा शंख मिळाला, यावरून या शंखाचें हें नांव पडलें आहे. हा शंख पंचजनाच्या उदरांत सांपडला–अशी कथा आहे. कित्येक ग्रंथकार हा शंख सदर्हू दैत्याच्या अस्थींपासून निर्माण केला होता असें म्हणतात. कसेंही असो. या दैत्याची कथा अशी आहे कीं, हा समुद्राच्या तळाशीं राहत असे, व एकदां भगवान् श्रीकृष्ण हे आपल्या संदीपनिनामक गुरूजवळ शास्त्रादिकांचा अभ्यास करित असतां त्या गुरूचा मुलगा प्रभासतीर्थांत स्नान करितां करितां बुडाला, तो या दैत्यानें पाण्याच्या तळाशीं नेला. हें कृष्णास कळल्याबरोबर तो पाण्यांत उडी टाकून बुडी मारून तळाशीं गेला, आणि त्या ठिकाणीं पंचजन दैत्याचा वध करून त्याच्या उदरांतून हा शंख काढिला, आणि गुरूचा पुत्र गुरूस जिवंत आणून दिला." (सरलार्थबोधिनी गीता–अंक २ पृष्ठ ३१.) २. यमाच्या. (कृत+अंत=केलेला+अंत=नाश करणारा.) ३. अध्याय १८ श्लो० ७८ पहा. ४. देवानें (इंद्रानें) दिलेला तो देवदत्त. हें अर्जुनाच्या शंखाचें नांव. या स्थळीं देव या शब्दानें इंद्रदेवाचें ग्रहण केलें पाहिजे. अर्जुनानें एका प्रसंगीं दानवयुद्धांत इंद्रास साहाय्य केलें होतें, तेव्हां इंद्रानें प्रसन्न होऊन हा शंख अर्जुनास दिला. मोरोपंतकृत वनपर्व–अध्याय ५ गीति ११६–११७, काव्यसंग्रह–पृ० ९१; महाभारत–वनपर्व–अध्याय १६८ श्लो० ८४–८५ पहा.] ५. खांडववनाच्या दहनवेळीं. श्वेतकीनामक एका प्रख्यात राजानें असंख्य यज्ञ केले; शेवटीं शतसंवत्सरात्मक यज्ञ दुर्वासा ऋषीच्या आश्रयानें केला. या अनेक यज्ञांत हविर्भक्षण केल्यामुळें अग्नीला इतकें जाड्य आलें कीं, 'त्याचा प्रतिकार कसा करावा?' असें विचारण्यासाठीं त्याला ब्रह्मदेवाकडे जावें लागलें. अनेक वर्षें घृतधारा सेवन केल्यानें अग्नि निस्तेज आणि म्लान झाला. 'खांडववन भक्षण करून अग्नीनें आपलें जाड्य निरस्त करावें' असा उपाय पितामहानें सांगितला. पण हें वन इंद्ररक्षित होतें म्हणून तें अग्नीस सुप्राप्य नव्हतें. तेव्हां पितामहाच्या अनुमतानें अग्नि विप्रवेष घेऊन मनुष्यलोकीं कृष्णार्जुनांस शरण आला. या उभयतांनीं खांडववन भक्षणार्थ देण्याचें कबूल केलें, पण अर्जुनापाशीं रथादियुद्धसाहित्याची कांहींशी उणीव अस-

सूचवी. ॥ २११ ॥ पौंड्र[1]नामक क्रूर । शंख वाजवी वृ[2]कोदर । जो घंटघट रक्त पिणार । दुःशासनाचें. ॥२१२॥ जयास हेतु कृष्णार्जुन । परी तुझे पुत्र भीमसेन । मारील हा अर्थ गहन । शंखप्रसंगें सूचवी. ॥ २१३ ॥ भाव कीं बोकड मा[3]तें । तो आपले तोंडीं मुते । भ्रातृपत्नी द्रौपदी तें । नग्न करूं आरंभिली. ॥ २१४ ॥ ऐशा बोकडांसी गिळी । तो लांडगा भीम बळी । अतएव तो एक या कुळीं । [4]भीमकर्मा. ॥ २१५ ॥ पोटीं निर्दय निष्ठुर । म्हणोनि नांव वृकोदर । वृक लांडगा तैसें उदर । दयाहीन म्हणोनि. ॥२१६॥ हा भावार्थ गहन । खोंची धृतराष्ट्राचें मन । आतां संजय वचन । काय बोले आणिक? ॥ २१७ ॥ कुंतीपुत्र राजा युधिष्ठिर । [5]अनंतविजयनामें सुंदर । वाजविती शंख माद्रीकुमार । सु[6]घोषमणिपुष्पक. ॥ २१८ ॥

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ! ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥**

काशीचा क्षिति[7]पति । धनुष्य थोर ज्याचे हातीं । आणि जो शिखंडी म्हणती । महारथ त्यासही. ॥ २१९ ॥ धृष्टद्युम्न विराट सात्यकी । जो जिंकिला न जाय या लोकीं । शंख इत्यादि अनेकीं । वाजविले. ॥ २२० ॥ द्रुपद आणि द्रौपदीसुत । अभिमन्यु वीर अत्यद्भुत । आणिक वीर जे बहुत ।

---

त्यामुळें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन अर्जुनाला गांडीव धनुष्य, अक्षय्य इषुधि, कपिध्वजयुक्त दिव्यरथ, इत्यादि सामुग्री दिली आणि कृष्णास वज्रनाभनामक आणि कौमोदकीनामक गदा देऊन उभयतांस संतुष्ट केलें. नंतर अग्नि तें वन भक्षण करूं लागला, आणि कृष्णार्जुन रथारूढ होऊन वनाच्या दोन्ही बाजूंस सर्वप्राणिनाश करूं लागले. हें वर्तमान कळतांच इंद्र अग्नीचें निवारण करण्यासाठीं सकल देवांसह आकाशांत येऊन जलवृष्टि करूं लागला. तेव्हां कृष्णार्जुनांनीं त्याचा पाडाव करून त्यास परत लाविलें. नंतर अग्नि तें वन पंधरा दिवस यथेच्छ भक्षण करून व्याधिनिर्मुक्त झाला. (आदिपर्व–अध्याय–२२३–२२५.)
६. अग्नीनें दिलेला.

१. भीमाच्या शंखाचें नांव पौंड्र. २. (वृक) लांडग्यासारखें ज्याचें (उदर) पोट तो, खादाड व पुष्कळ अन्न पचविणारा भीम. ३. उन्मत्त होतो. ४. भीम (भयंकर) आहे कर्म (करणी, पराक्रम) ज्याचें तो. ५. धर्माच्या शंखाचें नांव. ६. नकुलसहदेव यांचे शंख सुघोष आणि मणिपुष्पक. ७. राजा.

सकळीं शंख वाजविले. ॥ २२१ ॥ शंखांचीं नांवें **सं**जय । सांगतां **धृ**तराष्ट्र मानीं भय । घोष वर्णितांही निश्चित जय । तेंचि सूचवी यावरी. ॥ २२२ ॥

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

**धृ**तराष्ट्रा! तुझे सुत । जे **धा**र्तराष्ट्र एक शत । त्यांचें हृदय निश्चित । विदारिलें त्या घोषें. ॥ २२३ ॥ पृथिवी आणि आकाश । तुमुलनादें निरवकाश । गर्जवूनि करी प्रवेश । हृदयीं तुझ्या पुत्रांच्या. ॥ २२४ ॥

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥**

**सं**जय म्हणे, 'यानंतर । ते **धृ**तराष्ट्राचे कुमार । धैर्य धरूनि पुन्हा सादर । उभे राहिले. ॥ २२५ ॥ शस्त्रें हाणों लागले । तों **पां**डवही सरसावले । हेही कांहीं हाणिते जाले । प्रवर्तला शस्त्रपात.'[1] ॥ २२६ ॥ प्रवर्ततां शस्त्रपात । **गां**[2]डीव घेऊनि हातांत । काय करिता जाला [3]**पं**डुसुत । **सं**जय म्हणे परिस तें. ॥ २२७ ॥

---

१. शस्त्राघात सुरू झाला. २. गांडीव हें धनुष्याचें नांव. हें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन (महाभारत–आदिपर्व–अध्याय २२५ श्लोक १–९) अर्जुनास दिलें. वीरांच्या धनुष्यांस भिन्न भिन्न नांवें होतीं असें दिसतें:–कर्णाचें 'कालपृष्ठ,' अभिमन्यूचें 'रौद्र.' या 'गांडीव' धनुष्याचें वर्णन (विराटपर्व–अध्याय ४३ श्लोक १–७ यांत) केलें आहे, तें असें:—विराटपुत्र उत्तर आणि बृहन्नला यांचें संभाषण चाललें असतां बृहन्नला उत्तरास म्हणते:–'हे उत्तरा! तूं मला विचारलेंस. तें हें अर्जुनाचें गांडीव नामक धनुष्य आहे. हें शत्रूचा संहार करण्यास समर्थ आहे; हें लोकांमध्यें प्रख्यात आहे. हें सर्व आयुधांच्याहून उत्कृष्ट आहे. हें सुवर्णालंकृत आहे. हें अर्जुनाचें गांडीव धनुष्य मोठें प्रबल आयुध आहे. याला हजार धनुष्यांचें बल आहे. हें राष्ट्रांचा उत्कर्ष करणारें आहे. या धनुष्यानें पार्थ देवांना जिंकतो; हें अनेक प्रकारच्या रंगांनीं चित्रविचित्र केलेलें आहे; हें सडसडीत बारिक आहे; हें लांब व अविद्ध आहे; पूर्वी हें धनुष्य ब्रह्मदेवानें एकहजार वर्षें धारण केलें; प्रजापतीनें ५०३ वर्षें; इंद्रानें ८५ वर्षें; सोमदेवानें ५०० वर्षें व वरुणानें १०० वर्षें धारण केलें; ३२॥ वर्षें श्वेतवाहन (ज्याच्या रथाला शुभ्रवर्ण घोडे असतात अशा) अर्जुनापाशीं आहे. ह्या धनुष्याचा पराक्रम मोठा आहे; हें सुंदर आहे; हें उत्कृष्ट व मनोहराकृति धनुष्य अर्जुनाला (अग्निद्वारा) वरुणापासून प्राप्त झालें. ३. अर्जुन.

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ! ।**
अर्जुन उवाच—**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत** ! ॥ २१ ॥

तेव्हां हृषीकेशाप्रती । हें वाक्य वदे, 'गा ! महीपती ! । कीं दों सेनेंत क्षिती । उभा करीं रथ तेथें.' ॥ २२८ ॥ हृषीकें म्हणजे इंद्रियें । त्यांचा ईश जो चाळी स्वयें । कृष्ण 'हृषीकेश' या अन्वयें । त्यातें तेव्हां हें बोले. ॥ २२९ ॥ जो वदवी वागिंद्रिया[1] । अर्जुन वदे त्या अव्यया[2] । कीं, 'अच्युता[3] ! रथास या । उभा करीं दों सेनेंत.' ॥ २३० ॥ एवं कृष्णचि बोलवितो । संजय हा भाव सूचवितो, । कीं एथून अर्जुन तो । युद्ध न करीं म्हणेल. ॥ २३१ ॥ तेंही कृष्णचि बोलवील । आणि जेव्हां कुरुसेना दावील, । कृपा तोचि उपजवील । युद्ध न करीं म्हणावया. ॥ २३२ ॥ त्या प्रसंगें हे गीता । उपदेशूनि तत्त्वतां । त्याची अज्ञानयुक्त अहंता[4] । विश्वरूपें[5] नाशील. ॥ २३३ ॥ कीं कृष्ण सकळांचा हंता[6] । आपणास कां हे अहंता । आत्मज्ञानें अकर्तृता[7] । देणार आतां पार्थातें. ॥ २३४ ॥ साध्य व्हावया राज्यपद । सारथ्यार्थ वंदिलें पद । परी हा देणार परंपद[8] । तें या उपदेशें देतसे. ॥ २३५ ॥ शत्रु नाशावे कौरव । हें सारथ्यफलगौरव । परी हा अज्ञाननाशक देव । तें या उपदेशें नाशितों. ॥ २३६ ॥ आत्मस्वरूप न कळणें । हें अज्ञानआवरण[9] । रज्जू न कळतां सर्पसत्यपण । तो विक्षेप[10] जडभ्रांति. ॥ २३७ ॥ अष्टमाध्यायीं[11] मूलावरण[12] । नाशील आणि जडभ्रांतिपण । नवमीं[13] नाशील कमलेक्षण[14] । या सारथ्यप्रसंगें. ॥ २३८ ॥ हरावया[15] तृषा मात्र । अमृत प्याला तृषार्त । तें अजरामर निश्चित । करी सहज गुण त्याचा. ॥ २३९ ॥ पाकाकारणें नर । जरी पेटवी वैश्वानर[16] । तरी तो नाशीच सत्वर । शीत तम[17] यां दोहींतें. ॥ २४० ॥

---

१. वाक् नाम इंद्रियाला, वाचेला. २. अविनाशी, ईश्वर. 'व्यय म्हणजे नाश नसे, जरा नसे, मृत्युही नसे ज्याला । नाहीं विकार म्हणउनि, 'अव्यय' हें नाम जाहलें त्याला ॥ १३ ॥' [नामार्थदीपिका–पृष्ठ २.] ३. ज्यास च्युति म्ह० पतन नाहीं, असा जो परमात्मा तो. [अच्युत=विष्णु (कृष्ण). 'भक्तेभ्योऽच्युतपूर्वत्वात् अच्युतः परिकीर्तितः । आश्रितानां च्युतिर्यस्मान्नास्ति सोऽच्युत ईरितः ॥' विवृतिसहितं विष्णुनामसहस्रम्–पृ० ८.] ४. अहंकार. ५. विश्वरूप दाखवून. ६. नाशकर्ता. ७. अकर्तेपण. ८. मुक्ति. ९. आच्छादन. १०. विपरीत ज्ञान. ११. अध्याय ८ श्लो० १३–१६ पहा. १२. प्रत्यक्ष जे पदार्थ ते सत्य असा जो भ्रम. १३. अध्याय ९ श्लोक २७–३२ पहा. १४. कमलनेत्र कृष्ण. १५. हे दृष्टांत किती समर्पक आहेत ? १६. अग्नि. १७. अंधकार.

कापावया[1] तृण । परीस[2] मानूनि सहज पाषाण । पाणी पाजितां विळा सुवर्ण । होय गुण हा परिसाचा. ॥ २४१ ॥ ज्यांत जो महिमा पूर्ण । तो आपला दावीच गुण । आतां सारथि केला श्रीकृष्ण । तो केंवि महिमा न दावी? ॥ २४२ ॥ प्रस्तुत गीता या मिसें । आम्हां दीनांच्या कृपारसें । प्रकट करूं पाहे म्हणूनि ऐसें । हृषीकेश म्हणे संजय. ॥ २४३ ॥ 'हृषीकें' 'इंद्रियें' म्हणावीं । त्यांचा ईश चाळक गोसांवी[3] । तो 'हृषीकेश' त्यातें बरवीं । हीं वचनें बोले अर्जुन. ॥ २४४ ॥ संजय म्हणे, 'गा! महीपति! । ऐसा कृष्ण हृषीकपति । जो त्यास बोलवी त्याप्रति । हें वाक्य बोले अर्जुन. ॥ २४५ ॥ कीं, 'श्रीअच्युता स्वामी! । या दों सैन्यांत जे भूमि । तेथें अजी अंतर्यामीं । उभा करीं रथ माझा.' ॥ २४६ ॥ 'तेथें कोण काळवरी । रथ उभा करूं?' म्हणेल श्रीहरी । म्हणूनि जो आशय अंतरीं । तो बोलतो अर्जुन. ॥ २४७ ॥

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

युद्धकामना[4] मनीं । धरूनि उभे एथें येउनी । त्यांस जों मी पाहेन नयनीं । तोंवरी. ॥ २४८ ॥ कीं या रणाच्या उद्यमीं[5] । कोणाकोणांशीं संग्रामीं । म्यां झगडावें जें हेंचि मी । पाहेन. ॥ २४९ ॥ करावया युद्ध । भीष्मादि जे कुरुवृद्ध । इतर राजे तेही प्रसिद्ध । ठावके आहेत सर्वेही. ॥ २५० ॥ आतां 'पाहावें तें काय?' । ऐसें म्हणेल हा अव्यय । म्हणोनि जो हृदयीं निश्चय । तो म्हणे बोलों निजभाव. ॥ २५१ ॥ कीं युद्ध करणें उचित । नव्हे यांशीं निश्चित । हें बोलों जातां चित्तांत । पुन्हा शंकला. ॥ २५२ ॥ कृष्ण म्हणेल जरी । तुज उचित न वाटे तरी । हे कां मिळाले समरीं[6] । तुजशीं युद्ध करावया. ॥ २५३ ॥ तरी हे स्वयें नाहीं मिळाले । संकटेंकरूनि युद्धासि आले । स्वयें पाहतां भले । पाहेन म्हणतो. ॥ २५४ ॥ युद्ध करणार यांतें । पाहेन जे हे आले एथें । दुर्योधनाचें प्रिय इच्छिती चित्तें । जे या युद्धीं. ॥ २५५ ॥ आतां म्हणेल कीं, 'हे भले । तरी यास कां न निषेधिते जाले?' । म्हणूनि अ-

---

१. गवत कापण्याचें हत्यार. २. Philosopher's stone. ३. गोसांवी=गो (इंद्रिय)+सांवी (स्वामी). ४. इच्छा. ५. उद्योगांत, युद्धप्रसंगांत. ६. युद्धांत.

र्जुन बोले। कीं, 'धार्तराष्ट्र दुर्बुद्धि. ॥ २५६ ॥ हे तों निषेधिते जाले। निषेधितां नाहीं भ्याले,। आतां अंगल्यास आले। प्रिय इच्छुनि दुष्टबुद्धीचें. ॥२५७॥ परी यांस हें नव्हे प्रिय'। हा भाव दावी **धनंजय**। हृदयामध्यें निश्चय। **भीष्म**वचनाचा. ॥ २५८ ॥

भीष्मोक्त श्लोक—**'अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थो न कस्यचित्।**
**इति सत्यं महाराज! बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः ॥ २३ ॥**

**भीष्म** वदला **धर्मा**स। कीं, 'अर्थाचा पुरुष दास। बांधलें **दुर्योधनें** आम्हांस। निजधनें.' ॥ २५९ ॥ **अर्जुन** मनीं या श्लोका। स्मरूनि म्हणे उत्तमश्लोका। दुर्बुद्धि **दुर्योधना** एका। युद्धापेक्षा न इतरांसि. ॥२६०॥ संतापें म्हणे **अर्जुन**। कीं, 'दुष्टबुद्धि **दुर्योधन**। भाव कीं या प्रसंगें स्वजन। कैसे युद्धीं मारावे ? ॥२६१॥ तथापि पाहों नयनीं। कीं देखतां काय वाटेल मनीं.'। म्हणे **कृष्णास** म्हणोनी। कीं, 'या सकळांस पाहेन.' ॥ २६२ ॥ या दों श्लोकीं हा अर्थ। प्रकट भावार्थ यथार्थ। हा भाव न काढितां व्यर्थ। पुनरुक्ति एथें बोलाची. ॥२६३॥ युद्धकामना मनीं। त्यांस मी पाहेन नयनीं। हें पूर्वश्लोकेंकरूनी। बोलिलाच **कृष्णासि**. ॥ २६४ ॥ या युद्ध करणारांतें। पाहेन जे आले आहेत एथें। हे दुसऱ्या श्लोकें **पार्थें**। पुनरुक्ति कां हो! वदावी ? ॥ २६५ ॥ यालागीं हाचि अर्थ। सिद्ध जाला समर्थ। हृषीकेशशब्दभावार्थ। जो पूर्वीं एथें निरूपिला. ॥२६६॥ हे सकळ **कृष्ण**करणी। दया घातली अंतःकरणीं। म्हणोनि पुन्हां **हृषीकेश**स्मरणीं। वाणी योजी **संजय**. ॥ २६७ ॥

संजय उवाच—**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत!।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**

**संजय** म्हणे **हृषीकेश**। त्याप्रति ऐसा **गुडाकेश**। दाखवी भावलेश। तो

---

१. निकरावर आले. २. पुरुष स्वार्थाचा दास आहे, परंतु स्वार्थ कोणाचा दास नाहीं. हे धर्मराजा! ही गोष्ट खरी आहे पहा, कौरवांनीं मला ह्या स्वार्थाच्या पायीं बांधून टाकिलें आहे. ३. उत्तम कीर्ति ज्याची तो, ईश्वर. ४. संग्रामाची इच्छा. ५. ज्यांनीं युद्धकामना धरिली आहे त्यांस मी पाहतों व जे येथें युद्ध करणारे जमले आहेत त्यांस मी पहातों, अशी येथें अर्जुनाची द्विरुक्ति आहे. ६. अर्जुन. [गुडाकेश=हा शब्द प्रस्तुत पद्यांत अर्जुन या अर्थीं योजिला आहे. या पदाचा शब्दार्थ 'गुडाका' म्हणजे निद्रा आणि 'ईश' म्हणजे स्वामी. ह्याचा उपयोग 'हृषीकेश' शब्दाप्रमाणें केवळ विशेषनामाप्रमाणें समजावयाचा. 'निद्रेचा स्वामी' म्हणजे निद्रारूप भ्रांतीचा अथवा अज्ञानाचा नियंता, दमनकर्ता. निद्रा ही एक भ्रांति आहे, तेव्हां अशा भ्रांतीस जिंकून जो सदासर्वदा सावध, दक्ष असतो

तुज राया! वदलोंचि. ॥ २६८ ॥ त्यांचीं हृषीकें इंद्रियें । त्यांस प्रेरी **कृष्ण** स्वयें । म्हणोनि ऐसें वदला निश्चयें । स्वबुद्धि नव्हे **अर्जुना**ची. ॥ २६९ ॥ ही **अर्जुना**ची नव्हे बुद्धि । या अर्थाची घडे सिद्धि । म्हणोनि **अर्जुना**ची लोकप्रसिद्धि । त्याच्या नांवेंचि सुचवितों. ॥ २७० ॥ कीं तो अर्जुन **गुडाकेश** । गुडाका निद्रा, तिचा ईश, । निद्रा भ्रांति तिचा प्रवेश । न घडे बुद्धींत **अर्जुना**च्या. ॥ २७१ ॥ तोच भ्रांतीचा ईश । ज्याच्या मनीं ते न करी प्रवेश । या भावें म्हणे '**गु**डाकेश' । **अर्जुना**तें. ॥ २७२ ॥ हींच **कृष्णार्जु**नांचीं नांवें । द्वितीयाध्यायीं याचि भावें । **सं**जय बोलेल एथें पहावें । रहस्य हेंचि. ॥ २७३ ॥

**'[1]एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।**
**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूवह ॥'** [गीता–अ० २ श्लो० ९.]

एवं गुडाका निद्रा जे भ्रांती । ती नसे जयाच्या चित्तीं । तो '**गु**डाकेश' परी हे मती । प्रेरिली श्रीहृषीकेशें. ॥ २७४ ॥ ऐसे समयीं दया मनीं । धरूनि परतणें युद्धापासुनी । यांत अपकीर्ति परलोकहानी । हें काय न कळे **अर्जुना**? ॥ २७५ ॥ ज्याणें जिंकिली भ्रांति निद्रा । त्या **गु**डाकेशा बुद्धिसमुद्रा । भ्रांति न म्हणवे **धृ**तराष्ट्रा! नरेंद्रा! । हा भाव सुचवी या नांवें. ॥ २७६ ॥ एवं

---

त्यास 'गुडाकेश' असें म्हणावें; परंतु अशा प्रकारची 'गुडाकेश' शब्दाची व्याख्या घेतली असतां तिची संगति सदासर्वदा अर्जुनाच्या व्यवहाराशीं मिळेल असा नेम नाहीं. कारण अर्जुनाचीं कांहीं कृत्यें अदक्षताद्योतक आढळणार आहेत, तेव्हां 'गुडाकेश' हें नांव अर्जुनास अर्थानुरोधानें यथार्थपणें लागू पडत नाहीं; परंतु अर्जुनव्यतिरिक्त इतरांस 'गुडाकेश' असें म्हणण्याचा व्यवहार नाहीं म्हणून तें विशेषनाम समजावें. पाश्चिमात्य गीर्वाणभाषाभिज्ञ पंडितांनीं प्रस्तुत शब्दाचा अर्थ कल्पनेनें बसविला आहे तो असा:–गुडा म्हणजे गुळवेल, तिच्या गांठीसारखे ज्याचे केश गुंतलेले आहेत तो 'गुडाकेश'. हा अर्थ काल्पनिक असल्याकारणास्तव त्याजविषयीं जास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. प्रस्तुत शब्दावर **शंकरानंदसरस्वती**कृत गीतेवरील टीकेंत पुष्कळ मोठें व्याख्यान केलें आहे, त्यांत 'गुडाक' म्हणजे 'शिव' आणि 'ईश' म्हणजे 'स्वामी' यांचा बहुव्रीहि समास करून 'गुडाक आहे ईश ज्याचा तो' गुडाकेश, म्हणजे अर्जुन असा एक अर्थ काढिला आहे.

१. शत्रूस ताप देणारा जो अर्जुन (गुडाकेश) तो याप्रमाणें इंद्रियप्रवर्तक गोविंदास बोलून व त्याच समयीं मी युद्ध करणार नाहीं असें सांगून मुकाट्यानें स्तब्ध बसला. [सरलार्थबोधिनी गीता–पृ० १३०.]

हृषीकेशकरणी । दया घातली अंतःकरणीं । त्याप्रति पूर्वोक्त वाणी । **अर्जुन** ऐशी बोलिला. ॥ २७७ ॥ ऐसा **अर्जुन गुडाकेशें** । प्रार्थिला त्यानें **हृषीकेशें** । जगदुद्धार कृपालेशें । केलें तैसेंचि. ॥ २७८॥ परम उत्तम तो रथ । जणूं **ह**-रिभक्ताचा मनोरथ । ज्यांत रथी जीवात्मा अतिरथ । सारथी स्वयें **हृषीकेश**. ॥ २७९ ॥ दोहींकडे उभय दळ । मध्यें जें रिकामें स्थळ । तेथें तो [१]रथोत्तम अचळ । उभा केला. ॥ २८० ॥ स्थापूनि तेथें रथोत्तम । काय बोलेल **सर्वो**-त्तम । तें वचन उत्तमोत्तम । ऐक सांगतों. ॥ २८१ ॥

**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ! पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

[२]**ह**[३]रिमुखचंद्रचकोर । **भी**ष्म **द्रोण** राजे थोर थोर । त्यां सकळांही समोर । तो श्रीहृषीकेश बोलिला. ॥ २८२ ॥ **पार्था**! मिळाले जे जे हे । आणि या **कुरूं**तें पाहें । ऐसें बोलूनि उगा राहे । गहन भाव दाखवूनी. ॥ २८३ ॥ दुष्टबुद्धि **दुर्योधन** । त्याकारणें मिळाले स्वजन । म्हणोनि मागें म्हणे **अर्जुन** । त्यास तैसेंचि दाखवी. ॥ २८४ ॥ कीं पाहें या **कुरूं**तें । आणि **भीष्मद्रो**-णादि गुरूंतें । दया उपजवूनि [४]जगद्गुरूतें । असे **गी**ता उपदेशणें. ॥ २८५॥ आणि अर्जुनास म्हणे, '**पार्था**' । यांतही सूचवी भावार्था । कीं **कुं**तीचें नांव **पृ**था । **पार्थ** म्हणजे **पृ**थापुत्र. ॥ २८६ ॥ कीं राजपुरुषाचें क्रूर कर्म, । दया स्वजनीं स्त्रियांचा धर्म, । मातृगुण येथें सगुणब्रह्म । स्वसामर्थ्यें उपजवी. ॥ २८७ ॥ '**पार्था**' म्हणोनि [५]**घ**ननीळ । म्हणे तों फिरे बुद्धीची कळ । ते या अडिचां श्लोकीं [६]निखिल । **सं**जय सांगतो. ॥ २८८ ॥

**तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥**
**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।**
**तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥**
**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।**

तो **पृ**थेचा पुत्र **पार्थ** । ज्यास मातृगुणीं योजी समर्थ । जे तेथें मिळाले

---

१. रथांतील उत्तम रथ. 'रथोत्तम' असें म्हणण्याचें कारण या रथावर कृष्ण हा सारथी होता व ध्वजाग्रीं शिवावतार मारुति स्थित होता. २. कृष्ण. ३. हरिमुखचंद्राचे जे चकोर. चकोर पक्षी चंद्रिकाप्रिय आहेत; 'ज्योत्स्ना पेया चकोरैः' असें वर्णन कविसंकेतांत आहे. ४. कृष्णास. ५. मेघश्याम कृष्ण. ६. सर्व.

युद्धार्थ । त्यांतें पाहे. ॥ २८९ ॥ तों चुलते पित्यासमान । आजे भीष्मादि गौरवनिधान[1] । गुरु द्रोणादि जिहीं ज्ञान । दिधलें क्षात्रविद्येचें[2]. ॥ २९० ॥ शल्यादिक मातुळ[3] । भाऊ पुतणे पुत्रचि केवळ । नातु कोंवळे किरळ[4] । सखे अश्वत्थामादिक. ॥ २९१ ॥ ऐसेच सासरे सोयरे । दोहीं सैन्यांत मरणार सारे । इतर राजे तेही बरे । हितकर्ते बंधुत्वें. ॥ २९२ ॥ त्यांस देखोनि तो कौंतेय[5] । कुंतीचा पुत्र जयास अव्यय । मातृगुणीं उपजवी निश्चय । होता जाला कृपाविष्ट[6]. ॥ २९३ ॥ युद्ध न करावें म्हणुनि । विषाद उपजला मनीं । तो कृष्णास या वचनीं । विनवूं पाहे. ॥ २९४ ॥

अर्जुन उवाचः—**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**

**सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**

**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥**

**गांडीवं स्रंसते हस्तात्वक्चैव परिदह्यते ।**

अर्जुन म्हणे, 'जी! कृष्णनाथा! । देखोनि या स्वजनांतें[7] व्यथा । मज अत्यंत होते सर्वथा । जे उभे युद्धाकारणें. ॥ २९५ ॥ सर्वांग माझें पिळतें । आंत बाहेर मुख वाळतें[8] । शरीर कांपें चळतें । कांटे[9] येती देहासि. ॥ २९६॥ हातींचें गांडीव[10] गळे । संतापें त्वचा[11] जळे[12] । शोकाग्नि ऐसा पाजळे । हृद-यांत. ॥ २९७ ॥

**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥**

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव! ।**

रथीं उभें राहवेना । भ्रम जाला वाटे मना, । केशवा! विपरीत नयनां । होणारीं निमित्तें[13] दीसती. ॥ २९८ ॥

**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

**न कांक्षे विजयं कृष्ण! न च राज्यं सुखानि च ।**

कल्याण न दिसे कांहीं । युद्धीं स्वजन मारूनिही । विजयाची चोंड[14] नाहीं । राज्यसुखेंहि नलगती. ॥ २९९ ॥

---

१. मोठेपणाचे निधि. २. क्षत्रियांच्या विद्येचें, शस्त्रास्त्रविद्येचें. ३. मामा. ४. अंकुर. ५. ईश्वर, कृष्ण. ६. कृपा+आविष्ट=दया+अन्वित=दयालु. ७. स्वकीय आप्तजनांतें. ८. शुष्क होतें. (तोंडाला कोरड पडते.) ९. शरीरावर रोमांच उभे राहतात, कांटा=कंटक=रोमांच. १०. अग्नीनें अर्जुनास दिलेलें धनुष्य. ११. कातडी. १२. सर्वांगाचा भडका होतो. १३. अशु-भसूचक चिन्हें, अपशकुन. १४. इच्छा.

**किं नो राज्येन गोविंद ! किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥**
**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**

यांस राज्यार्थ मारावें । तें राज्य घेउनी काय करावें ? । भोगांसि कोणीं भोगावें ? । जीवित्व नलगे जी ! आम्हां. ॥ ३०० ॥ राज्य भोग सुख संपदा । यांचकारणें कीं गोविंदा ! । मारूनि त्या त्या स्वजनवृंदा[1] । कोण वांचूं पाहतो ? ॥ ३०१ ॥

**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**

राज्य करावें ज्यांकारणें । ते हे त्यजूनि धनें प्राणें । अंगीकारूनि मरणें । युद्धीं उभे. ॥ ३०२ ॥ गुरु आणि चुलते ते ऐसे । कीं सखा पिता पांडु तैसे । पुतणे कीं तैसेही पुत्र जैसे । आणि पितामह. ॥ ३०३ ॥

**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥**
**एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ! ।**

मामे आणि सासरे । तैसेच नातु शालक सोयरे । प्राणांसमान आप्त सारे । कैसे मारूं मधुसूदना ? ॥ ३०४ ॥ देवा ! तूं मधुसूदन । क्षणीं देसी अनुमोदन । कीं तुज दैत्यादिकंदन[2] । करणें अगत्य. ॥ ३०५ ॥ आतां म्हणसी हरी ! । कीं तूं न मारिसी यांतें परी । हे तुज मारिती ते अवसरीं । अगत्य तुवां मारावें. ॥३०६॥ म्हणोनि म्हणतों यांतें । मारावें हे इच्छा चित्तें । मी जरी न धरीं हे मातें । मारिती. ॥ ३०७ ॥ आतां[3] म्हणेल अच्युत । कीं, 'हें सहज भल्याचें वृत्त[4], । परंतु राज्य साधायाचें निमित्त । प्राप्त झालें.॥३०८॥ या राज्याकारणें । अगत्य लागे मारणें.' । ऐसें हा अंतःकरणें । शंकोनि बोलतो अर्जुन. ॥ ३०९ ॥

**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ? ॥ ३५ ॥**
**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ! ।**

'न घडे यांतें मारणें । त्रैलोक्यराज्यांही कारणें । भूमिनिमित्त हें करणें ।

---

१. आप्तजनांच्या समुदायाला. २. मर्दन. ३. येथें शंका घेऊन तिचा परिहार पंडितांनीं स्वतःच केला. ४. वर्तन.

काय घडे ?' ॥ ३१० ॥ हें बोलूनि शंकला पुन्हा । श्रीकृष्ण म्हणे, 'अरे ! अर्जुना ! । मारितां आततायी[1] जना । पाप नाहीं. ॥ ३११ ॥

**अग्निदो[2] गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः ।**

**क्षेत्रदारहरश्चैव षडेते आततायिनः ॥** [शुक्रनीति.]

या स्मृतीचा अर्थविचार । कीं आततायी म्हणजे सहा प्रकार । अग्नि लावणार, विष देणार, । शस्त्रही घे जो मारावया, ॥ ३१२ ॥ आणि जो करी धनापहार । स्वक्षेत्र स्वस्त्री हरणार, । या सहा आततायींचा मारणार । पापी नव्हे स्मृति म्हणे. ॥ ३१३ ॥

**आततायिनमायांतं[3] हन्यादेवाविचारयन् ।**

**नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन ॥** [मनुस्मृति.]

स्मृतीचा अर्थ ऐसा । कीं आततायी वर्णिले जे सा[4] । त्यांस मारितांही सहसा । दोष नाहीं. ॥ ३१४ ॥ लाक्षागृहीं[5] अग्नि लाविला । विषप्रयोग **भी**मास केला । शस्त्रें धरूनि सिद्ध आला । भार[6] तुमच्या वधासि. ॥ ३१५ ॥ कपटें धनादि संपत्ती । हरिली आणि या प्रस्तुतीं । तेरा वर्षें जालीं तरी क्षिती[7] । न देती क्षेत्रापहारक[8]. ॥ ३१६ ॥ दारापहारी[9] ये रीती । कीं सभेस आणिली **द्रौपदी** सती । वधायोग्य आततायी होती । साही परी. ॥ ३१७ ॥

---

१. महापराधी. २. आग लावणारा, विषप्रयोग करणारा, मारण्यासाठीं हातांत शस्त्र घेणारा, धनाचें अपहरण करणारा, क्षेत्राचें हरण करणारा व स्त्रीचें हरण करणारा हे आततायी आहेत. ३. येथें मनुस्मृति–अध्याय ८ श्लोक ३५०–३५१ यांचा संबंध आहे. ते श्लोक असे– गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् । आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन् ॥ ३५० ॥ नाततायिवधे दोषो हंतुर्भवति कश्चन । प्रकाशं वाप्रकाशं वा मनुस्तं मन्युमृच्छति ॥ ३५१ ॥ यांचा अर्थ–गुरु अथवा बाल किंवा वृद्ध अथवा बहुत पढलेला ब्राह्मण कोणीहि आततायी (वध करण्याच्या इच्छेनें हातांत शस्त्र धारण करणारा) अंगावर येईल, [व पलायनादिकेंकरूनहि आपलें रक्षण होत नसेल] तर विचार न करतां त्याला मारावें. ॥ ३५० ॥ प्रसिद्धपणानें अथवा गुप्तपणानें (विषादिकानें) आततायीचा वध केला असतां मारणारास कोणताहि दोष नाहीं. कारण आततायीच्या क्रोधाभिमानी देवतेला दुसऱ्याची क्रोधाभिमानी देवता मारते, 'अर्थात् पुरुषांला हंतृहंतव्यभाव नाहीं.' ॥ ३५१ ॥ ४. सहा. ५. लाखेचें घर. ६. सैन्यभार. ७. पृथ्वी. ८. क्षेत्राचा अपहार करणारे चोर. (कौरव.) ९. भार्यापहार करणारे.

ऐसें शास्त्राधारें [1]झणीं । झगडेल म्हणे चक्रपाणी । म्हणोनि शंकोनि अंतःकरणीं । हा श्लोकार्ध बोलतों. ॥ ३१८ ॥

**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

याचें पापचि यांतें । मारूनियां आततायी यांतें । येऊनि आमच्या [2]आशयातें । आश्रय करील आमचा. ॥३१९॥ आततायी पापी । आम्हीं न मारावे तथापि । कीं यांचें सर्व पाप कदापि । न सोडी आम्हां. ॥ ३२० ॥ यांचाच जो पापसंचय । हा यांस मारील निश्चय । परी आम्हीं मारितां आश्रय । तें पाप करील आमुचा. ॥ ३२१ ॥ भाव अर्जुनाचे चित्तीं । ऐसा कीं देवा! या [3]स्मृती । आततायी मारावा म्हणती । हें [4]अर्थशास्त्र. ॥ ३२२ ॥ दृष्टि ज्याची अर्थावरी । तो जरी आततायिवध करी, । तरी त्यास पाप पात्र नाहीं, परी । न साधे धर्म. ॥ ३२३ ॥ ज्यांस जोडणें धर्म । तिहीं न करावें हिंसाकर्म । हें मुख्य धर्माचें वर्म । अजी! देवा! ॥ ३२४ ॥ विचारितां वेदवचनीं । '[5]न हिंस्यात्सर्वभूतानि' । पाहतां हिंसेंकरूनी । जोडे अधर्म. ॥३२५॥ अतएव [6]अर्थशास्त्रविहित । तो दुर्बल पक्ष निश्चित । प्रबल त्याहूनि बहुत । धर्मशास्त्र स्मृति म्हणे. ॥ ३२६ ॥

**[8]स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः ।**

**अर्थशास्त्राच्च बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ॥** [याज्ञवल्क्यस्मृति.]

हे याज्ञवल्क्य ऋषीची [7]उक्ति । याची ऐशी अर्थस्थिति । कीं दों स्मृतींस विरोधप्राप्ति । तेथें युक्ति बलवंत. ॥ ३२७ ॥ आणि अर्थशास्त्राहून । धर्मशास्त्र बलवंत म्हणोन । याज्ञवल्क्य म्हणतो यावरून । हे न मारावे सर्वथा. ॥ ३२८ ॥ गुरु आजे बाप । यांस मारितां कैसें नव्हे पाप? । जों युद्धीं भीष्मद्रोणप्रताप । तों केंवि मरतो दुर्योधन? ॥ ३२९ ॥ तोही चुलत्याचा सुत । त्याचा वधही नव्हे उचित । लोकविरुद्ध तें निश्चित । नरकातेंचि पाववी. ॥ ३३० ॥

---

१. कदाचित्. २. अभिप्रायास. ३. स्मृतींचीं वचनें. ४. आततायी पुरुषाला मारावें हें अर्थशास्त्र आहे आणि आचार्य माता पिता इत्यादि जनांस मारूं नये हें धर्मशास्त्र आहे. ५. प्राण्यांची हिंसा करूं नये—अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. ६. अर्थशास्त्रानें सांगितलेला. ७. भाषण. (याज्ञवल्क्यस्मृति—अ० १ श्लो० २१.) ८. दोहों स्मृतींचा परस्पर विरोध आला असतां, न्याय हा व्यवहाराहून प्रबल समजावा. अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र बलवत्तर अशी शास्त्रमर्यादा आहे.

**अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्न तु ॥** [स्मृति]

जरी धर्म शुद्ध । आणि दिसे लोकविरुद्ध । तो नरकदायक हें सिद्ध । नरक कौरव मारितां. ॥ ३३१ ॥ यांचा जो पापसंचय । तोच यांस वधी हा निश्चय । परी तें पाप करील आश्रय । आमुचा आम्ही मारितां. ॥ ३३२ ॥ म्हणूनि हें क्रूर कर्म । आम्हीं न करावें हाचि धर्म । ऐसें सिद्ध करूनि परम । हेंचि बोलतो. ॥ ३३३ ॥

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव! ॥ ३७ ॥**

यालागीं धृतराष्ट्राचे सुत । तदर्थ मरणार बहुत । यांस मारावें हें उचित । सर्वथा नव्हे. ॥ ३३४ ॥ बरें, जरी शास्त्रविरुद्ध । यांच्या वधें सुख तों सिद्ध । म्हणुनि म्हणसी तरी हें प्रसिद्ध । स्वजनवधें सुख कैचें? ॥ ३३५ ॥ स्वजन मारूनि माधवा! । सुखी कैसे होऊं देवा! । माधवा! मायेच्या धवा! । सर्वज्ञा सर्व जाणसी. ॥ ३३६ ॥ आतां म्हणसी, हा विचार । तिहींही करावाच सादर । ते उगे आणि वारंवार । तूंचि कां हे विचार करिसी? ॥ ३३७ ॥ म्हणूनि तूंहि अर्जुना! । नको करूं कष्टी मना । म्हणसी मारीं स्वजना । तरी तें आईक बोलतों. ॥ ३३८ ॥

**यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन! ॥ ३९ ॥**

आजि हेही हें जाणती, । परी लोभें नाशिली त्यांची मती । म्हणोनि हे न पाहती । या विचारासी. ॥ ३३९ ॥ सर्वांगसुंदर वरिष्ठ । आणि ललाटीं त्यांच्या कुष्ठ । सर्व सौंदर्यास अनिष्ट । तितकेंचि. ॥ ३४० ॥ तैसा राज्यलोभ यांला । दिसत असोनि ऐसें मला । मीही हा दोष आपणाला । दाटुनि केंवि संपादूं? ॥ ३४१ ॥ लोभें होऊनि नष्टमति । जरी हे हें न पाहती, । आम्ही जाणते स्वदुर्गती । कैसी न चुकवावी? ॥ ३४२ ॥ कुलक्षयें मित्रद्रोह ।

१. जें धर्मकृत्य लोकविरुद्ध आणि स्वर्गहानिहारक आहे तें करूं नये. २. पते! ३. येथें पंडितांनीं शंका काढून तिचें निरसन स्वतः केलें आहे. ४. आपली अधोगति, नरकवसति.

यांत जो [1]पापसंदोह । तो यांला न कळे, पडला मोह, । राज्यलोभें. ॥३४३॥ परी करितां कुलक्षय । अत्यंत दोषाचा संचय । कळतं कैसा न करावा निश्चय । या पापापासुनि परताया. ॥ ३४४ ॥ हें बोलतां कृष्णाप्रति । शंकली अर्जुनाची मति । कीं मारिता जाला [2]यदुपति । कंस मामा आपला. ॥ ३४५ ॥ सभेंत मारिला शिशुपाळ । इत्यादि सुहृदांचा हा काळ । स्वजन मारी जो तो [3]फटकाळ । म्हणूनि म्हणतो याप्रति. ॥ ३४६ ॥ या गोष्टीनें याची निंदा । मज घडते बुद्धिमंदा । म्हणूनि म्हणतों गोविंदा । जनार्दना म्हणोनि. ॥ ३४७ ॥ कीं दुष्टजनाचें अर्दन । करितोसि तूं जनार्दन ! । तूं करावया असुरमर्दन । धरिसी अवतार. ॥३४८॥ तूं कर्मातीत सर्वेश्वर । आम्ही [4]कर्मबद्ध जीव नर । या भावें म्हणे धनुर्धर । जनार्दन म्हणोनि. ॥ ३४९ ॥ आतां आम्हीं वधावें कुळ । तरी अनर्थ होती पुष्कळ । म्हणोनि बोले विव्हळ । [5]पांचां श्लोकें-करूनि. ॥ ३५० ॥

**कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।**

**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

देवा! कुलाचिया क्षयें । कुळींचे धर्म लोपती स्वयें, । जे आचरतां निश्चयें । ब्रह्म [6]सनातन पाविजे. ॥ ३५१ ॥ सनातन म्हणजे नित्य । धर्म कर्ममय हे तों [7]अनित्य । ज्या धर्मीं ब्रह्म सत्य । पाविजे ते सनातन. ॥ ३५२ ॥ तेव्हां हे [8]भागवत धर्म । ज्या धर्मीं [9]विश्वही ब्रह्म । हे नव्हती ते कुलधर्म । जे हीं क्षुद्रदैवतें पूजिती. ॥ ३५३ ॥ ते कुलधर्म बुडाले जरी । हानि होणार काय तरी । त्यांचा शोक न करी । अर्जुन एथें. ॥ ३५४ ॥ म्हणूनि म्हणतों जे धर्म । बुडालिया प्रबळे अधर्म । जो अधर्म करूनि कुकर्म । घात करी कुळांचा. ॥ ३५५ ॥

**अधर्माभिभवात्कृष्ण ! प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।**

**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय! जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

---

१. पापसंचय. २. यादवांचा राजा कृष्ण. ३. वाईट, क्षुद्र, नीच. ४. कर्मानें बांधलेले. ५. श्लोक ४०–४४ पहा. कुलक्षय झाला असतां मोठी अनर्थपरंपराच उद्भवते असें या पांच श्लोकांत वर्णिलें आहे. ६. अनादिसिद्ध, शाश्वत. ७. अशाश्वत. ८. भगवत्संबंधीं धर्म. ९. सर्व जगत्.

अधर्में व्यापिलें जया । त्या कुळींच्या कुलस्त्रिया । भ्रष्टतां करिती जारक्रिया । त्या जारें वर्णसंकर. ॥ ३५६ ॥

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

परपुरुषापासूनि उपजे । तें [2]संतान संकर म्हणिजे । त्या कुळीं मरती जे जे । ते पडती नरकांत. ॥ ३५७ ॥ करिती कुळाचा संहार । त्यांच्या कुळीं होय संकर । उत्तम गतीपासूनि पितर । [3]च्यवती त्यांचे. ॥ ३५८ ॥ कीं [4]पिंडोदकक्रिया । त्यांची न होतां तयां । पतन होय **यदुराया!** । **अर्जुन** म्हणे. ॥ ३५९ ॥ आतां जे स्ववर्णविहित । त्या धर्मीं भगवद्भक्ति निश्चित । भक्तींत धर्म **भा**गवत । ते सद्वंशी कुलधर्म. ॥ ३६० ॥ तें परम धन्य कुळ । त्या कुळींचे पितर सकळ । पावती पदें अढळ । हा सिद्धांत. ॥ ३६१ ॥ ते कुलधर्म शाश्वत । त्यांसि साधन जातिधर्मविहित । या दोहींचा [5]उच्छेद निश्चित । करितां हत्या कुळाची. ॥ ३६२ ॥ हा भाव धरूनि पोटीं । आणि अनुतापाच्या कोटी कोटि । म्हणतों कीं हे गोष्टी खोटी । कुलहत्येची **माधवा!** ॥ ३६३ ॥

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

स्वजातीस उचित कर्म । त्यानें जोडे शाश्वत धर्म । ज्या धर्में शाश्वत [6]ब्रह्म । मानवदेहीं पाविजे. ॥ ३६४ ॥ ऐसे परंपरागत । जातिधर्म आणि धर्म

---

१. "सर्व वर्णांचा संकर होतोः—उत्तम वर्णाच्या स्त्रीचे ठायीं नीच वर्णाच्या पुरुषापासून उत्पत्ति होते, व नीच वर्णाच्या स्त्रीचे ठायीं उत्तम वर्णाच्या पुरुषापासून उत्पत्ति होते, म्हणजे प्रातिलोम्यानें आणि आनुलोम्यानें सर्व वर्ण संकीर्ण होतात. मनु म्हणतोः—व्यभिचारेण वर्णानामवेद्यावेदनेन च । स्वकर्मणां च त्यागेन जायंते वर्णसंकराः ॥ [अ० १० श्लो० २४.] अर्थः—ब्राह्मणादि वर्णांमध्यें व्यभिचार (अन्योन्यस्त्रीगमन) करणें, विवाहसंबंधाला जो अयोग्य त्याच्याशीं विवाहसंबंध करणें, स्वकर्मांचा त्याग करणें यांहीं करून वर्णसंकर होतात. २. अपत्य. ३. पतन पावतात. ४. मेलेल्या पितरांचें श्राद्ध करणें, तर्पण करणें, पिंडदान आणि तर्पण करणें या क्रिया. ५. खंड, नाश. ६. ज्याला रज, तम हे गुण नाहींत; माया, अविद्या हे उपाधि नाहींत; ज्याला उत्पत्ति, विनाश इत्यादि विकार नाहींत; सजातीय, विजातीय, स्वगत हे भेद नाहींत; व देश, काल, वस्तु हे परिच्छेद नाहींत परंतु सच्चिदानंद ईश्वरस्वरूप तें.

शाश्वत[1] । त्यांचा उच्छेद[2] होतो निश्चित । दोषीं ऐशा कुलघ्नांच्या[3]. ॥ ३६५ ॥ कुलांची हत्या करणार । ज्यांच्या दोषें वर्णसंकर । सकळां अनर्थास ऐसे नर । हेतु होती. ॥ ३६६ ॥ परम धर्माची हानी । या कुलहत्येनें म्हणोनी । ऐसा अनुतप्त होउनी । पूर्वीं बोलिला. ॥ ३६७ ॥ ऐशा सद्धर्माचा लोप । करूनि हें कुलहत्येचें पाप । शेवटीं दे परम संताप । ऐसें अर्जुन बोलतो. ॥ ३६८ ॥

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन! ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥**

ज्या धर्मीं जोडे ब्रह्म । ते विच्छिन्न[4] होतां कुलधर्म । मोक्षप्रद मनुष्यजन्म । नरका साधन होतसे. ॥ ३६९ ॥ शाश्वत सनातन[5] जे कुलधर्म । ते विच्छिन्न होतां कैचें ब्रह्म? । उफराटा उपजोनि भ्रम[6] । नियत[7] नरक मनुष्यास.॥३७०॥ ऐसें आम्हीं आइकिलें । आणि हें काय आरंभिलें । म्हणोनि अर्जुनाचें मन क्षोभलें । त्या क्षोभें आतां बोलतो. ॥ ३७१ ॥

**अहो! बत! महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥**

अहाहा! नवल अद्भुत । कीं आम्ही कळत कळत । प्रवर्तलों निश्चित । हें महत्पाप करावया. ॥ ३७२ ॥ जे राज्यलोभेंकरूनि । कवचें[8] घालूनि, शस्त्रें धरूनि । सिद्ध जालों कीं स्वजन मारूनि । राज्य करूं. ॥ ३७३ ॥ अनुतप्त[9] अंतःकरणें । आतां आपण जें काय करणें । तें बोलतो परम करुणें । कुंतीसुत. ॥ ३७४ ॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं[10] भवेत् ॥ ४६ ॥**

आतां शस्त्रें टाकितों । निःशस्त्र होऊनि बैसतों । युद्ध करीन हें तों । कधींच न घडे. ॥ ३७५ ॥ ऐसें देखूनि मज । हे धृतराष्ट्राचे आत्मज । सहरथपदातिसादिगज[11] । लोटूनि येती मजवरी. ॥ ३७६ ॥ तरी प्रतिक्रिया[12] कांहीं । मी त्यांसि करणार नाहीं, । शस्त्रें घेऊनि मारावें तिहीं । मज निःश-

१. नित्य, सनातन. २. लोप, नाश. ३. कुलघातक्यांच्या. ४. खंडित, बंद, बाधित. ५. अनादिसिद्ध. ६. भ्रम. ७. खचित, निश्चित. ८. चिलखतें. ९. पश्चात्ताप झालेल्या. १०. 'प्रियतरम्' इति पाठांतरम्. ११. पदाति=पायदळ; सादी=घोडेस्वार. १२. प्रतिकाराचा उपाय.

त्रासी. ॥ ३७७ ॥ जरी हे ऐशियास मज । मारिती धृतराष्ट्राचे आत्मज । तें माझें कल्याण चरणांबुजं[1] । शिवतों तुझें. ॥ ३७८ ॥ करूनि ऐसा निश्चय । मग काय करिता जाला धनंजय[2] । हें धृतराष्ट्रास संजय । सांगतसे.॥३७९॥

संजय उवाच—**एवमुक्त्वार्जुनः[3] संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु[4] ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥**

ऐसें बोलोनि अर्जुन । शरांसहित शरासन[5] । टाकूनि शोकविव्हळमन । रथीं उगा तो बैसला. ॥ ३८० ॥ हा अध्याय पहिला । जेथें अर्जुनविषाद लिहिला । 'युद्ध न करीं' म्हणून राहिला । अर्जुन उगा. ॥ ३८१ ॥ पुढें अध्याय दुसरा । उपदेश आरंभेल एकसरा[6] । जेणें देहात्मवादी[7] निजसुरा[8] । जागा होय तत्काळ. ॥ ३८२ ॥ ऐशी टीका मराठी । जी संस्कृताचीच धाटी । अर्थभावार्थरहाटी । समजती अनुभवी शास्त्रज्ञ. ॥ ३८३ ॥ संस्कृतीं नसे परिज्ञान । तरी पदपदार्थानुसंधान । समजोनि वक्ते श्रोते जन । सुख पावती. ॥ ३८४॥ गीताकार[9] चिद्घन । मेघश्याम कृपाघन । तोचि हें टीकाजीवन[10] । वर्षतो. ॥ ३८५ ॥ जैसे तुम्ही श्रोते वक्ते जन । तैसाच जाणावा वामन । टीकाकार जगज्जीवन । गीताकार श्रीकृष्ण.॥ ३८६॥ हे भगवत्तत्त्वाची सुधा[11] । सज्जनांची बुद्धिवसुधा[12] । आर्द्र करील बहुधा । वामन म्हणे. ॥ ३८७ ॥ गीतार्थ बिंबला मनीं । तेचि टीका झाली वामनी । जे पाहती दिनयामिनी[13] । भगवत्कृपापात्र ते होती. ॥ ३८८ ॥

---

१. पादकमळ. २. अर्जुन. ३. शोकानें दुःखितांतःकरण होऊन अर्जुन रणामध्यें याप्रमाणें बोलला आणि बाणासह धनुष्य टाकून रथाच्या पुढल्या भागीं जाऊन बसला. ४. श्रीमद्भगवद्गीता ही उपनिषद् आहे. 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥.' सर्व उपनिषद गायी आहेत. गोपालनंदन कृष्ण हा दोहनकर्ता आहे, अर्जुन हा सेवन करणार बुद्धिमान् वत्स आहे आणि गीतामृत हें दुग्ध आहे, याप्रमाणें गीतेचें माहात्म्य अनेक ठिकाणीं वर्णिलेलें आढळतें. ५. धनुष्य. ६. एकदम. ७. देह हाच आत्मा असें प्रतिपादन करणारा. ८. निजलेला, असावधान. ९. गीता करणारा ज्ञानमेघ. १०. टीकारूप उदक. ११. अमृत. १२. पृथ्वी. १३. दिवसरात्र.

**क**मलभव**भ**वाद्याः सर्वदा यन्निदेशे **वि**जयरथ**म**जोऽसौ सेनयोर्मध्यदेशे, ।.
तदुदितवच**ने**न स्थापयामास देवः करुण इति सदास्तु श्री**मु**कुंदो मुदे वः ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥

---

## अध्याय दुसरा.

जय जय जगज्जीवन! । जय जय **श्री**[1]राजीवनयन! । जय जय जी **शे**षशयन! । **ल**क्ष्मीपते! ॥ १ ॥ जय जय करुणालयनिधे! । जय जय [2]ज्ञानविज्ञाननिधे! । जय जय [3]आनंदजलधे! । देवदेव! ॥२॥ करूनि तुझें ध्यान । द्वितीयाध्यायव्याख्यान । आरंभितों **सां**ख्यज्ञान । आरंभ जेथें. ॥३॥ पूर्वाध्यायीं **अ**र्जुन । करूनि शोक[4]संतप्त मन । टाकूनि शर [5]शरासन । रथीं बैसला. ॥४॥ देखोनि ऐसा **ध**नंजय । काय करिता जाला **अ**व्यय । त्याचें अनुसंधान **सं**जय । लावीतसे. ॥५॥

संजय उवाच— **तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

**धृ**तराष्ट्रास **सं**जय । म्हणे पूर्वाध्यायीं **ध**नंजय । युद्ध न करावें हा निश्चय । करी विषादसंयुक्त. ॥ ६ ॥ ज्याचे डोळे व्याकुळ । ज्यांत पूर्ण अश्रुजळ । कृपेनें [6]आविष्ट केवळ । विषादयुक्त. ॥ ७ ॥ त्यातें [7]पूर्णेंदुवदन । हें बोले तो **म**धुसूदन । म्हणूनि भाव [8]गहन । तेथें दावी **सं**जय. ॥ ८ ॥ हा 'न करीं म्हणे [9]कंदन' । परी सारथि केला **म**धुसूदन । [10]**मधुमुरनरककैटभमर्दन** । तो कां सोडितो? ॥ ९ ॥ म्हणूनि म्हणे **म**धुसूदन । पुढें बोलेल तें हें व**चन** । बोलता जाला [11]अज्ञानशमन । श्रीभगवान् **य**दुरूपें. ॥ १० ॥

श्रीभगवानुवाच—[12]**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्? ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन! ॥ २ ॥**

---

१. कमलनयन. २. ऐहिक व परमार्थिक विद्येच्या निधाना. ३. आनंदसमुद्रा. ४. शोकानें तापलेलें (विव्हळ). ५. धनुष्य (शर+आसन=बाण+क्षेपण). ६. व्यापलेला. ७. पूर्ण चंद्रासारिखें मुख ज्याचें असा (कृष्ण). ८. दुर्गम. ९. कत्तल. १०. मधु, कैटभ, मुर व नरकासुर या दैत्यांना मारणारा. ११. अज्ञानाचा नाश करणारा. १२. श्रीभगवान् (कृष्ण) बोलला:—हे अर्जुना! अनार्य जनांनीं सेविलेलें, स्वर्गप्राप्ति न करणारें व अपकीर्ति करणारें असें [हें] [बुद्धि] मालिन्य [या] भयंकर स्थलीं तुला कोठून प्राप्त झालें? हे कुंतीपुत्रा! तूं हतवीर्य

**क्लैब्यं मास्म गमः पार्थ! नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप! ॥ ३ ॥**

पूर्ण षड्गुणवैभव । तो भगवान् देवदेव । म्हणे, 'कोण्या हेतूस्तव । मूढत्व उपजलें हें तूतें? ॥ ११ ॥ कारणें वदसी बहुतें । तीं पोंचट अवघीं नि-मित्तें । हें तूं मानिसी मूढचित्तें-। करूनि या. ॥ १२ ॥ युद्धारंभ विषम काळ । ये समयीं हा फँटकाळ । मोह उपजला तो तत्काळ । नाशी सकळ कल्याणें. ॥ १३ ॥ इहलोकीं अपकीर्ति । स्वर्गहानि नरकप्राप्ति । जे भले ते हें चित्तीं । न धरिती कदापि. ॥ १४ ॥ हे गोष्टी तुच्छांस योग्य । अपकीर्तिकर अस्वर्ग्य, । तुज ऐसे चतुर सभाग्य । मनीं ऐसें न धरिती.' ॥ १५ ॥ मुरडावया मत्त हस्ती । महामात्र दोन्हीं हस्तीं । अंकुश हाणी, तैसा श्रीपति । मर्मोद्घाटनें करीतसे. ॥ १६ ॥ 'नको धरूं षंढपणा । नको स्मरूं पूर्वगुणा । विराटनगरीं आपणा । षंढ म्हणविलें जैसें. ॥ १७ ॥ तोचि संस्कार तुजला । आजि वाटतो उदेला, । परी हा विचार न भला । नको होऊं नपुंसक. ॥ १८ ॥ म्हणसी 'न भांडें आपण' । याहूनि काय लंडीपण । हा तों नपुंसका गुण, । नव्हे तुज योग्य.' ॥ १९ ॥ या प्रसंगीं म्हणे पार्था । पार्थनामीं गहन अर्था । दावीत या भावार्था । पूर्वाध्यायीं वर्णिलें. ॥ २० ॥ पृथा कुंती तिचा सुत । तो पार्थ गूढार्थ यांत । कीं हृदय कोमळ हा निश्चित । मायाळू गुण स्त्रि-यांचा. ॥ २१ ॥ मातेचें दयाळूपण । अवलंबिसी आपण । परी तुझ्या ठायीं हा गुण । योग्य नव्हे. ॥ २२ ॥ जाला असतास कन्या । तरी लोक म्हणते काय धन्या । पुत्र होउनि या दैन्या । काय भाकिसी? ॥ २३ ॥ पृथा नव्हे सामान्या । ते आम्हां यादवांची कन्या । तिचा पुत्र होउनि दैन्या । काय भाकिसी? ॥ २४ ॥ इत्यादि भावविवरण । असो याकारणें म्हणे श्रीकृष्ण । तुज योग्य नव्हे हें लंडीपण । अगा पार्था! ॥ २५ ॥ आणि भ्यालाही अ-ससी । ऐसें वाटतें मानसीं । बहुतेक विसरलासी । सामर्थ्य आपुलें. ॥ २६ ॥ हें क्षुद्र दुर्बळपण । हा मनाचा सहज गुण । तूं साच मानिसी आपण । परम

होऊं नको. हे [हतवीर्यत्व] तुला योग्य नाहीं. हे शत्रूंस ताप देणाऱ्या [अर्जुना!], मनाचें [हें] नीच दौर्बल्य टाकून [युद्धास] उभा रहा. [सरलार्थबोधिनी गीता.]

१. मोह, मंदत्व. २. अवघड प्रसंग. ३. दुष्ट, क्षुद्र. ४. स्वर्गप्राप्तीच्या आड येणारी. ५. चालविण्यास, वळविण्यास. ६. महात. ७. वर्में काढणें. ८. भित्रेपणा. ९. युद्ध करतों. १०. नामर्दपण, बायक्येपण, नामर्दी. ११. लहान. १२. दुबळेपण.

समर्थ होउनि. ॥ २७ ॥ मनाचें दुर्बलत्व । काय साच मानिसी तत्त्व ? । ऊठ अवलंबूनि सत्त्व । परंतपा ! ॥ २८ ॥ तूं पराक्रमी या भावें । 'परंतपा' ऐशा नांवें । तिखेरितों कीं तूं स्वभावें । परंतप. ॥ २९ ॥ पर जे शत्रु त्यांस ताप । करी ऐसा तुझा प्रताप, । मनाच्या दुर्बलत्वें पाप । स्वजनहत्त्या म्हणतोसी. ॥ ३० ॥ हें बोलिला उत्तमश्लोक । याचें उत्तर उत्तरश्लोक । आधींच पार्थ सशोक । दुःखी झाला बहु फार. ॥ ३१ ॥ घाय लागोनि जर्जर । रणीं पडला जो नर । त्यास करिजे लत्ताप्रहार । तैसे अर्जुना हे शब्द. ॥ ३२ ॥ हा समजोनि भावार्थ । क्रोधें संतप्त जाला पार्थ । तडफडोनि पूर्वोक्त अर्थ । सिद्ध करितो अर्जुन. ॥ ३३ ॥

अर्जुन उवाच—**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ! ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ! ॥ ४ ॥**

अर्जुन म्हणे, 'अजी ! स्वामी ! । कैसा भांडों भीष्माशीं मी? । द्रोणाशींही संग्रामीं । झगडों कैसा? ॥ ३४ ॥ वडील पूज्य चक्रपाणी ! । ज्यांसि बोलतां भिते वाणी । त्यांशीं सांग आजि बाणीं । केंवि भांडों? ॥ ३५ ॥ पूजा करावया योग्य । कोण त्यांशीं भांडे अभाग्य? । त्यांशीं भांडणें योग्य । कधीं नव्हे याकरितां.' ॥ ३६ ॥ बोलतां पार्थ शंकला । कीं, 'याणें मामा आपला । केशीं धरूनि आफळिला । भूमीवरी. ॥ ३७ ॥ आज पिता चुलता मामा । समान या वडिलांचा महिमा । त्यांत मामा मारितां या यदूत्तमा । दया ऐशी न उपजली.' ॥ ३८ ॥ यावरूनि मातें । झणीं म्हणेल मारीं यांतें । म्हणोनि पुरुषोत्तमातें । आळवी एथें दों नामें. ॥ ३९ ॥ कीं तूं ईश्वर आपण । कल्पतरूसमान गुण । जे तुज मानिती अरिपणें । तूं तदनुरूप अरि होसी. ॥ ४० ॥ होउनिही मामा । अरि मानी पुरुषोत्तमा । दावूनि कल्पवृक्षाचा महिमा । मारिला तूं अरिसूदना ! ॥ ४१ ॥ तरी म्हणसी तुजशीं युद्ध । करावया हेही सर्व सिद्ध । यांस मारूनि तूंही प्रसिद्ध । होय 'अरिसूदन' म्हणोनि. ॥ ४२ ॥ म्हणूनि म्हणतो अर्जुन । कीं तूं विष्णु मधुसूदन । मी वडिलांचें निर्धन । करितां दुर्गति पावेन. ॥ ४३ ॥ या श्लोकीं हीं

---

१. शत्रूंस ताप करणारा, पराक्रमी. २. तीक्ष्ण करितों, हुशार करितों. ३. कृष्णाचा मामा, कंस. ४. आपटिला. ५. यादवांत उत्तम. (कृष्ण.) ६. कदाचित्. ७. शत्रुत्वानें. ८. शत्रुर्दना. ९. मधुदैत्यास मारणारा. १०. नाश, वध. ११. अधोगति, नरक.

दोन नांवें । अर्जुन योजी इत्यादि भावें । 'आतां हे न मारितां खावें । काय?' म्हणेल तरी बोलतो. ॥ ४४ ॥

**गुरूनहत्वा हि महानुभावाञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥**

सहज वडील गुरु । जे विद्येचे कल्पतरु । महिमेंकरूनि महामेरू । भीष्मादिक. ॥ ४५ ॥ यांचा न करूनि घात । भिक्षा मागोनि लोकांत । भक्षावी हेंही अत्यंत । बरवें वाटे. ॥ ४६ ॥ गुरु मारूनि हे वृद्ध । भोग भोगणें अतिसमृद्ध । ते यांच्या रक्तें अशुद्ध । ग्रास माखूनि भक्षावे. ॥ ४७ ॥ गुरुहत्येचें महापाप । आणि हृदयीं अनुताप । कोणा भोग देखतां कांप । न सुटे शरीरीं? ॥ ४८ ॥ हे एथेंचि नरक, । मेल्या होती ते तों अनेक, । यांच्या वधें आणिक एक । अनर्थ भोग भोगितां. ॥ ४९ ॥ हे अर्थकाम सकळ । अर्थ संपादिती पुष्कळ । भोग भोगिती अविकळ । अर्थकाम ते ऐसे. ॥ ५० ॥ राज्य आम्हीं करावें । यांस अर्थकामें भरावें । तयां मारूनि विसरावें । कवणेपरी? ॥ ५१ ॥ स्वहस्तें यांचीं निधनें । करूनि मेळवूं जीं जीं धनें । तीं तीं यांचीं पूजासाधनें । स्मरोनि तों तों रडावें. ॥५२॥ यांला अन्नें फळें प्रियें । तीं देखतां हे निश्चयें । आठवतील तेव्हां स्वयें । मारिलें हेंचि स्मरावें. ॥ ५३ ॥ तीं अन्नें तीं फळें । यांच्या रक्तें केवळें । माखूनि भक्षिलीं ओंगळें । ऐशीं वाटती. ॥ ५४ ॥ न मारितां यांस भिक्षा । मागूनि भक्षूं अंबुजाक्षा! । दोहीं याच पक्षा । अंगीकारणें बहु बरें. ॥ ५५ ॥ यापुढें दुसरा श्लोक । बोले पार्थ पुण्यश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । अर्थासहित परिसोत. ॥ ५६ ॥ आतां जें तूं निपुण । बोलिलास कीं लंडीपण । युद्ध न करावयाचा करिसी पण । म्यां या गोष्टीस लाजावें. ॥ ५७ ॥ आणि करावया युद्ध । म्यां व्हावें आजि सिद्ध । तरी दोहीं लोकीं विरुद्ध । दोहीं पक्षीं विपरीत. ॥ ५८ ॥ कोण पक्ष होणार । हाही न कळे विचार । आतां इतकेही प्रकार । बोलों पाहतों. ॥ ५९ ॥ तत्रापि होऊनि दक्ष । कोण तो करावा पक्ष । कोणता बरा म्हणतां प्रत्यक्ष । विरुद्ध दोन्ही. ॥ ६० ॥ एवं इतकेही प्रकार । यावेगळाले विचार । करितां न दिसे एक निर्धार । म्हणूनि म्हणतों या श्लोकीं. ॥ ६१ ॥

---

१. मधुसूदन व अरिसूदन. २. घांस. ३. चोपडून (रक्तानें भरलेले). ४. संपूर्ण. ५. मरणें. ६. ओंगळ, अमंगल. ७. कमलनेत्रा (कृष्णा). ८. प्रतिज्ञा. ९. निश्चय.

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥**

आम्ही जिंकों यांला । तें बरें आम्हांला । कीं तो पक्ष भेला । कीं हे जिंकिती आमुतें.॥६२॥ दोहोंचा नव्हे निर्धार । विचारितां वारंवार । कीं आमचें बरें तो कोण प्रकार । दोहींमध्यें ? ॥ ६३ ॥ यांस मारावें तेव्हांच । जय आमचा होणार सांच[1] । तेव्हां अपयशें प्रपंच । व्यापे नरक हा शेवटीं. ॥ ६४ ॥ आतां यांचा जय । आम्ही मेलों तरीच होय । तरी नरक हा निश्चय । आम्हांस आणी अपकीर्ति. ॥ ६५ ॥ **भीष्म द्रोण** यांची हिंसा[2] । करूं म्हणोनि संकल्प ऐसा । करूं आम्ही तेव्हां कैसा । चुकेल वास नरकाचा ? ॥ ६६ ॥ प्रत्यक्ष गुरूतें मारणें । मनीं धरिलें राज्याकारणें । त्या पापेंचि पावले मरणें । अपकीर्ति गाती हे लोक. ॥ ६७ ॥ दोहीं पक्षीं यापरी । युद्ध न करणें गोष्टी बरी । म्हणोनि भिक्षा भक्षूं परी । युद्ध न करूं म्हणतसे.॥६८॥ आतां म्हणसी **हरी** ! । कीं यांस मारिल्या उपरी । सुख पावसी आणि समरीं[3]। जय निश्चयें तूं पावसी. ॥ ६९ ॥ तरी हें न घडे कांहीं । यांस मारितां सुख नाहीं । यांस मारूनि वांचावें हेही । इच्छा आम्हांस होईना. ॥ ७० ॥ अनुताप[4] ऐसा मनातें, । तो काय मारील यांतें । शस्त्र तरी कैसें हातें । तो यांवरी उगारील ? ॥ ७१ ॥ याकारणें म्हणतों **हरी** ! । कीं ज्यांचा वध केल्यावरी । वांचों न इच्छूं ते ये अवसरीं[5] । समोर उभे हे धार्तराष्ट्र[6]. ॥ ७२ ॥ तरीच हातींचें चाप । गळालें, जाला अनुताप, । करीन म्हणेन तरी हें पाप । जाण न करवे माझ्यानें. ॥ ७३ ॥ संमुख उभे परी । हात वाहेना यांवरी, । युद्ध करूं कोणेपरी । सांग आतां ? ॥ ७४ ॥ आतां पुढील जो श्लोक । तो **पां**[7]डुपुत्र पुण्यश्लोक । कां बोलेल सुज्ञ लोक । निमित्त त्याचें परिसोत. ॥ ७५ ॥ कीं कोणेपरी न करवे युद्ध । भिक्षा भक्षणें हेंचि शुद्ध । हा अर्थ केला पूर्वी सिद्ध । परी मागुती शंकला. ॥ ७६ ॥ कीं यांशीं युद्ध न करणें । आणि भिक्षा मागून भक्षणें । तेंही अपयश नपुंसकपणें । अपयशें नरक निश्चित. ॥ ७७ ॥ तरी आतां काय करूं । या **कृष्णाचे** पाय धरूं । गुरुपणें यातेंचि वरूं । येविषयीं. ॥ ७८ ॥ म्हणोनि दों श्लोकीं शरण । येतो वंदूनि **कृष्णचरण** । त्यावरूनि आत्मानात्मविवरण[8] । उपदेशील जगद्गुरु. ॥ ७९ ॥

---

१. खरोखर. २. हत्या, हनन. ३. युद्धांत. ४. पश्चात्ताप. ५. समयीं. ६. धृतराष्ट्राचे कुमार. ७. अर्जुन. ८. आत्मा आणि अनात्मा यांविषयीं विचार.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७॥**

यांशीं न भांडणें हें कर्म । मज निश्चयें वाटे धर्म । आणि तूं म्हणतोसि अधर्म । जाणें नरक अपकीर्ति. ॥ ८० ॥ ऐसें हें धर्मसंकट । मोह उपजला उत्कट । अविवेकें चित्त निपैट । मूढ जालें. ॥ ८१ ॥ इत्यर्थ न सुचे मज । म्हणोनि पुसतों जी! तुज । कीं जें श्रेयाचें गुंज । कृष्णजी! तें बोल. ॥८२॥ ज्या श्रेयें निश्चित । कल्याण होय तेंचि त्वरित । सांग मातें कीं शरणागत । शिष्य मी तुझा. ॥ ८३ ॥ मानी गुरूच्या शासना । करी त्याची उपासना । तो शिष्य तरी गरुडासना! । तैसाच मी. ॥ ८४ ॥ माझें कल्याण तुझे चरण । हें समजोनि आलों शरण । आतां जें जें असेल करणें । तें तें करीं शासन. ॥ ८५ ॥ म्हणसी तूंहि नीतिनिपुण । आपलें हित तूं आपण । विचारूनि करीं, शरण । काय निमित्त मज येसी? ॥ ८६ ॥ तरी या संकटें झालों दीन । दीनपणें त्या बुद्धिहीन । म्हणूनि पुसतों तुज अधीन । झालों आलों शरणागत. ॥८७॥ आतां पुढील जो श्लोक । तो पांडुपुत्र पुण्यश्लोक । कां बोलेल हें सुज्ञ लोक । निमित्त त्याचें परिसोत. ॥ ८८ ॥ अर्जुन म्हणे उत्तमश्लोक । म्हणेल तुज जाला शोक । हा जाईल तेव्हां भूलोक । येईल हाता. ॥ ८९ ॥ तरी तूं आतां धनंजया! । यांस मारूनि पाव जया । हा शोक जातां अवघिया । या गोष्टीला विसरसी. ॥ ९० ॥ यांत काय तत्त्वाचें विवरण । असे कीं तूं येतोस शरण । ऐसें बोलेल श्रीकृष्ण । म्हणूनि बोलतों हा श्लोक. ॥ ९१ ॥

**नहि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥**

जें हा माझा शोक हरी । तें मी न देखें जी! श्रीहरी! । ज्या शोकें इंद्रियें सारीं । शोषूनि टाकिलीं. ॥ ९२ ॥ जितांच या भूमीवरी । सार्वभौम होऊनि श्रीहरी! । देवाचें राज्यही जरी । प्राप्त होय निष्कंटक. ॥ ९३ ॥ ज्या देवराज्यास दैत्य । कंटक नसती तें आधिपत्य । प्राप्त जालें तरी सत्य । न हरी! हरी या शोका. ॥ ९४ ॥ शोकें जाली भ्रांति । हें सत्य, परी त्याची

---

१. फार. २. केवळ. ३. भ्रांत, विवेकशून्य. ४. गुह्य. ५. पूजासेवा. ६. गरुड आसन ज्याचें असा (विष्णु). ७. राज्य. ८. ब्रह्मस्वरूपाचें. ९. निवारी. १० शत्रुरहित.

शांति । अन्य उपायें न घडे यदुपति! । शरण आलों म्हणोनी. ॥ ९५ ॥ ऐशी अर्जुनाची वाणी । धृतराष्ट्रास संजय वर्णी । परी जाणे अंतःकरणीं । जें असे अर्जुनाच्या. ॥ ९६ ॥ भाव ऐसा पांडवाचा । कीं म्यां शब्द माधवाचा । ऐकावा ऐशी वाचा । माझी म्यांच गोंविली. ॥ ९७ ॥ युद्ध करावें हें मनीं । याच्या आहे म्हणोनी । शासन करील हेंच एथुनी । कीं शासनार्ह मी शिष्य. ॥ ९८ ॥ तरी हें एक वेगळें करूनी । मज योजिसी ज्या शासनीं । तें करीन म्हणतों म्हणोनी । बोले संजय. ॥ ९९ ॥

संजय उवाच—**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप! ।**

**न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥**

जो श्रीकृष्ण हृषीकेश । त्यास अर्जुन गुडाकेश । जें बोलिला कीं उपदेश । करिसी तो मी करीन. ॥ १०० ॥ संजय म्हणे, 'जी! रोया! । ऐसें अर्जुन बोलोनियां । शेवटीं म्हणे गोविंदा तया । कीं युद्ध न करीं. ॥१०१॥ न करीं युद्ध म्हणोनि । गोविंदातें बोलूनि । राहिला उगा मौन धरूनि । धनंजय. ॥ १०२ ॥ 'गो'शब्दें वेद, । वेदीं जाणिजे तो 'गोविंद' । तोचि या रूपें मुकुंद । गुरु जाला. ॥ १०३ ॥ एवं वेदीं जाणावें । तें तत्त्व कृष्णें सांगावें । याणें युद्धींच योजावें । नसे शरण यालागीं. ॥ १०४ ॥ युद्ध न करणें चित्तांतूनी । आणि तत्त्व आइकावें हें मनीं । युद्ध न करी म्हणोनी । या भावें म्हणे गोविंदा. ॥ १०५ ॥ अतएव अर्जुन गुडाकेश । 'गुडाका' निद्रा तिचा ईश । निद्रा भ्रांति ते प्रवेश । न करी ज्याच्या हृदयांत. ॥१०६॥ तत्त्वश्रवणीं सावध । तरी यांचा कां न करी वध । श्रुति स्मृति विविध । हा धर्म बोलती क्षत्रियां. ॥ १०७ ॥ तरी या भ्रांतीचा लेश । त्याच्या मनीं न करी प्रवेश । परी काय करी हृषीकेश । प्रेरी म्हणे संजय. ॥ १०८ ॥ या दों नामीं हाचि अर्थ । पूर्वाध्यायीं सिद्ध समर्थ । तो निजभाव यथार्थ । एथें दाखवी संजय. ॥ १०९ ॥ धृतराष्ट्रास याचा प्रत्यय । म्हणोनि म्हणे संजय । कीं स्वधर्म धनंजय । नेणे काय परंतप. ॥ ११० ॥ 'पर' जे शत्रु त्यांतें ताप । करिसी तूं धरिसी जो प्रताप । शत्रु स्वजन तरी काय पाप । हें कैसें नेणे अर्जुन? ॥ १११ ॥ एवं हृषीकेशें प्रेरिला । हाचि सिद्धांत सिद्ध जाला । आतां श्रीकृष्ण बोलिला । तें संजय वदे या श्लोकीं. ॥ ११२ ॥

---

१. बजावीन. २. धृतराष्ट्र. ३. आत्मानात्मविवेक. ४. वास्तव. ५. अध्याय १ श्लो० २४ पहा.

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत! ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥**

तो भ्रांत[१] नव्हे लेश, । परंतु कृष्ण हृषीकेश । करावया गीतोपदेश । प्रेरी जया. ॥ ११३ ॥ तयातें हें वचन । हृषीकेश मनमोहन । बोले हांसूनि गै-हन[२] । तें हास्य वर्णी संजय. ॥ ११४ ॥ हांसे हांसिल्याचेपरी । ऐसा हांसत बोले हरी, । जाणों देखोन हास्य करी । मूर्खत्व त्याचें. ॥ ११५ ॥ स्वयें तो नेणोनि निजधर्म । जरी युद्ध मानिता अधर्म । तरी हांसणें उचित कर्म । तैसें नाहीं. ॥ ११६ ॥ जो जाणत असोनि । म्यांच मोहिला म्हणोनि । यास काय हांसावें मनीं । भाव ऐसा. ॥ ११७ ॥ परी वाटावें त्याला । कीं माझ्या मूर्खत्वासि हांसला । म्हणोनि हांसिल्याचे परी दाविला । हास्यभाव. ॥ ११८ ॥ 'प्रहसन्निव' म्हणोनी । या 'इव' शब्देंकरूनि । संजय निजभाव[३] उघडूनि । एथें दाखवी. ॥ ११९ ॥ सर्वदा सर्वांच्या मती । प्रेरी हाचि विश्वपती । परी प्रेरकत्व दों रीतीं । हें पुढें स्पष्ट होईल. ॥ १२० ॥ पाप पुण्य करवी देव । आणि फळ भोगी जीव । तेव्हां निर्दय वासुदेव । हें तों अयुक्त. ॥ १२१ ॥ प्रेरी सर्वांस तो ऐसा । कीं नेत्र वर्तवी रवि जैसा । रोगियास शंख पीतसा[४] । दिसे रोगें[५] आपल्या. ॥ १२२ ॥ बुद्धि प्रकाशी श्रीहरी । ते वासनानुरूप कर्म करी । पुण्यें जीवां गति बरी, । पापें नरक. ॥ १२३ ॥ आतां याच्याच कर्माचें फळ । प्रारब्धरूप प्रबळ । तें भोगाया केवळ । प्रेरी शक्ति ईश्वराची. ॥ १२४ ॥ किंवा कल्पवृक्षस्वभावा[६] । भक्त म्हणती, 'दे भक्ति देवा!' । नाशूनि त्यांच्या कुभावा[७] । देतसे सद्भाव. ॥ १२५ ॥ श्रुति म्हणे, 'आत्मा[८] रथी । देह रथ बुद्धि सारथी.' । अर्जुनें बुद्धिस्थानीं रथी । परमात्मा प्रार्थिला. ॥ १२६ ॥ म्हणूनि दावूनि कृपालेश । करूं पाहे उपदेश । त्यास निमित्त हृषीकेश । हें करी. ॥ १२७ ॥ प्रेरिली ऐशी बुद्धि । तो कंटाळला युद्धीं ।

---

१. मूढचित्त. २. गूढार्थक. ३. आपला आशय, स्वाभिप्राय. ४. पिंवळट. ५. कामलानामक रोगानें. कावीळ झाली असतां रोग्यास सर्व पदार्थ पिंवळे दिसतात. ६. कल्पवृक्षासारखा स्वभाव ज्याचा अशा (देवा). ७. वाईट वासना. ८. 'आत्मानꣳरथिनं विद्धि शरीरꣳरथमेव तु । बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ इंद्रियाणि हयानाहुर्विषयाꣳस्तेषु गोचरान् । आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ (क. व. ३. ४.) आत्मा रथांत बसणारा असें जाण. शरीर हें रथच. बुद्धि ही सारथी असें जाण. मन ही आनती. इंद्रियें हीं घोडीं. त्या घोड्यांना विषय हे मार्ग.

या प्रसंगें कराया समृद्धी । [1]ब्रह्मविद्येची. ॥ १२८ ॥ स्वयेंचि त्याच्या चित्तीं । हे उपजली नाहीं भ्रांति । तरी हांसेल **श्री**पति । काय त्याला. ॥ १२९ ॥ परी त्यास वाटावें अंतरीं । कीं आपणास हांसे हरी । म्हणोनि हांसल्याचे परी । हास्य वर्णी **सं**जय. ॥ १३० ॥ हांसल्याचे परी अजी । हासत दों सैन्यांमाजी । हें वचन बोले **कृ**ष्णजी । तो भगवान् षड्गुण. ॥ १३१ ॥

श्रीभगवानुवाच—**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**

शोक न करावा जयांचा । शोक करितोसि तूं तयांचा । व्यर्थ आपल्या जीवाचा । [2]आट करिसी. ॥ १३२ ॥ ऐसियाकारणें शोक । करिती अत्यंत मूर्ख लोक । तूं चतुर [3]पुण्यश्लोक । काय रडसी यांकारणें ? ॥ १३३ ॥ म्हणावास मूर्ख जरी । तरी पांडित्ययुक्ति नानापरी । प्रज्ञावंताच्या [4]कुसरी । शास्त्र अवलंबूनि बोलसी. ॥ १३४ ॥ **भी**ष्माशीं झगडों कैसा ? । आणि **द्रो**णाशीं, म्हणशी ऐसा । ज्यांशीं न बोलवे शब्द [5]सरसा । शर कैसे टाकूं त्यांवरी ? ॥ १३५ ॥ इत्यादि पांडित्याचे बोल । पाहतां अवघेच [6]फोल । वाटती तुज सखोल । विचारितां उथळ अत्यंत. ॥ १३६ ॥ काय सर्वेही विवेक । जाणसी तूंचि एक ? । वेडे तुझेच [7]कुलतिलक । **भी**ष्मादि सर्व. ॥ १३७ ॥ हाच **भी**ष्म पाहें । [8]गुरूशीं भांडला आहे । हात तुझा न [9]वाहे । ज्यावरी. ॥ १३८ ॥ **भीष्म** न होय आपला पती, । म्हणोनि **परशुरामा**प्रती । शरण गेली [10]**अं**बा सती । जो **राम** गुरु **भी**ष्माचा. ॥ १३९ ॥ '[11]स्त्री करीं' म्हणे [12]आचार्य, । [13]हो न सोडी ब्रह्मचर्य । तेव्हां **भी**ष्म आणि [14]**भृ**गुवर्य । झगडले. ॥ १४० ॥ [15]**भी**ष्म गुरूस हाणी बाण । तूं त्याहूनिही मोठा सुजाण । टाकूं पाहसी प्राण । त्याशीं झगडतां. ॥ १४१ ॥ इत्यादि भाव पोटीं । भगवद्वाणी सखोल मोठी । या भावें म्हणे खोटी । बुद्धि तुझी **अर्जुना** ! ॥१४२॥ कीं शोक न करावा ज्यांचा । शोक करिसी तूं त्यांचा । व्यर्थ आपल्या जीवाचा । [16]आँट करिसी. ॥ १४३ ॥ अरे ! **भी**ष्म ब्रह्मचारी । गुरुवचनें वरिता

---

१. ब्रह्मज्ञानाची. २. संताप. ३. पवित्रयशस्क. ४. युक्ति. ५. दमदार. ६. पोकळ. ७. कुलभूषण. ८. भार्गवरामाशीं. मोरोपंतकृत उद्योगपर्व—अध्याय १४ यांत भीष्मभार्गवराम-युद्धकथा आहे. ९. उचले. १०. काशीराजाची ज्येष्ठ कन्या. ११. अंबेशीं विवाह कर. १२. गुरु परशुराम. १३. भीष्म. १४. परशुराम. १५. ही कथा महाभारताच्या उद्योगपर्वांत आहे. (अध्याय १७३-१९४.) १६. ओंवी १३२ पहा.

नारी । तरी पतित न होता, विचारी । पावता गृहस्थाश्रम. ॥१४४॥ तथापि आपली प्रतिज्ञा । न सोडी, मोडी गुरूची आज्ञा । त्या गुरुवरा सर्वज्ञा । बाण हाणे. ॥ १४५ ॥ त्या **भी**ष्मावरी बाण । टाकितां जाती तुझे प्राण । जो जाला अंगत्रीण[१] । **दु**र्योधनाचा. ॥ १४६ ॥ अरे! गुरु **प**रशुराम। शिष्यवत्सल[२] निष्काम । अल्प प्रतिज्ञेसाठीं **भी**ष्म । झगडला त्याशीं. ॥ १४७ ॥ यांस तों **दु**र्योधनें । पोसूनि आपल्या धनें । **भी**ष्म **द्रो**ण साधनें । केलीं तुमच्या वधासी. ॥ १४८ ॥ त्यांवरी कैसे टाकूं शर? । म्हणूनि बोलसी तूं चतुर । जालासि ऐसा शोकातुर[३] । देखोनि त्यांला. ॥ १४९ ॥ त्यांशीं झगडणें उचित । आणि वृथा होसी दुश्चित्त[४] । अरे! हा धर्म वृद्धसंमत[५] । व्यर्थ शोक हा तुझा. ॥ १५० ॥ एवं हा तुझा शोक । विचारितां अत्यंत अविवेक । आतां आश्रय एक । या शोकासि दिसतो. ॥ १५१ ॥ कीं हे आपले आप्त । यांस मारणें जालें प्राप्त । यानिमित्त संतप्त । जालासि तूं. ॥ १५२ ॥ तरी हें निपट[६] अज्ञान । न यांत धर्म न यांत ज्ञान । ममता अहंता अभिमान । रडवी तुज. ॥१५३॥ कीं ज्यांचे गेले प्राण । आहेत त्यांसही मरण । असें म्हणूनि सुजाण । शोक न करिती पंडित. ॥ १५४ ॥ या श्लोकांच्या[७] उत्तरार्धीं । ये रीतीची अर्थसिद्धी । या अर्थापासूनि समृद्धी । तत्त्वज्ञानाची. ॥ १५५ ॥ ज्ञानरीतीकरूनि[८] । कोणी मरणारचि नाहीं म्हणोनि । बोलतो आतां एथूनि । देवाधिदेव[९]. ॥ १५६ ॥ मरणें मारणें दोन्ही । ज्ञानमार्गीं लटकीं म्हणोनि । बोलोनि धर्मन्यायेंकरूनि । युद्ध करणें स्थापील. ॥ १५७ ॥ पाहतां सर्व लटिकें । पुण्य कर्म तितकें । परी अज्ञानें केलें असकें[१०] । अज्ञास सत्य. ॥१५८॥ रज्जू[११] न कळतां होय साप । भय उपजवी, तैसें पाप । [१२]बोबडी वळे, कांप । सर्प म्हणोनी. ॥ १५९ ॥ जों न कळे [१३]अधिष्ठान । तों पाप पुण्य अज्ञान । पाहों जातां ज्ञानें । नसती दोन्ही. ॥ १६० ॥ परी जों होय जागृत । तों स्वप्न साचें निश्चित । सुखदुःखहेतु अत्यंत । खरे तोंवरी. ॥ १६१ ॥ जो स्वप्नीं क्षुधाक्रांत[१४] । तो स्वप्नींच्या अन्नें होय शांत । स्वप्नींचा देह स्वप्नजळांत । बुडे सर्वथा. ॥ १६२ ॥ तैसे स्वर्गादि विषय । पुण्यें[१५] होती हा निश्चय, । जरी विषय पुण्यसंचय । दोन्ही

---

१. रक्षक, कवच. २. शिष्यावर प्रीति करणारा. ३. दुःखपीडित. ४. व्याकुलमन, दुःखी. ५. वृद्धांस मान्य. ६. केवळ. ७. अकराव्या श्लोकाच्या. ८. ब्रह्मज्ञानदृष्ट्या. ९. भगवान् श्रीकृष्ण. १०. सगळें. ११. दोरी. १२. हें भयाचें व्यंजक चिन्ह आहे. १३. आधार, स्थान. १४. भुकेलेला. १५. पुण्यानें प्राप्त होतात.

मिथ्या. ॥ १६३ ॥ तैसेंचि मिथ्या पाप । मिथ्या नरक संताप, । परी कर्माचा ऐसा प्रताप । कीं दुःख अवश्य भोगवी. ॥ १६४ ॥ एवं दुःखदायक कर्म । सुखदायक शुद्ध कर्म । तेव्हां धर्मास अनुकूळ कर्म । सर्वथा करावें. ॥१६५॥ दों प्रकारीं तो धर्म । काम्य कर्म, निष्काम कर्म, । काम्यें बंध, निष्कामें ब्रह्म । हें रहस्य. ॥ १६६ ॥ यालागीं मुख्य फळ । ब्रह्मज्ञान केवळ । परंतु चित्त निर्मळ । निष्काम कर्में जरी होय. ॥ १६७ ॥ तें वर्णाश्रमांस उचित । करावें तेव्हां शुद्ध चित्त । म्हणूनि ज्ञान आणि विहितें । धर्मोपदेश एथूनि. ॥ १६८ ॥ एवं ज्ञान आणि धर्म । दोहींस संमत हें कर्म । हें न कळोनि अर्जुन संभ्रम । म्हणतो, 'न करीं युद्ध मी.' ॥ १६९ ॥ हें युद्ध धर्मानुकूळ । हें पुढें बोलणें प्रबळ । प्रस्तुत मनीं हेंचि केवळ । धरूनि शोक निषेधिला. ॥ १७० ॥ एवं वृथा शोकप्रसंग । पूर्वार्धीं निषेधी श्रीरंग । उत्तरार्धापासूनि अंतरंग । ज्ञान उपदेशूं पाहतो. ॥ १७१ ॥ शास्त्र आणि ज्ञानवृद्ध । त्यांस संमत हें युद्ध । यालागीं धर्मविरुद्ध । शोक तुझा. ॥ १७२ ॥ आतां एका गुणें प्राप्त । शोक जाला कीं हे आप्त । मारावे कैसें म्हणून तप्त । जाला असती. ॥ १७३ ॥ तरी यांस मारणें उचित । ऐसें असोनि कां दुश्चित्त । हा शोक अनुचित । हें सिद्ध जालें. ॥ १७४ ॥ अधर्म नव्हे हें मारण । परी स्वजन पावती मरण । शोक असेल याकारण । बहुतेक. ॥ १७५ ॥ तरी हाही शोक उचित । भल्यास नव्हे निश्चित । म्हणोनि बोलतो अच्युत । या उत्तरार्धें. ॥ १७६ ॥

**गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥**

ज्या देहींचे गेले प्राण । ज्यांचे आहेत त्याहीकारण । शोक पंडितांचे गण । सर्वथा न करिती. ॥ १७७ ॥ कीं पंडितांच्या मतें । स्वप्नतुल्य सर्व भूतें । असत्य अशाश्वतें । कां रडावें त्यांलागीं ? ॥ १७८ ॥ स्वप्नीं सखे सोयरे । काय न वाटती खरे । तैसे हेही लोक सारे । शोक करावा किमर्थ ? ॥ १७९ ॥ स्वप्नींचीं इंद्रियें हेंचि मन । ज्या मनें निर्माण केला जन । जागृतींतही मनोनयन । स्वप्नजन दिसे आठवितां. ॥ १८० ॥ तैसें स्थूल देहाचे दृष्टी । जरी देखिली मिथ्या सृष्टि । मेल्याजित्याकारणें कष्टी । कां ते होती पंडित ?

---

१. काम्यकर्म. २. फलेच्छेनें केलेलें कर्म. ३. फलेच्छा न धरितां केलेलें कर्म. ४. शास्त्रप्रतिपाद्य. ५. भ्रांतियुक्त. ६. लक्ष्मीपति. ७. अंतर्यामी. ८. शास्त्रवृद्ध आणि ज्ञानवृद्ध. ९. गतासु. १०. अगतासु. (ज्यांचे प्राण आहेत.) ११. मनाच्या डोळ्यानें. १२. मनुष्यदेह.

॥ १८१ ॥ आपण आत्मा अतींद्रिय । इंद्रियें स्वप्न आणि विषय । स्वप्नदृष्टि स्वप्नप्रत्यय । जागृतास. ॥ १८२ ॥ एवं ज्याचे गेले प्राण । आणि जिवंतास पुढें मरण । ऐसें म्हणोनि दोहींकारण । शोक न करिती पंडित. ॥ १८३ ॥ इत्यादि भाव चित्तीं । तों ऐसें म्हणे यदुपति । कीं पंडित शोक न करिती । जित्या मेलियाचा. ॥ १८४ ॥ यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तेंही निमित्त सुज्ञ लोक । परिसोत ऐसें. ॥ १८५ ॥ वाखाणिला पूर्वश्लोक । त्या श्लोकीं उत्तमश्लोक । अर्जुनाचा निषेधी शोक । धर्मविरुद्ध म्हणोनि. ॥१८६॥ त्यांत मेले आणि जीवंत । दोहींकारणें पंडित । शोक न करिती तूं अत्यंत । मूर्ख कीं शोक करिसी. ॥ १८७ ॥ हा उत्तरार्धाचा अर्थ । एकीकडूनि होतो व्यर्थ । कीं ते मरतील म्हणोनि पार्थ । शोक न करी. ॥ १८८ ॥ यांस मी मारूं कैसा ? । इतकाच शोकाचा वेळसा । हे मरती कीं शोक ऐसा । न करी अर्जुन ॥ १८९ ॥ ऐसा वाखाणितां अर्थ । हा दोष ठेविती समर्थ । याचा अर्थ यथार्थ । वाखाणिला ऐसा. ॥ १९० ॥ कीं यांस मारणें अधर्म । तेव्हां शोक करणें अधर्म । तरी शोकाचें मूळ भ्रम । कीं हे मरती म्हणोनि. ॥ १९१ ॥ न हें अर्जुनाचे मनीं । परी माथां स्थापलें येऊनी । हे मरती कीं कैसा मारूं म्हणोनी । अंगीं न करवे शोक. ॥ १९२ ॥ हे मरती कीं ऐसा शोक । स्थापितो हा उत्तमश्लोक । कीं न करिती पंडित लोक । शोक मेल्या जित्याचा. ॥ १९३ ॥ तरी कोण्या ज्ञानें शोक । न करिती पंडित लोक । हें अतःपर उत्तमश्लोक । बोलेल तें आइका. ॥ १९४ ॥ शोक माझा व्यर्थ । त्याचा कोणे परी तरी हा अर्थ । सिद्ध करील समर्थ । तरी हो असाचि. ॥ १९५ ॥ या प्रसंगें ज्ञान । सांगेल करुणानिधान । कीं शोक पंडित जन । न करिती कैसा. ॥१९६ ॥ ऐसा सादर श्रोता । श्रीगुरु देखोनि आतां । वदेल नित्यानित्यता । आत्मानात्मविवेकें. ॥ १९७ ॥ कोणे दृष्टीं पंडित । शोक न करिती अनुचित । तें अर्जुना सांगे निश्चित । या श्लोकीं. ॥१९८॥

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

मीं तूं हे जनाधिप । अगा ! अनादि नित्यस्वरूप । सर्वांस एक एक रूप ।

---

१. इंद्रियांनीं जाणण्याजोगा नव्हे तो. २. विळखा. ३. यापुढें. ४. दयानिधि. ५. शाश्वत आणि अशाश्वतपणा. ६. चैतन्य आणि जड यांच्या विवेकानें. ७. कोणत्या दृष्टीनें, कसा विचार केला असतां. ८. अयोग्य. ९. राजे. १०. शाश्वत.

लागलेंचि असे. ॥ १९९ ॥ मागें कधीं आम्ही नव्हतों । सर्वथाही न घडे
अर्जुना! हें तों, । जे आतां देहधारी दिसतों । तेचि होतों पूर्वीही. ॥२००॥
पूर्वीही एक एक देह । आम्हांस होता निःसंदेह । तैसेंच आतां ज्याचा स्नेह ।
दुर्लभत्वें अपंडितां. ॥ २०१ ॥ आतां हीं रूपें जाती । पुढें आणिक न होती ।
हेंही न घडे मागुती । होती देह सर्वांसी. ॥ २०२ ॥ आत्मा नित्य शाश्वत ।
देह पुनः पुनः निश्चित । मेल्याकारणें पंडित । शोक न करिती यालागीं.
॥ २०३ ॥ या श्लोकीं जीवांमाजी । श्रीकृष्ण आपणास मोजी । कीं काल-
त्रयीं कृष्णजी । तोही करी अवतार. ॥ २०४ ॥ आणि जीव वेगळेसे । हा
भेद दृष्टी न दिसे । याकारणें शब्द ऐसे । निघती मुखामधूनि. ॥ २०५ ॥
आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तें निमित्तही सुज्ञ लोक ।
परिसोत अर्थासहित. ॥ २०६ ॥ आत्मा अनादि शाश्वत, । पुनः पुन्हा देह
निश्चित, । परी एक जाऊनि एक प्राप्त । जाला यासी. ॥ २०७ ॥ पूर्वील देह
सोडावा । नवा एक जोडावा । ऊर कैसा न फोडावा । आजि या शोकें ?
॥ २०८ ॥ म्हणेल ऐसें अर्जुन । यालागीं श्री[1]जगज्जीवन । या मोहाचेंही
निरसन[2] । करितसे या श्लोकीं. ॥ २०९ ॥

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

याच देहीं अर्जुना! । देहांतरां[3]ची भावना । एथें कोणी मानीना । देहांतर.
॥ २१० ॥ देहास जाणे देही[5] । नाना अवस्था त्याच देहीं । पुढिले अवस्थे-
माजी नाहीं । रूप मागिले अवस्थेचें. ॥ २११ ॥ न दिसे कांहीं बालपण ।
शरीर होतां तरुण । वृद्ध होतां पूर्व लक्षण[6] । कांहींच न दिसे. ॥ २१२ ॥
देहीं अवस्था ना[illegible] । पालटती, स्वयें पालटेना, । तैशी देहांतरभावना । द्रष्टा[7]
तोचि. ॥ २१३ ॥ बाल्य जातां मेला । कीं तारुण्य येतां उपजला[8] । तैसा
देहांतरा गेला । पूर्व देह टाकूनि. ॥ २१४ ॥ एथें मोहे[9] अधीर, । न मोहे
जो पुरुष धीर । कीं दृश्य तितकें नव्हे स्थिर । द्रष्टा अविनाशी सर्वदा.
॥ २१५ ॥ एथें कां फुटावा ऊर । एक जातां दुजें शरीर । आत्मा नित्य

१. परमात्मा श्रीकृष्ण. २. भ्रमाचा परिहार. ३. देहांत जे फेरफार होतात त्यांची.
४. अवस्था. ५. जीव, प्रतिबिंब, आत्मा. ६. बालतरुणपणाचें चिन्ह. ७. देहास पाहणारा
आत्मा. ८. जन्मला. ९. मोह (भ्रम) पावतो.

म्हणोनि धीर । न मोहती एथें. ॥ २१६ ॥ यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तें निमित्त सुज्ञ लोक । अर्थसंयुक्त समजोत. ॥ २१७ ॥ आत्मा नित्य शाश्वत । देह देहापुढें निश्चित । तथापि शोक उचित । एक गुणें. ॥ २१८ ॥ कीं आपला सखा सोयरा । त्यास देह प्राप्त दुसरा । परी ते सोयरीक यदुवीरा । भंगेल कीं. ॥ २१९ ॥ यांस पाहतां सुखी नेत्र । यांच्या शब्दें सुखी श्रोत्र[1] । यांस आलिंगितां गात्र[2] । सौख्य पावे. ॥ २२० ॥ देहांतर प्राप्त त्याला । जो एक देह त्यजोनि गेला । जीवंत सुहृद[3] यांला । तें सुख कैंचें त्यावरी ? ॥ २२१ ॥ आणि यांच्या दर्शनें । सुखी होती त्याचीं नयनें । त्वचा[4] आलिंगनें । सुखी होती. ॥ २२२ ॥ एवं देहांतरा जाणें । कां नव्हे शोकाकारणें । नराचा[5] हा शोक नारायणें । हरिजेला या श्लोकीं. ॥ २२३ ॥

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय ! शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ! ॥ १४ ॥**

मेले आणि जीवंत । शोक दोहींचाही पंडित । कां न करिती याचा अंत । एथवरी आला. ॥ २२४ ॥ कीं शोक न करणें उचित । परी इंद्रियद्वारा चित्त । सुख वेत होतें निश्चित । अंतरलें. ॥ २२५ ॥ तरी बापा ! तेचि पंडित । जिहीं विषय इंद्रियजनित[6] । सुख तें दुःख निश्चित । मानिलें. ॥२२६॥ आणि जाले विरक्त[7] । तरीच ते युक्त । शोक न करूनि मुक्त । जितांच जाले. ॥ २२७ ॥ कीं हीं विषयेंद्रियें । शीतोष्णसुखाच्या निश्चयें । दुःख देती जीं स्वयें, । केवळ रूपेंचि दुःखाचीं. ॥२२८॥ उष्णकाळीं शीत । सुख दाखवी निश्चित । वस्तुतः तें अत्यंत । दुःखरूप. ॥ २२९ ॥ शीतकाळीं उष्णता । सुख दाखवी देहवंता[9] । वस्तुतः ते पाहतां । दुःखरूप. ॥ २३० ॥ एवं विषयेंद्रियें[10] । हीं दुःखरूपें निश्चयें । त्यांत वाटे सुख तें स्वयें । आत्मसुख. ॥ २३१ ॥ मृग मृगजळातें धांवती । मार्गीं नदीचें जळ पिती । धांवतां उरीं फुटती । मृगजळाकारणें. ॥ २३२ ॥ ज्याकारणें ऊर फुटे । सुख त्याच्याच पानें वाटे । जळ नदीचें प्यालें वाटे । तें वेगळें हें नेणती. ॥२३३॥ तैसेंच[11] आत्मगत सुख । विषय इंद्रियें केवळ दुःख । हें नेणती [12]बहिर्मुख ।

१. कान. २. अंग. ३. सोयरे. ४. कातडी. ५. अर्जुनाचा. ६. इंद्रियांपासून झालेलें. ७. विषयभोगांवरून ज्यांची प्रीति उडाली आहे. ८. जीवंत असून. ९. देहधारी जीवाला, प्राण्याला. १०. विषय आणि इंद्रियें. ११. सुख आत्म्यांत आहे. १२. आत्मा न जाणून बाहेरचे विषयच मात्र पाहणारे.

अनुभवी जाणती. ॥ २३४ ॥ उष्ण शीतातें परिहरी । शीत उष्णातें हरी । सुख वाटतें अंतरीं । आत्मसुख. ॥ २३५ ॥ सुषुप्तीसारिखें सुख । प्रपंचीं नसे आणिक । इंद्रियविषयांचें सुख । न दिसे तया सुषुप्तींत. ॥ २३६ ॥ विषयें-द्रियांरहित । सुख आहे निश्चित । हें जाणती पंडित । अनुभवी जे. ॥ २३७॥ विषयेंद्रियां उत्पत्ति नाश । त्यांत कैंचा सुखाचा लेश । आणि अनित्य ज्यांचा भ्रंश । होय मरणापूर्वींही. ॥ २३८ ॥ अंध होतां रूप नाहीं, । बधिर होतां नाइके कांहीं, । ऐशीं अनित्य तिहीं । काय सुख द्यावें प्राण्यास ? ॥ २३९ ॥ मेले त्यांचा वियोग । होतां विषयेंद्रियभोग । अंतरे म्हणोनि नित्य योगें । इच्छिसी अनित्याचा. ॥ २४० ॥ हे गोष्टी जाली सिद्ध । जें सर्व दुःखबीज प्रसिद्ध । दुःखसंसारबद्ध । जो तो याच गोष्टीनें. ॥ २४१ ॥ कीं ज्या भोगीं सुख । निश्चित त्याच भोगीं दुःख । सुखीं मातें आणिक । घाबरा होय दुःखांत. ॥ २४२ ॥ म्हणोनि इच्छी सुख । न हो म्हणे कधीं दुःख । या चिंतेनेंचि मुख । विश्रांतीचें न ओळखे. ॥ २४३ ॥ ऐसा कोण विषय । कीं भोगितांच तृप्त इंद्रिय । वियोग होतां तरी होय । अत्यंत दुःख. ॥ २४४ ॥ विषयवि-योगें रडावें । त्या रडें काय घडावें ? । कां धैर्य धरूनि न पडावें । समाधानीं ? ॥ २४५ ॥ न होतांही वियोग । घडतां विषयेंद्रिययोग । दुःख उपजवी तोचि भोग । शीतोष्णरूपें. ॥ २४६ ॥ शीतकाळीं पहांटे । उष्ण अत्यंत गोड वाटे । दुपारां चालतां वाटे । दुःख भोगी तयाचेंच. ॥ २४७ ॥ त्या उष्णें पावे दुःख । तों अस्तमानीं सूर्यमुख । मार्गीं न दिसतां सुख । मानी उष्णें पीडिला. ॥ २४८ ॥ जों अंगींचा उष्मा जाय । तों शीतसुखस्पर्श होय । त्याच शीतें हाय हाय । करूं लागे घडिभरां. ॥२४९ ॥ उष्ण आठवी शीतीं । उष्णीं स्मरे शीत चित्तीं । सुख दावूनि अंतीं । भोग तितका दुःख दे. ॥ २५० ॥ भोगीं होतां सुख । मातें फुगे आणिक । तेथेंचि होतां दुःख । तळमळूं लागे. ॥ २५१ ॥ विषयसुखीं मातला । तों दुःखें चिंतेंत घातला । मातेना तो भला । नव्हे दुःखी घाबरा. ॥ २५२ ॥ जरी घाबरा जाला । दुःखभोग न सोडी त्याला । म्हणोनि विवेकी भला । दोन्ही गोष्टी सोशितो. ॥ २५३ ॥ म्हणोनि विषयेंद्रियां । सोशीं तूं ऐसा **धनंजया** ! । कीं हीं टाकि-तांहीं तयां । वांचूनि वर्तणें घडेना. ॥ २५४ ॥ तरी तूं सोशीं यातें । साहें

---

१. नाशी. २. गाढ निद्रा. ३. नाश. ४. त्या इंद्रियांनीं. ५. संग. ६. मातती, माजती, उन्मत्त होतो. ७. माजतो आणि आनंदानें फुगतो. ८. जो उन्मत्त होत नाहीं.

योगावियोगांतें । कीं सुखीं मातणें, दुःखीं चित्तें । घाबरें होणें, तें नको. ॥ २५५ ॥ एवं स्वजनवियोग । होतां, [1]अंतरे विषयभोग । हें सोसूनि राहतां योग । महासमाधानाचा. ॥ २५६ ॥ कीं सर्वही अनित्य । वियोग होणें हें सत्य । यालागीं हें अगत्य । सोशीं तूं. ॥ २५७ ॥ कीं ज्या भोगांत सुख । त्याच भोगांत दुःख, । शीतांत उष्ण आणिक । शीतही तैसें उष्णांत.॥२५८॥ जितां स्वजनदेह । नेत्रें[2]सुख दे, लावी स्नेह । मृत देखतां सुख स्नेह । न नेत्रांसी. ॥ २५९ ॥ आलिंगितां जि[3]ता देह । [4]त्वचेस उपजे सुख स्नेह । [5]शव आलिंगितां निःसंदेह । दुःखकोटि त्वचेसी. ॥ २६० ॥ जितां जयाच्या गोष्टी । कर्णीं पडती अमृतवृष्टी । मेल्या करिती अत्यंत कष्टी । त्याच गोष्टी परिसतां. ॥ २६१ ॥ एवं जितां जयाचा स्नेह । न धरी आणि तो मरे देह । तरी दुःखही न उपजे संदेह । काय एथें. ॥ २६२ ॥ म्हणोनि तूं **अर्जुना!** । नित्य न मानी स्वजना । आणि स्नेह न लावी मना । तरी मेल्या न होसी संतप्त. ॥ २६३ ॥ टाकोनि यांची [6]असोसी । योग वियोग यांचा सोसीं । तरीच सुखी राहसी । अगा! **भारता!** ॥ २६४ ॥ **अर्जुनासि** एथें **'भारता'** । म्हणे [7]**भरतवंशप्रसूता** । भाव कीं तूं तत्त्वता । समर्थ आहेस हें सोसीं. ॥२६५॥ [8]आतां पुढील श्लोक । जो कां बोले **उत्तमश्लोक** । तें निमित्त पुण्यश्लोक । भावार्थें शीं परिसोत. ॥ २६६ ॥ इंद्रियां विषयभोग । यांचा योग आणि वियोग । एथें [9]सम पाहणें योग । समाधानाचा. ॥ २६७ ॥ सम होणें कठिण आहे । तरी तूं सोसूनि राहें । ऐसें बोलोनि भाव पाहे । **अर्जुनाचा.** ॥२६८॥ तों त्याच्या मनीं हे गोष्टी । कीं न म्हणों आम्ही सुखी कष्टी । परी या समाधानें दृष्टी । सुख कांहीं दिसेना. ॥ २६९ ॥ सुख न मानूं होतां सुख । कीं सुख म्हणतां होय दुःख । या समाधानें आणिक । सुख कांहीं दिसेना. ॥२७०॥ आणि टाकोनि [10]अंसोसी । म्हणतो हे गोष्टी सोसीं । सोसूं तरी आम्हांसी । सुख [11]कांकाय? ॥ २७१ ॥ आतां हें सोसणें । सुखदुःखीं समाधान असणें । या जीचें उसणें । अमृत फेडी. ॥ २७२ ॥ ऐसा अर्थ **श्रीहरी** । बोलोनि हा संदेह हरी । **कृष्ण** [12]भवगजकेसरी । या श्लोकीं. ॥ २७३ ॥

---

१. न प्राप्त होई. २. नयनानंद. ३. जित्याचा. ४. कातडीला. ५. प्रेत. ६. उत्कंठा, हांव. ७. भरताच्या वंशांत उत्पन्न झालेल्या. ८. येथें पुढील श्लोकाचें प्रयोजन सुचविलें आहे. ९. समान, तुल्य. १०. हव्यास, अतीच्छा. ११. तांदळांची पेज. १२. संसाररूप हत्तीचा नाश करणारा सिंह.

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ! ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

विषयेंद्रियांचें सोसणें । तें सुखदुःखीं समान असणें । सोसिता हा सद्यो-गुण । कीं त्यांची व्यथा स्पर्शेना. ॥ २७४ ॥ देहींच उठला फोड । तो खाजवितां वाटे गोड । खाजवितां उठती मोड । तिडकांचे त्यांतूनी. ॥२७५॥ ऐसें भोगसुखीं सुख । आणि भोगदुःखीं दुःख । मानितो तों आणिक । दुःखें कोटि उपजती. ॥ २७६ ॥ फोडा खाजवूं हे असोसी । धैर्य धरूनि जो सोसी । व्यथा न देतां तयासी । बरा होय. ॥२७७॥ ऐसा सुखदुःखीं सम । धैर्यें राहे साधकोत्तम । त्यास विषयेंद्रियसंगम । व्यथा न करी. ॥ २७८ ॥ या कारणें अगा! **पार्था**! । सुखदुःख तुल्य ज्या समर्था । त्या धीरपुरुषा व्यथा । न देती विषयेंद्रियें. ॥ २७९ ॥ तो पुरुष मोक्षा दुर्लभा । योग्य होतो पुरुषर्षभा! । तूं पुरुषश्रेष्ठा! प्रभा । संपादीं ऐसी. ॥ २८० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां वोले **उत्तमश्लोक** । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । भावार्थासहित परिसोत. ॥२८१॥ एथोनि तत्त्वोपदेश । करितो श्रीहृषीकेश । पूर्वानुसंधानलेश । अवलंबूनी. ॥२८२॥ स्वजनमरणीं दुःख । हें कीं दर्शनादि सुख । त्याचें अंतरलें आणिक । हेतु नाहीं शोकासी. ॥ २८३ ॥ हा हेतु सिद्ध होतां जो सम । तो मोक्षसाध-कोत्तम । योग्य होतो हा नियम । जगद्गुरू बोलिला. ॥ २८४ ॥ पूर्वश्लोकीं **हरी** । बोले ऐसी वैखरी । ते अर्जुनें बरी । कानीं घेतली. ॥२८५॥ **कृष्ण-कृपेची माउली** । **पार्थवत्साकडे** आली । जगाकारणें पान्हा घाली । सुखका-मधेनु प्रथम. ॥ २८६ ॥ चातक उतावेळ **अर्जुन** । कीं **मेघश्याम कृपाघन** । मुक्तिप्रद ज्ञानजीवन । शीघ्र वर्षो मजवरी. ॥ २८७ ॥ मुखचंद्राचे **किरण** । शब्दरूपें करिती स्फुरण । **पार्थचकोर** श्रवण । घेऊं म्हणे. ॥ २८८ ॥ मोक्षा योग्य पुरुष । त्यास जें ज्ञानपीयूष । हा श्रवणीं **परमपुरुष** । तें उपदेशू मज-

---

१. तात्कालिक गुण. २. मोक्षसिद्धीविषयीं फारच प्रवृत्त. ३. धीर=विषयग्रहणेभ्यो धियं राति निगृण्हातीति धीरः [शंक. स.]. ४. पुरुषश्रेष्ठा. 'पुरुषर्षभ' यांत 'ऋषभ' हें पद श्रेष्ठत्वसूचक आहे. 'स्युरुत्तरपदे व्याघ्रपुंगवर्षभकुंजरा । सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थगोचराः' [अमर-कोश–कांड ३ विशेष्यनिघ्नवर्ग श्लो० ५९.]. ५. सामर्थ्य. ६. वाचा. ७. हें रूपकालंकाराचें उदाहरण आहे. ८. मुक्ति देणारें ज्ञान हेंच जीवन (पाणी). ९. चकोर हा पक्षी चंद्रकिरणपान करून आपलें पोषण करतो असा कविसंकेत आहे. 'ज्योत्स्ना पेया चकोरैः' इति साहित्यदर्पणे. १०. ज्ञानामृत.

प्रती. ॥ २८९ ॥ ऐसें मन उतावेळ । तें जाणे श्रीमेघनीळ[1] । म्हणोनि ज्ञान केवळ । उपदेशितो या श्लोकीं. ॥ २९० ॥

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**

जडास नाहीं सत्ता । जडास नाहीं नित्यता । सत्ता[2] नित्यता तत्त्वतां[3] । सद्वस्तूसचि[4]. ॥ २९१ ॥ **'सत्ता'** म्हणजे असणें, । **'नित्यता'** म्हणजे न नासणें, । जें न दिसे सत्तेविणें । तेंचि अनित्य. ॥ २९२ ॥ सोनें तेंचि असे । म्हणोनि सत्ता त्यास दिसे । अलंकार त्याविण न भासे । सत्ता नाहीं तयाला. ॥ २९३ ॥ ज्याला नाहीं सत्ता । तें असत्, त्याला न नित्यता, । दोन्ही गोष्टी पाहतां । अलंकारीं. ॥ २९४ ॥ अलंकार आकार दिसे, । विचार करितां तो नसे, । नुसतें सोनेंचि गंवसे[5] । दुसरें नाहीं. ॥ २९५॥ अलंकाराविण । असों जाणे सुवर्ण । आपणामाजी आपण । असे हे सत्ता. ॥ २९६ ॥ सोन्याविण अलंकार । कांहीं नसतो आकार । असद्वस्तुप्रकार[6] । ये रीती त्याचा. ॥२९७॥ ऐसे दृष्टांत वेदीं । अभेद[7] जेथें नानाभेदीं । आणि मिथ्यात्व[8] कार्यवृंदीं । कारणीं सत्यत्व. ॥ २९८ ॥ ब्रह्म न घडे, न मोडे, । धातु मोडे आणि घडे । म्हणोनि म्हणती कोणी वेडे । कीं दृष्टांत साजेना. ॥ २९९ ॥ दृष्टांत एकदेशी[9] परी । आकार मिथ्या धातु खरी । घडी मोडी सत्य जरी । घडेमोडेना धातुपण. ॥ ३०० ॥ दुधाचें जालें दहीं । तें दहीं दूध नव्हे कधींही । ऐसें तों सोन्यास कांहीं । न दिसे रूपांतर. ॥ ३०१ ॥ आकाराचाच आकार । सोनें स्वयें निर्विकार[10] । घडणें मोडणें हे प्रकार । त्याच्या शक्तीस, न तया. ॥ ३०२ ॥ नव्हतें घडलें कडें[11] । तेव्हां सोनें केवढें । वाटोळें लिंबाएवढें । लांब केळासमान. ॥ ३०३ ॥ गोटी म्हणतां वाटोळें । सळा म्हणतांचि लांबोडें । त्रिकोण चतुष्कोण यावेगळें । निखिळें[12] सोनें तें कैसें? ॥ ३०४ ॥ जरी वाटोळें त्याचें रूप । तरी लांबोडें नव्हे हेमस्वरूप[13] । ऐसें पुसतां सरली हूंप[14] । स्वरूप त्याचें न बोलवे. ॥ ३०५ ॥ आतां जे पीतच्छाया[15] । तेच कनकाची[16] कांया[17] । तरी ते लांब वाटोळी कीं या । वेगळी त्रिकोण चतुष्कोण. ॥ ३०६ ॥ पीतच्छाया लां-

---

१. मेघश्याम कृष्ण. २. सत्ता आणि नित्यता हे दोन गुण खरोखर सद्वस्तूलाच असतात. ३. यथार्थ. ४. खरी वस्तु, ब्रह्म. ५. सांपडे. ६. खरी नव्हे जी. ७. भेदरहित. ८. खोटेपणा. ९. एक भागाला लागू पडणारा, एक अंशाला लागू पडणारा. १०. विकाररहित. ११. वलय. १२. सकल. १३. सोन्याचें रूप. १४. धैर्य. १५. पिंवळी कांति. १६. सुवर्णाची. १७. देह.

बोडी । तरी नासावी होतां वाटोळी । लांब आंखूड नव्हाळी[1] । तेव्हां न घडे सुवर्णाची. ॥ ३०७ ॥ लंबत्व अथवा वर्तुलत्व । जरी सुवर्णाचें सुवर्णत्व । तें नासतां, न नासे धातुत्व । घडलें मोडलें तें काय. ॥ ३०८ ॥ एवं दुधाचें दहीं । तैसें न होय सोन्याचें कांहीं । सुवर्णत्वीं हानि नाहीं । हानि नाहीं ब्रह्मत्वीं. ॥ ३०९ ॥ ब्रह्मत्वीं हानि नाहीं । तेव्हां घडमोडी नाहीं कांहीं । मृत्तिका हेमदृष्टांतही । वेदसिद्ध. ॥ ३१० ॥

**'[2]यथा सोम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृण्मयं विज्ञातं स्याद्वाचारंभणम् । विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्'** ॥ [छां० उ०—६-१-४.]

कळतां एक मृत्पिंड । कळले घटादि उदंड । ज्यांत त्यांत मातीच अखंड । आकार लटिके शब्दमात्र. ॥ ३११ ॥ आकार लटिके, खरी माती । तैसें ब्रह्म सर्वांभूतीं । भूतें मिथ्या होऊनि जाती । देखतां ब्रह्म. ॥ ३१२ ॥ याकारणें सोनें असे । तें सत्[3], आणि असत् अलंकार दिसे । कीं तो नाहीं त्यांत गवसे । एक सोनें. ॥ ३१३ ॥ ऐसें असत् ज्याला सत्ता[4] । नसे म्हणोनि नाहीं नित्यता । सत् तेंचि असे नित्यता । त्यास कीं सत्ता तेची. ॥ ३१४ ॥ एवं दृश्य[5] प्रकार । देहादि नाना विकार । हा असत् अनित्य आकार । नाहीं भाव जडास या. ॥ ३१५ ॥ दिसोनिही पटाचा भाव, । तंतु[6]च भाव पट अभाव[7] । तैसा नसे सद्भाव । जडास या. ॥ ३१६ ॥ **'नासतो विद्यते भाव'** । या भावें म्हणे देव । आतां जें सत् तया अभाव । नाहीं म्हणतो तो स्वयें. ॥ ३१७ ॥ सत् ब्रह्म तेंचि आहे । तें आहे म्हणणेंही न साहे । तरी बुद्धि त्यास पाहे । तन्मय[8] होउनी. ॥ ३१८ ॥ जें जडाहूनि विलक्षण[9] । बुद्धि अनुभवी विचक्षण । तें जड असत् ब्रह्मलक्षण । सत् म्हणोनि तें बुद्धि वर्णी ॥ ३१९ ॥ सत् म्हणजे सत्य । असत् म्हणजे असत्य । असत् अनित्य, सत् नित्य । अभाव नसे तयाला. ॥ ३२० ॥ जें सत् सत्ता निराकार[10] । त्याचाच आणीक एक प्रकार । सत् म्हणणें हा प्रकार । दोहींसही. ॥ ३२१ ॥

**'[11]सदेव सोम्येदमग्र आसीत् ।'** [छां० उ०—६-२.]

हे सामवेदींची श्रुति । उद्दालक श्वेतकेतूप्रति । म्हणे हे सृष्टि आदीं होती ।

---

१. नवेपणा. २. हे सोम्य ! जसें एका मातीच्या गोळ्यानें सर्व मातीचें म्हणून केलेलें जें तें सर्व कळतें, वाणीनें ठेवलेलें जें नांव. विकार—व्यर्थ आहे, मृत्तिकाच काय ती खरी. ३. खरें. (ब्रह्म.) ४. अस्तित्व. ५. दिसणारे. ६. सूत. ७. नाहींपणा. ८. त्यानें पूर्ण, त्यासारखी. ९. भिन्न. १०. आकार नाहीं ज्याला. ११. सोम्य ! सत् हेंच पूर्वीं होतें.

सद्वस्तु[1] मात्र. ॥ ३२२ ॥ कीं द्रष्टा नव्हता जेधवां । हा सर्प रज्जूच[2] होता तेधवां । श्रुत्यर्थ ऐसा सदैवा । ब्रह्मनिष्ठासचि[3] कळे. ॥ ३२३ ॥ प्रस्तुतीं हेचि गोष्टी । कीं जेव्हां नव्हती जीवदृष्टी । नव्हती मिथ्याभास सृष्टी । होतें ब्रह्मचि सत् एक. ॥ ३२४ ॥ तें सत् ब्रह्म केवळ । तेथें प्रगटे मायामृगजळ । सूर्यकिरणीं कल्लोळ[4] । उठती जेवीं मध्यान्हीं. ॥ ३२५ ॥ तें ब्रह्मीं ईश्वरपण । आणि मायात्रिगुणीं सत्त्वगुण । त्यांत जो ईश्वर आपण । प्रतिबिंबला जो जीव. ॥ ३२६ ॥ तो सत्त्वगुण निर्मळ । नानाघटीं जैसें जळ । नाना जळीं रविमंडळ । ईश्वर तैसा या देहीं. ॥ ३२७ ॥

**'यथा ह्ययं ज्योतिरात्मा विवस्वानापो भिन्ना बहुधैकोऽनुगच्छन् ।**
**उपाधिना क्रियते भेदरूपो देवः क्षेत्रेष्वेवमजोऽयमात्मा ॥'**

जैसा हा ज्योतिर्मंडळ । जो सूर्य नभीं[5] केवळ । तो पावोनि भिन्न भिन्न जळ । एक बहुधा होतसे. ॥ ३२८ ॥ नाना क्षेत्रीं[6] ऐसे भेद । देव पावला म्हणे वेद । ते हे जीव ज्यांस खेद । उपाधियोगें. ॥ ३२९ ॥ श्रुति ज्योतिर्मय मंडळ । सूर्यास म्हणे कीं तैसेंचि उज्ज्वळ[7] । प्रतिबिंब दिसे प्रतिजळ । प्रकाशूनियां. ॥ ३३० ॥ एवं सत्स्वरूप बिंब । तैसें सत्स्वरूप प्रतिबिंब । कीं ज्याचा धरूनि अवलंब[8] । जड अहंकार मी म्हणे. ॥ ३३१ ॥ एवं एक सत् तें बिंब । सत् दुसरें प्रतिबिंब । सुखदुःखभोगावलंब । सत् दुसरें तयासी. ॥ ३३२ ॥ अवलंबोनि मीपणा । प्रतिबिंबात्मा[9] आपणा । नेणोनि सत्यपणाच्या खुणा । मी जडदेह म्हणतसे. ॥ ३३३ ॥ त्यास बंध तो हाच । कीं देह आपण मानी साच । ते देहात्मता अहाच[10] । सत् असत् वेगळें कळतां. ॥ ३३४ ॥ म्हणोनि म्हणे देव । कीं, **'नासतो विद्यते भाव'** । आणि जें सत् तया अभाव । कधीं नाहीं. ॥ ३३५ ॥ म्हणत होता मी देह । आत्मपणें तयाचा स्नेह । तो फिटला संदेह । या विवेकेंकरूनी. ॥३३६॥ देह असत् क्षेत्र । जड मिथ्या दृश्यमात्र । विकार ज्याचे विचित्र । क्षेत्रज्ञ सत् जाणे जाणता याचा. ॥ ३३७ ॥ आपणास नेणें देह । अथवा ज्यास आपला स्नेह । त्यासही नेणें निःसंदेह । या विवेकेंकरूनी. ॥ ३३८ ॥ मी माझें म्हणोनी । या जडास आपण मानुनी । अहंपणें

---

१. खरी वस्तु. (ब्रह्म.) २. दोरी. ३. ब्रह्मस्वरूपीं ज्याची निष्ठा त्यास. ४. झोत, लाट. ५. आकाशांत. ६. देहीं. ७. प्रकाशित. ८. आश्रय. ९. जीवात्मा. १०. उगीच, व्यर्थ.

अभिमानूनी । जाणें म्हणावें सत् तया. ॥ ३३९ ॥ मी एक आहें ऐसें पाहे । प्रकाशवंत तोचि आहे । हे सत्ता ज्यास त्यास साहे । सत् म्हणवणें. ॥ ३४०॥ हें सत्पण नाहीं जया । असत् जड म्हणावें तया । जाणें आपणा आणि दुजिया । सत् म्हणावें तयासचि. ॥ ३४१ ॥ हे दोन्ही मिळोनि एक । समजणें हाचि अविवेक[1] । जैसें दूध आणि उदक । भिन्न न दिसे. ॥ ३४२ ॥ हीं दोन्ही निवडी हंस । जगद्गुरु देवावतंस[2] । तथापि हा परमहंस । हंसाहूनी. ॥ ३४३ ॥ हंस निवडी जळ क्षीर[3] । तथापि उरवी भिन्न नीर[4] । गुरु निवडोनि न करी उशीर । अमृत करी दोहींसी. ॥ ३४४ ॥ पूर्वार्धीं या विवेकीं हंस । तोचि उत्तरार्धीं परमहंस । दोहींचें तत्त्व अवतंस[6] । ब्रह्मादिहंसांचा बोलतो. ॥ ३४५ ॥ हा जडचैतन्याचा विवेक । या ज्ञानाचें नांव **व्य**तिरेक । आतां या दोहींचें तत्त्व एक । तें अन्वयज्ञान बोलावें. ॥ ३४६ ॥ असत् जड, सत् चैतन्य, । जें विपरीत लक्षणें अन्योन्य । तें एकाहूनि एक अन्य । वेगळीं दिसती. ॥ ३४७ ॥ हे दोन्ही ज्यापासुनी । जें मुख्य सत् म्हणोनी । वेद वर्णिती सत्ता जुनी । नवी नित्य. ॥ ३४८ ॥ तें ब्रह्म कळावें यावरी । म्हणोनि म्हणतो **श्री**हरी । कीं असत् सत् कळलें परी । कळावें तत्त्व दोहींचें. ॥ ३४९ ॥ हा शरणागता उपदेश । करीतसे श्रीहृषीकेश । परी या शरणागतीं लेश । न्यूनत्व असे. ॥ ३५० ॥ कीं **भी**ष्मादिकांस कैसा । मी मारूं म्हणोनि ऐसा । धर्मसंकटीं जाला पिसा[7] । आला शरण यास्तव. ॥३५१॥ तेविषयींच उपदेश । त्यास करी हृषीकेश । परी हृदयीं कृपालेश । कीं अनादि अज्ञान नाशावें. ॥ ३५२ ॥ परंतु ब्रह्मनिष्ठापासीं । ये शास्त्रमंत्र भागायासी । ज्ञान न इच्छी तों तयासी । न सांगती ब्रह्म. ॥ ३५३ ॥ जो जें पुसे जैसें । त्यास तेंचि सांगती तैसें । ज्ञान मागतां कृपारसें । सांगती ब्रह्म. ॥ ३५४ ॥ **'किं तद्ब्रह्म'**[8] ऐसा प्रश्न । अष्टमाध्यायीं **अर्जुन** । करील तेव्हां करुणाघन[9] । अपरोक्षामृतातें[10] वर्षेल. ॥ ३५५ ॥ प्रस्तुत युद्धसंदेह । स्वजनांचा उपजला स्नेह । तो परिहरूनि देह । आत्मा नव्हे हें सांगतो. ॥३५६॥ कीं आत्मा तो नित्य देह । मरणारचि अनित्य । आणि स्वधर्में तों अगत्य । क्ष-

१. मूर्खत्व, अविचार. २. देवांचें शिरोभूषण. ३. दूध. ४. पाणी. ५. सोळाव्या श्लोकाच्या पूर्वार्धांत. ६. शिरोभूषण. (कृष्ण.) ७. वेडा. ८. गीता–अध्याय ८ श्लोक १ यांत हे शब्द आहेत. यांचा अर्थ:–'सांगा तें ब्रह्म'. [ज्ञानेश्वरी.] ९. दयेचा मेघ. १०. आत्मज्ञान हेंच अमृत त्यास.

त्रियें तुवां मारावें. ॥ ३५७ ॥ हें सांगणें प्रस्तुत । आणि अपरोक्ष सांगणें निश्चित । दोहीं पक्षीं आदीं उचित । जडचैतन्य सांगणें. ॥ ३५८ ॥ तें त्या श्रीउत्तमश्लोकें । सांगितलें पूर्वार्धश्लोकें । सत् असत् कृपावलोकें । लक्षणांसहित वर्णिलें. ॥ ३५९ ॥ आतां या दोहींचें तत्त्व । तत्त्वांत ज्यास पूर्णत्व । त्याचें जाणती अनुभवी महत्त्व । हें उत्तरार्धें बोलतो. ॥ ३६० ॥

**उभयोरपि दृष्टोऽतस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

हें असत् सत् म्हणोनी । जें तुज बोलिलों दोनी । त्यांचें तत्त्व अनुभवेंकरूनी । अनुभवी तत्त्वदर्शी जाणती. ॥ ३६१ ॥ या दोहींचा जो अंत । अंत म्हणजे तत्त्वसिद्धांत । तत्त्वसिद्धांत म्हणजे ज्यांत । सत्त्वत्वें जें असे. ॥ ३६२ ॥ म्हणोनि म्हणतो अनंत । कीं या दोहींचाही अंत । देखिला असे याच दोंत । तत्त्वदर्शी जे तिहीं. ॥ ३६३ ॥ माती जैसी घटीं । कीं तंतु जैसा पटीं । कारणें असती शेवटीं । नसेचि कार्य. ॥ ३६४ ॥ घटाहूनि पूर्वीं माती । मातीच उरे अंतीं । घटकाळींही नुसती । मातीच दिसे. ॥ ३६५ ॥ ऐसी प्रपंचीं ब्रह्मसत्ता । उघडी देखती गा! तत्त्वतां । तत्त्वदर्शी याकरितां । म्हणिजेतें त्यांतें. ॥ ३६६ ॥ प्रपंच इंद्रियां भासे । बुद्धीस नुसतें ब्रह्म असे, । मृगजळ दृष्टी दिसे । उष्ण असे बुद्धीतें. ॥ ३६७ ॥ हातीं गुळाचा भेला । रसना चाटीतसे ज्याला । दृष्टि रस नेणें तरी त्याला । काय भेला म्हणेल? ॥ ३६८ ॥ मनुष्यदृष्टी मृगजळ । दिसोनिही तें केवळ । उष्ण वाटे परि जळ । कधीं न वाटे. ॥३६९ ॥ उष्ण सूर्याचें केवळ । हरिणास वाटे सत्य जळ । तैसें अज्ञजनांसि निखिल । जडचि सत्य. ॥ ३७० ॥ तत्त्वदर्शी तत्त्व । देखती तें द्रष्टृत्व । ऐसें कीं बुद्धि सत्त्व । तोचि डोळा तयांचा. ॥३७१॥ ज्या इंद्रियास जो विषय । त्या विषयासहित तें इंद्रिय । बुद्धीस दृश्य परि अद्वय । ब्रह्म देखे दोहींत. ॥ ३७२ ॥ एवं प्रपंच दृश्य सविकार । हें असत् यांत निर्विकार । ब्रह्म देखती सार । असारींही. ॥ ३७३ ॥ असत् जड हें याचा । याचमध्यें अंत साचा । ऐसा देखती म्हणोनि वाचा । गीता म्हणे मुकुंदाची. ॥ ३७४॥ ऐसें असत् हें क्षेत्र । याचे विकार नाना विचित्र । यांस जो जाणे त्यास शास्त्र । म्हणे 'क्षेत्रज्ञ' म्हणोनी ॥ ३७५ ॥ याच गीतेमाजी ।

---

१. सार. २. ब्रह्मवेत्ते, ब्रह्मस्वरूप जाणणारे, यथार्थवादी. ३. ऊन. ४. गुळाची लहानशी ढेप, गुळाचा गोळा. ५. जिव्हा. ६. पाहणारेपणा. ७. जीव.

अध्याय तेरांवा तेथें कृष्णजी । असत् याला अजी । 'क्षेत्र'[२] म्हणेल.॥३७६॥ यापुढील तेथें दुजा श्लोक । त्या श्लोकीं उत्तमश्लोक । उघड करूनि तत्त्वावलोक । यामध्येंच याचा सांगेल. ॥ ३७७ ॥

**'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ! ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम. ॥'** [गीता–अध्याय १३ श्लो० २].

एथें या श्लोकीं अनंत । म्हणे क्षेत्रक्षेत्रज्ञ यांत । जें ज्ञान आहे स्फुरत । त्या ज्ञानाचें ज्ञान मत माझें. ॥ ३७८ ॥ यांत असत् क्षेत्र जड । त्यांतही ज्ञान विरळ सुघड[३] । देखे हें परम अवघड । कळस सकळा ज्ञानाचा. ॥ ३७९ ॥ याचा जो अनुभव । तें ब्रह्मविद्येचें वैभव । तें बोलिला स्वयमेव[४] । टीकेंत याच श्लोकाच्या. ॥ ३८० ॥ आतां जो क्षेत्रज्ञ । अहंता ममता जाणे अभिज्ञ[५] । त्यांत जें ज्ञान तें तों सुज्ञ । वळखती तत्काळ. ॥ ३८१ ॥ प्रस्तुतीं सत् म्हणोनी । असत् देह त्यावेगळा करूनी । क्षेत्रज्ञ हाच स्ववचनीं । जगद्गुरूनें वर्णिला. ॥ ३८२ ॥ आणि याचा अंत । अंत म्हणजे तत्त्वसिद्धांत । याचमाजी म्हणे अनंत । तो ऐसा. ॥ ३८३ ॥ मी माझें म्हणोनी । वर्तें स्वरूपज्ञानेंकरूनी । ते अहंताशाखा[६] तीवरूनी । चैतन्यचंद्र देखावा. ॥ ३८४ ॥ मीपणापासूनि शब्द । त्यावेगळें सत् अशब्द । गुरुमुखावांचूनि कोटि अब्द[७] । धुंडितांही जें न आकळे[८]. ॥ ३८५ ॥ तें याचें तत्त्व यांत । तत्वदर्शी देखती संत । असत् सत् या दोहींचा अंत । याचमाजी तो ऐसा. ॥ ३८६ ॥ असत् सत् दोहींचा विवेक । करितां तत्त्व दोहींत एक । सत् उमजे करितां व्यतिरेक । असत् पटतंतूअन्वयें. ॥ ३८७ ॥ हें तत्त्वदर्शी पाहती । म्हणोनि बोले यदुपती । कीं याची अपरोक्षानुभूती[९] । पुढें सांगणें यास्तव. ॥ ३८८ ॥ **'किं तद्ब्रह्म ?'** हा प्रश्न । अष्टमीं करील अर्जुन । तेव्हां अपरोक्षज्ञान[१०] । उपदेशील. ॥ ३८९ ॥ हेचि गोष्टी त्रयोदशीं । 'क्षेत्रक्षेत्रज्ञ'उपदेशीं । क्षेत्रज्ञ मी मज जाण ऐसी । देव वाचा बोलेल. ॥ ३९० ॥ हें तत्त्वदर्शी जाणती । एथें ऐसें म्हणे श्रीपती । प्रस्तुत युद्धीं धरावी प्रवृत्ती । नित्यानित्यविवेक[११] यास्तव. ॥ ३९१ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त

---

१. गीता–अध्याय १३ श्लोक १-७ पहा. २. शेत. ३. कुशल. ४. स्वतः. ५. मर्मज्ञ. ६. खांदी. ७. वर्षें. ८. आंवरे, समजे. ९. परमेश्वर तो मीच असा अनुभव. १०. आत्मज्ञान. ११. शाश्वत काय आणि अशाश्वत काय याविषयीं विचार.

पुण्यश्लोक । भावार्थयुक्त परिसोत. ॥ ३९२ ॥ मेले आणि जीवंत लोक । यांचा पंडित न करिती शोक । कीं नित्यानित्यविवेक । ते जाणती. ॥ ३९३ ॥ तों उपजला संदेह । कीं आत्मा नित्य उदंड देह । परी दर्शनादिसुखें स्नेह । तो शोक तदर्थ करणार. ॥३९४॥ यावरूनि विषयेंद्रियें । दुःख देती निश्चयें । सुखदुःखीं सम तो स्वयें । मुक्त होय ऐसें कथियेलें. ॥ ३९५ ॥ परी मुक्त कोणत्या ज्ञानें । मनीं इच्छितां हें अर्जुनें । पूर्वश्लोकीं चैतन्यघनें । अपरोक्षही परोक्ष उपदेशिलें. ॥ ३९६ ॥ त्यांत असत् देह अनित्य । जीव सत् तो नित्य । या दोहींचें तत्त्व सत्य । जाणती हेंही वर्णिलें. ॥ ३९७ ॥ जरी सत् असत् दोहींचें । तत्त्व एक जें साचें । तरी तें नित्य यास कैचें । नित्यत्व अर्जुना वाटलें. ॥ ३९८ ॥ कीं दोहींचें एक तत्त्व । यांत एकास अनित्यत्व । तेव्हां दुजासही नित्यत्व । नसों[1] ये. ॥ ३९९ ॥ एवं देह जेव्हां मारवेल । त्याचाही नाश करवेल । तेव्हां शोकाग्नि कां निवेल । पंडितांचा ? ॥ ४०० ॥ तरी यांस कैसें मारावें ? । आप्तवधीं कैसें भरावें ? । युद्ध आतां करावें । कशास्तव ? ॥ ४०१ ॥ अर्जुनमनीं हा भाव । उपजतां उमजला देव । संदेह हा स्वयमेव । निवारितो [2]दों श्लोकीं. ॥ ४०२ ॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

हरावा पार्थसंशय । ऐसा करी जों निश्चय । तों एक गोष्टी अव्यय । खरी देखे. ॥ ४०३ ॥ कीं दोहींचें जें एक तत्त्व । त्यास मानितो हा नित्यत्व । हें तों नव्हे मूढत्व । संशयांत या. ॥४०४॥ म्हणोनि म्हणे अर्जुनासी । कीं तें तों जाण अविनाशी । तुझ्या वरकडा संशयासी । हरूं आम्ही. ॥४०५॥ या भावें नारायण । म्हणे तें अविनाशीच जाण । भाव दाखवी सुजाण । कीं हे आम्ही निषेधूं ना. ॥४०६॥ 'अविनाशि तु तद्विद्धि' । या चरणें हे अर्थसिद्धी । आतां संशयारूढ बुद्धी । परिहार त्याचा करीतसे. ॥ ४०७ ॥ दोहींचें एक तत्त्व । यांत एकास नित्यत्व । दुसऱ्यास कां अनित्यत्व । संदेह ऐसा. ॥ ४०८ ॥ तरी सत् प्रतिबिंब [3]चिद्रूप । जैसें बिंब [4]चित्स्वरूप । अन्योन्य हें अनुरूप । बिंब तैसें प्रतिबिंब. ॥ ४०९ ॥ याकारणें विनाशी । म्हणों नये कदापि यासी । [5]कीं विलक्षणत्वें कार्यासी । आलें नाहीं प्रतिबिंब. ॥ ४१० ॥ असत् जड नाशवंत ।

---

१. नसावें. २. श्लोक १७।१८ यांच्या द्वारा. ३. चैतन्यरूप. ४. ब्रह्मस्वरूप. ५. कारण कीं.

कीं विलक्षण कार्य निश्चित । नैश्वर[1] म्हणणें उचित । कारण अविनाशी त-याचें. ॥ ४११ ॥ याकारणें जडाचें कारण । तें तूं अविनाशी जाण । हें बोलाया दुसरा चरण । आरंभी या श्लोकाचा. ॥ ४१२ ॥ **['येन सर्व-मिदं ततम्']** ज्या वस्तूनें सर्वेही हें । जड असत् व्यापिलें आहे । तें अविनाशी कीं न साहे । याचें कार्य नित्यत्व. ॥ ४१३ ॥ सोनें स्वयें अ-विनाशी । ज्याणें व्यापिलें नगासी । नग न साहे नित्यत्वासी । येचें[2] कार्य म्हणोनी. ॥ ४१४ ॥ एवं जड प्रपंचासी । व्यापिलें तेंचि अविनाशी । त्याचें कार्य म्हणोनि यासी । नैश्वरत्व[3] हा भाव. ॥४१५॥ त्याचा करवेल नाश । दे-हाकारें ज्यास भास । कार्य म्हणोनि जडास । नश्वरत्व. ॥ ४१६ ॥ जें सत् तया कोण नाशी[4]? । कीं तें तदंश अविनाशी । उत्तरार्धें अर्जुनासी । हे गोष्टी आतां सांगतो. ॥४१७॥ **['विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति'[5]]** चिंदंश[6] हा नाशरहित । अव्यय[7] म्हणावा जो निश्चित । कोणी याचा घात । करावया समर्थ असेना. ॥४१८॥ एवं देह जीव दोहींचें । तत्त्व एक हें जरी साचें । देह कार्य त्या कारणाचें । हा अंश. ॥ ४१९ ॥ म्हणोनि याचा नाश । अर्जुना! न करवे कोणास । झणीं वाटों देशील मनास । हा मारवेल म्हणोनि. ॥ ४२० ॥ आतां कार्यदेह त्यास । बोलिजे तो अगा! नाश । हें उत्तरश्लोकीं अर्जुनास । श्रीकृष्ण सांगे. ॥ ४२१ ॥

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत! ॥ १८ ॥**

हे देहं[8] अंतवंत[9] । ज्यांस तो नित्य निश्चित । असे अंतवंत देहांत । उरी अविनाशी हा जाण. ॥ ४२२ ॥ अविनाशी भाव याचा । म्हणशी कां व-र्णितां साचा । तरी अगा! हा अप्रमेयाचा[10] । प्रतिबिंबांश अविनाशी. ॥४२३॥ मारवेल मारितां देह । म्हणोनि मानिसी हा मोह । तस्मात् अगा! निःसंदेह ।

---

१. नाशवंत. २. सोन्याचें. ३. नाश पावण्याचा धर्म. ४. कोणी नाशीत नाहीं—असा अर्थ. ५. या अव्ययाचा 'विनाश' करण्यास कोणीही समर्थ नाहीं. ६. चैतन्याचा अंश. ७. ज-न्मक्षयातीत. ८. सूक्ष्म, स्थूल आणि कारण देह. ९. नाशिवंत, नश्वर, अंत आहे ज्यांस. १०. प्रमाणांनीं ज्यास ओळखतां येत नाहीं त्याचा, प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ज्याचें मापन होणें अशक्य आहे असा.

युद्ध करीं तूं या सर्वांशीं. ॥ ४२४ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । तेच पावतील भावार्थें. ॥ ४२५ ॥ आत्मा देहविलक्षण । तो मरेना हें लक्षण । तेव्हां मारणें हाही गुण । देहविलक्षणाचा नव्हे याचा. ॥ ४२६ ॥ ऐसें जालें सिद्ध । यास्तव करावें युद्ध । तरी हे गोष्टी अप्रसिद्ध । नाना शास्त्रीं. ॥ ४२७ ॥ आत्मा कर्ता म्हणोनी । जैमिनी आणि गौतम मुनी । बोलती तेव्हां कां मनीं । आत्मा न मारी हें धरूं. ॥ ४२८ ॥ करी कर्ममीमांसा जैमिनी, । तर्क बोले गौतम मुनी, । ते तों म्हणती नेमुनी । कर्तृत्व आत्मयासी. ॥ ४२९ ॥ आणि आत्मयाचें नित्यपण । कृष्ण बोले आपण । तोच मरे म्हणोनि निपुण । वदे देवगुरु बृहस्पती. ॥ ४३० ॥ कृष्णवाक्य मानूं साच । तरी हीं शास्त्रें होती असाच । सत्य मानितां शास्त्रप्रपंच । उडतें वचन कृष्णाचें. ॥ ४३१ ॥ संकल्प हा अर्जुन । मनीं करी तों निर्गमानन । सुचवूनि दुर्मतखंडन । तत्काळ वदला हा श्लोक. ॥ ४३२ ॥

**य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥**

हा आत्मा मारणार । हा आत्मा मरणार । यातें ऐसें जाणणार । ते जाणनेणते दोघेही. ॥ ४३३ ॥ कीं हा मारीत नाहीं । मरेल हा न घडे हेंही । म्हणती मारी मरे ते कांहीं । जाणते दोघेही न म्हणावे. ॥ ४३४ ॥ श्लोकाचा इतका अर्थ । मतें दूषावीं तीं किमर्थ ? । ऐसें बोलती त्यातें समर्थ । श्रीहरीच उत्तर देतसे. ॥ ४३५ ॥ जे म्हणती साधारण । आत्मा देह त्यास मरण । देहें देहास मारण । त्यांलाच वाटे. ॥४३६॥ मरणार म्हणे जो स्वयें । मारणारही म्हणे निश्चयें । दों गोष्टींस दोघे अव्ययें । नेणते वर्णिले कां हो ? ॥ ४३७ ॥ आतां देहात्मवादी । ज्यांस विश्वास नाहीं वेदीं । आत्मदेह त्या मंदीं । 'मरे मारीही' म्हणावा. ॥ ४३८ ॥ प्रमाण ज्या मतीं वेद । तथापि मानिती भेद । आत्मा अकर्ता म्हणतां खेद । ते मानिती. ॥ ४३९ ॥ त्यांच्या मतें जीव नित्य । देहावेगळा म्हणती सत्य । परी अकर्ता म्हणती असत्य ।

---

१. देहाहून भिन्न. २. अयथार्थ. ३. पसारा. ४. वेद आहेत मुख ज्याचें. ५. कुमत. ६. हा आत्मा मारणारा [आहे] असें जो जाणतो व हा आत्मा हत (मारलेला) [आहे] असें जो जाणतो, त्या दोघांस चांगलें समजत नाहीं [कारण] हा (आत्मा) मारीत नाहीं आणि मारला जात नाहीं. ७. वधिता. ८. वध्य. ९. ईश्वरानें. १०. देह हाच आत्मा असें बोलणारे.

कर्ताच म्हणती ते सर्व. ॥ ४४० ॥ एवं आत्मा मारणार । सकळ भेद[1]वादी म्हणणार । आणि [2]आत्मादेह मरणार । [3]चार्वाक म्हणती. ॥ ४४१ ॥ भेदवादी पक्ष एक । आणि एक पक्ष चार्वाक । या दों [4]गजभारांवरी हांक । गीताश्लोकीं [5]हरीची. ॥ ४४२ ॥ हे दोनी पक्ष नेणते । भगवद्वाणी ऐसें म्हणते । नेणते कैसे कोणते । टीकाकारीं दूषावे. ॥ ४४३ ॥ प्रकृतिपुरुषभेद । हा सांख्यशास्त्रवाद । परी तो नेदी भल्यास खेद । ज्ञानोपयोगी म्हणोनी. ॥ ४४४ ॥ प्रकृतिपुरुषां भेद । तरीच [6]अकर्तृता वदे वेद । या भेदें साधे अभेद । हे एथें न दूषिले. ॥ ४४५ ॥ हे तों जैमिनी गौतम । जरी ऋषि दोघे उत्तम । तिहीं अगत्यास अधम । भेदपक्ष धरिला. ॥ ४४६ ॥ वेदव्यास महामुनी । त्याचा शिष्य जैमिनी । कळत गुर्वाज्ञा म्हणोनी । भेद त्याणें स्थापिला. ॥ ४४७ ॥ [7]व्यासें केला वेदांत । ज्ञान मुख्य हा सिद्धांत । ज्ञान जालिया तयांत । आदर नसे कर्माचा. ॥ ४४८ ॥ ज्ञानाहूनिही पहिलें । काम्यकर्म अमान्य केलें । ज्ञानेंचि मोक्षफळ लिहिलें । वेदांतशास्त्रीं. ॥ ४४९ ॥ परी या [8]कैवल्यवाटे । अधिकारी विरळा भेटे । गोड भेला त्यास वाटे । एकादा निंघे या [9]मार्गीं. ॥ ४५० ॥ मुख्य मोक्षाच्या मार्गवाटे । आणि निघेना [10]नैष्कर्म्यवाटे । काम्यही टाकी तो वाटे । उभयभ्रष्ट. ॥ ४५१ ॥ शुद्धाधिकारियाकारण । केलें [11]अद्वैतनिरूपण । परंतु काम्यत्यागें साधारण । वायां जाती. ॥ ४५२ ॥ याकारणें महामुनी । स्वशिष्य ऋषि जैमिनी । त्यास सांगे नेमुनी । कीं प्रवर्तवीं कर्ममार्ग. ॥ ४५३ ॥ न धरितां आमची भीड । मोक्ष फटकाळ ऐसी बडबड । करूनि काम्यचि गोड । वाटे ऐसें बोल तूं. ॥ ४५४ ॥ त्याणें कर्ममार्ग केला । जन काम्याकारणें भुकेला । नाहींसा करूनि टाकिला । मोक्षमार्ग. ॥ ४५५ ॥ तेथें आत्मा अकर्ता । म्हणतां उडे काम्यवार्ता । [12]ब्रह्मात्मतेचा ठसा वरता । तत्काळ पडे. ॥ ४५६ ॥ कर्तृत्वाचा विकार । मी

---

१. आत्म्यास कर्तृता देणारे. २. देह तोच आत्मा. ३. चार्वाकमतानुसारी लोक आत्मा हननक्रियाकर्म आहे असें समजतात. ४. हत्तींच्या कळपांवर. ५. सिंहाची. ६. अकर्तेपणा. ७. व्यास हा ब्रह्मसूत्रांचा कर्ता होय. यांस उत्तरमीमांसा म्हणतात. जैमिनी हा पूर्वमीमांसेचा कर्ता. यांचा समावेश षड्दर्शनांत करतात. ८. मुक्ति. ९. या ओंवीच्या चतुर्थ चरणांतील 'मार्ग'शब्दाचें लिंग येथें लाविलें आहे. अर्थ:—ज्या एखाद्यास तो ज्ञानमार्ग गोड आणि भला वाटे तो त्या मार्गीं जातो. १०. फलेच्छारहित कर्म. ११. जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्य. १२. ब्रह्म तें मीच.

कर्ता हा अहंकार । त्याचा निषेध करितां साचार । ब्रह्मात्मबोधीं मन निघे. ॥ ४५७ ॥ म्हणोनि [1]अहंप्रत्यय । निखिल[2] आत्मत्वाचा निश्चय । करितां आयता [3]सक्रिय । सिद्ध जाला. ॥ ४५८ ॥ हाच तार्किकांचा निश्चय । कीं आत्मस्वरूप अहंप्रत्यय । कीं त्याच्या व्यतिरेकें अद्वय । ब्रह्मचि सांपडे. ॥४५९॥ भेदवादियाचे बोल । एथें ऐसेच तितके फोल[4] । साधारणांस हेचि खोल । वाटती उथळ अत्यंत जे. ॥ ४६० ॥ मी म्हणतां आत्मा स्फुरे । तो तूं म्हणतां काय झुरे ? । तूं म्हणतां कोठें उरे । अहंस्फुरण ? ॥ ४६१ ॥ मी म्हणतां तूं नसे । तूं म्हणतां मी न [5]गवसे । स्फुरणीं स्फुरण अन्य वसे । हें म्हणणेंचि मूर्खत्व. ॥ ४६२ ॥ मी म्हणे त्यास तूंपण । निमिषार्धकाळीं स्फुरण । त्यास वाटे स्वाहंस्फुरण । होतेंचि तेव्हां. ॥ ४६३ ॥ अखंड आत्मप्रत्यय । अहंरूप तेथें आशय । तो न खंडे ऐसा निश्चय । मानिती आत्मा न कळतां. ॥४६४॥ अहंप्रत्यय आत्मता । त्यास वाटे आत्मा कर्ता । **कृष्ण** म्हणे **पांडुसुता** । नेणते ते यास्तव. ॥ ४६५ ॥ त्यांचाच हा अन्याय । येविषयीं मानावा काय । जाणोनि अद्वैतसंप्रदाय । कोणी ऐसेंचि बोलती. ॥ ४६६ ॥ हा त्रि-विध[6] अहंकार । देह मी हा तामस विकार । इंद्रियात्मत्व हा संस्कार । राजस अहंकार बोलिला. ॥ ४६७ ॥ मी पाहतों चाखतों । आइकतों हुंगितों । मी शीतोष्णस्पर्श घेतों । हा इंद्रियाभिमानी राजस. ॥ ४६८ ॥ मी नव्हे देह इंद्रियें । यांवेगळा मी स्वयें । ऐसा तरी अहं निश्चयें । अहंकार म्हणावा सात्विक. ॥ ४६९ ॥ काढितां अहंकाराची साली । सत्ववृत्ति वाटे निघाली । ते आत्मानुभव पावली । तरी तीहूनही पलीकडे आत्मा. ॥ ४७० ॥ विरळा जाणे हे खूण । न शुद्ध आत्मा अहंस्फुरण । **'[7]कर्मतत्व'**ग्रंथीं हें निरूपण । वि[8]शद असे. ॥ ४७१ ॥ शुद्ध [9]आत्मा अहंस्फुरण । तेव्हां हेंचि निरहंकारपण । तरी साहंकारलक्षण । तें कैसें ? ॥ ४७२ ॥ आदीं शुद्ध अहंप्रत्यय । दुजें हें स्फुरण अहंमय । **'[10]अहं अहं'** प्रत्ययद्वय । ऐसें तुजला वाटावें. ॥ ४७३ ॥ तरी तूं निरहंकारी ज्ञानी । आतां जे साहंकार अज्ञानी । ते **'अहं अहं'** म्हणोनि दोनी । अहंस्फुरणें तों नेणती. ॥ ४७४ ॥ यालागीं

---

१. आत्मता. आत्मा कर्ता असा अनुभव. २. सर्व. ३. क्रियावान्. ४. व्यर्थ. ५. सांपडणें. (गवसणें=सांपडणें. गवेषण=शोध, आढळणें.) ६. तीन प्रकारचा. (राजस, तामस आणि सात्विक.) ७. वामनपंडितकृत स्फुटकाव्यें–भाग २ प्रकरण १९ वें पद्य. **'कर्मतत्व'** हें **पं**डितांचें स्वतंत्र काव्य आहे. ८. स्पष्ट. ९. अहंस्फुरण जर शुद्ध आत्मा. १०. 'मी मी.'

हे वेडेचार । हा नव्हे शुद्ध आत्मविचार । अहंप्रत्यय [1]असार । टाकितां स्फुरे शुद्ध आत्मा. ॥ ४७५ ॥ असोनि वेदांतमार्गीं । ऐसा भ्रम तयांलागीं । ते तों भेदवादी जगीं । अभिमानेंचि वर्तती. ॥ ४७६ ॥ एवं 'आत्मा कर्ता । तोचि मारी ऐशी वार्ता' । बोलती तयां गजांवरता । चपेटा [2]हेरीचा हा ऐसा ॥ ४७७ ॥ आतां [3]आत्मा मरे । म्हणणार चार्वाक खरे । शापें बृहस्पतीची [4]वैावरे । जिव्हा ऐसी. ॥ ४७८ ॥ आणि दिसतें तेंचि साच । हें तों म्हणे भलताच । बृहस्पति बोले तसाच । प्रबळ करी पूर्वपक्ष. ॥ ४७९ ॥ मेळवूनि सकळ सेना । जों शत्रु युद्धास येईना । तों शत्रुशेष तुटेना । मारितांही. ॥ ४८० ॥ त्यांत भेदी आपला । मिळे जो तो त्यांस वाटे भला । आइकोनि त्याच्या बोला । [5]आबाल येती युद्धासी. ॥ ४८१ ॥ मग ते सकळ । संहारावे खळ । तरी पृथ्वी निखिळ । नि[6]ष्कंटकप्राय होणार. ॥४८२॥ तैसा बृहस्पती । [7]प्रत्यक्षवादीं घाली मती । त्यास अनुकूळ युक्ती । लिही तितक्याही. ॥ ४८३ ॥ वैदिकीं तें शास्त्र । खंडावें जें प्रत्यक्षमात्र । या भावें स्वयें पवित्र । शास्त्र अपवित्र तो मांडी. ॥ ४८४ ॥ प्रत्यक्ष जें जें दिसे । तेंचि प्रमाण त्याला असे । देह उपजे नासे । हाचि आत्मा. ॥ ४८५ ॥ आत्मा देहावेगळा । तों तो दिसत नाहीं डोळां । म्हणोनि [8]पंचभूतमेळा । हा देह आत्मा ते म्हणती. ॥ ४८६ ॥ देह जैसा पाषाण । आपणास नेणे आपण । मी देह म्हणे हा कवण । पुसतां बोलती ते ऐसें. ॥ ४८७ ॥ कीं सुपारी कात [9]चूर्ण । यांसहित चावितां [10]पर्ण । उपजोनि वाटे तांबडेपण । तांबूलाचें. ॥४८८॥ मिळतां [11]शुक्रशोणित । पंचभूतीं होय भूत । होय त्यांत [12]जाणीवकळा अद्भुत । म्हणती उत्पन्न होतसे. ॥४८९॥ तें नसतां अहंस्फुरण । देहास येतें मरण । प्रत्यक्ष एथें प्रमाण । बोलती ऐसें. ॥ ४९० ॥ म्हणोनि म्हणती जों [13]जिवावें । [14]ॠण करूनि घृत प्यावें । पुनः जन्मा कोणें यावें । देह भस्म जालिया. ॥ ४९१ ॥

---

१. व्यर्थ, फोल. २. सिंहाचा; पक्षीं कृष्णाचा. ३. चार्वाकदर्शनांत आत्मा विनाशी मानला आहे:—'न स्वर्गो नापवर्गो वा नैवात्मा पारलौकिकः'=स्वर्ग नाहीं, मोक्ष नाहीं, परलोकास जाणारा असा आत्मा नाहीं. ४. बोले. ५. मुलांपर्यंत, मुलांसह=सर्व. ६. शत्रुरहित. ७. जें दिसतें तेंच मात्र आहे असें ज्यांचें मत. ८. पंचभूतांचा समुदाय. ९. चुना. १०. खायाचें पान. ११. रेत. १२. जाणतेला, चैतन्य. १३. वांचावें. १४. ग्रीस देशांतील इपिक्युरियन पंथाच्या लोकांचेंही असेंच मत होतें. "Let us eat, drink, and be merry, for to-morrow we die" या वाक्यांत या पंथाचें वर्णन थोडक्यांत पूर्णत्वानें केलें आहे.

**'यावज्जीवं सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् ।**
**भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ? ॥'**

मत ऐसें अवलक्षण । ज्यांस प्रत्यक्ष मात्र प्रमाण । वाद त्यांशीं करणार कोण ? । न मानिती प्रमाण जे वेद. ॥४९२॥ बोलोनि युक्ति विचित्र । आपणही प्रत्यक्ष मात्र । प्रमाण धरूनि त्यांचें शास्त्र । दूषणें द्यावीं. ॥ ४९३ ॥ हा अनादि अविद्याभेद । **चा**र्वाकांचा प्रत्यक्षवाद । कीं हा पूर्वपक्ष वेद । प्रसंगोपात्त दूषिती. ॥ ४९४ ॥ शत्रु मेलाचि असे । आणि जीवंतसा दिसे । तेव्हां सर्वज्ञ बोलती ते ऐसें । कीं हा कैसा जीवंत ? ॥ ४९५ ॥ तेव्हां मरणाचीं लक्षणें । त्याचे ठायीं विचक्षणें । लक्षोनि मस्तक कापणें । उचित जैसें. ॥ ४९६ ॥ तैसें जे स्थळीं हें मत । खंडिलें जाय निश्चित । तें स्थळ श्रुति करिती श्रुत । ये रीती. ॥ ४९७ ॥

**'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ।**
**तद्ध्येक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ।**
**कुतस्तु खलु सोम्येव स्यादिति होवाच कथमसतः सज्जायेत ॥'**

[छां० उ० ६-२ श्लो० १-१२.]

या **छां**दोग्य उपनिषच्छ्रुती । जगत्कारण उपपादिती । **चा**र्वाकमत खंडिती । प्रसंगीं या. ॥ ४९८ ॥ कीं हें विश्व आदीं । सद्वस्तूच होतें तदीं । द्रष्टा नव्हता जदीं । जीववृंद. ॥ ४९९ ॥ सर्प दिसतो हा आदीं । रज्जूच होता तदीं । द्रष्टा नव्हता जदीं । नेणता रज्जूचा. ॥ ५०० ॥ या न्यायें या श्रुती । जगत्कारण ऐसें बोलती । कीं सद्वस्तु एकलीच होती । जे चिद्वस्तू कारण जडाचें. ॥ ५०१ ॥ सिद्धांत बोलोनि निश्चित । पूर्वपक्ष याचा विपरीत । तें तों हें **चा**र्वाकमत । ते बोलती दूषाया. ॥ ५०२ ॥ कीं हे पंचभूतरूप । जें केवळ जडस्वरूप । जड माय जडदेह बाप । जडचि अवघें.

---

१. ज्ञानी पुरुषानें. २. 'सोम्य, सत् हेंच पूर्वीं होतें तें एक आणि अद्वितीय.' ३. **'उपनिषद्**–हा शब्द ब्राह्मणकालाच्या शेवटीं उत्पन्न झाला. याचा मूळचा अर्थ गुरूच्या जवळ खालीं बसणें असा आहे. पुढें शिष्य गुरूजवळ जें काय शिके त्याचा वाचक तो शब्द झाला. आणि शेवटीं त्याचा अर्थ गूढज्ञान असा झाला.' [रा० **शं**कर **बा**ळकृष्ण **दी**क्षितकृत **धर्ममीमांसा**–भौतिकधर्मविवेचन पृष्ठ ५४.] ४. सद्वस्तु ब्रह्म. ५. प्रतिपादितात. ६. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या भूतांचें रूप.

॥ ५०३ ॥ आतां जैसें दिसतें । ऐसेंचि सर्वदाही असतें । यास जाणतें तें उपजतें । यापासूनि चैतन्य. ॥ ५०४ ॥ जड अवघें एक आदीं । होतें चैतन्य नव्हतें तदीं । म्हणजे हें पहावें तदीं । प्रथम जडचैतन्य तदुपरी. ॥ ५०५ ॥ ऐसेंही एक बोलती । म्हणोनियां म्हणती श्रुति । दूषण याचें सूचविती । या प्रसंगीं. ॥ ५०६ ॥ श्रुति म्हणती या मिसें । कीं कोणे युक्तीनें घडे ऐसें । जडापासोनि चैतन्य कैसें । उत्पन्न होय? ॥ ५०७ ॥ कीं कार्य चैतन्य जालें । कारणत्व जडा आलें । हें विरुद्धत्व मांडलें । प्रत्यक्षासी. ॥५०८॥ कारण कार्यास वर्तवी । कीं कार्य कारणातें वागवी । प्रत्यक्ष तुमचें मत नागवी । एथें तुम्हां. ॥ ५०९ ॥ चैतन्य वर्तवी देह । हें प्रत्यक्ष निःसंदेह । जें धरूनि देहाचा स्नेह । रक्षी तयास शीतोष्णीं. ॥ ५१० ॥ कारण कार्याधीन । हें प्रत्यक्ष तुमचें अज्ञान । अलंकाराधीन कांचन[1] । म्हणतां विरुद्ध प्रत्यक्षीं. ॥ ५११ ॥ चैतन्य म्हणावें कारण । त्याआधीन देहाचे गुण । सुवर्णाआधीन भूषण । जे रीती. ॥ ५१२ ॥ कारणद्वय वर्तमान । एक **निमित्त,** दुजें **उपादान,** । निमित्त सोनार, आणि कांचन । उपादान कारण अलंकारीं. ॥ ५१३ ॥ सोडितां निमित्तकारण । कार्यास घडे वर्तन । सोनारा सोडोनि भूषण । जाय जैसें. ॥ ५१४ ॥ सोनें न सोडी भूषण । भूषण सोडीना सुवर्ण । या **उपादानकारण** । प्रत्यक्ष म्हणती. ॥ ५१५ ॥ तैसें देह आणि चैतन्य । कारण कार्य अन्योन्य । देह कारण चैतन्य अन्य । कार्य उत्पन्न त्यापासूनि. ॥ ५१६ ॥ निमित्तकारणत्व घडे । तरी कांहीं सवड सांपडे । देह उपादान तेव्हां पडे । तुमचें मत. ॥ ५१७ ॥ अलंकारें सोनें दिसे । कीं सुवर्णें अलंकार भासे । कारणेंचि कार्य गवसे । प्रत्यक्षीं. ॥ ५१८ ॥ तरी चैतन्यें दिसे देह । चैतन्यास त्याचा स्नेह । जडेंकरूनि निःसंदेह । चैतन्य न दिसे. ॥ ५१९ ॥ चैतन्य आपण आपणा । जाणोनि जाणे देहपणा । जैसे आदीं सुवर्णा । देखोनि आकार देखिजे. ॥ ५२० ॥ तरी चैतन्य कारण म्हणा । कार्य देहचि गणा । प्रत्यक्षविरुद्ध जाणा । स्वमत हें. ॥ ५२१ ॥ इत्यादि मतखंडन । **वै**दिकमताचें मंडन[2] । पुरे हें मुंडमुंडन[3] । आत्मा मरे तो या मतीं. ॥ ५२२ ॥ एवं हे **चा**र्वाक एक । भेदवादी ते अनेक । दोहींस यदुकुलतिलक[4] । म्हणे कांहीं न जाणती. ॥ ५२३ ॥ म्हणोनि अगा! अर्जुना! ।

---

१. सुवर्ण. २. स्थापन. ३. वपन केलेल्या मस्तकाचें वपन. ४. यदूंच्या कुळाचा टिळा. (कृष्ण.)

आत्मा मरेना मारीना, । पावोनियां समाधाना । युद्ध करीं. ॥ ५२४ ॥ खंडोनि चार्वाकादि मत । तद्विपरीत श्रुतिसंमत । स्वमत बोलेल अच्युत । या श्लोकीं. ॥ ५२५ ॥

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥**

आत्मा उत्पन्न होत नाहीं । कधीं मरेल न घडे हेंही । देह उपजतां कांहीं । हा न उपजे. ॥ ५२६ ॥ देह उत्पन्न होतसे । त्या देहीं आत्मा वसे । त्यासवें उपजला दिसे । परी न उपजे उपजोनि. ॥ ५२७ ॥ राजा म्हणती चालिला । तो तों सुखासनीं बैसला । चालोनि नाहीं घडला । चालण्याचा प्रसंग. ॥ ५२८ ॥ चालोनि चाले न कांहीं । तैसा होऊनि होत नाहीं । देहासवें अगा! पाहीं । होऊनि होत नाहीं तो ऐसा. ॥ ५२९ ॥ एकदांच नव्हे देही । पुन्हा होऊनि होत नाहीं । प्रत्यक्षवादी मोहीं । वृथा पडे हा भाव. ॥ ५३० ॥ एक देह होतां, हा जाला । तो देह मरतां म्हणती मेला, । तरी हा पुनःपुन्हा उपजला । तरी उपजोनि उपजेना. ॥ ५३१ ॥ कीं स्वयें हा [1]अज । याला न [2]जन्म सहज । देहास जैसा [3]उपज । यास नाहीं. ॥५३२ ॥ मरण नाहीं यास्तव । कीं हा नित्य ज्यास्तव । म्हणती चार्वाकदानव । कीं देह मरतां, हा मरे. ॥ ५३३ ॥ देह जन्मतां नसे उपजत । देह वाढतां नसे वाढत । म्हणोनि हा [4]शाश्वत । कीं वृद्धिक्षय असेना. ॥५३४॥ आत्मा म्हणतां शाश्वत । मत जें जें भेदाश्रित । तें तें खंडिलें निश्चित । कीं भ्रांत आत्मा न कळतां. ॥५३५॥ आपण कोण न कळे ज्याला । '**भ्रांत**' म्हणती जगीं त्याला । जें मत नेणे आत्मयाला । तें भ्रांत सर्वही सर्वत्र. ॥५३६॥ आत्मा न म्हणतां शाश्वत । [5]क्षय वृद्धि तितकें नाशिवंत । म्हणोनि आत्मा अत्यंत । सूक्ष्म म्हणती सर्वही. ॥ ५३७ ॥ या गोष्टीनें सूक्ष्म थोर । जें जेवढें शरीर । यांत आत्मा [6]मातो हा प्रकार । सिद्ध होतो. ॥ ५३८ ॥ परंतु थोर थोर शरीरीं । भोग भोगितो कैसेपरी । पुसतां म्हणती झडकरी । पावे जेथें सुखदुःख. ॥ ५३९ ॥ कित्येकांचा पक्ष ऐसा । परी हा उडे शब्दासरिसा । सर्वांग टोंचितां कैसा । एकाच समयीं हा पावे. ॥ ५४० ॥ एकांचा पक्ष ऐसा । कीं चंदनाचा बिंदु

---

१. जन्म ज्यास नाहीं. आत्म्याला जन्म नाहीं. २. आत्मा नित्य आहे म्हणून याला जन्म नाहीं. (श्लोक १३.) ३. जन्म. ४. शश्वद्भवतीति शाश्वतः=सदासर्वदा जसा आहे तसाच असतो तो शाश्वत. ५. ज्याला क्षयवृद्धि आहे तो नश्वर अनित्य होय. ६. मावतो.

जैसा । व्यापी सर्वांग तैसा । हा व्यापक. ॥५४१॥ देहीं अणुप्रमाण वसे । परी सर्वांगही व्यापीत असे । एक बोलती ऐसें । भेदवादी. ॥ ५४२ ॥ चंदनबिंदु एकत्र । व्यापी शैत्य सर्वत्र । धुतां चरण अणुमात्र । ओला कपाळीं तो नव्हे. ॥ ५४३ ॥ कांटा रुपतां पायीं । जरी तो असेल हृदयीं । त्याणें दुःखी ते ठायीं । होऊं नये. ॥ ५४४ ॥ चंदनाचे परी । दीपही एकत्र घरीं । प्रकाश सर्वत्र करी । व्यापी चंदनासारिखा. ॥ ५४५ ॥ प्रकाशीं फुंकितां देखा । ते न हाले [1]दीपशिखा । एकदांच सुखदुःखा । सर्वांगाच्या भोगितो. ॥ ५४६ ॥ अग्नि एक प्रभा दुसरी । एक ओते प्रभेवरी । न विझे तोही विझे जरी । अंगावरी जळ पडे. ॥ ५४७ ॥ काष्ठ अत्यंत थोर । एकत्र लागला वैश्वा[2]नर । अन्यत्र ओतितां [3]नीर । अग्नि अन्यत्र न विझे. ॥ ५४८ ॥ अग्निप्रभा तरी । सर्वत्र त्या काष्ठावरी । न पेटे न विझे परी । फुंकितां भिजवितां अन्यत्र. ॥ ५४९ ॥ होय काष्ठाचा इंगळ[4] । व्यापी सर्वत्र अनळ[2] । फुंकितां पेटे पडतां जळ । विझे सर्वत्र तेधवां. ॥५५०॥ एवं जीव एकत्र । व्यापूनि भोगी सर्वत्र । ऐसें म्हणणार मतमात्र । शाश्वतपदें उडविलें. ॥ ५५१ ॥ अजी ! आत्मा शाश्वत । परी दुःख भोगितो निश्चित । त्यास म्हणतां उचित । कीं भोक्ता अंश प्रतिबिंब. ॥ ५५२ ॥ तेव्हां देहाप्रति नवा । लहान थोर होतो म्हणावा । तरी शाश्वत कैसा गणावा । प्रतिबिंबांश हा ? ॥ ५५३ ॥ येविषयीं श्रीकृष्ण । म्हणे कीं तो **'पुराण'**[5] । पुराणबिंब तेव्हां जाण । पुराण त्याचें प्रतिबिंबही. ॥ ५५४ ॥ जेव्हां जळीं दिसे । तेव्हांच प्रतिबिंब असे, । न दिसे जळीं तेव्हां वसे । बिंबींच प्रतिबिंब. ॥ ५५५ ॥ बिंब पुराण पुरातन । तैसें हेंही नित्य नूतन । थोर आणि लहान । उपाधियोगें. ॥५५६॥ सूक्ष्म उपाधि नसे । तरी त्याच बिंबीं हें पैसे[6] । थोर नाशतांही गवसे । त्याच बिंबीं.॥५५७॥ एवं बिंब शाश्वत । तेव्हां हेंही तेंच निश्चित । कदापि हें वेदमत । नव्हे बाँधित युक्तीसी. ॥ ५५८ ॥ जीं धरूनि मनीं मतें । शंका मानिली पार्थें चित्तें । तीं खंडोनि अच्युतें । स्वमतें केलें समाधान. ॥ ५५९ ॥ यालागीं म्हणतो पार्था । देह मारितां हा सर्वथा । न मारिला जाय कथा । अन्य मनाची वि[7]रुद्ध. ॥ ५६० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें

---

१. दिव्याची ज्योत. २. अग्नि. ३. उदक. ४. निखारा. ५. आत्मा निरवयव आहे, तेव्हां तो पूर्वीं, आज व पुढें सारखाच आहे. 'पुराण' या विशेषणानें त्याचें 'पूर्वनित्यत्व' सुचविलें. ६. असतें. ७. विरुद्ध, विरोधी.

निमित्त पुण्यश्लोक । परिसोत. ॥ ५६१ ॥ नित्य आणि अकर्ता । आत्म-याच्या या दोन्ही वार्ता । बोलिला श्रीकृष्ण शोकार्ता । अर्जुनातें. ॥५६२॥ त्यांत याचें नित्यत्व । पार्थास वाटे तत्त्व । परी आलें नाहीं अकर्तृत्व । प्रत्यया. ॥ ५६३ ॥ कीं हा विचारलेश । परोक्षरीती हृषीकेश । बोले अपरोक्ष उपदेश । अद्यापि नसे. ॥ ५६४ ॥ तो म्हणे देह इंद्रियें । आ-त्मयास नसती निश्चयें । परी मारीन ऐसी इच्छा स्वयें । आत्माचि धरितो. ॥ ५६५ ॥ हेंही संकल्पात्मक मन । शुद्ध आत्मा मानी अर्जुन । जों अपरोक्ष नाहीं ज्ञान । तों हा वाटे शुद्धात्मा. ॥ ५६६ ॥ हें अर्जुनास न कळे । देह अकर्ता आत्मा नाढळे । म्हणूनि हृदयीं खेळे । संदेह ऐसा. ॥ ५६७ ॥ देह इंद्रियें वेगळीं । परी म्हणे आत्मा हाचि चाळी । कर्म करीन हेही उकळी । आत्मयाची. ॥५६८ ॥ मी आत्मा न मारीं यांतें । परि मारवीन देहाच्या हातें । कीं शर भेदी परातें । तरी धनुर्धर मारक. ॥ ५६९ ॥ अकर्तृत्व कैंचें म्हणोनी । ऐसें अर्जुनें धरिलें मनीं । अंतर्यामीं हें जाणोनी । बोलतो आतां हा श्लोक. ॥ ५७० ॥

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ ! कं घातयति हंति कम् ? ॥ २१ ॥**

अगा ! न कळतां आत्मता । तुज कळेना अकर्तृता । या भावें पांडुसुता । कृष्ण म्हणे. ॥ ५७१ ॥ कीं आत्मत्वाचें गुंज[2] । मी बोलिलों अर्जुना ! तुज । तें तुवां आइकिलें सहज । तथापि अनुभवें नेणसी. ॥ ५७२ ॥ **अविनाशी अज अव्यय** । ऐसा अनुभवें ये प्रत्यय । त्यास अकर्तृत्वाचा निश्चय । अगा ! बाणे. ॥ ५७३ ॥ ऐशा आत्मयातें जाणे । त्यास अकर्तृत्वही बाणे । तुजऐसे लौकिकी शाहणे । ते हे कैसें जाणती ? ॥ ५७४ ॥ या भावें देव म्हणे । कीं या अजा अव्यया जाणे । अगा ! त्यास तों ऐसें बाणे । कीं अकर्ता आ-पण. ॥ ५७५ ॥ जेथें नसे मारण । जेथें नसे मारवण । तेथें कोणास कोण मारी अथवा मारवी ? ॥ ५७६ ॥ मारीन मारवीन म्हणणें । अगा ! हें तों मीपणें । तें तूं मानिसी आपणें । शुद्ध आत्मा म्हणोनी. ॥ ५७७ ॥ मारीन मारवीन । हे जागृति अथवा स्वप्न । सुषुप्तींत हें तुझें मन । सांग कोठें ?

---

१. हे अर्जुना ! जो पुरुष हा (आत्मा) अविनाशी, अज, नित्य आणि अव्यय [आहे असें] समजतो, तो कसा कोणाला मारील किंवा मारवील ? २. रहस्य.

॥ ५७८ ॥ सुषुप्तींत जो तूं उरसी । तो कोणास रे! मारिसी । अथवा कोणास [1]मारविसी । कोण्या देहें? ॥ ५७९ ॥ सुषुप्तींत उरला अद्वय । तो [2]अज [3]अ-विनाशी [4]अव्यय । जन्म नाश अवांतर व्यय । मीतूंपणासी. ॥ ५८० ॥ आत्मा [5]सुषुप्तिगम्य । गुरुकृपेवीण अगम्य । सेविले ज्याणें चरण रम्य । तो जाणे ऐसें आपणा. ॥ ५८१ ॥ या भावें परमपुरुष । म्हणे यातें जो पुरुष । जाणे तो आत्मा निर्विशेष । मारी मारवीही कवणासी? ॥ ५८२ ॥ या पुढिलिया श्लोकीं । श्रीकृष्ण ऐसें बोलेल कीं । जुनीं टाकूनि वस्त्रें लोकीं । जैसीं नवीं धरिजेती. ॥ ५८३ ॥ तैसीं आत्मा शरीरें । टाकूनि जीर्ण [6]कलेवरें । नवीं धरितो नाना प्रकारें । स्वयें तोचि. ॥ ५८४ ॥ एवं जीवातें पुनः पुन्हा । देह धरणें असे अर्जुना! । बोलणें असे कमलनयना । या श्लोकीं. ॥ ५८५ ॥ पूर्वश्लोकीं तरी । जो आत्मा जाणे बरवेपरी । तो कोणास मारवी मारी । बोलिला ऐसें. ॥ ५८६ ॥ आणि वर्णिलें आत्मयासी । कीं **अज अव्यय अविनाशी** । तो शरीरें धरी कैशीं । हें आतां बोलेल. ॥ ५८७ ॥ मागेंही प्रसंगोपात्त । हेंचि बोलिला अच्युत । कीं एका देहीं अवस्था बहुत । तैसे देह द्रष्टयासी. ॥५८८॥ तेंचि पुन्हा बोलतां । पुनरुक्ति दिसेल संतां । परी निमित्त आणखी आतां । बोलिजेल. ॥ ५८९ ॥ मेलियाचा शोक । न करी पंडित लोक । या प्रसंगीं उत्तमश्लोक । बोलिला [7]नित्यत्व आत्मयाचें. ॥ ५९० ॥ देहनिमित्त शोक भले । न करिती कीं सर्वत्र लागले । त्यास दृष्टांत ऐसा बोले । अवस्था जैशा देहाच्या. ॥ ५९१ ॥ कीं [8]बाल्य गेलें, । तारुण्य आलें, । तारुण्य जातां वहिलें । पातलें वृद्धत्व. ॥ ५९२ ॥ शोक याचा कां मना । म्हणूनि म्हणतां अर्जुना । संदेह जाला कीं जुना । देह होऊं लागला. ॥ ५९३ ॥ कीं प्राणी चिंतातुर । होय देखतां वृद्ध शरीर । जीर्ण आणि जर्जर । जों जों होय.

---

१. 'न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित् । अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥' (क. २–१८). २. जन्मरहित, आद्य विकारशून्य. ३. ज्याच्या सत्तेस बाध नाहीं तो अविनाशी. ४. कोणत्याही प्रकारें ज्याचा व्यय (क्षय) होत नाहीं तो. ५. सुषुप्तींत ओळखितां येण्याजोगा. ६. देह, शरीरें. ७. आत्म्याचें अमरत्व (नित्यत्व) हा विषय प्राचीन आणि अर्वाचीन पंडितांस सारखाच प्रिय, आदरणीय आणि चिंतनीय आहे. **'प्लेटोकृत फीडो अथवा आत्म्याचें अमरत्व'** हें पुस्तक **'भाषांतर'** नामक मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालें आहे, तें अवश्य पहावें म्हणजे प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञांचे विचार कळून येतील. ८. बाळपण.

॥ ५९४ ॥ या दृष्टांतें जेव्हां शोक । हा परिहारी उत्तमश्लोक । तेव्हां शोक
त्यागीं हा विवेक । न दिसे बरा. ॥ ५९५ ॥ पुढें आणखी प्रसंग । बोलों ला-
गला श्रीरंग । हे शंका अंतरंग[1] । धरूनि राहिली पार्थाचें. ॥ ५९६ ॥ लागलें
शस्त्रक्षत[2] । औषध लाविलें न शोधित । किल्मिष राहिलें त्यांत । तें क्षत काळें
फुटे पुन्हा. ॥ ५९७ ॥ 'मात्रास्पर्शास्तु'[3] हा श्लोक । मागें बोलिला उत्तम-
श्लोक । कीं मृतजनदर्शनादिशोक[4] । प्रबळ देखिला. ॥ ५९८ ॥ याकरितां
हरी । ते शंका एथें हरी[5] । कीं जुना देह गेला जरी । देही नवा देह ध-
रितो. ॥ ५९९ ॥

**वासांसि[6] जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥**

अविनाशी अव्यय अज । पूर्वश्लोकीं आत्मा तुज । सांगितला याचें
गुज । कीं जडदेहविलक्षण[7]. ॥ ६०० ॥ जड देह हा विनाशी । तद्वि-
परीत हा अविनाशी । देह उपजे या आत्मयासी । अज म्हणावें यास्तव.
॥ ६०१ ॥ देहास अवांतर व्यय । क्षीण रोड होतां निश्चय । अविनाशी हो-
ऊनि अव्यय । हा आत्मा. ॥ ६०२ ॥ ऐसा आत्मा स्वलक्षण । देह धरी वि-
लक्षण । टाकी, होतां काळें क्षीण, । धरी आणखी नवा देह. ॥ ६०३ ॥
थोडिया वयाचा देह । तोही [8]जीर्ण निःसंदेह । लोक मूढ धरिती स्नेह । तत्त्व
न कळे. ॥६०४॥ कणसाची नेव्हाळी[9] । परी मूषक[10] लागला मुळीं । दाणा न
येतां ते काळीं । वाळोनि जाय. ॥ ६०५ ॥ ज्यास आला काळ[11] । तो देह होय
फटकाळ[12] । ज्यास डसला महाव्याळ[13] । तोचि जीर्ण. ॥ ६०६ ॥ अंगास स्प-
र्शमात्र । होतां जुनें होय वस्त्र । मीपणा स्पर्शलें गात्र । दिवसेंदिवस तें जीर्ण.
॥६०७॥ वस्त्र टाकूनि जीर्ण । नवें घेणें हाचि गुण । तें [14]धोंगडें तरी निपुण ।
नवेंचि धरिती. ॥ ६०८ ॥ त्याकारणें जो रडे । दाटूनि दुःखार्णवीं बुडे । वि-
वेकी यास न घडे । करणें शोक. ॥ ६०९ ॥ इत्यादि भाव पोटीं । धरूनि

---

१. अंतःकरण. २. घाय. ३. अध्याय २ श्लो० १४ पहा. ४. मेलेल्या लोकांच्या भेटीचा इ०. ५. परिहारी. ६. [एखादा] पुरुष ज्याप्रमाणें जीर्ण वस्त्रें टाकून अन्य नूतन [वस्त्रें] घेतो, त्याप्रमाणें देही (आत्मा) जीर्ण शरीरांचा त्याग करून अन्य नूतन शरीरांप्रत जातो. ७. जडदेहाहून भिन्न. ८. जुना, फाटका. ९. टवटवीतपणा. १०. उंदीर. ११. मृत्यु. १२. निरुपयोगी, जुना, व्यर्थ. 'फटकाळ' हा शब्द या ग्रंथांत अनेकवार आला आहे. १३. मोठा सर्प, मृत्यु. १४. जाडेंभरडें.

म्हणे, 'अगा! किरीटी! । टाकूनि जीर्णदेह कोटी । नवे धरी हा आत्मा. ॥ ६१० ॥ जैसीं वस्त्रें जुनीं । लेणार नर टाकूनी । नवीं धरी त्रिभुवनीं । देह तैसे हा धरी. ॥६११॥ कीं शरीरें जुनीं । हा आत्मा त्यजूनी । नवीं धरी म्हणोनि । देही शरीरधारी हा आत्मा.' ॥ ६१२ ॥ पुढल्या श्लोकीं श्रीपती । अविनाशित्व मागुती । बोलेल परी पुनरुक्ती । न म्हणती संत. ॥ ६१३ ॥ शंकानुरूप उत्तर । देतो अनादि चतुर । आत्मा नित्य, अनित्य शरीर । प्रसंगें पुनः पुन्हा बोलतो. ॥ ६१४ ॥ नित्यानित्यअभ्यास । घडवी श्रोतयांस । पुनरुक्तीचाही भास । दिसों नेदी. ॥ ६१५ ॥ जैसीं वस्त्रें जुनीं । पुरुष देतो टाकुनी । नवीं वस्त्रें घेउनी । वर्ततो. ॥६१६॥ तैशीं शरीरें जुनीं । हा आत्मा टाकुनी । नव्या देहातें पावोनी । वर्ततो. ॥ ६१७ ॥ हें आइके अर्जुन । तों साशंक जालें मन, । कीं देह जरी वस्त्रासमान । आत्मयाला. ॥ ६१८ ॥ तरी वस्त्रें जीर्ण टाकितां । नवीं वस्त्रें धरितां । नाश नव्हे नाशवंता । देहाही. ॥ ६१९ ॥ पाहतां वस्त्राकडे । अविनाशित्व देहा घडे । अमरत्वाचा ठसा पडे । देवां जैसा. ॥ ६२० ॥ लोक मरती जाती । अमर कौतुकें पाहती । तेही मृत्यूच्या हातीं । सांपडती काळेंकरूनी. ॥ ६२१ ॥ तथापि त्यांस अमर । म्हणती वेद ऋषीश्वर । तैसा देह टाकितां अंबर[३] । अमर दिसे. ॥ ६२२ ॥ तैसीं टाकी शरीरें । नवीं धरी जेंवी अंबरें । स्वयें न नासे त्या नश्वरें[४] । हा अविनाशी यास्तव. ॥ ६२३ ॥ आणि बोलिलाही कृष्ण । कीं नवीं धरी टाकूनि जीर्ण । तरी स्वभावें टाकितांच मरण । नसे या आत्मया. ॥ ६२४ ॥ परी शरीरावरील वस्त्रें । तोडूं जातां महाशस्त्रें । छेदिलीं जातील गात्रें[५] । वस्त्रें छेदितां. ॥ ६२५ ॥ अंगावरील अंबर । जेव्हां जाळील वैश्वानर[६] । जळेल तेव्हां शरीर । वस्त्र जळतां. ॥ ६२६ ॥ अंगावरील अंबर । ओलें करील जेव्हां नीर[७] । ओलें होईल शरीर । तें वस्त्र भिजतां. ॥६२७॥ देहीं ओल्या अंबरा । वाळवील जेव्हां वारा । वाळवील तेव्हां शरीरा । वाळवितां वस्त्र. ॥ ६२८ ॥ तैसा शस्त्रें छेदितां । देह अग्नीनें जाळितां । देह उदकींही भिजतां । आत्मा तुटे जळे भिजेचि. ॥ ६२९ ॥ एवं अमरां अमरपण । तैसा जीव अविनाशलक्षण । तो कौरववधार्थ कमलेक्षण । मज ऐसा चाळवितो. ॥६३०॥ हा समजोनि भाव । हें नाश निषेधाया देव । बोलतो देवाधिदेव[८] । हा श्लोक. ॥६३१॥

१. हे अर्जुना! २. देह धारण करणारा. ३. वस्त्र. ४. नाशवंत. ५. अवयव. ६. अग्नि. ७. पाणी. ८. कृष्ण.

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**

शस्त्रें न तोडिती यांतें[1] । न जाळी अग्नि[2] आत्मयातें । न जळ[3] भिजवी अव्ययातें । वारा न शोषी. ॥ ६३२ ॥ आइकोनि हेंही वचन । चित्त न पावे समाधान । पुढील श्लोक यदुनंदन । बोलतो यालागीं. ॥ ६३३ ॥ अर्जुन म्हणे मनीं । देह शस्त्रादिकेंकरूनी । नासे छेदादि पावोनी । आत्मा न नासे तो कां ? ॥ ६३४ ॥ हा समजोनि भाव । अविनाशित्वीं देव । निमित्तें सांगे देवाधिदेव । दीड श्लोकें. ॥ ६३५ ॥ दुसरिया श्लोकींचें उत्तरार्ध । त्यांत म्हणेल आत्मा शुद्ध । कळल्यावीण मन अशुद्ध । शोक करी. ॥ ६३६ ॥ तो आत्मा कळे । तेव्हां चित्त वळे । पुरती सकळ सोहळे । म्हणूनि बोलेल या श्लोकीं. ॥ ६३७ ॥

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

छेदावया जाळावया । भिजवावया शोषावया । योग्य नव्हे त्या आत्मया । अनित्यसम पाहशी त्या नित्यासी. ॥ ६३८ ॥ अरे ! रत्नें[4] नव । परी हिऱ्याची शक्ति अभिनव[5] । त्याचें अभंगत्व[6]वैभव । इतरां नये. ॥ ६३९ ॥ घणें फुटे मोतीं । तैसीच हिरियाची ज्योती[7] । तरी हाही फुटेल ऐसी भ्रांती । देहसम आत्मा पाहणें. ॥ ६४० ॥ अगा ! देह स्वयें अनित्य । तरी वस्त्रनाशें नाश सत्य, । आत्मा, तैसा हा नव्हे नित्य । नाशशंका अयोग्य. ॥ ६४१ ॥ नित्य म्हणतां आत्मया । हेही गोष्टी गेली वांया । दृष्टांताविण धनंजया । न वाटे साच. ॥ ६४२ ॥ म्हणूनि म्हणे अच्युत । कीं आत्मा सर्वगत[8] । कीं सर्वगत आकाश निश्चित । अविनाशी. ॥ ६४३ ॥ वस्त्रनाशें नाश । देहास साधे सावकाश । परी देहांतील आकाश । सर्वगतत्वें[9] नासेना. ॥ ६४४ ॥

---

१. शस्त्रें आत्म्याचा छेद करूं शकत नाहींत. २. अग्नि आत्म्याचें भस्म करण्यास असमर्थ आहे. ३. निरवयव आत्म्याला उदक स्पर्श करूं शकत नाहीं. ४. रत्नें नऊ आहेत. 'मुक्तामाणिक्यवैदूर्यगोमेदा वज्रविद्रुमौ । पद्मरागो मरकतं नीलश्चेति यथाक्रमम् ॥' माणिक्य, मौक्तिक, प्रवाल, मरकत, पुष्कराज, वज्र, नील, गोमेद, वैडूर्य. (भागवत.) २=मुक्त, हिरण्य, वैडूर्य, पद्मराग, पुष्कराज, गोमेद, गारुत्मक, प्रवाल, नील. (धर्मसिंधु.) ५. अपूर्व. ६. न फुटण्याचें ऐश्वर्य. ७. पाणी, तेज. ८. सर्वव्यापी. ९. सर्वव्यापीपणानें.

ऐशा त्याही [1]नभास । जो व्यापूनि असे [2]निराभास । तो आत्मा [3]रज्जुसर्पाभास । [4]अवकाश हा. ॥ ६४५ ॥ देहासवें [5]गगन । हें न नासे, देखे जन । देहनाशें नासतां [6]वसन । तरी कां नासे आत्मा सर्वगत? ॥ ६४६ ॥ 'सर्वगव' म्हणतां अर्जुन । समजे, निःशंक होय मन, । कीं सर्वनाशीं गगन । सर्वगत हें न नासे. ॥ ६४७ ॥ परी अनुभवी हा दृष्टांत । न [7]सोशिती कीं सर्वगत । आकाश सर्वत्र परी निश्चित । सर्व नव्हे आकाश. ॥६४८॥ म्हणूनि सर्वगतशब्दापुढें । [8]स्थाणुपद घातलें [9]गाढें । कीं भक्त अनुभवी तेचि गूढें । हीं माझीं समजती. ॥६४९॥ स्थाणु म्हणजे वृक्ष । तो पुरुषाकार प्रत्यक्ष । भासे दृष्टीस [10]अपरोक्ष । असोनि [10]परोक्ष वृक्ष होय. ॥ ६५० ॥ पुरुषाचे सर्व अवयव । दिसती दृष्टी अभिनव । सर्वगत त्यांत तो स्वयमेव । असे स्थाणु. ॥ ६५१ ॥ सर्वगत [11]स्थाणु निश्चित । हा जैसा दृष्टांत । आत्मा तैसा सर्वगत । [12]दार्ष्टांतिकीं.॥६५२॥ दृष्टांतेंचि [13]निगम । तत्त्व बोलती [14]दुर्गम । [15]'**द्वा सुपर्णा**' श्रुति [16]विहंगम । उगेंचि म्हणे दोनी. ॥ ६५३ ॥ दोनी [16]सुपर्ण [17]जीवेश्वर । अनुभवी बोलती चतुर । [18]पिप्पल भक्षी [16]गगनचर । एक एक म्हणे न भक्षीं. ॥ ६५४ ॥ पिप्पलवृक्ष जग । जीवेश्वर दोघे [16]विहंग । दृष्टांतशब्दीं प्रयोग । न बोलतां दार्ष्टांतिक. ॥ ६५५ ॥ सर्वगत **स्थाणु हरी** । एथें बोले यापरी । अर्थरचना दुसरी । ते अचल पदें निरसितो. ॥६५६॥ **स्थाणु**शब्दें अचलत्व । अचलशब्देंही निश्चलत्व । दोहीं पदीं नसे चंचलत्व । अर्थ हाचि. ॥६५७॥ तरी अचलशब्दें अचंचल । स्थाणुशब्दें निखळ । अधिष्ठान जें केवळ । [19]विश्वविवर्ती सर्वगत. ॥ ६५८ ॥

---

१. आकाशास. २. भासत नाहीं असा. ३. दोरीवर सर्पाचा भास झाल्यासारिखा. ४. अंतर. ५. आकाश. ६. वस्त्र. ७. कबूल करीत नाहींत. ८.स्थाणु=वृक्षाचें कांडें. स्थाणु हा शब्द. ९. कठिण. १०. परोक्ष अप्रत्यक्ष, परोक्ष नव्हे तें अपरोक्ष. प्राकृतांत बहुतकरून याचा उलट अर्थ घेतात. ११. आत्मा स्थाणु आहे=आत्मा अविकार्य आणि रूपांतरापत्तिशून्य आहे. १२. ज्याविषयीं दृष्टांत दिला आहे तो. १३. वेद, उपनिषद्ग्रंथ. १४. समजण्यास कठिण. १५. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥'[मुं. उ. ३।१।१.] दोन पक्षी जोडीनें मित्र. (ते)एकाच वृक्षावर गोडीनें वास करतात. त्यांतील एक कर्मापासून उत्पन्न होणारें जें गोड फळ तें खातो, दुसरा कांहींएक न खातां उगीच पाहत बसतो. यांतील एक जीव आणि दुसरा ईश्वर होय. या उपनिषद्वचनाचा अर्थ पंडितांनीं दिला आहे. [यथार्थदीपिका—अध्याय १५ ओंवी २०७२-१०९६.]१६. पक्षी. १७. जीव आणि ईश्वर. १८. पिंपळाचें फळ. १९. विश्वाच्या भोंवऱ्यांत.

उपपादितां अविनाशित्व । हेतु तेथें अचलत्व । कीं जें चळे नश्वरत्व । घडे त्यासी. ॥ ६५९ ॥ म्हणूनि आत्मा अचल । जो अविनाशी केवळ । तो स्थाणु अधिष्ठान निष्कल[1] । विवर्तरूप पुरुषाचें. ॥ ६६० ॥ आतां अचळ पाषाणही । त्यास अविनाशित्व न घडे कांहीं । तरी पाषाणादिकां नाहीं । शाश्वतत्व. ॥ ६६१ ॥ शाश्वतत्व असे याला । याकारणें आत्मयाला । सनातन ह्मणे जयाला । प्रकारांतरत्व न घडे. ॥ ६६२ ॥ अविनाशित्वीं हेतु । आणीकही आइक तूं । म्हणोनि बोले भवसिंधुसेतु[2] । हा श्लोक. ॥ ६६३ ॥

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

अर्जुना ! व्यक्ति[3] वर्ण[4] ज्याला । नाश म्हणवेल गा ! तयाला । व्यक्ति म्हणजे मूर्ति याला । नसे आत्मा अव्यक्त. ॥ ६६४ ॥ व्यक्ति नाहीं जरी । चिंतावा हा कवणेपरी ? । अर्जुना ! ऐसें म्हणसी तरी । आत्मा हा अचिंत्य[5]. ॥ ६६५ ॥ ज्या सत्तेनें सचेतन । होऊनि मन करी चिंतन । त्यास तें मन अचेतन । चिंतील काय ? ॥ ६६६ ॥ अरे ! जया नेत्रांकरितां । उपनेत्रांस येतें पाहतां । तीं उपनेत्रें आतां । कैशीं देखती नेत्रांतें ? ॥ ६६७ ॥ रज्जूवरील सर्पाकृति । हे तों दृष्टीमधील कांहीं भ्रांति । ते भ्रांति त्या रज्जूप्रति । काय पाहे ? ॥ ६६८ ॥ रज्जूस दृष्टि स्पर्शली । आहेच तेव्हां भ्रांति गेली । तैशी चिच्छक्ति[6] लागली । आहेच आत्मवस्तूतें. ॥६६९॥ आकाराचें चिंतन । राहतां आत्माकार मन । ते उन्मनी[7] तें उन्मन । जाणवेल परी चिंतवेना. ॥६७०॥ आकार कल्पी मन । त्यास म्हणिजे 'चिंतन', । ज्या शरीराचें केलें दहन । तेंही मन अगा ! कल्पीतसे. ॥ ६७१ ॥ परि ज्या सत्तेनें कल्पना । ते सत्ता तों चिंतवेना । उपनेत्रांस पाहवेना । नयनयुग्म[8] जैसें. ॥६७२॥ म्हणूनि म्हणावा अविकार्य[9] । कीं हें कारण यास कार्य । न करवे म्हणूनि आर्य । तिहीं आत्मा ऐसा बोलिजेतो. ॥६७३॥ संतीं ऐसा बोलिजेतो । तुज जो ठाउका नाहीं तो । त्या कारणास्तव आम्ही सांगतों । कीं या आत्मयातें तूं जाण. ॥६७४॥ आतां बहु बोलोनि काय । अर्जुना ! संतां शरण जाय । अनन्यभावें त्यांचे पाय । धरूनि आत्मा तूं जाण. ॥ ६७५ ॥ देव या भावें बोलतो । कीं आत्मा

---

१. कलारहित. २. संसारसमुद्राचा सेतु. (श्रीकृष्ण.) ३. मूर्ति. ४. रंग. ५. चिंतवेना असा. ६. ज्ञानशक्ति. ७. आत्माकार मन होणें. ८. दोन्ही डोळे. ९. विकाररहित.

ऐसा बोलिजेतो । तूं जाणोनि आत्मा तो । होसी शोकावेगळा. ॥ ६७६.॥ जाणें आत्मा अविनाशी । अगा! शोकास तोचि नाशी । **नारद सनत्कुमार** दोघांसी । **साम**वेदीं ऐसें बोलणें. ॥ ६७७ ॥ वेद स्वयें अनादि । परी होणार तें वेदीं । असे आतां या संवादीं । चित्त दीजे. ॥ ६७८ ॥

**'[1]शोकस्य पारं तारयतु ।'** [छां. उ. ७।२६।२.]

शोकसागराच्या पैलपारीं । मी पावें ऐसें तारीं । **सनत्कुमारातें** यापरी । **नारद** म्हणे. ॥ ६७९ ॥ **ब्रह्म**याचा मानस । पुत्र **सनत्कुमार** त्यास । प्रश्न करी ऐसा सुरस । **ब्रह्म**सुत तोही **नारद**. ॥ ६८० ॥ ऐसें पुसे जों **नारद** । तों [2]ब्रह्मविद्याविशारद । **सनत्कुमार** वरद । गुरुवर्य उत्तर देतसे. ॥ ६८१ ॥

**'[3]सुखं त्वेव विजिज्ञासितव्यम् ।'** [छां. उ. ७।२४।१.]

म्हणे **सनत्कुमार** । जरी शोक तरोनि पैल पार । पावणें तरी करीं विचार । सुख जाणावयाचा. ॥ ६८२ ॥

**'सुखं भगवतो विजिज्ञासे ।'**

**नारद** म्हणे तूं भगवंत । तुजपासूनीच मी निश्चित । सुख जाणेन म्हणतों अत्यंत । कृपा करीं गुरुवर्या! ॥ ६८३ ॥

**'[4]यो वै भूमा तत्सुखं, नाल्पे सुखमस्ति, भूमैव सुखम् ।'** [छां. उ. ७।२४।१.]

**सनत्कुमार** म्हणे अंत । ज्यास नाहीं तो अनंत । त्यास 'भूमा' म्हणती संत । जो 'भूमा' तें सुख. ॥ ६८४ ॥ ज्यास देशें काळें अंत । तें प्राकृत नाशवंत । तें अल्प त्यास म्हणती संत । कीं त्या जडीं सुख नाहीं. ॥ ६८५ ॥ तरी तो 'भूमा' जो अनंत । तो तूंचि सांगसी भगवंत । म्हणोनि **नारद** अत्यंत । शरण आला. ॥ ६८६ ॥ तेव्हां जो 'अनंत भूमा' । तो त्या **नारदा**चा निजात्मा । गुरुमुखें जाणोनि स्वमहिमा । तरला शोकसागर. ॥ ६८७ ॥ या भावें म्हणे श्रीहरी । कीं सर्वगत शाश्वत यापरी । बोलिजेतो आत्मा तरी । तो तूं जाण. ॥६८८॥ आणि शोकाचा सागर । हा तूं तर सत्वर । कीं योग्य अधिकारी [5]नरवर । आहेस तूं. ॥ ६८९ ॥ धरूनि ऐसा भाव मनीं । म्हणे या आत्मयातें जाणोनी । शोकयोग्य न होसी म्हणोनी । जाणा-

---

१. भगवान्, शोकाच्या पार मला न्यावें. २. ब्रह्मज्ञानांत व्युत्पन्न. ३. सुख जें तेंच जाणण्याची इच्छा करावी. ४. जो भूमा तेंच सुख; अल्पाच्या ठायीं सुख नाहीं. भूमा तेंच सुख. ५. पुरुषश्रेष्ठ.

यास तूं योग्य. ॥ ६९० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । पाहोत ऐसें. ॥ ६९१ ॥ कीं अविनाशीसा कळला । अर्जुन कांहींएकसा वळला । परी मागुतीं [1]खवळला । मनोभाव. ॥ ६९२ ॥ कीं हा आत्मा जरी नित्य । तरी देह लागले ते अनित्य । देह उपजे मरे सत्य । उपजे मरे हाही त्यांसवें. ॥ ६९३ ॥ अर्जुना! याही भावें व्यर्थ । शोक तुझा ऐसें समर्थ । बोलों पाहतो अर्थ । या दों श्लोकीं. ॥ ६९४ ॥

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो! नैवं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

'अथ' म्हणजे यानंतरें । [2]आत्मनित्यत्व वदलों खरें । तें आइकोनिही बरें । शोकचि करिसी. ॥ ६९५ ॥ अगा! देह उपजतां तो उपजला । पुनः पुन्हा तो मरतां मेला । आत्मा ऐसा जरी मानिला । तरी न शोकायोग्य तूं. ॥६९६॥ कीं हें जरी चुकेसें असे । करीं यत्न कांहीं जरी दिसे । वृथा मन शोकीं बुडतसे । बोलेल हें या दुज्या श्लोकीं. ॥ ६९७ ॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

अगा! जो उपजला । एक [3]अढळपद असे त्याला । मृत्यु म्हणावें ज्याला । कीं मृत्यु न टळे कदापि. ॥ ६९८ ॥ आणि जो मेलाच पाहीं । अढळ पद काय त्यासही नाहीं । कीं तो देह न घे कांहीं । न उपजे पुन्हा हें घडेना. ॥ ६९९ ॥ आतां म्हणसी ज्ञान जालें । त्याचें हें शरीर उपजलें । आणि तें दिसतेंही मेलें । तरी काय जन्म त्यालाही? ॥ ७०० ॥ तरी हे अज्ञानियास । दोन्ही नसती ज्ञानियास । दोन्ही मिथ्या जयास । जन्ममरण त्यास कैंचें? ॥७०१॥ म्हणूनि तूतें घडिघडी । गुह्य गोष्टी ही बोलतों उघडी । कीं आत्मा जाणोनि हे तोडीं । बेडी जन्ममरणांची. ॥७०२॥ आत्मा कळला अर्जुना! । ज्यास तो दोन्ही जाणेना । देह मरतां मेलों म्हणेना । जन्म कैंचा पुन्हा त्यास? ॥७०३॥ उपजलों उपजतां देह । हा ज्ञान नसतां जो मोह । तो स्वप्नदेहसंदेह । या जागृतीस न करी. ॥७०४॥ लटकें जालें उपजणें । नुपजे त्यास कैंचें मरणें । न मरे त्यास जन्म घेणें । घडे केंवी? ॥ ७०५ ॥ ऐसें जों कळेना । तों

१. उचंबळला. २. आत्म्याचा शाश्वतपणा. ३. ध्रुवपद.

दोन्ही अढळ अर्जुना! । मी उपजलों वाटे मना । त्यास मरेन हें वाटेच. ॥७०६॥ यालागीं जो उपजला । अढळ मृत्यु आहे त्याला । जो आत्मा न कळतां मेला । अढळ त्याला गर्भवास. ॥७०७॥ हे ज्ञानाज्ञानप्रसंग । असोत या भावें श्रीरंग । म्हणे प्रस्तुत तुझें अंतरंग । दुःखी मरणाकारणें. ॥ ७०८॥ तरी उपजे त्यास मरणें । मेलियास पुन्हा जन्म घेणें । हें अढळ अपरिहारपणें । परिहार याला असेना. ॥ ७०९ ॥ ज्यास नाहींच परिहार । त्याचा शोक वेडेचार । म्हणूनि म्हणतों वारंवार । शोक कराया न योग्य तूं. ॥ ७१० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । याचें निमित्त पुण्यश्लोक । पाहोत विशद[1] अर्थाशीं. ॥ ७११ ॥ जन्ममृत्यूस परिहार । नसे हा कळला विचार । तरी शोकाचा एक प्रकार । उरला वाटे. ॥ ७१२ ॥ कीं बळवंत अर्थ कांहीं । नेतो जरी परिहार नाहीं । तथापि संताप देहीं । उपजेच. ॥ ७१३ ॥ तैसा बळवंत काळ । देहेमूषका[2] तो गिळी व्याळ । तथापि खेद तों होतो विशाळ । अर्जुन म्हणे. ॥ ७१४ ॥ हा मनाचा भाव । जाणोनि देवाधिदेव । या शोकपरिहारीं वासुदेव । बोलतसे हा श्लोक. ॥ ७१५ ॥

**अव्यक्तादीनि[3] भूतानि व्यक्तमध्यानि भारत! ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना? ॥ २८ ॥**

आपला अर्थ[4] जातां मना । शोक वाटों ये अर्जुना । पराव[5] ने आपल्या धना । धनंजया! त्याचा कां शोक? ॥ ७१६ ॥ देखिलीं राजयाचीं धनें । त्यांचा लोभ धरिला मनें । त्याचीं तो नेतां नयनें । सजल होती कोणाचीं? ॥ ७१७ ॥ अरे! हीं सकल भूतें । पंचभूतांश निश्चितें । तीं अहंकाराचीं त्यांतें । उत्पन्न करी महत्तत्व[6]. ॥ ७१८ ॥ त्या महत्तत्वाची उत्पत्ति । ज्यापासूनि ते मूळप्रकृति[7] । ते अव्यक्त कीं नसे व्यक्ती[8] । तिये मूळप्रकृतीला? ॥ ७१९ ॥ तें अव्यक्त ज्यांचा आदि[9] । तीं हीं कार्यें तें कारण अनादि । त्या अव्यक्तीं मांदी[10] । या तत्त्वांची लय पावे. ॥ ७२० ॥ अव्यक्ततत्त्व अनल[11][12] । महत्तत्त्वादि त्याची ज्वाळ । ज्वाळ अग्नींत मिळतां लोळ । कोण करी जीवाचा? ॥ ७२१ ॥ अगा! अव्यक्त तत्त्व जळ । कालवायूचे हे कल्लोळ[13] ।

१. स्पष्ट. २. देहरूप उंदराला. ३. हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना! ह्या शरीरांचा आरंभ अप्रकट आहे, ह्यांची मध्यमस्थिति प्रकट आहे, आणि अंत अप्रकट आहे; तेव्हां त्याजविषयीं विलाप कां करावा? ४. द्रव्य. ५. परकीय पुरुष. ६. मूळमाया, तीन गुणांची साम्यावस्था. ७. मूळमाया. ८. मूर्ति नाहीं जिला. ९. प्रकटपणा. १०. आरंभ. ११. समूह. १२. अग्नि. १३. लाटा.

जळीं मिळतां कल्लोळ लोळ । कोण करी जीवाचा? ॥ ७२२ ॥ सकळ तत्त्वांचाही लय । ज्यास म्हणिजे **'महाप्रलय'** । त्याचा वृथा खेद हा निश्चय । लय होतां पंचभूतमात्रांचा. ॥ ७२३ ॥ मरणास **'पंचत्व'** म्हणती । कीं पंचभूतांश पंचभूतीं । देह नासतां, जाऊनि मिळती । इतर असती सर्व तत्त्वें. ॥ ७२४ ॥ मन बुद्धि इंद्रिय । शब्दादि तन्मात्रा ते विषय । प्रतिदेहीं तेचि हा निश्चय । नाश पंचभूतमात्रांचा. ॥ ७२५ ॥ एवं **अव्यक्तीं** सकळ लय । मरण नव्हे तो तों प्रलय । मरण तों पंचभूतीं भूतलय । होतां जाय काय आपलें? ॥ ७२६ ॥ जें जयाचें वित्त । तो तें नेणार निश्चित । शोकसंयुक्त निजचित्त । कां करावें? ॥ ७२७ ॥ आपलेंसें परधना । मानूनि गोंवूनि मना । ज्याचें तो नेतां अर्जुना! । शाहणे काय शोक करिती? ॥ ७२८ ॥ देखोनि धन आरसीचें । झुरे आणि निजधन साचें । जें प्रकाशक [1]मानसाचें । तें न पाहे. ॥ ७२९ ॥ तो काय पार्था! शाहणा । अरे! तो पंडितांचा राणा । जो पाहे निजधन [2]आपणा । [3]शाहणा तो एक. ॥ ७३० ॥ जें धन सोडितां सुटेना । जें निजधन तोडितां तुटेना । जें निजधन फोडितां फुटेना । अरे! अनुभवाचें तें धन. ॥ ७३१ ॥ या भावें उत्तमश्लोक । बोले यापुढें श्लोक । जेथें आश्चर्यावलोक । आत्मसुखाचा. ॥ ७३२ ॥

**[4]आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥**

अरे! आत्मा आपला । आश्चर्य काय पाहतां याला । तथापि धन्य तो आत्मयाला । पाहे जाणों आश्चर्य. ॥ ७३३ ॥ [5]अनादि ज्याचा स्नेह । त्यास म्हणत होता देह । तो सर्वदा असे [6]विदेह । आश्चर्य हें. ॥ ७३४ ॥ एक देहच आपण । मानी धरूनि मीपण । त्यास सर्वत्र देखे निपुण । आश्चर्य हें. ॥ ७३५ ॥ सर्वीं असोनि तोचि सर्व । नसोनि दावी अपूर्व । जग होऊनि यथापूर्व । आश्चर्य हें. ॥ ७३६ ॥ इत्यादि आश्चर्यकोटी । ज्याच्या श्रवणें वाटती पोटीं । ब्रह्मपद लाळ घोंटी । ज्याच्या सुखाच्या. ॥ ७३७ ॥ जें चित्त

---

१. मनाचें. २. आत्म्याला. ३. ही 'शाहणा' शब्दाची व्याख्या आहे. ४. कोणी हा (आत्मा) आश्चर्यानें पहातो, दुसरा कोणी ह्या [आत्म्या]विषयीं तसेंच आश्चर्यानें बोलतो, कोणी ह्या [आत्म्या]विषयीं आश्चर्यानें श्रवण करतो, तथापि श्रवण करूनही कोणी ह्या [आत्म्याला] जाणत नाहीं. ५. आदिरहित. ६. देहरहित.

त्यास पाहे । [1]चिन्मय [2]जगन्मय होऊनि राहे । त्यास त्याचें वाटताहे । आश्चर्य तरी आश्चर्य काय ? ॥ ७३८ ॥ इत्यादि आश्चर्य तेंचि असे । नवें नाहीं कीं आश्चर्य दिसे । तथापि आश्चर्यचि भासे । पाहे आश्चर्यासारिखा. ॥ ७३९ ॥ त्याच्या आत्मयास गुरुवर्य । शिष्यास सांगे आचार्य । आश्चर्यासारिखेंचि आश्चर्य । तोही बोलतो. ॥ ७४० ॥ शिष्य गुरूतें म्हणे । कीं मी स्वामी आत्मा नेणें । नेणें म्हणूनि ऐसें जाणे । मागुती नेणें म्हणतसे. ॥ ७४१ ॥ तेंचि त्याचें त्याला । श्रीगुरु बोलों लागला । आश्चर्य नसोनि आचार्याला । वाटे आश्चर्यासारिखें. ॥ ७४२ ॥ आतां जो आइके कानीं । तोही आश्चर्यासारिखें मानी । आइके आश्चर्य मानुनी । आश्चर्य नसतां. ॥ ७४३ ॥ जो देखे आणि जो दावी । ते दों चरणीं दोघ अनुभवी । सांगितली [3]जिज्ञासुपदवी । हे तृतीय चरणीं तिसरियाचीं. ॥ ७४४ ॥ आइके जों जों गुरुमुखें । तों तों मानी महासुखें । सहज परी आश्चर्यासारिखें । आइके परम आश्चर्य. ॥ ७४५ ॥ एवं आश्चर्य आत्मज्ञान वाटे । तरी त्रिभुवनीं आनंद दाटे । चित्त अनुभवाचे वाटे । लागे सर्वदा. ॥ ७४६ ॥ जरी आत्मा कळला । भाव आश्चर्यत्वीं न वळला । तो मागुती खळवळला । देहात्मभावीं. ॥ ७४७ ॥ जों जों होतो अनुभव । तों तों आइता नव्हे [4]अभिनव । तथापि संसारियास वैभव । प्राप्त जालें ईश्वराचें. ॥ ७४८ ॥ सर्व भूतांचा आत्मा स्वयें । हा [5]ईश्वरानुभव निश्चयें । तो यास जाला निःसंशयें । कैसें नव्हे आश्चर्य ? ॥ ७४९ ॥ ऐसें असोनि ज्याला । आश्चर्यें आल्हाद नाहीं जाला । आत्मा कळोनि त्याला । भ्रांति पडे मागुती. ॥ ७५० ॥ म्हणोनि चौथे चरणीं । अनादि अविद्येची निःसीम करणी । सांगतो कीं गुरुचरणीं । लागोनिही भ्रष्ट होय. ॥ ७५१ ॥ कोणेएकीं आइकिला । देहातीत [6]चिदात्मा नाहीं कळला । आइकोनिही नाहीं [7]थारला । आत्मबोध. ॥ ७५२ ॥ चित्तास चैतन्ययोग । सर्वदा आहे नाहीं वियोग । रज्जु देखे तेव्हां [8]भुजग । दृष्टीं पाहे. ॥ ७५३ ॥ [9]शरीरी आणि शरीर । निवडूनि सांगतां काय उशीर । वेगळें करणें क्षीर नीर । हा स्वभावचि हंसाचा. ॥ ७५४ ॥ संतकृपेचे [10]घन । सर्वत्र वर्षती [11]जीवन । पालथा घट [12]करंटा जन । दोष नव्हे हा तयाचा. ॥ ७५५ ॥ चंद्र

---

१. ज्ञानमय. २. विश्वमय. ३. जाणण्यास इच्छितो त्याची. ४. नूतन. ५. ईश्वर असा अनुभव. ६. ज्ञानमय असा. ७. स्थिर झाला, ठसला. ८. साप. ९. आत्मा. १०. मेघ. ११. पाणी. १२. दैवहीन.

देखोनि आनंद । पावे सकळ जनवृंद[1] । विषयतस्कर[2] मंद । सुख न मानिती देखोनिही. ॥ ७५६ ॥ एवं आत्मज्ञान कानीं । पडोनीही कितीएकांनीं । गमाविलें कीं मनीं । अनुताप[3] नाहीं उपजला. ॥ ७५७ ॥ अधिकारी अनधिकारी । वर्णूनि दोघांतें मुरारी । म्हणे त्यांत जे अधिकारी । आश्चर्य मानिती आत्मयाचें. ॥ ७५८ ॥ एक आश्चर्यवत् पाहती । एक आश्चर्यवत् बोलती । एक आश्चर्यवत् आइकती । अरे! अर्जुना! ॥ ७५९ ॥ या आत्मयाचें आत्मपण । जो विचारितो आपण । त्या निजधना पाहोनि निपुण । परधनशोकी तूं होसी. ॥ ७६० ॥ जें पूर्वश्लोकीं निरूपिलें । कीं अव्यक्तापासोनि उपजलें । शरीर अव्यक्तींच तें मिळालें । यांत गेलें तुझें काय? ॥ ७६१ ॥ त्याचा वृथा शोक । करणें हाचि अविवेक । आत्मा पाहणें हाचि विवेक । अगा! अर्जुना! ॥ ७६२ ॥ या भावें हा श्लोक देव । बोलिला आतां देवाधिदेव । यावरूनि श्रीवासुदेव । दृढ करील पूर्वोक्त. ॥ ७६३ ॥ कीं आत्मा हा सर्वदेहीं । याचा वध होणार नाहीं । म्हणोनि शोक न करीं कांहीं । ऐसें बोलेल या श्लोकीं. ॥ ७६४ ॥

**देही[4] नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत! ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥**

अरे! जो आत्मा वर्णिला । तो हा देहधारीच कीं आपला । देह जो तो असे धरिला । येणेंचि[5]. ॥ ७६५ ॥ यालागीं म्हणावा **'देही'** । कीं हाचि असे सर्वांचे देहीं । आतां उरले देह तेही । त्याच आत्मयापासुनी. ॥ ७६६ ॥ देहास कारणें भूतें । तीं त्यापासोनि निश्चितें । आतां तूं दोहीं निमित्तें । शोक कराया न योग्य. ॥ ७६७ ॥ अर्थ एथें आणिक एक । कीं तस्मात् कारण सर्वभूतशोक । नको करूं हें उत्तमश्लोक । सर्व भूतांविषयीं बोलिला. ॥ ७६८ ॥ तरी सर्वभूतांस मरण । होणार कीं याकारण । शोक करितों मी आपण । स्वजन मारूं कसा म्हणे? ॥ ७६९ ॥ आतां सर्व भूतें म्हणिजे । हे स्वजन मिळाले जे जे । ऐशी क्लिष्ट[6]कल्पना कां कीजे । मुख्य अर्थ साधतां. ॥ ७७० ॥ **'तस्मात्सर्वाणि भूतानि'** । म्हणजे सर्वभूतें त्यापासूनी । जैसें मृगजळ किरणांवांचोनी । भासेना अथवा दिसेना. ॥ ७७१ ॥

---

१. लोकसमूह. २. चोर. ३. पश्चात्ताप. ४. हे भारता अर्जुना! सर्वांचे देहांत [स्थित] जो देहधारी [आत्मा] तो नित्य अवध्य आहे, यास्तव सर्व भूतांविषयीं शोक करणें तुला योग्य नाहीं. ५. या आत्म्यानेंच. ६. सरळ नव्हे अशी कल्पना.

तैसीं आत्मयावांचुनी । कोण म्हणेल भूतें म्हणोनी । यास्तव ऐसीं आत्मयापासूनी । सर्व भूतें. ॥ ७७२ ॥ मातीपासूनि घट । न दिसे मातीविण निपट । पाहतां मातीच आहे प्रकट । दिसोनिही घट असेचिना. ॥ ७७३ ॥ एवं मिथ्या भूतगणें । मिथ्या मारणें, मिथ्या मरणें । म्हणोनि शोका न करणें । पाहणें आत्मा पूर्वोक्त. ॥ ७७४ ॥ कीं शोक हा अयोग्य । तो कराया न तूं योग्य । आहेस अधिकारी सभाग्य । आत्मत्व जाणावया. ॥ ७७५ ॥ हा भाव दावी [१]अव्यय । त्यावरूनि धनंजय । युद्ध कराया निश्चय । मनीं धरी. ॥७७६॥ संदेह गेला सकळ । परी कृपा उरली पुष्कळ । याकारणें मेघनीळ । उपदेशितो हा श्लोक. ॥ ७७७ ॥

**[२]स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥**

दयाही करावया । योग्य नव्हसी धनंजया! । स्वधर्म पाहतां क्षत्रिया । धर्मयुद्ध. ॥ ७७८ ॥ यालागीं दया कराया । योग्य न होसी कुरुवर्या! । [३]धर्म-

---

१. श्रीकृष्ण. २. [हे अर्जुना!] स्वधर्माचें अवलोकन करून कंपित होणें तुला शोभत नाहीं; कारण क्षत्रियाला धर्म्यरणाहून अन्य कोणतीही गोष्ट श्रेयस्कर नाहीं. ३. युद्ध हेंच क्षत्रियांचें कर्तव्य आहे हा अर्थ ज्यांत प्रतिपादन केला आहे अशीं वचनें:—(१) क्षत्रियो हि प्रजा रक्षन् शस्त्रपाणिः प्रदंडवान् । निर्जित्य परसैन्यानि क्षितिं धर्मेण पालयेत् ॥ [परा० स्मृ०], (२) समोत्तमाधमै राजा त्वाहूतः पालयन् प्रजाः । न निवर्तेत संग्रामात्क्षात्रधर्ममनुस्मरन् ॥ संग्रामेष्वनिवर्तित्वं प्रजानां चैव पालनम् । शुश्रूषा ब्राह्मणानां च राज्ञः श्रेयस्करं परम् ॥ [म० स्मृ० अ० ७ श्लो० ८७–८८], (३) प्रजानां रक्षणं दानमरीणां निग्रहं तथा ॥ [बृ० परा० अ० २ श्लो० ३]. भावार्थः—(१) 'क्षत्रियानें प्रजेचें पालन करावें, हातांत शस्त्रें घेऊन शत्रूच्या सैन्यास पराजित करावें आणि न्यायानें पृथ्वीपालन करावें. (२) समबल, अधिकबल अथवा हीनबल राजानें संग्राम करण्यासाठीं बोलाविलें असतां राजानें प्रजारक्षण करून व क्षत्रियधर्म स्मरून रणांगणापासून कधींही परत येऊं नये. समरांत अपराङ्मुखत्व, प्रजारक्षण आणि ब्राह्मणपरिचर्या हीं तीन कर्में राजाला स्वर्गादिश्रेयःसाधनें म्हणजे परमकल्याणकारक आहेत.' (३) प्रजापालन, दान आणि शत्रुनिग्रह हीं राजाचीं कर्में आहेत. वरील उताऱ्यांत राजा हा शब्द 'क्षत्रिय' ह्या शब्दाच्या ऐवजीं आहे असें समजावयाचें. राजा हा शब्द क्षत्रियांसच कां लावावा ह्याविषयीं विस्तृत विवेचन 'षड्दर्शनचिंतनिके'तील पूर्वमीमांसादर्शन पृष्ठ ४२९–३१ यांत आढळेल. समर केल्यानें श्रेयःसाधन होतें असा शास्त्रांचा निर्देश आहे; तेव्हां 'न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ।' [अ० १ श्लो० ३१] असें जें अर्जुनानें पूर्वीं सांगितलें त्या भाषणाची व्यर्थता शास्त्रप्रतिपादनावरून स्पष्ट होते. [सरलार्थबोधिनी गीता—पुस्तक २ अंक १.]

युद्धाहूनि क्षत्रिया । श्रेय आणिक न दिसे. ॥ ७७९ ॥ श्रेय मुख्य परलोक, । तो सिद्ध सद्य असतां, शोक । काय करिसी? ऐसें उत्तमश्लोक । या श्लोकीं बोलतो. ॥ ७८० ॥

**[1]यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**

**सुखिनः क्षत्रियाः पार्थ! लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**

अरे! जो धर्मयुद्धीं मेला । तो निश्चित स्वर्गासि गेला । आजि तरी मोकळाच केला । देवीं [2]दारवंटा स्वर्गाचा. ॥ ७८१ ॥ कीं मरणार एथें फार । किती उघडावें वारंवार । म्हणोनि [3]ऐकसरें स्वर्गद्वार । उघडेंचि ठेविलें. ॥ ७८२ ॥ अरे! जें जपल्या न घडे । तें स्वर्गद्वार अनायासें उघडे । भाग्यें ऐसें सांपडे । धर्मयुद्ध क्षत्रियां. ॥ ७८३ ॥ ज्यास ऐसा शोकसंशय । नसे तो सुखी क्षत्रिय । त्यास भाग्यें धर्ममय । युद्ध ऐसें सांपडे. ॥ ७८४ ॥ उभयलोकपुरुषार्था । हें युद्ध देणार गा! पार्था! । हें न करितां अनर्था । पावसी म्हणे चौं श्लोकीं. ॥ ७८५ ॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**

**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥**

श्रीचतुर्भुज भुज । उभारूनि म्हणे आम्ही तुज । बोलिलों [4]वेदशास्त्रगुज । अर्जुना! ॥ ७८६ ॥ आतां यानंतर जरी । हें न करिसी धर्मयुद्ध तरी । गोष्टी नव्हे बरी । सांगतों. ॥ ७८७ ॥ स्वधर्म आणि कीर्ती । टाकोनि, पावोनि अपकीर्ती, । पाप पावसी तूं धर्ममूर्ती । त्याकरितां. ॥ ७८८ ॥

**[5]अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।**

**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

अपकीर्ति तुझी भूतें । बोलती जें कधीं नाशातें । न पावे ऐशा अपयशातें । [6]आचंद्रार्क पावसी. ॥ ७८९ ॥ सर्वीं सर्वत्र मानिला । त्याचा अपकीर्तिघोष जाला । तो मरणाहूनि त्याला । अधिकतर. ॥ ७९० ॥

---

१. हे अर्जुना! सहजगत्या आलेलें आणि स्वर्गाचें उघडलेलें [केवळ] द्वारच असें [हें] युद्ध सुखी क्षत्रियांना प्राप्त होतें. २. द्वार. ३. एकदम. ४. वेदशास्त्रांचें रहस्य. ५. हे अर्जुना! सर्व जन तुझी अकीर्ति निरंतर गातील. प्रतिष्ठित पुरुषाला अकीर्ति मरणाहून अधिक दुःखप्रद आहे. ६. चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत.

**भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**

कीं रण देखोनि भ्याला । तरीच [1]तोंडीचा निघाला । ऐसें मानितील तुजला । महारथ. ॥ ७९१ ॥ जे तुज देती बहुमान । वर्णिती तेच अपमान । [2]लाघव पावसी वर्तमान । काळांत याही. ॥ ७९२ ॥

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः ।**
**निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम्? ॥ ३६ ॥**

बोलों नये ते परी । तुज बोलती तुझे वैरी । सामर्थ्य निंदिती याहीवरी । दुःख अधिक तें कोण? ॥ ७९३ ॥ युद्ध न करितां अनर्थ । चौं श्लोकीं बोलिला [3]समर्थ । दों पक्षींही पुरुषार्थ । युद्ध करितां म्हणे या श्लोकीं. ॥ ७९४ ॥

**[4]हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौंतेय! युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

मरसील हें तों न घडे । कीं मी आहें तुजकडे । अथवा रणीं मस्तक पडे । तरी पावसी तूं स्वर्ग. ॥ ७९५ ॥ अथवा न मरतांच जया । पावसी तूं धनंजया! । तरी पृथ्वी भोगिसी संदेह या । गोष्टीस काय? ॥ ७९६ ॥ या दोहीं कारणांवरी । दृष्टि देउनियां बरी । कौंतेया! ऊठ झडकरी । युद्धनिश्चय करूनियां. ॥ ७९७ ॥ कुंतीची [5]लेकी असती । ते वेडेपणें रुसती बैसती । तरी आम्ही तीप्रती । कां ऊठ म्हणतों? ॥७९८॥ तूं तों अगा! कौंतेय! । कन्या नव्हेस, तिचा तनय । म्हणूनि म्हणतों युद्धनिश्चय । करूनि ऊठ हा भाव. ॥ ७९९ ॥ गेला या गोष्टीनें भ्रम । युद्धही वाटे स्वधर्म, । परी म्हणे जाणावें ब्रह्म । कर्म [6]बंधक अनिवार. ॥ ८०० ॥ 'जितां राज्य मेल्या स्वर्ग । दोन्ही बंधाचेच उपसर्ग । अंतीं कर्मफलवर्ग । दुःखहेतु. ॥ ८०१ ॥ दुःख तितुकें पाप । स्वर्गीं शेवटीं तरी ताप । युद्ध स्वधर्म तरी पश्चात्ताप । फल बंधरूपें देणार.' ॥ ८०२ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । याचा परिहार देवाधिदेव । यापुढें आतां बोलेल. ॥ ८०३ ॥ कीं होऊनि [7]निरहंकार । जय अपजय दोन्ही प्रकार । [8]सम मानी तरी हा निर्धार । कीं पाप ऐसें न पा-

---

१. तोंड घेऊन पळाला. २. लहानपण. ३. श्रीकृष्ण. ४. हे अर्जुना! युद्धांत मेलास तर स्वर्ग भोगशील, किंवा जय पावलास तर पृथ्वीराज्य भोगशील, यास्तव युद्धाचा निश्चय करून उभा रहा. ५. मुलगी. ६. पापरूपानें. ७. अहंकाररहित. ८. समान, तुल्य.

वसी. ॥ ८०४ ॥ पाप ऐसें न पावसी । या श्लोकीं म्हणेल अर्जुनासी । हें मारितां स्वजनांसी । पाप होणार तें पाप म्हणवेना.॥८०५॥ पाप वाटतें जरी। स्वधर्म त्यास एथवरी । न म्हणता सर्वथा हरी । स्वजनहत्येसी. ॥ ८०६ ॥ स्वधर्म कां टाकिसी । वारंवार गोष्टी ऐसी । जो बोले तो कैसी । पापवार्ता बोलेल? ॥८०७॥ हें पाप म्हणोनी । बोलेल जेव्हां अंगीकारूनी । तेव्हां या अध्यायाच्या आरंभापासुनी । जें बोलिला तें व्यर्थ. ॥ ८०८ ॥ स्वजनहत्याही स्वधर्म । क्षत्रियांस परी हेंही कर्म । बंध करणार हेंचि वर्म । पापशब्दें ये स्थळीं. ॥ ८०९ ॥ बंध कर्माचें नाम । पाप म्हणती निगमागम । त्याचा परिहार पुरुषोत्तम । बोलेल आतां. ॥ ८१० ॥ कीं सुखदुःखीं सम । होऊनि करीं हा स्वधर्म । ऐसें पार्थास सगुण ब्रह्म । बोलेल आतां या श्लोकीं. ॥ ८११ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

अर्जुना! करितांही स्वधर्म । फलबंध जोडीच कर्म । हें सकल वेदांचें वर्म । बंध म्हणजे पाप. ॥ ८१२ ॥ परि या पापाचा हेतू । एक कामना जाण तूं । हा स्वधर्मीं जो किंतू । तो निष्कामता परिहरी. ॥ ८१३ ॥ कामनारूप तें हें कीं । मज सुख हो उभयलोकीं । आणि दुःख न हो इतुकी । मूळप्रतिमा कामनेची. ॥ ८१४ ॥ दुःख न हो, हो सुख । यामुळें द्वंद्वें आणिक । जयांत सुख अपजयांत दुःख । या युद्धीं कामना इतुकीच. ॥ ८१५ ॥ तरी होईं सुखदुःखीं सम । टाकीं जयापजयाचा भ्रम । निरहंकार होउनि संग्राम । आरंभीं त्यावरी. ॥ ८१६ ॥ पुण्यांतही बंधरूप । अर्जुना! घडे जें पाप । ऐसा होतां तूं संताप । तोही न पावसी. ॥ ८१७ ॥ ऐसा निष्काम धर्म । यांत बहु संदेहाचा भ्रम । तें सकळ सगुण ब्रह्म । छेदूं म्हणे स्वशरणाचें. ॥ ८१८ ॥ आतां यापुढें जो श्लोक । त्या श्लोकीं उत्तमश्लोक । करूनि हा कृपावलोक । हेंचि बोले. ॥ ८१९ ॥

---

१. श्लो० ३८ पहा. २. वेदशास्त्रें. ३. संशय. '**किंतू** या शब्दाचा मराठींत 'विकल्प' या अर्थीं प्रयोग होतो. जसें, 'त्याच्या मनांत मजविषयीं किंतू आलासा दिसतो, तेव्हां त्यानें माझ्या हवालीं रुपये केले नाहींत.' संस्कृतांत या शब्दाचें रूप 'किंतु' आहे; 'किं' आणि 'तु.' आक्षेप काढावयाचा असल्यास वरील अव्ययाचा उपयोग करितात. तेव्हां मराठींत हें अव्यय नामरूप होऊन त्याचा अर्थही वरच्यासारखा झाला आहे.' [निबंधमाला—अंक ५३ पृष्ठ २३.] ४. मूळस्वरूप. ५. होवो. ६. युद्ध. ७. वासनारहित, फलेच्छाविरहित. ८. आपणास जो शरण आला त्याचें.

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**

**बुद्ध्या युक्तो यया पार्थ! कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

अर्जुना! एथवरी । जे हे बुद्धि वदलों बरी । हींत **सांख्याच्या** कुसरी । **सांख्यरीतीं** बोलिलों. ॥ ८२० ॥ **सांख्य** म्हणजे **गणना** । सकल तत्त्वांची **अर्जुना!** । ज्या शास्त्रांत हे रचना । '**सांख्य**' म्हणावें तें शास्त्र. ॥ ८२१ ॥ असत्पदें जड क्षेत्र । त्यांत गणिजे जडतत्वमात्र । क्षेत्रज्ञ जाणे जो हें विचित्र । तो सत्पदें वर्णिला. ॥८२२॥ तें क्षेत्रज्ञ देह नाशवंत । क्षेत्रज्ञ साक्षी शाश्वत । जाणोनि तो सर्वगत । शोक टाकीं ऐसें बोलिलों. ॥ ८२३ ॥ हे **सांख्यरी**-तीची बुद्धी । बोलिलों जिणें मोक्षसिद्धी । परी या अनुभवाची समृद्धी । चित्त-शुद्धीनें. ॥ ८२४ ॥ तें चित्तशुद्धिकर्म । म्हणजे विहितधर्म । त्यांत बंधक सकाम । निष्कामकर्मीं चित्तशुद्धी. ॥ ८२५ ॥ त्याचेंही स्वल्पमात्र गुज । पूर्वश्लोकीं बोलिलों तुज । परी तितक्यानें बरा उमज । जाला नसे तूतें. ॥ ८२६ ॥ आतां त्या कर्मयोगीं ।बुद्धि सांगतों तुजलागीं । बुद्धीनें तूं कर्मप्र-योगीं । **पार्था!** तोडिसी कर्मबंध. ॥ ८२७ ॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**

**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

**अर्जुना!** हा सुगम पंथ । धोकाच नाहीं कांहीं जेथ । कीं जें आरंभिलें एथ । त्यास अपूर्णता असेना. ॥ ८२८ ॥ कीं एक कर्म आरंभिलें । त्यास मध्यें विघ्न आलें । तरी तें नासोनि नाहीं नासलें । पूर्णचि जालें जाणावें. ॥ ८२९ ॥ सत्कर्में होय संतुष्ट । ईश्वर दे फल अभीष्ट । यास कांहींच नाहीं इष्ट । ईश्वराविण. ॥ ८३० ॥ हा फल अपेक्षिता । तरी फलासारिखें कर्म पा-हता । पूर्ण होतें तरीच देता । फल ईश्वर. ॥ ८३१ ॥ फुका सेवा करूं लागे । आणि फळ कांहीं न मागे । विहित आज्ञेमध्यें वागे । फुकाची. ॥८३२॥ पूर्ण होतांही फळ । जो न इच्छीच केवळ । पूर्ण न होतां काय विकळ । हो-णार त्याचें? ॥ ८३३ ॥ कर्म करितां कांहीं । चुके, तरी प्रत्यवाय नाहीं, ।

---

१. सर्वव्यापी. २. मुक्तीची सिद्धि. ३. या धर्माचें वर्तन अर्धवट राहिलें तरी नाश पावत नाहीं, तसेंच त्यास प्रत्यवाय नाहीं. योगधर्माप्रमाणें केलेलें स्वल्प आचरण देखील मोठ्या भयापासून रक्षण करतें. ४. सोपा. ५. इच्छिलेलें. ६. इच्छा करणारा.

फुकट राबे त्याचीही । चुकी कोणीं काढावी? ॥ ८३४ ॥ एथें मनीं म्हणे पार्थ । तरी काय त्याचें करणें व्यर्थ । तो उत्तरार्धें समर्थ । तेंही बोले. ॥८३५॥ करितां हा निष्काम धर्म । त्याचें जें स्वल्पही कर्म । त्याणें शुद्धचित्त पावे ब्रह्म,। सुटे महद्भयापासूनी. ॥ ८३६ ॥ धरोनि हा भाव मनीं । म्हणे श्रीकृष्ण हांसोनी । कीं रक्षीं थोर भयापासुनी । स्वल्पही कर्म या धर्मांचें. ॥ ८३७ ॥ आतां सुखास उपयोगी । बुद्धि निष्कामकर्मयोगीं । त्याच [१]कामुकाच्या बुद्धि [२]बेजागी । दोन्ही वर्णितों या श्लोकीं. ॥ ८३८ ॥

**[३]व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन! ।**

**बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥**

अगा! हे कुरुनंदना! । कौरवकुळाच्या [४]मंडना! । धन्य कीं तूं या [५]भवखंडना । मोक्षमार्गास आइकसी. ॥ ८३९ ॥ एक सर्वेश्वरकृपा । तारील या निश्चयरूपा । बुद्धि पावे हा मार्ग सोपा । आणीक ऐसा असेना. ॥ ८४० ॥ एका ईश्वराचे चरण । त्यास एकनिष्ठ असणें शरण । त्या कारणेंचि कर्म करणें । अन्य नलगे. ॥ ८४१ ॥ हें एक बुद्धीचें लक्षण । आतां तिचें निश्चयात्मिकपण । हें कीं निश्चित आपण । या भवसमुद्रीं बुडेना. ॥ ८४२ ॥ ऐशी निश्चयात्मिका । बुद्धि गा! कुरुकुळाच्या टिळका! । सुखहेत न मनीं एका । ईश्वराविण. ॥ ८४३ ॥ न जया हा एक निश्चय । त्याच्या बुद्धीचे [६]आशय । अनंत आणी नाना काममय । फांटे तया आशयाचे. ॥८४४॥ एका एका मनोरथासाठीं । यत्न करिती कोटि कोटी । मागुती निश्चय पोटीं । कार्यसिद्धीचा असेना. ॥ ८४५ ॥ होईल कीं नव्हे फळ । या चिंतनेनें तळमळ । कधीं होईल हे हळहळ । सुख कैंचें तयातें? ॥ ८४६ ॥ एक निश्चय नसे जया । त्याची बुद्धि साह्य न तया । पीडी ऐसी धनंजया! । अनंत शाखा होउनी. ॥ ८४७ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कोण्या निमित्तें उत्तमश्लोक । बोलेल हें निष्काम लोक । परिसोत. ॥ ८४८ ॥ अर्जुन म्हणे मनीं । कीं, 'काम्य वाईट म्हणोनी । कां निंदितो जें महाजनीं । [७]श्लाघ्य केलें. ॥ ८४९ ॥

---

१. फलेच्छूच्या. २. तापट, तामसी. ३. हे अर्जुना! येथें निश्चयात्मक अशी एकच बुद्धि होते, अनिश्चयात्मक पुरुषांच्या बुद्धि अनेक असतात आणि त्या बुद्धींना पुनः अनेक फांटे असतात. ४. भूषणा. ५. संसारनाशना. ६. हेतु. ७. उत्तम, प्रशंसनीय.

जें जें वेदप्रमाण । बोलती चतुर सुजाण । वेदशास्त्रप्रवीण । तें निंद्य कैसें?' ॥ ८५० ॥ हा अर्जुनमनोभाव[1] । जाणे सर्वसाक्षी देव । तो पुसे तों स्वयमेव[2] । बोलतसे हा श्लोक. ॥ ८५१ ॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।**

**वेदवादरताः पार्थ! नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**

**अर्जुनास भवभंजन[3]** । म्हणे, 'जे दिसती महाजन । त्यांचा भाव जो गहन । तो उथळ अत्यंत पाहतां. ॥८५२ ॥ अरे! ते वेदवादींच रत । पुष्पास म्हणती फळ निश्चित । मोक्ष नाहींच ऐसें मत । अगा! त्यांचें. ॥८५३॥ आणि मूढही नसती, । वेदांचा अर्थही वदती, । परंतु सर्वज्ञ नव्हती । अदीर्घदर्शी[4] असर्वज्ञ. ॥ ८५४ ॥ **अर्जुना!** कर्म म्हणजे वेल । स्वर्गादि पुष्प, मोक्ष फल । आधीं वेलास येतें फूल । फळ शेवटीं. ॥८५५॥ फळ आलियावरी । वेल वाळे ज्यापरी । ज्ञान झालिया उपरी । जळे कर्म. ॥ ८५६ ॥ जें ज्ञान तेचि मुक्ति । तेचि जागृति तेचि स्वप्ननिवृत्ति[5] । परी ते ब्रह्मात्मताप्राप्ती[6] । चित्तशुद्धीनें. ॥ ८५७ ॥ चित्तशुद्धि कर्ममूळ । एवं परंपरेनें मोक्षफळ । तोचि मोक्ष केवळ । आत्मबोध. ॥ ८५८ ॥ फळ पक्क होतां वेल । वाळे त्यांत न उरे ओल । परी फळाहूनि पूर्वीं येतें फूल । तें घेऊं नये. ॥ ८५९ ॥ ज्याणें तोडिलें फूल । त्यास कैचें होय फळ? । परी बळांस सद्यः[7] कोमळ । पुष्प तोडणें आवडे. ॥ ८६० ॥ फळाकारणें वेल । लावा म्हणे बाप वडील । बाळक नाइकनी बोल । साध्य बहुकाळें म्हणोनी. ॥ ८६१ ॥ बाळांस आवडती फुलें, । बापही त्यांस तैसाच बोले, । 'वेल लावा म्हणे येती फुलें । शीघ्र उपयोगी खेळावया.' ॥ ८६२ ॥ मग ते लाविती वेल । आइकती पितयाचा बोल । नेणती बोलांत जो खोल । भावार्थ फळींच पितयाचा. ॥ ८६३ ॥ वेद जगाचा पिता । मोक्षार्थ कर्मयोगाचा वक्ता । तो विषयभोगरता । नावडे मोक्ष. ॥ ८६४ ॥ पापें नरकास जाणें । त्याहूनि बरें स्वर्ग भोगणें, । पापें अपुत्र अभाग्यपणें, । पुण्यें सभाग्य पुत्रवंत. ॥ ८६५ ॥ तोडोत कामनेचीं[8] फुलें । परी कर्में करोत आपल्या बोलें । म्हणुनि काम्य म्हणे भलें । ते **'वाचा पुष्पिता'** वेदाची. ॥ ८६६ ॥ मोक्षफळ मुख्य कारण । तें ज्या वचनीं न

---

१. अर्जुनाच्या मनांतील आशय. २. स्वतःच. ३. संसारनाशन. (कृष्ण.) ४. लांबचें पहाणारे नव्हत. ५. सुषुप्ति. ६. उन्मनी. ७. तत्काळ. ८. वासनेचीं.

बोलणें । काम्य पुष्पचि मुख्यत्वें सांगणें । ते वेदाची आज्ञा **'पुष्पिता.'** ॥ ८६७ ॥ हा कर्मकांडसिद्धांत । अंगीकारी शास्त्र वेदांत । कीं वैदिक कर्म मोक्षानिमित्त । वेदप्रमाण येविषयीं. ॥ ८६८ ॥

**'तमेतमात्मानं[1] वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषंति ।**

**यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन ॥'**

श्रुति म्हणे या आत्मयातें । जाणों इच्छितात ज्ञानपंथें । तो ज्ञानपंथ एथें । बोलिला ऐसा. ॥ ८६९ ॥ कीं ब्रह्मलक्षणें जया वचनीं । त्या वेदानुवचनेंकरूनी । ब्राह्मण जाणों इच्छिताति आणी । यज्ञादिकीं. ॥ ८७० ॥ जाणों इच्छिती ज्या मनीं । तें शुद्ध नसे म्हणोनी । यज्ञादिकीं शुद्ध करूनी । जाणों इच्छिती. ॥ ८७१ ॥ म्हणूनि म्हणे भगवंत । कर्म मोक्षफळानिमित्त । स्वर्गादिक पुष्प निश्चित । मुख्य फळ हें नव्हे. ॥ ८७२ ॥ तथा जेथें कामना । त्या वेदाचिया वचना । पुष्पित म्हणावें अर्जुना! । कीं मुख्य फळ नव्हे तें. ॥ ८७३ ॥ ज्या अशा **पुष्पिता वाचा** । तितक्याच धरिती अर्थ त्याचा । काम्य फळचि साचा । पुरुषार्थ म्हणती. ॥ ८७४ ॥ जरी म्हणविती पंडित । ते असर्वज्ञ निश्चित । न कळोनि वेदसिद्धांत । पुष्पास फळ मानिती. ॥८७५॥ सर्वज्ञातें तें असंमत । जे वेदवादीं रत । वेदीं जे अर्थवाद तयांत । रत होउनी राहिले. ॥ ८७६ ॥ निंब पाजितां पिता । लाडू देईन म्हणे सुता । निंबपानफळ तत्त्वतां । लाडूच मानी बाळक. ॥ ८७७ ॥ ऐसा पितयाचा शब्द । त्यास म्हणावें अर्थवाद । परी आरोग्य इच्छी पिता वेद । मोक्षमार्गा जो लावी. ॥ ८७८ ॥ आरोग्य न कळे बाळा । परी हात पसरी गुळा । वेदाची ऐसी नाकळे कळा । रत अर्थवादीं म्हणूनि ते. ॥ ८७९ ॥ **पार्था!** स्वर्गादि फळ । वेद पिता दावी गूळ । आणीक नाहीं हाचि केवळ । पुरुषार्थ म्हणती. ॥८८०॥ आणि पाहतां सुज्ञ । न म्हणवे ते केवळ अज्ञ । परंतु नव्हती सर्वज्ञ । कीं अमुख्यास मुख्यचि म्हणती. ॥ ८८१ ॥ मनुष्याहूनि जीवित्व । अधिक म्हणूनि अमरत्व । देवांस तैसें अक्षय्यत्व । कर्मफळास वेदीं वर्णिती. ॥८८२॥

**'अक्षय्यं[2] ह वै चातुर्मास्ययाजिनः सुकृतं भवति ।'**

चातुर्मास्य यज्ञ यजिती । त्यांचीं सुकृतें अक्षय्य म्हणे श्रुति । ते हेंच तत्त्व

---

१. वेदाध्ययनानें, दानानें आणि तपश्चर्येनें विविदिषा (ब्रह्म जाणण्याची इच्छा) उत्पन्न होते. २. चातुर्मास यज्ञ करणाराला अक्षय पुण्य प्राप्त होतें.

मानिती । परंतु नव्हती सर्वज्ञ. ॥ ८८३ ॥ कीं अमरत्व देवां जैसें । कर्मफळ नित्यत्वें तैसें । तरी मोक्षनित्यत्व ऐसें । कां नव्हे म्हणती. ॥ ८८४ ॥ मोक्षास नैश्वरता[1] । वेद बोले तत्त्वतां । तरी मोक्षही म्हणिजेता । नश्वर. ॥ ८८५ ॥ कर्मफळ नाशवंत । वेद बोलती निश्चित । हेतु दाविती अत्यंत । नश्वरत्वीं. ॥ ८८६ ॥

**'[2]तद्यथेह कर्मजितो लोकः क्षीयते ।**

**एवमेवामुत्र पुण्यजितो लोकः क्षीयते ॥'** [छां० उ० ८. १-६.]

कर्म करूनि इहलोकीं । देश संपादिला नासेच कीं । तैसा पुण्यें परलोकीं । लोक मेळविला नासेच. ॥ ८८७ ॥ इहलोकीं साधे देश । शत्रु आक्रमी तोच नाश । अथवा आपण वश । मृत्यूस होतो. ॥ ८८८ ॥ एवं मेळविला देश । इहलोकीं त्यास एथेंचि नाश । स्वर्गीं स्मरतां पुण्यलेश । ढकलूनि देती. ॥ ८८९ ॥ श्रुति म्हणे इहलोक । तैसाच नासे परलोक । कर्मफल नश्वर सशोक । श्रुति म्हणे. ॥ ८९० ॥ मोक्षही ऐसी श्रुति । जरी कोठें तरी नाशवंत म्हणती । तरी मोक्षाचीही स्थिति । होती अमरांचसारिखी. ॥ ८९१ ॥ कर्मफळाप्रति । बहुत श्रुति नाश म्हणति । अक्षय्य म्हणे एक श्रुति । तें अमरत्व जैसें अमरांचें. ॥८९२॥ ऐसा श्रुतिचा विचार । न करूनि करिती वेडेचार । असर्वज्ञ त्यांस सर्वेश्वर । स्वमुखें म्हणे याकरितां. ॥८९३॥ याकारणें पार्था! । ते भले न मानीं सर्वथा । आणीक यांची कथा । आईक जे मी बोलतों. ॥ ८९४ ॥

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**

**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

मानवी स्त्रिया इह लोकीं । देवांगना भोगूं परलोकीं । कामसमुद्राच्या उदकीं । मन बुडालें जयांचें. ॥ ८९५ ॥ जो स्वर्ग नाशवंत । तो पुरुषार्थ अत्यंत । कर्में करोनि होती श्रांत । त्या स्वर्गाकारणें. ॥ ८९६ ॥ भोगैश्वर्य[3] साधावया । आरंभिती ज्या ज्या क्रिया । त्या त्या अगा! धनंजया! । दुःखें देती अगणित. ॥ ८९७ ॥ दुःख नरकापरिस । अधिक ऐसा गर्भवास । अवश्य घडे तयांस । त्या क्रियेनें. ॥ ८९८ ॥ एथें शंका वाटे मना । सहज गर्भवास असे

---

१. नाशिवंतपणा. २. जसा मृत्युलोकीं कर्मानें प्राप्त झालेल्या सुखांचा क्षय होतो, तसा स्वर्गलोकींही पुण्यानें प्राप्त झालेल्या सुखांचा क्षय होतो. ३. भोग आणि ऐश्वर्य.

जनां । कां निंदावी वेदोक्त कामना । तरी भावार्थ परिसा कृष्णाचा. ॥८९९॥ कीं वासनानदीची धारा । जन्ममरणप्रवाहीं नरा । सहज वाहवी विशेष वारा । सुटला वेदोक्त काम्यकर्माचा. ॥ ९०० ॥ लागावया [1]तीरा । यत्नही करूं नेदी नरा । ऐसा कामनेचा वारा । [2]काम्यशास्त्रें सोडिला. ॥ ९०१ ॥ जरी टाकी [3]कर्मकामना । तरी मोक्षशास्त्र रुचे जना । तेव्हां मोक्षाच्या साधना । झोंबों लागे. ॥ ९०२ ॥ कामना तितकी फूल । ऐसा वेदार्थ समजे सखोल । तरी मोक्षफळ मुख्य फळ । जन मानी. ॥ ९०३ ॥ तेव्हां वासनानदीची धारा । सोडूनि लागावें तीरा । तैसी बुद्धि होय नरा । तों वारा सुटला हें शास्त्र. ॥ ९०४ ॥ वेग जाला प्रवाहीं । तीरीं लागावया यत्न नाहीं । यत्न असोनि न सुचे कांहीं । मोक्षमार्गाचा. ॥ ९०५ ॥ मोक्षाचा यत्न न सुचे । न चुकती गर्भवास त्यांचे । निर्घोनि वेदमार्गींही ख्यांचे । पडले गर्भाचिया. ॥९०६॥ ऐसा पोटीं भाव । म्हणूनि म्हणे देव । कीं गर्भवास [5]पुनर्भव । [6]काम्यक्रिया आचरतां. ॥ ९०७ ॥ जरी पावला स्वर्गास । तरी दारुण नरक त्यास । कीं न चुके गर्भवास । जो अधिक नरकाहूनिही. ॥ ९०८ ॥ त्या गर्भनरकाबाहेरी । तो प्राणी आल्याहि उपरी । नर जन्म पावेल केव्हां तरी । दारवंटा मोक्षाचा. ॥ ९०९ ॥ तेथेंही पूर्वसंस्कार । प्राप्त होतां तो नर । काम्यकर्मींच आदर । धरी नेटें. ॥ ९१० ॥ काम्यकर्मेंचि केवळ । करितां पावे तैसेंच फळ । पुन्हा गर्भवास अढळ । दारुण नरकापरीसही. ॥ ९११ ॥ [7]जन्मकर्मफलप्रदा । [8]काम्यक्रिया ऐशा सदा । त्या भोगैश्वर्यसंपदा । प्राप्तीकारणें आचरती. ॥ ९१२ ॥ भोग ऐश्वर्य हीं तों फळें । पुन्हा जन्म कर्म यांच्याचमुळें । त्यावेगळ्या घननीळें । [9]साधनक्रियाही निंदिल्या. ॥ ९१३ ॥ कीं भोगैश्वर्य पावावया । आचरती ज्या ज्या क्रिया । त्याही अगा! धनंजया! । जन्मकर्मफळ देती. ॥ ९१४ ॥ जन्मकर्मफलप्रदा । हे काम्यकर्माची वेगळी निंदा । कीं फळ हो न हो [10]जनवृंदा । परी जन्मकर्मफळ चुकेना. ॥ ९१५ ॥ द्यावें जन्मकर्मफळ । तें काम्यकर्मफळ अढळ । [11]अनादिशक्ति [12]प्रबळ । अंगीं काम्यकर्माच्या. ॥९१६॥

---

१. किनाऱ्याला. २. फलार्थ कर्म सांगणारें शास्त्र. ३. कर्मांची इच्छा. ४. रिघोनि. ५. पुनः होणें, पुनर्जन्म. ६. फलेच्छेनें केलेलें कर्म. ७. जन्म आणि कर्म हीं फलें देणाऱ्या. ८. फलेच्छेनें केलेल्या क्रिया. ९. भोग आणि ऐश्वर्य यांच्या साधनार्थ ज्या क्रिया, कर्में. १०. लोकसमूहास. ११. माया. १२. फार बळकट.

भोग ऐश्वर्य फळ । कर्म सांग होतां सकळ । सांग न होतां निष्फळ । परी अढळ जन्मकर्म. ॥ ९१७ ॥ मागें निष्काम धर्म । तुज बोलिलों तें वर्म । चुको वांको तरी ब्रह्म । पाविजे ईशप्रसादें. ॥ ९१८ ॥ काम्य सफळ हो निष्फळ । जन्ममरण हें तों अढळ । अज्ञान आधींच प्रबळ । त्यासही बळ या क्रियांचें. ॥ ९१९ ॥ त्याही सोपिया क्रिया । नव्हती अगा धनंजया! । कष्ट लागती तयां । अत्यंत. ॥ ९२० ॥ क्रियाच कठिण अत्यंत । त्यांचेही विशेष बहुत । 'क्रियाविशेषबहुला' म्हणे अनंत । या भावें. ॥ ९२१ ॥ देशकालादि सकळ । जों जों बरें तों तों फळ । कांहीं चुकतां सर्व विफळ । प्रायश्चित्तें त्याकारणें. ॥ ९२२ ॥ ऐसें करितां कर्म । सांग होतां साधे धर्म । कांहीं चुकतां अवघा श्रम । व्यर्थ होय. ॥ ९२३ ॥ यालागीं निष्काम वाट । बरी जेथें कांहीं कचाट । नसे आणि फळ अचाट । कीं चुकती नरकवास. ॥ ९२४ ॥ ईश्वरीं एकनिष्ठ बुद्धि । त्यास तेचि सद्यः समाधि । सकामास ते नसे सिद्धी । तें या श्लोकीं बोलतो. ॥ ९२५ ॥

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

भोगैश्वर्य नाशवंत । कामना त्यांचीच अत्यंत । आयुष्य वेंचिती अत्यंत । आसक्त ऐसे. ॥ ९२६ ॥ मोक्षफळातें लपविती । स्वर्गादिपुष्प फळ म्हणती । ऐसी वेदवाचा तुजप्रती । जे 'पुष्पिता' मागें बोलिलों. ॥ ९२७ ॥ या वेदवाचेनें त्यांची । बुद्धि हरिली कामुकांची । निश्चयात्मता कैंची । त्या बुद्धीस त्यांचिया? ॥ ९२८ ॥ एकनिष्ठ जे बुद्धी । तेचि म्हणावी समाधी । ते निश्चयरूप सिद्धी । यांच्या बुद्धीस न घडे. ॥ ९२९ ॥ म्हणूनि काम्याची खटपट । टाकूनि धरीं तूं मार्ग नीट । शुद्ध मोक्षाची वाट । दावी अर्जुनास या श्लोकीं. ॥ ९३० ॥

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन! ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥**

अर्जुना! हे वेद । ज्ञान द्यावया अभेद । प्रवर्तले त्रिगुणभेद । बंध हरावया जीवांचा. ॥ ९३१ ॥ तमोगुण विषय । रजोगुण तें इंद्रिय । मन सत्त्व

---

१. पूर्ण. २. पुष्कळ. ३. संकट. ४. भेदरहित.

तें रजतमय । वासना विषयभोगाची. ॥ ९३२ ॥ एवं विषय इंद्रिय मन । या त्रिगुणचक्रींच जे जन । त्यांस **'त्रैगुण्य'** म्हणून । अर्जुना! म्हणावें. ॥९३३॥ जे ऐसे त्रिगुणमय । वेद त्यांचे जाले विषय । कीं पुष्पीं फळाचा निश्चय । दाविती त्यांला. ॥ ९३४ ॥ तरी ते तूं सोडीं वाट, । टाकीं काम्याची खटपट, । आणि निस्त्रैगुण्य[1] निपट । होईं तूं. ॥ ९३५ ॥ म्हणसी टाकूनि तिन्ही गुण । कोणे परी असों आपण । तरी सांगतों तेही खूण । अर्जुना! ॥९३६॥ त्रिगुणांचें मूळ आहे । तें या तिहींवेगळें पाहें । या नित्यसत्त्वीं तूं राहें । अगा अर्जुना! ॥ ९३७ ॥ जैसा पडला दोर । तो दृष्टीस दिसे सर्प[2] थोर । दृष्टिभ्रमें सर्पाकार । रज्जूच दिसतो दृष्टीसी. ॥ ९३८ ॥ दृष्टींत आहे भ्रम । तोचि भासे भुजंगम । तथापि रज्जूचा संगम[3] । असे दृष्टीसी. ॥ ९३९ ॥ रज्जू कळला असता । तरी कां सर्प दिसता? । सर्प भासे तरी तत्त्वतां । दृष्टि स्पर्शली रज्जूतें. ॥ ९४० ॥ तोचि कळला दोर । मिथ्या जाला सर्पाकार । तेव्हां हा दोर निर्विकार । दिसे तेथें दृष्टीसी. ॥९४१॥ जाणे नेणे तरी सत्य । रज्जू साच दिसे जीस नित्य । तीस तों म्हणावें अगत्य । नित्यदृष्टि[4] म्हणोनी. ॥९४२॥ नित्यसत्त्वाचें लक्षण । ऐसें जाणती विचक्षण[5] । ज्यांस सर्वदा ईक्षण[6] । आत्मयाचें. ॥ ९४३ ॥ बुद्धीस म्हणावें सत्त्व । जें स्पर्शोनि आत्मतत्व । पावोनियां सचेतनत्व । विषय पाहे. ॥ ९४४ ॥ रज्जू नेणतां भ्रम । दृष्टींत करी भुजंगम । तैसा सत्त्वांत इंद्रियग्राम । विषय जड पाहे अज्ञानें. ॥ ९४५ ॥ स्पर्शोनि आत्मयातें । इंद्रियद्वारा विषयांतें । सत्त्व पाहे तयातें । **'नित्यसत्त्व'** म्हणिजे. ॥ ९४६ ॥ ज्ञानदर्शेतही तत्त्व । पाहों लागे तेंचि सत्त्व । तें नित्यसत्त्व आत्मत्व । नित्य दिसे जयाला. ॥ ९४७ ॥ जड पाहतां मिश्रसत्त्व । आत्मा पाहतां शुद्धत्व । तें दोन्ही रूपीं एकत्व । नित्यसत्त्वा तयातें. ॥ ९४८ ॥ या नित्यसत्त्वीं राहणें । जेथें नसती तिन्ही गुण । यालागीं म्हणे श्रीकृष्ण । कीं निस्त्रैगुण्य होईं तूं. ॥ ९४९ ॥ कांहीं तांबें कांहीं रुँजत[7] । सुवर्णीं असतां मिश्रित । हीन सोनें तें निश्चित । मिश्रसत्त्व ऐसें रजतमीं. ॥ ९५० ॥ तें सोनें पुटीं घालितां । रुपें तांबें वेगळें करितां । शुद्ध सोनें उरे तत्त्वतां । अनुभवीं ऐसें शुद्धसत्त्व. ॥ ९५१ ॥ ज्या सत्त्वास मिश्रत्व । त्यासच

---

१. विषय, इंद्रियें आणि मन यांविरहित, ह्मणजे सत्त्व, रज, तम या गुणांविरहित. २. साप. ३. संयोग. ४. शाश्वत, खरी. ५. पंडित. ६. पहाणें. ७. रुपें.

जेव्हां शुद्धत्व । तेव्हां गुणद्वयातीत[1] सत्त्व । निस्त्रैगुण्य नव्हे हे शंका. ॥ ९५२ ॥ कीं गेलें रज तम । सत्त्वचि उरलें उत्तम । दों गुणांचाचि अतिक्रम[2] । नित्यसत्त्वीं होतसे. ॥ ९५३ ॥ निस्त्रैगुण्य निश्चित । होऊं सांगे अच्युत । मागुती शुद्धसत्त्वांत । राहों सांगे. ॥ ९५४ ॥ टाकिलें जेव्हां रज तम । सत्त्व न गेलें त्यां दोंसम । गुणत्रयाचा अतिक्रम । जाला कैसा. ॥ ९५५ ॥ या तीन ओंवियांची शंका । हरील तो शब्द आइका । कीं हीनपण शुद्ध कनका । टाकूनि गेलें. ॥ ९५६ ॥ रुपें तांबें जळे । हीनपण त्यासांगातें टळे । शुद्ध सुवर्णी नाढळे । हीनपण तिसरा दोषही. ॥ ९५७ ॥ टाकिलें जेव्हां रज तम । तोचि मिश्रसत्त्वाचा अतिक्रम । अनुभवीं उरलें उत्तम । सत्त्व तेव्हां. ॥ ९५८ ॥ निस्त्रैगुण्य होउनी । गुणत्रयातें अतिक्रमूनी । नित्यसत्त्वीं राहें म्हणोनी । या भावें म्हणे श्रीकृष्ण. ॥ ९५९ ॥ त्रिगुणांचे वेद विषय । तूं निस्त्रैगुण्य[3] होय । आणि नित्यसत्त्वीं राहें निश्चय । ऐसा बोले श्रीकृष्ण. ॥ ९६० ॥ तेव्हां तामस विषय । आणि राजस जें इंद्रिय । आणि मन रजतमोमय । टाकावीं तिन्ही. ॥ ९६१ ॥ तेथें वाचा तेही राहे । आपण आपणातें पाहे । त्या अनुभवीं कोठें आहे । शब्दस्वरूप हा वेद. ॥ ९६२ ॥ तो तूं आत्मा स्वयें । सत्त्वें पहावा जों निश्चयें । त्या सत्त्वा विषय इंद्रियें । स्पर्शलीं नसती. ॥ ९६३ ॥ तरंग[4] उदकीं मुरे । तैसें सत्त्व स्वरूपीं स्फुरे । तेंही वेगळें नुरे । नित्यसत्त्व ऐसें. ॥ ९६४ ॥ मन आणि इंद्रियें । तेथें स्फुरे वेद स्वयें । अनुभवी ऐशा निश्चयें । वेद नसती. ॥ ९६५ ॥ वेदवाणीही न साहे । त्या अनुभवीं सत्त्व आहे । जो आत्मा आत्माकार होऊनि राहे । श्रुतिही बोले ऐसेंचि. ॥ ९६६ ॥

**'यतो[5] वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह ।**

**आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन ॥'** [तै० ब्रा० उ०९.]

वाचा चारी न पावती । मनासांगातें परतती । अनुभवी तेथें जाणती । ब्रह्मानंद. ॥ ९६७ ॥ अनुभव सत्त्वाविण । नव्हे हे सिद्ध खूण । परी कल्पना शब्दस्फुरण । नसे तेथें. ॥ ९६८ ॥ जेथें कल्पना तेथें शब्द । तेथेंच जाणावे अगा! वेद । तूं टाकूनियां सर्व भेद । राहे त्या नित्यसत्त्वींच. ॥ ९६९ ॥ या नित्यसत्त्वीं राहें । स्वस्वरूप सर्वदा पाहें । परंतु एथें विघ्न

---

१. दोन गुणांविरहित. २. नाश. ३. गुणत्रयातीत. ४. लाट. ५. जेथें मनासह वाणीचा प्रवेश होत नाहीं (तें ब्रह्म), ब्रह्मानंद जाणणारा कशालाही भीत नाहीं.

आहे । वश नको होऊं तयासी. ॥ ९७० ॥ होऊनि [1]रजतमातीत । नित्य सत्त्वीं तूं निश्चित । राहसी तें अनुभवामृत । जतन करीं **अर्जुना!** ॥ ९७१ ॥ शीतोष्ण मानापमान । सुखदुःख हें [2]द्वंद्व समान । पाहसी तरीच देहाभिमान । न [3]खवळे तुझा **अर्जुना!** ॥ ९७२ ॥ जोंवरी रज्जूची स्मृति । तोंवरी न दिसे सर्पाकृति । त्याची पडतां विस्मृति । भय सर्प करी तत्काळ. ॥ ९७३ ॥ प्रारब्धभोग देहा । जरी टाकिसी त्याच्या स्नेहा । परंतु भोग उपजवी हा । सुखी दुःखी मीपणा. ॥ ९७४ ॥ सुखीं वाटेच मी सुखी । दुःखीं वाटेच मी दुःखी । भोगसमयीं आणखी । न उपजे प्रत्यय. ॥ ९७५ ॥ त्या मीपणाची जाती । सुखीं म्हणे हो हे मागुती । दुःखीं म्हणे हे दुःखप्राप्ती । कधीं न हो. ॥ ९७६ ॥ या चिंतेंत पडला । अनुभव त्याचा बिघडला । जाऊनि मागुती जोडला । दे[4]हभाव. ॥ ९७७ ॥ प्रारब्धाचा भोग । तो करीच सुखदुःखयोग । जोंवरी होय वियोग । शरीराचा. ॥ ९७८ ॥ म्हणूनि यास उपाय । हाच कीं निर्द्वं[5]द्व होय । कीं भोगूनि भोग नव जाय । अनुभव नित्यसत्त्वाचा. ॥ ९७९ ॥ बाळास लागे क्षुधा । रडे होतां दुःखबाधा । पितां मातेची [6]स्तनसुधा । हांसों लागे. ॥ ९८० ॥ मज नलगे ऐसी क्षुधा । हें न म्हणे होतां क्षुधेची बाधा । सदा मिळो हे स्तनसुधा । स्तन पितां हेंही म्हणेना. ॥ ९८१ ॥ होऊनि गेला सुखभोग । न म्हणे पुन्हा तोचि हो योग । अथवा न हो रोग । जाला होता जो मला. ॥ ९८२ ॥ **अर्जुना!** ऐसे परी । सुखदुःखें भोगिसी जरी । धारसी नित्यसत्त्वीं तरी । निर्द्वंद्व हो यालागीं. ॥ ९८३ ॥ ऐसें बाळाचे परी । सुखदुःख भोगिसी जरी । अनुभव सर्वा अवसरीं । थारेल तुझा. ॥ ९८४ ॥ द्वंद्वीं जालासि धीर । तरी आहे शरीर । त्याच्या रक्षणार्थ भार । झणीं वाहसी चिंतेचा. ॥ ९८५ ॥ जे जे काळीं जें जें । देहनिर्वाहास पाहिजे । तें मेळवाया न कीजे । यत्न कांहीं **अर्जुना!** ॥ ९८६ ॥ नाहीं तें मेळवावें । अगा! यास **'योग'** म्हणावें । मिळावें तें जतन करावें । **'क्षेम'** म्हणावें त्यालागीं. ॥ ९८७ ॥ दोन्हीं मिळोनि **'योगक्षेम'** । येविषयीं न करीं श्रम । कीं त्या श्रमें उपजे भ्रम । संपादितां अर्थ. ॥ ९८८ ॥ यत्नही केला नाहीं । आणि उगेंचि मिळालें कांहीं । जतन करावया तेंही । न करीं यत्न.

---

१. रजतमावेगळा. २. जोडपें. ३. उचंबळत नाहीं. ४. देह हा आत्मा—असा भाव. ५. द्वंद्वरहित, रजतमावेगळा. ६. स्तन हेंच अमृत.

॥ ९८९ ॥ कीं येणार तें येईल । जाणार तें निश्चित जाईल । यत्न करितां वृथा होईल । ज्ञानहानि. ॥ ९९० ॥ कीं स्वप्नदेहाची चिंता । करणें लागे जागृता । तैसी योगक्षेमवार्ता । ज्ञानियासी. ॥ ९९१ ॥ द्वारावीण नारळ । अकस्मात् होय सजळ । गजभुक्तकपित्थफळ[1] । टेंरफल[2] होय द्वारावांचुनि. ॥ ९९२ ॥ होणार तें धनंजया! । होईल घरीं या निश्चया, । आणि सर्वथा टाकीं या । योगक्षेमचिंतेसी. ॥ ९९३ ॥ इत्यादि भाव पोटीं । धरूनि म्हणे किरीटी[3]! । चिंता न करीं देहासाठीं । होईं निर्योगक्षेम[4] तूं. ॥ ९९४ ॥ करूनि वरवें मनन । वश करूनि आपलें मन । नित्यसत्त्वीं आत्मचिंतन । करीं निस्त्रैगुण्य होउनी. ॥९९५॥ **'त्रैगुण्यविषय वेद'** । जाले म्हणूनि न करीं खेद, । नित्यसत्त्वीं अभेद । अनुभवी ब्रह्मात्मतेचा[5]. ॥ ९९६ ॥ तें वेदाचें वेदपण । कीं त्रिगुणांसहित आपण । मागें सरोनि निर्गुण । दाविती याच्या सत्त्वासी. ॥ ९९७ ॥ जैसी लेकीस माता । नेउनी एकांतीं कांता । तूं म्हणे भोगीं मी आतां । एथूनि मागें परतलें. ॥ ९९८ ॥ तैसें गुरुमुखें वेद । निरसूनि जडउपाधिभेद । अनुभवितां ब्रह्मीं अभेद । परतती मागें. ॥ ९९९ ॥ तरीच म्हणावे वेद । कीं वेद विती अकळ भेद । तूं हा नको करूं खेद । कीं त्रैगुण्यविषयक कां जाले. ॥ १००० ॥ आतां कळलें ब्रह्म केवळ । तथापि वेदोक्त फळ । तें तों न घडे हे तळमळ । टाकीं म्हणतो या श्लोकीं. ॥ १००१ ॥

**यावानर्थ[6] उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

**अर्जुना!** एक मोठें तळें । त्याभोंवतीं नाना जळें । तीं आश्रयेंच त्याच्या सकळें । नाना रूपें पाझरती. ॥१००२॥ वापी कूप विहिरे । सर्वत्र तेंचि पाणी पाझरे । ब्रह्मसुखाश्रयें अरे! । विषयसुखें हीं अवघींच. ॥ १००३ ॥ परी जळ तळ्याचें पुष्कळ । पूर्ण करी काम सकळ । तैसा ब्रह्मानंद केवळ । पूर्ण करी मनोरथ. ॥१००४॥ विहिरींत एका पाँदपाणी[7] । धुतां होतें गढूळ पाणी । गोड कूपाचें गोडवणी । न करवे स्नान त्यामाजी. ॥ १००५॥ वापींत[8] केलें स्नान ।

---

१. हत्तीनें गिळलेलें कवीठ. २. गररहित. ३. हे अर्जुना! ४. मिळवून (योगक्षेमासाठीं) जतन करून ठेवणें यावेगळा. ५. ब्रह्म आणि आत्मा यांचें ऐक्य. ६. सर्व बाजूंनीं ज्यामध्यें पाणी येतें अशा जलाशयांत जितका कार्यभाग घडतो तितका कार्यभाग सर्व वेदांमध्यें विद्वान् ब्राह्मणांचा घडतो. ७. हातपाय. ८. विहीर.

पद्मी न करवे वस्त्रक्षालेन[1] । न पाजवे वापीचें जीवन[2] । तृषिता[3] गाईस आपल्या. ॥१००६॥ इत्यादि कार्यें सकळ । तळ्यामध्यें होती सफळ । अक्षोभ्य ज्यांतील जळ । ऐसा ब्रह्मानंद हा. ॥ १००७ ॥ विहिरी वापी कूपजळ । तैसे स्वर्गादि विषय सकळ । जें जें जेथें सुखफळ । ब्रह्मानंदीं सर्व तें. ॥ १००८ ॥ अनंतानंत[4] वेद । अनंतानंत सुखभेद । ते सर्वही जेथें अभेद । अनुभवी ज्ञाता ब्राह्मण. ॥ १००९ ॥ ब्रह्मनिष्ठ जो कोणी जाला । तोचि 'ब्राह्मण'[5] बोलिला । ज्या ज्ञानियास अनुभवा आला । ब्रह्मानंद. ॥ १०१० ॥ नाना क्षुद्रें जळें । जे जे साधिती क्षुद्र[6] फळें । कार्यें घडती सकळें । जळीं खोल एकाची. ॥ १०११ ॥ नाना क्षुद्र कामना । सिद्ध होतां जें सुख जना । तें अनुभवितां एका निरंजना[7] । सकळ सुखें ब्रह्मनिष्ठातें. ॥ १०१२ ॥ कीं हीं सुखें सकळ । ब्रह्मसुखेंचि गा! केवळ । थोरा तळ्याभोंवतीं जळ । पाझर तयाच उदकाचे. ॥१०१३॥ टाकितां क्षुद्र उदकें । सर्व घडे महाजळें एकें । तैसीं ब्रह्मानंदीं सुखें अनेकें । श्रुति म्हणती. ॥ १०१४ ॥

**'सत्यं[8] ज्ञानमनन्तं ब्रह्म यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् ।**
**सोऽश्नुते सर्वान्कामान्सह ब्रह्मणा विपश्चितेति ॥'** [उ० ब्र० १]

सत्यज्ञानादि ब्रह्मलक्षण । श्रुति दावी अर्थ विस्तीर्ण । वर्णिजे तो याकारण । जो अर्थ उपयोगी प्रस्तुत. ॥ १०१५ ॥ कीं जो जाणे ऐसें ब्रह्म । जो बुद्धिगुहेंत आहे परम । तो भोगितो सर्वकाम[9] । ऐकसरां[10]. ॥ १०१६ ॥ भोगितो सर्व कामातें । तरी काय विषयभोग तयातें । ऐसी शंका जनातें । झणीं होय. ॥ १०१७ ॥ याकारणें श्रुतिही हे । **'सह'** म्हणोनि म्हणताहे । **सह**पदाचा अर्थ पाहे । शंका हरे तयाची. ॥ १०१८ ॥ **सह** म्हणजे सांगातें । एकेच काळीं सकळ कामातें । तो भोगितो तेव्हां विषयांतें । भोगणें ऐसें कैसें घडे. ॥ १०१९ ॥ खातो जेव्हां आम्रफळ[11] । भक्षितो तेव्हांच गूळ । करूनि भक्षितां उभय फळ । उभयविलक्षण स्वाद तो. ॥ १०२० ॥ जे गोडी गुळीं । ते नाहीं केळीं । दोनी कालवितां तिजी[12] वेगळी । ते गोडी

१. धुणें. २. उदक. ३. तान्हेल्या. ४. अंत ज्याला नाहीं. ५. ही 'ब्राह्मण' शब्दाची व्याख्या समजावी. ६. क्षुल्लक, अल्प. ७. ईश्वरास. ८. ब्रह्म (हें) सत्य, ज्ञान आणि अनंत (आहे). हृदयरूप, उत्तम आकाशरूप गुहेमध्यें ठेवलेलें (जें तें) जो जाणतो । चतुर ब्रह्मरूपासहवर्तमान तो सर्व भोग अनुभवितो. ९. सर्व सुखें. १०. एके समयींच. ११. आंबा. १२. तिसरी.

नसे दोहींस. ॥ १०२१ ॥ एकेच वेळे सकळ । भोग घडणें बाष्कळ । अनुभवितां ब्रह्म पुष्कळ । सकळ सुखें त्या तृप्तींत. ॥ १०२२ ॥ विषयसुखीं नाहीं तृप्ती । सुख म्हणतां दुःखप्राप्ती । ब्रह्मानंदीं समाप्ती । अवघिया कामाची. ॥ १०२३ ॥ एक पावला फळ । ती दुसरियाकारणें तळमळ । हे न आढळे हळहळ । ब्रह्मानंदीं. ॥ १०२४ ॥ ज्या फळसुखाची प्राप्ती । त्याची दिसे पुढें समाप्ती । हे न आढळे ज्यांस तृप्ती । [१]ब्रह्मानंदीं. ॥१०२५॥ याकारणें अर्जुना ! । टाकीं सकळ कामना । निस्त्रैगुण्य होऊनि मना । करीं एकाग्र या सुखीं. ॥१०२६॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । धरोत हृदयीं भावार्थें. ॥ १०२७ ॥ वदे त्रैगुण्यविषय । तूं [२]निस्त्रैगुण्य होय । या श्रवणें करील निश्चय । कर्मत्यागीं अर्जुन. ॥ १०२८ ॥ वेदोक्त सुखाच्या कोटी । आटल्या ब्रह्मसुखाच्या पोटीं । या गोष्टीनें [३]लाळ घोटीं । त्या सुखातें अर्जुना ! ॥ १०२९ ॥ मनीं म्हणे मी अधिकारी । ब्रह्मसुखाचा आहें तरी । मज म्हणतो हा श्रीहरी । कीं निस्त्रैगुण्य होईं तूं. ॥ १०३० ॥ तरी मी टाकीन कर्म । अनुभवीन जाणोनि ब्रह्म । एथें मला कळलें वर्म । कीं मज नसे कर्मीं अधिकार. ॥ १०३१ ॥ जाणोनि भाव श्रीहरी । म्हणों पाहतों कीं जरी । निष्कामकर्में करिसी तरी । निस्त्रैगुण्य होसील. ॥ १०३२ ॥ जाणेन जो म्हणे ब्रह्म । तोचि करावया निष्कामकर्म । अधिकारी ऐसें वर्म । बोले श्रीकृष्ण या श्लोकीं. ॥ १०३३ ॥

**[४]कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

पावेन म्हणसी निराकार । यालागीं कर्मींच तुज अधिकार । आणि कर्मफळसंस्कार । नसे अधिकार तुज एथें. ॥ १०३४ ॥ नाना कर्मीं नाना फळें । परी कितीएक फळें जीं अढळें । तीं काम्यें करितां सकळें । न सोडिती. ॥ १०३५ ॥ जन्मकर्मफलप्रदा । सर्वक्रिया सर्वदा । हें मागेंही एकदां । बोलिलों तूतें. ॥ १०३६ ॥ यालागीं कर्माचें फळ । जें जन्ममरण अढळ ।

१. ब्रह्मानंदांत सकल आनंदांचा समावेश होतो, म्हणून ब्रह्मनिष्ठ पुरुषास इतर आनंद तुच्छ वाटतात व त्या आनंदांची इच्छा होत नाहीं. २. त्रैगुण्यरहित, गुणत्रयरहित, संसाररहित, निष्काम. ३. इच्छा धरीं. ४. हे अर्जुना ! कर्माचाच तुला अधिकार आहे. फलाविषयींचा अधिकार तूं कधींही मिरवूं नको, कर्मफल हा हेतु तूं धरूं नको, आणि अकर्माची हौस बाळगूं नको.

त्याचा हेतु[१] तूं कुशळ । ह्मणीं होसी. ॥ १०३७ ॥ मनीं धरिसी कामना[२] । तेव्हां तुझा तूंचि अर्जुना ! । होसी हेतु जन्मनिधना[३] । आपणातें आपण. ॥१०३८॥ सांग कर्में उक्त फळ । सांग नव्हतां कर्म विफळ । परी जन्ममरण अढळ । फळ सकळ काम्यकर्मांचें. ॥ १०३९ ॥ या कर्मफळाचा हेतू । म्हणतो ह्मणीं होसील तूं । सर्वथा फळें नको चिंतूं । कर्मेंचि करीं. ॥ १०४० ॥ कर्मेंचि म्हणसी न करीं । ज्याचें अढळ फळ ऐसें परी । कर्मत्यागार्थ ऐसा अंतरीं । धरिसी ह्मणीं तूं संग. ॥ १०४१ ॥ समुद्र बुडवी खरा । तथापि जाती द्वीपांतरा[४] । धनें मेळवूनि येती घरा । दृढनौकाआश्रयें. ॥ १०४२॥ कर्में करितां जन्ममरण । तथापि निष्कामपण । भवसमुद्रीं तारूं जाण । पाववी ब्रह्मात्मतेसी. ॥ १०४३ ॥ राजसेवेविण । लभ्य नव्हे थोरपण । तेथें जे घातक गुण । ते तास्कर्यादि[५] टाकावे. ॥ १०४४ ॥ हे गोष्टी आइकतां । भिऊनि आपल्या घाता । राजसेवाच टाकितां । पदप्राप्ति[६] न घडे. ॥ १०४५ ॥ अर्जुना ! याकारणें । अगत्य निष्काम कर्म करणें । कर्म न करीं ऐसा न धरणें । हृदयीं संग. ॥ १०४६ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तें निमित्त आणि विवेकें[७] । परिसा निष्कामकर्माचा. ॥ १०४७ ॥ हो न हो काम्य फळ । परी जन्ममरणफळ अढळ । या गोष्टीनें तळमळ । सुटली आणीक अर्जुना. ॥ १०४८ ॥ कीं हो न हो काम्यफळ । जन्ममरण जेव्हां अढळ । तेव्हां कांहीं फळाचें मूळ । निष्कामींही असो ये. ॥ १०४९ ॥ कीं धरितां काम । कर्म होय सकाम । टाकितां काम निष्काम । तेंचि होय. ॥ १०५० ॥ तेव्हां सकामनिष्कामपण । दोनी कर्मकर्त्याचे गुण । तथापि आपला गुण आपण । कर्मही निश्चित दाखवी. ॥ १०५१ ॥ कर्मीं स्वतःसिद्ध शक्ती । नसतां फळाची आसक्ती । धरितांही फळ नव्हे युक्तीं । प्रत्यक्षसिद्ध हें दिसतसे. ॥ १०५२ ॥ आंगास उष्ण लागो जळ । म्हणतांही लागे सीतळ । कीं द्यावया उष्णत्वफळ । शक्ति जळीं असेना. ॥ १०५३ ॥ शक्ति धरी तें जळ । आंगास लागे सीतळ । नको म्हणतांही अढळ । तें फळ प्राप्तचि होणार. ॥ १०५४ ॥ न ये जे शक्ति नाहीं । नवजाय[८] आहे ते शक्ति कांहीं । ऐसेंचि वाटे कर्मही । अर्जुन म्हणे. ॥ १०५५ ॥ कीं कर्मीं जे नसेल शक्ती । ते न ये धरिली जरी आसक्ती । तेव्हां धरितांही विरक्ती । नको म्हणतांही फळ होय.

---

१. कारण. २. वासना. ३. जन्ममरणास. ४. अन्य बेटांला. ५. चोरटेपणादि. ६. पदवीची प्राप्ति. ७. विचार. ८. न जाते.

॥ १०५६ ॥ अरे विषा! होईं मला। आणि मारूं नको मला। ऐसें म्हणोनि भक्षी त्याला। तरी मारीच विष तें. ॥ १०५७ ॥ अमृत पितां नर। म्हणे मज करूं नको अमर। तरी तें अजर अमर। करीच कीं. ॥ १०५८ ॥ कर्ता निष्काम जाला। परी कर्म गोंवीच त्याला। या गुणें कर्मास आला। दोष मोठा. ॥ १०५९ ॥ याकारणें कर्मजाळ। सकाम निष्कामही फैटकाळ। हृदयसंदेह विशाळ। सर्वसाक्षी समजला. ॥ १०६० ॥ धन्य अर्जुन सभाग्य। कीं विचार केला यथायोग्य। हें नेणती अभाग्य। अभक्त निष्कामही करणारे. ॥ १०६१ ॥ कर्म न अर्पितां ईश्वरीं। तें अवश्य आपला गुण करी। जन्म-मरण हें तरी। अढळचि कीं. ॥ १०६२ ॥ आजन्म निष्कामकर्मी। आणि न अर्पी सगुणब्रह्मीं। त्यास पितृलोक शब्दब्रह्मीं। वेदीं बोले हे श्रुती. ॥ १०६३ ॥

श्रुतिः—'**कर्मणा पितृलोकः।**'

कर्में पितृलोक। हा श्रुतीचा बोल एक। त्यास कर्म अमुक। न म्हणे कांहीं. ॥ १०६४ ॥ कीं ज्या कर्मीं जो काम। तें त्याचें फळ हाचि नेम। पितृलोक फळ बोले निगम। अनर्पित निष्कामकर्माचें. ॥ १०६५ ॥ कर्म अर्पितां ईश्वरीं। फळरूपें बंध तें न करी। हें नेणोनि अंतरीं। अर्जुनें शंका मानिली. ॥ १०६६ ॥ हा भाव उत्तमश्लोक। समजोनि याचा विवेक। बोलावया हा श्लोक। स्वमुखें आतां बोलतो. ॥ १०६७ ॥

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय!।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

मनीं ईश्वराचे चरण। सर्वभावें त्यास शरण। जें ऐसें अंतःकरण। योग म्हणावें त्याला. ॥ १०६८ ॥ राहोनि योगीं तया। कर्में करीं गा! धनंजया!। कर्म करितां प्रकारें या। बंधक नव्हे तें कर्म. ॥ १०६९ ॥ भाव ऐसा एथें। कीं ईश्वरीं चित्त जेथें। तो योग कर्म तेथें। राहोनि करितां बंध नव्हे. ॥ १०७० ॥ ज्या चित्तें कर्म घडे। तें चित्त ज्या चरणीं जडे। सहजचि अर्पण घडे। त्या चरणीं त्या कर्माचें. ॥ १०७१ ॥ धान्य पात्राअं-

---

१. मृत्युरहित. २. जरेवेगळा. ३. व्यर्थ. ४. जन्मापासून. ५. निष्काम कर्म करणारा. ६. वेदांत. ७. कर्मानें पितृलोक प्राप्त होतो. ८. वेद. ९. हे धनंजया! फलाचा संग टाकून, योगस्थ राहून आणि सिद्धि व असिद्धि ह्यांस समान लेखून कर्में कर. समत्वास ज्ञाते पुरुष योग म्हणतात.

तरीं । तें ठेवितां वैश्वानरीं । धान्य भाजे त्यावरी । परितांही तें न उगवेचि. ॥ १०७२ ॥ कर्मशक्ति बंध करी । सर्वथा हे तों गोष्टी खरी । ईश्वरचरणीं अर्पिजे तरी । बंध करूं ते शकेना. ॥ १०७३ ॥ बचनाग विष मारी । तो देतां वैद्याचे करीं । त्याचा तो रस करी । ज्या रसें आरोग्य देहासी. ॥ १०७४ ॥ विष्णूस अर्पिलें कर्म । तें बंध सर्वथा न करी हें वर्म । बोलेल सगुणब्रह्म । अध्याय यापुढें तयांत. ॥ १०७५ ॥ त्याही स्थळीं हरी । म्हणेल कीं तेंही जरी । निष्काम अर्पिजे तरी । बंधक नव्हे. ॥ १०७६ ॥

**'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**

**तदर्थं कर्म कौंतेय! मुक्तसंगः समाचर ॥'** [अ० ३ श्लो० ९.]

**'यज्ञो वै विष्णुः'** ऐसी श्रुती । त्याकारणें कर्म करिती । यावेगळीं बंधकें होती । कर्में समस्त लोकांसी. ॥ १०७७ ॥ कर्म त्याहीकारणें । फळसंग टाकुनि करणें । इत्यादि याचें विवरण । होणार पुढें. ॥ १०७८ ॥ एथें त्या भावें हरी । म्हणे योगस्थ कर्में करीं । योगें तो कीं चित्त जरी । चरणीं लागे ईश्वराच्या. ॥ १०७९ ॥ ईश्वरीं अर्पितां चित्त । त्या चित्तीं कर्मवित्त । तें अर्पिलें होय निश्चित । हा भाव. ॥ १०८० ॥ लौकिक आणि वेदोक्त । कर्म अवघें ईश्वरार्पित । करावें हें पुढें अच्युत । नवमाध्यायीं वर्णील. ॥ १०८१ ॥ हा अध्याय दुसरा । सकळ गीतार्थ एकसरां । संक्षेपें एथें गुरुवरा । बोलणें असे गूढार्थे. ॥ १०८२ ॥ एवं या श्लोकीं प्रथम चरणीं । **'योगस्थः कुरु कर्माणि'** । दुसरिया चरणीं चक्रपाणी । येविषयीं आणीक बोलतो. ॥ १०८३ ॥ ईश्वराचे चरणीं चित्त । अर्पितां कर्मही अर्पित । तरी होय जरी निश्चित । संग नसे फळाचा. ॥ १०८४ ॥ देउनी संचितार्थ । विकत मागे पदार्थ । तरी तो मानी किमर्थ । आपणास दिधलें म्हणोनी. ॥ १०८५ ॥ फलसंग कर्मीं निश्चित । आणि करी ईश्वरार्पित । होय तें तों निमित्त । जन्ममरणासी. ॥ १०८६ ॥ याकारणें धनंजया! । फळाचा संग टाकुनियां । योगस्थ करीं गा! तूं या । कर्मयोगातें. ॥ १०८७ ॥ आतां फलेच्छारहित । कर्मीं प्रवर्तेच ना चित्त । हे गोष्टी तों निश्चित । परी उपायें ऐशा प्रवर्ते. ॥ १०८८ ॥ कीं योगस्थ कर्म करणें । म्हणजे ईश्वरीं तें अर्पिणें । चित्तशुद्धीनें

---

१. अग्नींत. २. कृष्ण. ३. तिसऱ्या अध्यायांत. ४. येथें 'योग' म्हणजे काय याचें विवेचन केलें आहे. ५. सगळ्या गीतेचा अर्थ. ६. एकसारिखा. ७. कृष्ण.

पावणें । ब्रह्मानंदासी. ॥१०८९॥ बुद्धीस हा लाभ कळे । तरी उघडती विवेकाचे डोळे । मग अनायासें वळे । निष्कामकर्मीं. ॥ १०९० ॥ तेव्हां वेदोक्त स्वर्गादि सिद्धी । ईश्वरीं अर्पितां त्याच्या असिद्धी । दोनी समान मानी बुद्धी । निष्कामकर्मी जे प्रवर्ते. ॥ १०९१ ॥ या भावें म्हणे हरी । सिद्ध्यसिद्धींत तूं याउपरी । सम होऊनियां करीं । निष्काम कर्में. ॥ १०९२ ॥ सम जालियाचें फळ । कीं ईश्वरीं चित्त अचळ । राहे तेव्हां पावे अढळ । ब्रह्मानंद पूर्वोक्त. ॥ १०९३ ॥ याकारणें '**समत्व**' । तोचि '**योग**' हें तत्त्व । नुरे कर्मास कर्मत्व । जया योगीं. ॥ १०९४ ॥ चित्त अर्पूनि ईश्वरीं । तया योगीं कर्म करी । तें बंधक नव्हे परी । तो योग वाणे जरी हें समत्व. ॥ १०९५ ॥ अपेक्षितां कर्मसिद्धी । न थारे ईश्वरीं बुद्धी । निष्कामीं देखे असिद्धी । तरी काम्यकर्म करूं लागे. ॥१०९६॥ यालागीं उभय सम । त्यास साधे योग उत्तम । याकारणें '**योग**' नाम । प्राप्त जालें [1]समत्वासी. ॥ १०९७ ॥ मुख्य तों तोचि योग । कीं ईश्वरीं चित्तसंयोग । या समत्वें नव्हे वियोग । चित्तास ईशचरणाचा. ॥ १०९८ ॥ यालागीं हें '**समत्व**' । योग म्हणावें हें तत्त्व । मुख्य योगाचें योगत्व । कीं चित्त लागे ईश्वरीं. ॥ १०९९ ॥ चित्तास योग ईश्वरीं । त्या योगीं जो कर्म करी । त्यास तें बंध यापरी । कर्म निष्कामही करीना. ॥ ११०० ॥ अन्यथा जैसें सकाम । तैसेंचि बंधक कर्म निष्काम । हें पुढें [2]मेघश्याम । [3]विशदही बोलेल. ॥ ११०१ ॥ आतां यापुढें उत्तमश्लोक । यालागीं बोले हे दोनी श्लोक । कीं अर्जुनासि कर्मचि एक । मुख्यत्वें वाटलें. ॥ ११०२ ॥ कर्मप्रशंसा फार । आइकिली वारंवार । ब्रह्म जाणावें हा [4]निर्धार । विसरला. ॥ ११०३ ॥ म्हणुनी ज्ञानाचा [5]बडिवार । कर्म नीच त्याहूनि फार । काम्यकर्म तों [6]निपट [7]निःसार । ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ११०४ ॥

**[8]दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ! ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

[9]बुद्धिचैतन्ययोग । यासि म्हणावें '**बुद्धियोग**' । बोलिलों हा तों [10]कर्म-

---

१. समानपणास. २. घनश्याम. (कृष्ण.) ३. स्पष्ट. ४. निश्चय. ५. थोरपणा. ६. केवळ ७. व्यर्थ. ८. तथापि हे धनंजया ! बुद्धियोगाहून कर्माचरण हें निकृष्ट आहे, यास्तव बुद्धीच्या ठायीं कर्माला आश्रय लावून दे. ज्ञानावांचून केवळ फलाच्या हेतूनें कर्म करणारे (पुरुष) कृपण होत. ९. बुद्धीचा आणि चैतन्याचा संयोग. १०. कर्माचरण.

योग । नीच त्याहूनि बहु फार. ॥ ११०५ ॥ अगा ! याचिकारणें । तें चैतन्य तुवां विचारणें । तुज रक्षणार तें आत्मपणें । धनंजया ! ॥ ११०६ ॥ तें बुद्धीच माजी आहे । परी अगा ! धुंडूनि पाहें । म्हणसी लोक कां हे । न विचारिती तयासी ? ॥ ११०७ ॥ तरी हे जाले दीन । काम्यकर्मफळभोगाधीन । नेत्र असोनि नेत्रहीन । जाले फळभोगहेतूनें. ॥ ११०८ ॥ परी तूं तसा नको होऊं । कर्मींच वायां नको जाऊं । ज्ञानमार्ग नको गमावूं । भाव हा. ॥ ११०९ ॥ थोर अगा ! बुद्धियोग । बहुत नीच कर्मयोग । काम्यकर्मफळभोग । हा तों तुच्छ अत्यंत. ॥ १११० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । याचें निमित्त पुण्यश्लोक । आइकोत. ॥ ११११ ॥ आतां म्हणसी निष्काम धर्म । ईश्वरीं अर्पितां कर्म । कर्मबंध तुटेल कां ब्रह्म । वळखों सांगतां. ॥ १११२ ॥ तरी ईश्वरास अर्पणें कर्म । तें न साहे काम्यधर्म । ऐसा जेथें असेल नेम । कैंची वार्ता पापकर्म अर्पायाची ? ॥१११३॥ वेदोक्तकर्म लौकिककर्म । भगवदर्पणीं **'भागवतधर्म'**। परी जरी नसे कामना हें वर्म । भगवदर्पणाचें. ॥ १११४ ॥ सकाम अर्पणें न सोसे । त्यास पापकर्म अर्पिती कैसें । सर्वकर्मार्पणीं ऐसे । हे गूढ भाव. ॥ १११५ ॥ पापफळ लोखंडबेडी । पुण्य सुवर्णशृंखलाजोडी[1] । ते हे शृंखला मात्र न धडी । पुण्य अर्पितां हरिपदीं. ॥ १११६ ॥ आणि त्या भगवदर्पणाहोनि पहिलें । जें पापकर्म असेल जालें । आणि जन्मांतरीं[2] असे सांचलें । तें न नासे विना ज्ञानें. ॥ १११७ ॥ तैसेंचि नानाजन्मकृत । जें पुण्यही संचित । तेंही ज्ञानें नासे निश्चित । ब्रह्म वळखावें यालागीं. ॥ १११८ ॥ तें नित्य निष्काम अर्पितां हरी । संतुष्ट होऊनि लौकरी । ज्ञान देऊनि संहरी । पुण्य पाप सकळही. ॥ १११९ ॥ एवं जन्मजन्मांतरकृतें । पुण्यें पापें समस्तें । ज्ञानेंचि नासती या निमित्तें । ज्ञान थोर म्हणतो या श्लोकीं. ॥ ११२० ॥

**बुद्धियुक्तो[3] जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**

बुद्धीकरूनि युक्त । तो द्विविधही कर्मसंचित । पापपुण्यें दोनी निश्चित । नाशितो जितांचि इहलोकीं. ॥ ११२१ ॥ **'बुद्धियुक्त'**[4] म्हणजे । स्वयें ज्या बुद्धीस प्रकाशिजे । जीकरितां आपणास अनुभविजे । तीकरूनि युक्त तो

---

१. सांखळ. २. मागल्या जन्मीं. ३. हे अर्जुना ! जो बुद्धियुक्त आहे तो येथें पाप आणि पुण्य या उभयतांपासून मुक्त होतो. ४. जो ज्ञानानें युक्त तो.

ऐसा. ॥ ११२२ ॥ दह्यांत लोणी असे । परी मथन करितांचि दिसे । बुद्धीस अनुभवीं गवसे । जड चैतन्य निवडितां. ॥ ११२३ ॥ काष्ठादियोगाविना । नुसता अग्नि जैसा दिसेना । सत्त्वाविणें अनुभवा येना । आत्मा आपला आपणा. ॥ ११२४ ॥ काष्टांत अग्नि असे । मथन करितां प्रगट दिसे । बुद्धीस अनुभवीं गवसे । जड चैतन्य निवडितां. ॥ ११२५ ॥ मथन केल्याविना । तो त्या काष्टास जाळीना । न जाळितां काष्ठ तो दिसेना । जाळितां दिसे काष्टयुक्त. ॥ ११२६ ॥ बुद्धींत आत्मा असे । तो ते बुद्धीतेंचि न दिसे । दिसे तेव्हां जळतसे । कर्मासहित ते बुद्धी. ॥ ११२७ ॥ बुद्धींत कर्माची रोहणी । तरीच बुद्धि कर्मानुसारिणी । स्वप्नसृष्टीची खाणी । जे रीती. ॥ ११२८ ॥ जागृतींत नाना प्रकार । बुद्धींत जडती संस्कार । स्वप्नीं कल्पी ते ते प्रकार । यथायोग्य अथवा विपरीत. ॥ ११२९ ॥ चित्त बुद्धि मन अहंकार । एका सत्त्वाचे प्रकार । या चौंचेच स्वप्नविकार । भेद नसे या चौंसी. ॥ ११३० ॥ प्रस्तुतीं बुद्धियुक्त । ज्ञानियास म्हणे भगवंत । ज्यालागीं कर्माचें संचित । स्वप्नदृष्टांतें बुद्धिमाजी. ॥ ११३१ ॥ स्वप्नसृष्टि करणार । तो बुद्धीमधील संस्कार । जागृतींत न दिलें तैसा विस्तार । तीमधील न दिसे कर्माचा. ॥ ११३२ ॥ स्वप्नप्रपंच जाला । तो तीचमाजी होता ठेविला । तैसा कर्मभोग आपला । न दिसोनि निघे बुद्धींतुनी. ॥ ११३३ ॥ बुद्धिसाक्षी ईश्वर । तेथेंच कर्माचा प्रसर । जीवास पडला विसर । परमात्मालेश विसरेना. ॥ ११३४ ॥ पूर्वीं अनेक जन्म । सांचलें तें संचितकर्म । कांहीं धर्म, कांहीं अधर्म । जें सुकृत दुष्कृत म्हणवी. ॥ ११३५ ॥ प्रस्तुत मनुष्यजन्म । या जन्मीं जें होतें कर्म । तें क्रियमाण धर्माधर्म । देहीं देह पडिजे तों असे. ॥ ११३६ ॥ टाकूनि एक घर । दुजे गृहांत जातां नर । खांदीं घेऊनि परिकर । त्या घरींचा ने जसा. ॥ ११३७ ॥ तैसें देह सोडिजे तोंवरी । क्रियमाण असे देहाचवरी । प्रायश्चित्त तरी हरी । देह धुतां पापमळ देहाचा. ॥ ११३८ ॥ ऐसें क्रियमाण नूतन । आणि संचित पुरातन । होतां देहावसान । क्रियमाण निघे संचितीं. ॥ ११३९ ॥ संचितांतूनि जगजीवन । प्रारब्ध करी नूतन । तें एक देह ज-

---

१. सांपडे. २. सत्त्वगुणावांचून. ३. घर्षण. ४. वास्तव्य. ५. अयथार्थ. ६. पापपुण्यांचा सांठा, सांचलेले कर्माचें फल. ७. प्रस्तुत जन्मीं केलेलें कर्म. ८. जिंदगी. ९. नाशी. १०. नवीन. ११. जुनें. १२. देहाचें अवसान (मरण), मृत्यु. १३. रिघे.

न्ममरण । तोंवरी भोग तो सुखदुःखाचा. ॥ ११४० ॥ स्वप्न जीवशक्तिकृत । प्रपंच ईश्वरशक्तिरचित । प्रपंचफळ भोगणें निश्चित । प्रारब्धकर्में. ॥११४१॥ तेव्हां ईश्वरशक्तिकृत । प्रारब्धफळ निश्चित । न टळे भोगिल्याविरहित । शक्ति समर्थाची म्हणोनी. ॥ ११४२ ॥ ज्ञान झालें जरी । प्रतिबिंब बिंबैक्य[1] पावे जरी । भोग प्राप्त त्या अवसरीं[2] । प्रतिबिंबोनि बुद्धींत तो भोगी. ॥ ११४३ ॥ अविद्या जरी गेली । आणि विद्या जरी आली । बुद्धि असे तेचि पहिली । जीमाजि भोक्ता प्रतिबिंब. ॥ ११४४ ॥ तंतु कळतां पट । नाहींच जरी निपट । माती कळतां नाहीं घट । तरी पट घट दीसती. ॥ ११४५ ॥ सर्वगत[3] बुद्धीस कळला । तरी प्रपंच नाहीं गेला । जों संहारकाळ नाहीं आला । असे जों असे स्थितिकाळ. ॥ ११४६ ॥ लटक्या काळें लटकें जग । लटक्या लोहसाधनीं लटका नग । तथापि नग[4] न पावे भंग । मिथ्या लोहशस्त्रावांचुनी. ॥ ११४७ ॥ सोनें साच नग असत्य । तैसीं शस्त्रें मिथ्या लोह सत्य । असत्यें असत्य घडला अनित्य । असत्यें असत्य मोडावें. ॥ ११४८ ॥ मिथ्या सर्प रज्जूवरी । मिथ्या भ्रमें दृष्टि करी । भ्रम जातां दृष्टि हरी । मिथ्या भुजंगा. ॥ ११४९ ॥ घट पट अलंकार । दृष्टी देखेच आकार । अधिष्ठान देखोनि संहार । न करूं शके परकृतांतें. ॥ ११५० ॥ एवं प्रपंच कालकृत । ज्ञानियांसही दिसे निश्चित । दृष्टांतेंही उचित । बोलती श्रुतीही ऐसेंची. ॥११५१॥

श्रुतिः—**'प्रपंचो यदि विद्येत निवर्तेत न संशयः ।**
**मायामात्रमिदं द्वैतमद्वैतं परमार्थतः ॥'**

ज्ञान जाल्यावरी । प्रपंच दिसे जरी । काय संशय तरी । कीं तो न निवर्तेच. ॥ ११५२ ॥ अज्ञान दृष्टीस प्रवर्ते । सत्यत्वें प्रपंच वर्ते । ज्ञानीं पाहतां निवर्ते । माती पाहतां घट जैसा. ॥ ११५३ ॥ कीं मायामात्र हें द्वैत । सत्य परमार्थें[5] अद्वैत । घटादि द्वैत मिथ्या निश्चित । परमार्थ सत्य मृत्तिका. ॥ ११५४ ॥ याकारणेंचि श्रुती । घटादि दृष्टांत बोलती । कीं नसोनि मिथ्या दिसती । याहीविषयीं हे श्रुती. ॥ ११५५ ॥ **यथा सोम्यैकेन॰** कळतां एक मृत्पिंडगोळ । कळे सकळ मृन्मय भूगोळ । माती खरी इतर कल्लोळ[6] । लटके जैसे समुद्राचे. ॥ ११५६ ॥ या श्रुतीपुढें श्रुती । धातूचेचि दृष्टांत बो-

---

१. बिंबांत मिळालें. २. वेळीं. ३. सर्वव्यापी. ४. अलंकार. ५. खरोखर, तत्त्वतः. ६. तरंग, लाटा.

ळती । कीं अधिष्ठान कळतांही दिसती । विवर्त नाना. ॥ ११५७ ॥ प्रपंच जीवन्मुक्ता । दिसे प्रस्तुतीं ज्या बुद्धियुक्ता । भगवद्वाणी वर्णी कीं सुकृत-दुष्कृता । नाशितो म्हणोनी. ॥ ११५८ ॥ तें सुकृतदुष्कृत । क्रियमाण आणि संचित । प्रारब्ध तिसरें जें निश्चित । भोगणें लागे. ॥ ११५९ ॥ परी ज्ञानी सर्वगत । भोग एके देहीं अनुगत । आणि सर्वगतास निश्चित । भोग न घडे. ॥ ११६० ॥ जडास न घडे भोग । घडे चैतन्यास जरी देहयोग । तेव्हां प्रतिबिंबदेहसंयोग । होतां भोग बोलावा. ॥ ११६१ ॥ तरी अविद्या जातां भोग । आणि बुद्धि प्रतिबिंबयोग । न घडे कीं अविद्यावियोग । होतां प्रतिबिंब कांहींच असेना. ॥ ११६२ ॥ ऐसें संदेहाचें स्थळ । यालागीं हें बोलणें सकळ । कीं कळोनीही ब्रह्म केवळ । घटपटन्यायें जग दिसे. ॥ ११६३ ॥ भोगसाधनें असती । प्रतिबिंबकारणीं ही असे मती । जळीं डळमळी रविबिंबाकृती । तैसा भोगीं प्रतिबिंबांश. ॥ ११६४ ॥ आतां प्रपंच गवसो । प्रतिबिंबांश भोग सोसो, । परी भोग साचा नये दिसों । विद्यायुक्त बुद्धीसी. ॥ ११६५ ॥ भोग तों साचा दिसे । कीं सुखदुःख होतसे, । ज्ञानी जाले तरी कैसे । म्हणतील मिथ्या? ॥ ११६६ ॥ संशयाचा ठाव साचा । परंतु ऐसा विचार याचा । कीं भोग अज्ञानदशेचा । कर्मसंचय देतसे. ॥ ११६७ ॥ ज्या मापें घ्यावें । त्याच मापें उसणें द्यावें । केल्या प्रकारें भोगावें । पूर्वकर्म. ॥ ११६८ ॥ भोगवी समर्थ ईश्वर । भोगी प्रतिबिंब होउनी नर । तेथें बुद्धि ऐसी चतुर । ज्ञानी करी. ॥ ११६९ ॥ कीं कर्म करितां मी कर्ता । त्याचें फळ वाटे मी भोक्ता । कर्म साचें मानिलें तत्त्वतां । भोग साचा तरी गमे. ॥ ११७० ॥ हें ईशशक्तीचें बळ । कीं ज्ञानियांसही भोगवी फळ । वस्तुतः पाहतां सकळ । मिथ्या असे. ॥ ११७१ ॥ आतां प्रतिबिंब चिदंश । करूनि बिंबीं प्रवेश । कैसा निघेल हा संदेहलेश । तोही निरसितो. ॥११७२॥ अति निर्मळ सत्त्व जळ । तमकर्दमीं होय गढूळ । त्यास म्हणावें सुषुप्तिकाळ । बिंबैक्य तेव्हां प्रतिबिंबा. ॥ ११७३ ॥ गढूळ होतां वारी । प्रतिबिंब न दिसे ते अवसरीं । तेव्हां बिंबैक्य बोलावें कीं तरी । दिसे पुन्हा निर्मळत्वीं सत्त्वाच्या. ॥ ११७४ ॥ ऐसेंचि बोलती श्रुती । आणि प्रलयींही ऐक्य पावती । उपाधि होतां प्रतिबिंबती । मागुती जळीं उपाधीच्या. ॥११७५॥ तैसाचि तमाचा चि-

१. भोंवरे. २. दूर करतो. ३. तमोगुण हाच चिखल त्यांत. ४. पाणी. ५. समयीं. ६. सत्त्वगुणाच्या.

खल। तळीं बसतां सत्त्वसलिल[1]। नितळ होतां चिद्भानुमंडळ[2]। जागृतीं मागुतीं प्रतिबिंबे. ॥ ११७६ ॥ गेली जरी अविद्या। आली जरी विद्या। तथापि सत्त्वशक्ति अनाद्या। आहेचि जीवन्मुक्ताची. ॥ ११७७ ॥ प्रतिबिंब जाणे जरी बुद्धी। तथापि काय अज्ञानाची सिद्धी। प्रतिबिंबांशाची समृद्धी। नेणे काय परमेश्वर? ॥ ११७८ ॥ प्रतिबिंबासहित सृष्टी। देखेच सर्वसाक्षीची दृष्टी। ते काय अज्ञानें कष्टी। होते म्हणावी. ॥ ११७९ ॥ तैसी हेही बुद्धी। तीस तों नाहींच भोगसिद्धी। प्रतिबिंब देखतां असिद्धी। काय तिच्या ज्ञानाची. ॥ ११८० ॥ एवंच दोष कांहीं। प्रारब्धभोगीं दिसत नाहीं। आतां बोलों गोष्टी तेही। जे प्रस्तुत वर्णितां राहिली. ॥ ११८१ ॥ कृष्ण म्हणे बुद्धियुक्त। नासी सुकृतदुष्कृत। त्यांत प्रारब्ध भोगावें निश्चित। तें ऐसें जैसें वर्णिलें. ॥ ११८२ ॥ नासी सुकृता दुष्कृता। तो इहलोकीं देह जितां। सुचवी देह जिता म्हणतां। क्षय प्रारब्धकर्माचा. ॥ ११८३ ॥ कीं जों प्रारब्ध सरे। तोंचि ज्ञानियाचा देह उरे। सरती भोग वाईट बरे। तें इह शब्दें सूचवी. ॥ ११८४ ॥ प्रारब्ध नासी भोगें। संचित क्रियमाण बुद्धियोगें। तिच्या वियोगें पुन्हा संयोगें। नासे संचित क्रियमाण. ॥ ११८५ ॥ काष्ठ आणि अग्नी। वेगळे करावे मथुनी। हा वियोग जाळूं लागे तेथुनी। संयोगें काष्ठास काष्ठयुक्त. ॥ ११८६ ॥ आत्मा बुद्धीमधूनी। निवडावा जेव्हां मथुनी। तों वियोग जाळूं लागे तेथुनी। योग बुद्धीस तो पुरुषबुद्धिसंयुक्त. ॥ ११८७ ॥ बुद्धींत कर्म राहे। स्वप्नहेतु संस्कार जैसा आहे। बुद्धियुक्त आपणा आपण पाहे। तों तों नासे पूर्वकर्म. ॥ ११८८ ॥ एवं बुद्धियुक्त दोनी। सुकृतदुष्कृत नासी म्हणोनी। ज्ञान थोर कर्माहुनी। धनंजया. ॥ ११८९ ॥ जरी अर्पिलें ईश्वरीं। तें हेमबेडी[3] न घडी परी। पापें आणि पूर्वसुकृतें नासती तरी। जरी दे ज्ञान तो ईश. ॥ ११९० ॥ तथापि कर्मचि करावें। तें निष्काम ईश्वरास अर्पावें। तो ज्ञान दे यालागीं भावें। कर्म करीं म्हणे उत्तरार्धीं. ॥ ११९१ ॥

**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥**

**'तस्मात्'** त्याकारणें अगा!। म्हणजे ज्ञानाकारणें कर्मयोगा। करीं तेणें जडवियोगा। बुद्धियोगा[4] पावसी. ॥ ११९२ ॥ कर्मयोग तो ऐसे रीती। त्याची सांगतों गुह्यस्थिती। कीं कुशलता करी सुमती। कर्मैं करितां त्यामाजी. ॥ ११९३ ॥ निश्चित बंध कळे जेथें। तों बंधीं पडेना तेथें। तो कुशल

१. उदक. २. ज्ञानसूर्याचें मंडळ. ३. सोन्याची शृंखला. ४. बुद्धीचा आत्म्याशीं संयोग.

प्रस्तुतीं एथें । कुशलता ऐसीच. ॥ ११९४ ॥ कर्म केल्याविण । राहे ऐसा आहे कवण । त्या बंधीं न सांपडे आपण । ते कुशलाची कुशळता.॥११९५॥ एक काम्य एक नित्य । नित्यकर्म करावें अगत्य । कीं राजाज्ञा सत्य । नरक न करितां नित्य कर्म. ॥ ११९६ ॥ काम्यकर्में राजमळा । जो विकत घेतो ज्या फळा । तें देती न घेतां गळां । कोणी न बांधे. ॥ ११९७ ॥ परी तें खातां फळ । वासना रोग होतो प्रबळ । क्रियाधनें तळमळ । कां दाटुनी साधावी. ॥ ११९८ ॥ ईश्वर राजा सार्वभौम । त्याचे हे इंद्रियग्राम । क्षेत्रें शरीरें शेतें सकाम । क्षेत्रज्ञ कृषि करणारे. ॥११९९॥ देह क्षेत्रीं शेतकरी । तो राजद्रव्य नेदी जरी । यमधर्म नेऊनि मारी । दंडधर सार्वभौमाचा. ॥ १२०० ॥ आणि जो तीं नित्यकर्में । करी वर्णाश्रमोचित धर्में । त्यास पितृलोक यमधर्में । देइजेतो सुखार्थ. ॥ १२०१ ॥ त्यास आज्ञा पारमेश्वरी । कीं दोनी सफळ या दोंपरी । त्यास वेद ऋषि अधिकारी । दोनी सूचना करावया. ॥१२०२॥ हे राजयाची आज्ञा । ठाउकी वेदां ऋषिसर्वज्ञां । म्हणुनी नित्यकर्में सर्वां क्षेत्रज्ञां । अवश्य करा ते म्हणती. ॥ १२०३ ॥ नित्यकर्में चुके दुःख । न होय नरक होय पितृलोकसुख । परी येणें न चुके आणिक । यावें गर्भवासनरकातें. ॥१२०४॥ एवं काम्यकर्म हे कनकबेडी । नित्यकर्मही तैसी घडी । तेव्हां काय विशेष जोडी । नित्यकर्में करूनिही. ॥ १२०५ ॥ एवं नव्हे बंधन । ईश्वरीं अर्पितां कर्मधन । परी काम्य मानी जगज्जीवन । मोल स्वर्गादि फळभोगाचें.॥१२०६॥ न करितांही कामना । पितृलोक नित्यकर्में जना । तें तों प्रजासन्माना । कारण वस्त्र तांबूल. ॥ १२०७ ॥ तें नित्यकर्म धन । यमधर्मादि अधिकारी जन । पावले देखोनि तांबूल वसन । पितृलोक देतीं प्रजांसी. ॥ १२०८ ॥ जो पावे राजापासीं । मोक्ष प्राप्त होय त्यासी । परी नित्यकर्म राजधनासी । न देतां दंडी यमधर्म. ॥ १२०९ ॥ दंड होत असतां । नये राजापासीं जातां । तें सहज रीती फेडितां । ओढोनि नेती पितृलोका. ॥ १२१० ॥ याकारणें राजधन । नित्यकर्में जो जन । राजचरणींच अर्पूनि मन । राजसन्मानींही न ठेवी. ॥ १२११ ॥ तुझ्या सेवेविना । न घें कांहीं जगज्जीवना । ऐसें म्हणतां करुणाघना । कर्मार्पणीं कृपा उपजेच. १२१२ ॥ होतां ईश्वराची दया । पाहों न शकती कोणी तया । नरक पितृलोक भोगावया । न वजाय हे गोष्टी ते

१. कर्म हेंच द्रव्य त्यानें. २. जाति आणि आश्रमाला योग्य अशा धर्मानें. ३. परमेश्वराची. ४. सोन्याची बिडी.

किती? ॥ १२१३ ॥ गुरुरूपें परमेश्वर । भेटतां पुन्हा गर्भकुहर[1] । स्वप्नीं न दिसे चराचर । तरंग त्याचे तो सिंधू. ॥ १२१४ ॥ जों प्रस्तुतीं बुद्धियुक्त । पूर्वार्धीं वर्णिला जीवन्मुक्त । तदर्थ म्हणतो नित्यमुक्त । कर्म करीं या कुशलतेनें. ॥ १२१५ ॥ अज्ञानाची विषेलता[2] । ज्ञानें छेदावया हे कुशलता । कर्मीं करावी ऐसें बोलता । जाला श्रीकृष्ण या भावें. ॥ १२१६ ॥ सकळही बुद्धियुक्त । ऐसेच होती मुक्त । म्हणुनी बोलतो नित्यमुक्त । या श्लोकीं या भावें श्रीकृष्ण. ॥ १२१७ ॥

**कर्मजं[3] बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥**

नित्यकर्मे करितांही । फळ होतें जें कांहीं । तें ईश्वरार्पणें होत नाहीं । कृपा होते तयाची. ॥ १२१८ ॥ तें ईश्वरार्पणें कर्मफळ । टाकूनि बुद्धिमंत विमेळ[4] । बुद्धियुक्त होती केवळ । ते परमपदातें पावती. ॥ १२१९ ॥ पुनरावृत्ति[6] चिंतामय । रोग त्यास म्हणजे आमय[7] । तो नसे ऐसें अनामय[8] । ते पदा पावती बुद्धियुक्त. ॥ १२२० ॥ न अर्पितां नित्यकर्म । बंध करी हें गूढ वर्म । तृतीयाध्यायीं सगुणब्रह्म । विशद[9] बोलेल. ॥ १२२१ ॥ त्यावरूनि एथें अर्थ । वाखाणिला तो समर्थ । कीं निष्कामही होय व्यर्थ । काम्यासमान ईश्वरीं न अर्पितां. ॥ १२२२ ॥ कर्मज म्हणजे कर्मफळ । टाकूनि पावती पद केवळ । हें या श्लोकीं बोले घननीळ[10] । हेंच सिद्ध करावया. ॥ १२२३ ॥ काम्य कर्मे करूनी । त्याचें फळ टाकुनी । पद ते पावती म्हणोनी । म्हणतां नये. ॥ १२२४ ॥ काम्यकर्मेंचि समूळ । टाकावीं जेव्हां सकळ । तो संन्यास हें मेघनीळ । वचनांबु[11] वर्षेल अष्टादशीं. ॥ १२२५ ॥

**'काम्यानां[12] कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥'** [अ० १८ श्लो० २.]

काम्यकर्मत्यागास । ज्ञाते बोलती संन्यास । आणि त्याग म्हणती तयास ।

---

१. गुहा. २. विषाची वेल. ३. जे विचारवंत ज्ञानी आहेत ते कर्मांच्या फलाची आसक्ति टाकून व जन्मबंधापासून मुक्त होऊन दुःखमुक्त पदाला पावतात. ४. मलरहित. ५. मुक्तीस. ६. पुनः जन्मास येणें. ७. रोग, व्याधि. ८. रोगरहित. ९. स्पष्ट, उघड. १०. घनश्याम. (श्रीकृष्ण.) ११. वाणीचा पाऊस. १२. काम्य कर्मांच्या त्यागाला संन्यास असें पंडित म्हणतात; सर्व कर्मांच्या फळावरील आसक्तीचा त्याग यास दुसरे कित्येक पंडित संन्यास म्हणतात.

कीं सकळ कर्मफळें टाकिजे. ॥ १२२६ ॥ हे दोंपरीचे त्याग । एक कर्मचि एक कर्मफलसंयोग । कर्मचि टाकावें त्यातें श्रीरंग । काम्य म्हणे अति स्पष्ट. ॥ १२२७ ॥ आतां सर्वकर्मफलत्याग । तो त्याग निष्कामफलसंयोग। अष्टादशीं हा श्रीरंग । विशद अर्थही बोलेल. ॥ १२२८ ॥ नित्य निष्कामफलत्याग । नव्हे विनाकृष्णार्पणयोग। हें तृतीयाध्यायीं अव्यंग । स्वयें श्रीरंग बोलेल. ॥ १२२९ ॥ कर्मज फळ टाकुनी । परमपदा पावती म्हणोनी । प्रस्तुत श्लोकीं या वचनीं । नित्यकर्मफलत्याग सूचवी. ॥ १२३० ॥ कीं कर्मे तरी करिती । फळें तरी टाकिती । ते परमपदा पावती । बुद्धियुक्त. ॥ १२३१ ॥ तेव्हां काम्यें टाकिलीं । नित्यकर्मेंचि आरंभिलीं । फळें त्यांचींही त्यजिलीं । ईश्वरार्पणें. ॥ १२३२ ॥ एवं अवघे अध्याय अठरा । जेथें जेथें कर्मकांडपसारा । बंध नाहीं म्हणतां ईश्वरा । अर्पितां मोक्षहेतु जाणावें. ॥ १२३३ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त मुमुक्षुलोक । अवलोकोत यापरी. ॥ १२३४ ॥ एक अनादि वासना । दुसरी भोगकामना । उभय लक्षणें मना । सज्जनीं आणावीं. ॥ १२३५ ॥ अन्न मागे क्षुधाक्रांत । त्यास पुसावें कीं अमृत । अपेक्षितें कीं नाहीं चित्त । तो म्हणेल नाहीं म्हणोनी. ॥ १२३६ ॥ तें असाध्य म्हणोनी मन । न करी अमृताचें चिंतन । साध्य यत्नें भोजन । साध्य त्याची अपेक्षा. ॥ १२३७ ॥ सांपडे जरी अमृत । पिऊं लागे निश्चित । असाध्य म्हणोनि उचित । यत्न करी अन्नाचा. ॥ १२३८ ॥ साध्य अन्नाची इच्छा मना । ते म्हणावी कामना । अमृताची वासना । झांकली असाध्य म्हणोनी. ॥ १२३९ ॥ तत्रापि जे भोग कानीं । आइकिले त्यांची मनीं । कामना उपजे पुण्यें करूनी । परलोकीं साध्य परिसतां. ॥१२४०॥ स्वर्गकामना याग करुनी । देवांगना[1] भोगूं अमृत पिउनी । वेद बोलती यावरुनी । कामना धरिती श्रुतफळीं[2]. ॥ १२४१ ॥ अश्रुफळें यावेगळीं । श्रवणीं पडतां त्याही फळीं । इच्छा उपजे ते वासनाकळी । कामना पुष्प होणार. ॥ १२४२ ॥ एवं श्रुतफळाची कामना । अश्रुतफळाची वासना । दोनी ज्ञानियाच्या मना । न स्पर्शती. ॥ १२४३ ॥ हेचि जीवन्मुक्तदशा । याकारणेंचि गीतोपदेशा । करणें असे हृषीकेशा । अर्जुनालागीं. ॥ १२४४ ॥ तो अर्जुन सभाग्य । या श्रवणा जाला योग्य । हृदयीं जयाच्या वैराग्य । उपजलेंही. ॥ १२४५ ॥ इतकियानेंचि हळहळ । दूर जाली तळमळ । परी मागुती

---

१. अप्सरा. २. ऐकलेलें.

हे मळमळ । होणार बोधावांचुनी. ॥ १२४६ ॥ चिखलामध्यें मासोळी । जळांशें जीवे परी तळमळी । ते टाकावया गंगाजळीं । सजळ घटीं घातली. ॥ १२४७ ॥ चिखलामधूनि निघाली । परी जों गंगा नाहीं पावली । नेणारास नाहीं वाटली । तोंवरी सुखी अत्यंत. ॥ १२४८ ॥ कीं ते सुखी घटजळीं । हे अस्थिर सुखाची कळी । गंगोदकींच हे मासोळी । अत्यंत सुख पावेल. ॥ १२४९ ॥ जालें नाहीं ज्ञान । तोचि सुख पावे अर्जुन । आइकोनि हें कृष्णवचन । या न्यायें. ॥ १२५० ॥ तों हांसोनि उत्तमश्लोक । करूनि लव कृपावलोक । अर्जुनाप्रति हा श्लोक । बोलतो. ॥ १२५१ ॥

**[२]यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**

**तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥**

आइकोनि आमुच्या वचना । सुखी जालासि अर्जुना ! । कांहींच नलगे ऐसें मना । वाटलें तुझ्या वाटतें. ॥ १२५२ ॥ परी हें काय सुख मानिसी । सुख तें पुढें पावसी । जेव्हां अज्ञानमोहडोहासी । बुद्धि तुझी तरेल.॥१२५३॥ प्रथम मोह हा अविवेक । कीं देह आत्मा वाटे एक । वेगळेपणें [३]व्यतिरेक । आधीं कळावा दोहींचा. ॥ १२५४ ॥ हा एक मोह गेला । तों दुसरा मोह आहे उरला । कीं आत्मा रज्जू तोचि टाकिला । वेगळा देह म्हणोनी. ॥ १२५५ ॥ तोही मोह निरसे । अलंकारीं हेम [३]समरसे । तैसा चराचरीं गवसे । आत्मा जेव्हां. ॥ १२५६ ॥ आइकोनि गुरूची वाचा । हा गहन समुद्र मोहाचा । बुद्धि तुझी तरेल साचा । तेव्हां आनंद पावसी. ॥ १२५७ ॥ तेव्हां श्रुतफळाची कामना । अश्रुतफळाची वासना । टाकोनि बुद्धि तुझी अर्जुना । निवळ वैराग्य पावेल. ॥ १२५८ ॥ वाटे आतांच नलगे फळ । परी हें होणार चंचल । पावसी पद हे बुद्धि निश्चळ । होतां म्हणतो या श्लोकीं. ॥ १२५९ ॥

**[४]श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**

**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

अर्जुना ! नाना फळश्रुती । आइकोनियां तुझी मती । धांवे ज्या त्या फ-

---

१. मासा. २. हे अर्जुना ! जेव्हां तुझी बुद्धि मोहकालुष्यास तरून जाईल, तेव्हां तूं श्रोतव्य आणि श्रुत यांजविषयीं विरक्ति पावसील. ३. एकरस होतें, दिसतें. ४. वेदांतील वचनांनीं विक्षिप्त झालेली तुझी बुद्धि जेव्हां निश्चल होऊन समाधीच्या ठिकाणीं स्थिर होईल, तेव्हां तुला योगप्राप्ति होईल.

ळाप्रती । होती ऐसी. ॥ १२६० ॥ ते या श्रवणें वळली । वाटे नाहीं खवळली । परी अद्यापि नाहीं निवळली । सत्य जाण. ॥ १२६१ ॥ हे पुढें जेव्हां निश्चळ । राहेल अचळ । समाधींत राहतां केवळ । योग तेव्हां पावसी. ॥ १२६२ ॥ आधीं होईल निश्चळ । मग समाधींत अचळ । तेव्हां म्हणे योग केवळ । पावसी याचा अर्थ हा. ॥ १२६३ ॥ आइकोनि नाना फळ । आधीं होती व्याकुळ । ते आतां जाली निर्मळ । वचनें आमुच्या. ॥ १२६४ ॥ हें पुराण वैराग्य । स्वहित तत्काळ वाटे योग्य । परी जो थोर सभाग्य । हें बुद्धि त्याची न विसरे. ॥ १२६५ ॥ ऐसी तुझी बुद्धी । धरूनि हे विवेकाची समृद्धी । राहेल निश्चळ तईं सिद्धी । जाली जाण या श्रवणाची. ॥ १२६६ ॥ मग ते आत्मबोधीं । एकाग्रता बुद्धि साधी । यास म्हणावें समाधी । अचळ समाधींत त्या होय. ॥ १२६७ ॥ आत्मसमाधींत बुद्धी । पावे जेव्हां अचळत्वसिद्धी । तेव्हां पावसी योगसमृद्धी । कर्मे नासती ज्या योगीं. ॥ १२६८ ॥ याहोनि पूर्वीं बुद्धियुक्त । बोलिलों कीं नाशी सुकृतदुष्कृत । तो योग पावसी निश्चित । तत्त्वीं होतां स्थिरबुद्धी. ॥ १२६९ ॥ समाधि आणि योग । एक परी नासावया कर्मयोग । कर्तृत्वादि वियोग । कर्मीं पाहणें हें एक. ॥१२७०॥ कीं आत्मज्ञानी आधीं । एकाग्रता स्वरूपीं[1] साधी । ते सविकल्प निर्विकल्प समाधी । ज्ञानसिद्धि या नांवें. ॥ १२७१ ॥ मग तो नित्य समाधिस्थ । अकर्ता करोनि कर्में समस्त । नाशी पूर्वील सुकृतदुष्कृत । समाधीवरील हा योग. ॥ १२७२ ॥ पूर्वीं वर्णिला जीवन्मुक्त । कीं जिता देह सुकृतदुष्कृत । नाशी तो योग निश्चित । समाधिअवस्था भेदची. ॥ १२७३ ॥ एवं समाधींत स्थिरबुद्धी । त्यास स्थितप्रज्ञतासिद्धी । त्याची वर्तण्याची प्रसिद्धी । ते योगशब्दें जाणावी. ॥ १२७४ ॥ कीं हें श्रीकृष्णवचन । आइकोनियां अर्जुन । ऐसाच करीतसे प्रश्न । स्थितप्रज्ञाविषयीं. ॥ १२७५ ॥

**अर्जुन उवाच—स्थितप्रज्ञस्य[2] का भाषा समाधिस्थस्य केशव! ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

प्रज्ञा म्हणजे बुद्धी । जिला समाधींत स्थिरत्वसिद्धि[3] । ते ज्याची तयास समृद्धी । स्थितप्रज्ञतेची. ॥ १२७६ ॥ त्यास प्रपंच भगवद्रूप । अलंकारीं हे-

---

१. आत्मरूपीं एकाग्रता. २. हे केशवा! मनुष्याची बुद्धि स्थिर झाली आणि समाधान पावली म्हणजे काय? स्थितप्रज्ञ मनुष्याचें बोलणें, बसणें, चालणें कसकसें असतें? ३. स्थैर्य.

मस्वरूप । इंद्रियदृष्टीं थिजलें तूप । रसनेस तेथें न रसभंग. ॥ १२७७ ॥ हा समाधीस विकल्प । विकल्पीं नुसतें निर्विकल्प । हें परोक्षरीतीं स्वल्प । अनुभवन्नसोनिही समजला. ॥ १२७८ ॥ ऐसा नित्य समाधिस्थ । जो बुद्धियुक्त नाशी सुकृतदुष्कृत । देह धरूनि वर्ते कीं निश्चित । हेंही अर्जुनें आइकिलें. ॥ १२७९ ॥ म्हणुनी म्हणतो केशवा । स्थितप्रज्ञ ऐसा माधवा! । जो नित्य समाधिस्थ यादवा! । बोलिलासी. ॥ १२८० ॥ अजी! त्याचीं जीं लक्षणें । तीं सांगावीं कमलेक्षणें । तो काय बोले संभाषणें । तींही वदावीं. ॥ १२८१ ॥ तो असतो काय करुनी । तो वर्ततो काय म्हणूनी । हें स्वमुखें निगमवचनीं । केशवा! स्वामि! वदावें. ॥ १२८२ ॥ शाहणें होय लेंकरूं । लागे समस्त प्रश्न करूं । तें प्रेम न सकती सांवरूं । मायबापें. ॥ १२८३ ॥ तैसा एथूनि अर्जुन । करूं लागला अध्यात्मप्रश्न । सुखावलें अत्यंत मन । जगद्गुरूचें परिसतां. ॥ १२८४ ॥ कीं मुख पसरी पिलूं । माय लागे चारा घालूं । तैसा कृपेनें लागला उकलूं । प्रश्न एथूनि भगवंत. ॥ १२८५ ॥ आधीं श्रीकमलेक्षण । सांगतो त्याचीं लक्षणें । उत्तर देतो विचक्षण । प्रथम प्रश्नाचें. ॥ १२८६ ॥

श्रीभगवानुवाच—**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ! मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

पार्था! प्रथम वैराग्य । ज्यास तो ज्ञानायोग्य । त्यांत वेगळा सभाग्य । स्थितप्रज्ञ होतो. ॥ १२८७ ॥ मन धांवे विषयांवरी । श्रवणबळें ज्ञानी आवरी । मन ऐसें सांवरी । तो साधक, परि नव्हे स्थितप्रज्ञ. ॥ १२८८ ॥ मनीं ज्या ज्या कामना । तो ओकिला ओक वाटे मना । जों ज्ञानी ऐसा होईना । तों न म्हणवे स्थितप्रज्ञ. ॥ १२८९ ॥ जे जे मनीं कामना होते । जेव्हां टाकी सकळही ते । अगा! पार्था! तेव्हां येते । स्थितप्रज्ञता. ॥ १२९० ॥ परंतु टाकणें सर्वकाम । हे गोष्टीचेंचि नव्हे काम । कीं मनें सुखाचें धाम । विषय मानिलें. ॥ १२९१ ॥ दुःख मेरूसमान । सुख मोहरीसमही मन । विषयांत

१. जिव्हेला. २. समाधींत स्थिर बुद्धि ज्याची. ३. वेदवाणीनें. ४. ब्रह्मज्ञानविषयक प्रश्न. ५. हे अर्जुना! जेव्हां जो कोणी सर्व मनांत येणाऱ्या कामांतें सोडतो आणि आपल्याच ठायीं आत्मत्वेंकरून संतुष्ट असतो तेव्हां त्यास स्थितप्रज्ञ असें पंडित म्हणतात. ६. समाधींत ज्याची स्थिर बुद्धि असा. ७. त्याला 'साधक' असें म्हणावें. ८. 'स्थितप्रज्ञ' कोण नव्हे हें व्यतिरेकानें दर्शविलें आहे.

पावे तें जीवन । मानूनि ऐसें. ॥ १२९२ ॥ चिखलामाजी मासोळी । जरी दुःखें तळमळी । ते टाकितां शुष्क स्थळीं । वांचेच ना. ॥ १२९३ ॥ नाकीं तोंडीं केवळ । चिखल त्यानें करी तळमळ । तथापि लवलेश जें जळ । जीवन मत्स्यास तें वाटे. ॥ १२९४ ॥ ते टाकितां गंगाजळीं । नाठवी चिखल मासोळी । ब्रह्मानंदीं केवळीं । विषय नाठवी मन ऐसें. ॥ १२९५ ॥ यालागीं सर्व कामना । टाकूनि आत्मत्वीं मना । लावी संतुष्ट राहे अर्जुना ! । **'स्थितप्रज्ञ'** तेव्हां बोलिजे.॥१२९६॥ हें सिद्धाचें सहज लक्षण । साधकें ऐसें क्षण क्षण । वैराग्य धरूनि आत्मपण । लक्षूनि तृप्ति मानावी. ॥ १२९७ ॥ या भावें म्हणे यदुवीर । कीं मनांतील काम अवघे नर । टाकूनि आत्मत्वीं निरंतर । संतुष्ट राहे जेधवां. ॥ १२९८ ॥ तेधवां स्थितप्रज्ञ तो । अगा ! पार्था ! म्हणिजेतो । याहूनि पूर्वी असतो । साधक होऊनि सिद्धीचा. ॥ १२९९ ॥ तत्त्वज्ञ होऊनि ज्यास । वैराग्य आणि अभ्यास । दोनी नसती तयास । दुर्लभ हे स्थितप्रज्ञता. ॥ १३०० ॥ वैराग्य हृदयीं धरावें । मन आत्मत्वीं स्थिर करावें । विषय स्मरतां आवरावें । वैराग्यें आणि अभ्यासें. ॥ १३०१ ॥ जेव्हां या यत्नाविण । बुद्धि स्वरूपीं स्थिरपण । पावे तेव्हां तो आपण । स्थितप्रज्ञ सिद्ध बोलावा. ॥ १३०२ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । आइकोत. ॥ १३०३ ॥ विचाराच्या बळें काम । सर्व टाकील निष्काम । आत्मस्वरूपीं आत्माराम । स्थितप्रज्ञ करूं शके. ॥ १३०४ ॥ हे यत्नसाध्य[1] गोष्टी दिसते । परी प्रारब्धाची तनु[2] असते । भोगितो आले भोग ते । दुःखी सुखी होऊनियां. ॥ १३०५ ॥ दुःख तें घाबरेंचि करी । स्पृहा[3] उपजवी सुख अंतरीं । कीं ऐसेंचि सुख हो तरी । स्थितप्रज्ञ तेव्हां तो कैसा. ॥ १३०६ ॥ ऐसें म्हणेल पार्थ । हें जाणोनि यदर्थ । बोले सर्वज्ञ समर्थ । हा श्लोक. ॥ १३०७ ॥

**[4]दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

नव्हे घाबिरा दुःखीं । स्पृहा न धरी जाल्या सुखीं । विषयप्रीति भय आ-

---

१. यत्नानें साधलेली. २. देह. ३. इच्छा. ४. दुःखामध्यें ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं; सुखाविषयींची ज्याची इच्छा गेली आहे, आवड, भय, क्रोध, हीं ज्याचीं निवृत्त झालीं आहेत, त्या विवेकी मनुष्याला स्थिरधी (स्थितप्रज्ञ) म्हणतात.

णखी । क्रोधही नसे जयाला. ॥ १३०८ ॥ तो स्थितप्रज्ञ म्हणोनी । बोलिजेतो मुनी । कीं तो मुनी मननेंकरूनी । विचारें ऐसा सिद्ध जाला.॥१३०९॥ युक्तिदृष्टांतेंकरूनी । विचार सिद्ध करी मनीं । हें मनन जाणे तो **'मुनी'** । हे साधकदशा सिद्धाची. ॥ १३१० ॥ आत्मा कळला व्यापक । तेव्हां जीव ईश्वर दोघे एक । प्रतिबिंबासि वेगळीक । नसे बिंबीं हें देखे. ॥ १३११ ॥ भोगोनि अज्ञानें दुःख । ज्ञानीं पावला आत्मसुख । विश्रांति पावतां आणिक । तत्त्व गोष्टीचें समजला. ॥ १३१२ ॥ कीं ईश्वर ब्रह्म सगुण । दुःख भोगितां प्रतिबिंबपणें । बिंबैक्य आपलें आपण । पावोनि पावतो निजानंद. ॥१३१३॥ राजा दाटूनि वनांत । पारधींत होतो श्रांत । क्लेशी क्षुधातृषाक्रांत । दाटूनि होतो. ॥ १३१४ ॥ परतोनि येतां गृहा । श्रमपरिहारीं सुख महा । पावतो कीं उपचार हा । सुखतर पूर्विल्याहूनिही. ॥ १३१५ ॥ तेंचि शीतळ छाया । पूर्वीं ऐसी सुखी काया । न करी उष्ण श्रम हराया । सुखस्पर्श जैसी होतसे. ॥ १३१६ ॥ इत्यादि राजोपचार । पहिल्याहूनि सुख फार । देती ऐसें सुख अपार । जीवन्मुक्तत्वीं ईश्वरा. ॥ १३१७ ॥ ऐशा युक्तीचें मनन । करी ज्या मुनीचें मन । तें कां होय उद्विग्न । दुःख भोगितां? ॥ १३१८ ॥ नाशवंत दुःखाचें स्मरण । तों नित्य सुखाचें स्फुरण । त्याचें घाबरें अंतःकरण । होय कां? ॥ १३१९ ॥ ऐसी सुखींही स्पृहा । कां मैननसंपन्न मानील हा । कीं कंडू खाजवितां देहा । सुख तैसें विषयांत. ॥ १३२० ॥ अर्जुना! वैश्यवृत्ति । करितां स्वल्पही धनप्राप्ति । इच्छुनि जातां सांतेप्रति । न गुंते गृहीं गृहसुखा. ॥ १३२१ ॥ स्त्री वाढी मिष्टान्न । परी याचें सांतेंत फिरे मन । तरुणी दे आलिंगन । मन याचें सांतेंत. ॥ १३२२ ॥ कामी कराया स्त्रीसंग । जातां इतर भोगप्रसंग । आड आले तरी अंतरंग । न धरी स्पृहा तयांची. ॥ १३२३ ॥ दरिद्री जाला राजा । पहिल्या वाकळेच्या सेजा । स्पृहा न देती त्या महाराजा । कदाचित प्राप्त होतांही. ॥ १३२४ ॥ इत्यादि दृष्टांत कोटी । श्रीकृष्ण धरूनि पोटीं । म्हणे अगा ! **किरीटी** ! । सुखीं न धरी तो स्पृहा. ॥ १३२५ ॥ कीं विषयीं अनुराग । न इच्छी कांहीं भोग ।

१. आत्मानंद, ब्रह्मानंद. २. दमलेला. ३. इच्छा. ४. मुनी. ५. उपजीविका. ६. जत्रा, मेळा, बाजार. ७. कामुक. ८. अंतःकरण. ९. जीर्ण वस्त्राच्या. १०. आवड.

कीं खरूज खाजवणें रोग । कां असोसी निरोगिया असेल? ॥ १३२६ ॥ निरोगीही देह । क्वचित् खाजवितां स्नेह । न धरी तैसा निःसंदेह । विषयसुखीं सुख तो न मानी. ॥ १३२७ ॥ वीतरागशब्दें स्पृहा । सुख भोगितांही न धरीच हा । दुःख प्राप्त होतां देहा । नव्हे घाबरा निर्भय. ॥ १३२८ ॥ देह लटिका हा निश्चय । तो पडला तरी न मानी भय । तो दुःखी उद्विग्न होय काय । हें निर्भयशब्दें सूचवी. ॥ १३२९ ॥ क्रोध घाबरेपणें । कीं स्पृहेच्याही गुणें । हा दोहींरहित आपण । क्रोध नसे यास्तव. ॥ १३३० ॥ दुःखीं नव्हे घाबरा । सुखीं स्पृहा न ज्या धीरा । तो क्रोधी नसे **पांडुकुमारा!** । याचि-लागीं. ॥ १३३१ ॥ हे सिद्धाचे सहज गुण । साधकें व्हावें मननिपुण । दुःखीं सुखीं ऐसें आपण । असावें भावार्थ हा पोटीं. ॥ १३३२ ॥ एवं सर्व-काम त्यागी । संतुष्ट जो निजात्मयोगीं । निर्भय अक्रोध वीतरागी । सम सुख-दुःखीं **'स्थितप्रज्ञ'.** ॥ १३३३ ॥ **'स्थितप्रज्ञ'** तो कैसा । म्हणूनि पुशिलें तरी तो ऐसा । प्रथम प्रश्नोत्तरठसा । बसला मनीं **पार्थाच्या.** ॥ १३३४ ॥ प्रश्न दुसरा **धनंजय** । करी कीं तो बोले काय । याचें उत्तर **अव्यय** । देत असे आतां या श्लोकीं. ॥ १३३५ ॥

**यः[३] सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

अगा! प्रयोजनाविणें । काय घडे बोलणें । आतां अहंता ममता गुणें । मीं माझें म्हणावें. ॥ १३३६ ॥ तरी देहीं नसे अहंता । त्यास कैंची अन्यत्र ममता । स्नेहपाश नसे चित्ता । जो कांहीं दाटूनि बोलवी. ॥ १३३७ ॥ स्व-

---

१. उत्कंठा. २. शंकराचार्यांच्या 'विवेकचूडामणि' नामक प्रकरणांत स्थितप्रज्ञ पुरुषा-विषयीं पुढील विवेचन आढळतें:—'स्थितप्रज्ञो यतिरयं यः सदानंदमश्नुते । ब्रह्मण्येव विलीनात्मा निर्विकारो विनिष्क्रियः ॥ ४२९ ॥ ब्रह्मात्मनोः शोधितयोरेकभावावगाहिनी । निर्विकल्पी च चिन्मात्रा वृत्तिः प्रज्ञेति कथ्यते ॥ ४३० ॥ सुस्थितासौ भवेद्यस्य **'स्थितिप्रज्ञः'** स उच्यते ।' म्हणजे—जो सदानंद सेवितो, ज्याचा आत्मा ब्रह्माच्या ठिकाणीं लीन झाला आहे, जो विकारशून्य आणि क्रियाशून्य झाला आहे तो यति स्थितप्रज्ञ आहे. ब्रह्म आणि आत्मा यांचें संशोधन करून एकभावाचें सेवन करणारी आणि विकल्पशून्य असणारी जी चिन्मात्रा वृत्ति तिला प्रज्ञा असें म्हणतात. ही प्रज्ञा ज्याची सुस्थित झाली आहे, तो स्थितप्रज्ञ समजावा.
३. जो कोठेंही आसक्ति ठेवीत नाहीं, शुभ प्राप्त झालें असतां तळमळ करीत नाहीं, त्याची प्रज्ञा (बुद्धि) प्रतिष्ठित (स्थिर) झाली असें समजावें.

देह पुत्र कलत्र[1] । स्नेह न धरी सर्वत्र । तो कां बोलेल चित्र विचित्र । शब्द लोकांसारिखे. ॥ १३३८ ॥ कीं सुखाची असे स्पृहा । तरी कांहीं बरें वाटतां देहा । बोलोंच लागे उत्तर हा । नावरे सर्वथा. ॥ १३३९ ॥ कीं दुःख न हो हे जपणी । जरी असे अंतःकरणीं । तरी अनुभव होतां वाणी । बोलोंच लागे. ॥ १३४० ॥ जो प्राप्त होतां शुभ । संतुष्ट नव्हे मानूनि लाभ । स्वसुखीं सर्वदा स्वयंभ । तो काय बोलेल कोणाशीं[2]? ॥ १३४१ ॥ जो अशुभासही भोगुनी । हें वाईट हें तें म्हणोनी । द्वेष न करी कीं वाईट न मानी । तो काय बोलेल कोणाशीं? ॥ १३४२ ॥ न हर्षे जो शुभ[3] पावतां । वाईट न मानी अशुभ होतां । त्याचीच प्रज्ञा[4] प्रतिष्ठिता । जाली पावली जे स्थैर्य[5]. ॥ १३४३ ॥ भाव ऐसा निघाला । कीं जो ऐसा नाहीं जाला । तों तो साधक बोलिला । साधन करावें त्या नरें. ॥ १३४४ ॥ सर्व टाकावा स्नेह । साक्षित्वें पारका पाहावा देह । स्त्री पुत्र धन गेह[6] । स्वप्न पहावें जागरीं. ॥ १३४५ ॥ प्रारब्धें देह गेह । न सुटे परी त्यजावा स्नेह । स्वरूपीं जागे त्यास मोह । स्वप्न न करी स्वप्नदृष्टीनें. ॥ १३४६ ॥ आत्मा स्वयें अतींद्रिय[7] । स्वप्नसृष्टि देहेंद्रियें[8] । स्वरूपीं[9] जागा हा निश्चय । धरितां स्नेह कवणाचा. ॥ १३४७ ॥ सुखदुःखांस रूपें दोनी । त्यांत जे ममतेकरूनी । स्त्रीपुत्रदुःखें दुःखी म्हणोनी । न मानूं शके आपणा. ॥ १३४८ ॥ जरी कळला विवेक । तरी देहास सुखदुःख । होतां दिसेच मुख । देहात्मतेचें. ॥ १३४९ ॥ तरी हें प्रारब्धऋण । जैसें घेतलें तैसें उत्तीर्ण । होतां देहात्मपण[10] । प्रारब्धबळें वाढतें. ॥ १३५० ॥ जीवन्मुक्तिपदा । विघ्न करी हे आपदा[11] । परंतु विवेकाची संपदा । मेळवूनि पद तें पावावें. ॥ १३५१ ॥ ऋणी याचें ऋण । फेडावें भलत्या गुणें । सिंहासनारूढ आपण । होऊनि कां न फेडावें? ॥ १३५२ ॥ दुःखीं न मानितां दुःख । सुखीं न मानितां सुख । दृष्टीस देहात्मतेचें मुख । पडलें तरी तें बाधीना. ॥ १३५३ ॥ स्थितप्रज्ञत्वसिंहासनीं । साम्राज्यपदीं[12] बैसोनी । प्रारब्धऋणापासूनी । मुक्त न व्हावें कां सुखें?

---

१. स्त्री. २. तो कोणापाशीं बोलणार नाहीं—असें अपेक्षित उत्तर आहे. ३. ब्रह्मवेत्त्या पुरुषाला प्रियाप्रिय अथवा शुभाशुभ यांचा स्पर्शच होत नाहीं असें '**वि**वेकचूडामणि' प्रकरणांत **शंकरा**चार्य सांगतात:—'अशरीरं सदा संतमिमं ब्रह्मविदं क्वचित् । प्रियाप्रिये न स्पृशतस्तथैव च शुभाशुभम् ॥ ५४८ ॥' ४. बुद्धि. ५. अढळ. ६. घर. ७. इंद्रियांस अगोचर. ८. देह आणि इंद्रियें. ९. आत्मस्वरूपीं. १०. देहास आत्मा समजणें. ११. दुःख. १२. निष्कंटक राज्य.

॥१३५४॥ या सुखास न म्हणावें सुख । या दुःखास न म्हणावें दुःख । त्यक्त-स्नेहास आणिक । बोलणें उरलें तें काय? ॥ १३५५ ॥ ऐशा विवेकें नर ऐसा । साधकही होय सरसा । साधक म्हणावा कैसा । स्थितप्रज्ञही तो मग होय. ॥ १३५६ ॥ तो कांहींच नाहीं बोलत । असे स्वानंदें डोलत । उपदेश हरिकथा तों निश्चित । नव्हे बोली प्रपंचाची. ॥ १३५७ ॥ शुक स्थितप्रज्ञ भागवत । सांगे श्रीमद्भागवत । ब्रह्मोपदेश हरिचरित । हरिभक्तचरित्रें ज्यामध्यें. ॥ १३५८ ॥ ज्यांत अवतारमाला । नवरस श्रीकृष्णलीला । रास-क्रीडा गोपाळकाला । ज्यामध्यें. ॥ १३५९ ॥ ऐसे स्थितप्रज्ञ योगी । होऊनि गेले नाना जगीं । न चाळिती वाणी उगी । उपदेश हरिकथा न वर्णितां. ॥ १३६० ॥ न बोलायाचें स्थळ । तें तेंच निवडी मेघनीळ । कीं सर्वत्र स्नेह अचळ । वाणी ज्याची शुभाशुभीं. ॥ १३६१ ॥ इत्यादि गहन भाव । सुचवूनि बोले देव । आतां तृतीय प्रश्नीं स्वयमेव । तोचि उत्तर देतसे. ॥ १३६२ ॥ काय करूनि असतो । जो **स्थितप्रज्ञ** म्हणावा तो । उत्तर याचें आतां देतो । या श्लोकीं. ॥ १३६३ ॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

अनायासें भोग करी । अनायासेंचि आवरी । स्थितप्रज्ञ ऐशा परी । असतो अर्जुना! ॥ १३६४ ॥ येविषयीं दृष्टांत । स्वमुखें बोले रमाकांत । सिद्ध साधक सिद्धांत । सुचवूनि बोले. ॥ १३६५ ॥ कीं जेव्हां इंद्रियांतें । भोगितां सकळ विषयांतें । आवरी जैसा निजांगातें । कांसव जलचर. ॥ १३६६ ॥ क्षणांत बाहेर काढी । क्षणांत आंत ओढी । आढाओढींत न पडे गाढी । काढी ओढी अनायासें. ॥ १३६७ ॥ भोगिल्याविणें नव्हे क्षय । प्रारब्धाचा हा निश्चय । विनायत्न प्राप्त विषय । त्या भोगीं इंद्रियें वर्तवी. ॥ १३६८ ॥ चेंडू भूमीवरी पडे । तो भूमि स्पर्शतां उडे । परी त्या भूमीस न जडे । मृत्पिंड जैसा. ॥ १३६९ ॥ विषयभूमि स्पर्शोनी । मन उडे चिद्गगनीं । अज्ञमन मृ-

१. ज्यानें स्नेह सोडिला त्यास. २. भगवद्भक्त. ३. घननील, श्रीकृष्ण. ४. पुढें ओंवी ९६ पहा. ५. जसा कांसव आपलीं अंगें सर्व बाजूंनीं आंत सहज आंवरतो, तसा जेव्हां हा (यति) इंद्रियांस इंद्रियार्थांपासून आंवरून धरतो, तेव्हां त्याची प्रज्ञा (बुद्धि) प्रतिष्ठित (स्थिर) झाली असें समजावें. ६. चैतन्यरूप आकाशांत.

त्पिंड होऊनी । विषयभूमीतें जडतसे. ॥ १३७० ॥ चिखलाचा गोळा पडे । तो भूमीस लागोनि जडे । परतोनि पडतांही न उंच चढे । मन तैसें अज्ञाचें. ॥ १३७१ ॥ स्थितप्रज्ञाचे दृष्टी । विषय नाहींच परी अदृष्टीं । भोगणें तेथें न होतां कष्टी । इंद्रियें वर्तवी अनायासें. ॥ १३७२ ॥ भोग भोगितांचि दिसती । मग जाणों इंद्रियेंच नसती । कीं भोगवासनेची वस्ती । इंद्रियांत त्याच्या असेना. ॥ १३७३ ॥ रजोगुणाचें तें इंद्रिय । रजोगुणच वासनामय । वासनेविण इंद्रियनिश्चय । घडेचि ना. ॥ १३७४ ॥ विषय इंद्रियें सकळ । प्रपंच दिसे ब्रह्म केवळ । त्यास इंद्रियग्राम[1] ओंगळ । दिसे कैंचा? ॥ १३७५ ॥ कांसव आंगें आवरी । नसतींच जाणों तोंवरी । आणि कांहींच न करी । श्रम आंगें आवरितां. ॥ १३७६ ॥ कामनेनें विषय । टाकिती त्यांचे दृढनिश्चय । विषय भोगितां इंद्रियें[2] । न निघे कधीं. ॥ १३७७ ॥ आपणास जन्मांतरीं । राज्यपद लाधावें हें अंतरीं । म्हणूनि भोग न करी । विषयांचे. ॥१३७८॥ ब्रह्मर्षी ऋषीश्वरी । न म्हणतां तपश्चर्या करी । अतिप्रयत्नें चित्त हरी । मेनका विश्वामित्राचें. ॥ १३७९ ॥ इंद्रियां भोगीं प्रवृत्ति । न घडतां मेनका चित्तवृत्ति । हरितां तींच नावरती । विश्वामित्रा. ॥ १३८० ॥ आटोपूं शकता इंद्रियें । तरी कां होता कुतरा स्वयें । प्रवृत्ति निवृत्ति ही निश्चयें । नसे सकामा स्वाधीन इंद्रियांची. ॥ १३८१ ॥ अनादि मायाविलास । श्वान[3] करी विश्वामित्रास । 'श्वानमैथुनन्याय' ज्यास । घडोनि आला. ॥ १३८२ ॥ असोनि मैथुनवासना । सदा न करवे श्वाना । काळविशेषें घडतां निघेना । शिश्न योनीबाहेरी. ॥ १३८३ ॥ स्वस्त्री तरुण सुंदरी । टाकूनि धनार्थ देशांतरीं । कुरूप [4]पुंश्चलीसंग करी । न सोडी सोसूनि दंडही. ॥ १३८४ ॥ स्वस्त्रीशीं रतिप्रवृत्ती ।

---

१. सर्व इंद्रियें, इंद्रियगण. २. इंद्रियजय करणें फार कठिण आहे व तो बुद्धि स्थिर होण्यास अवश्य आहे. बुद्धि स्थिर राहण्यास मनोनिग्रह आणि इंद्रियजय हीं दोन साधनें आहेत. परंतु मन फार चंचल आहे, त्याचें आकलन करणें वायूप्रमाणें दुष्कर आहे. पंचदशी ग्रंथांत एक वचन आहे:—अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि । अपि वह्न्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥ १२१ ॥ [तृप्तिदीप ७ वें प्रकरण.] याचा भावार्थः—समुद्राचें पान करवेल, मेरुपर्वत खणून काढतां येईल, अग्नि भक्षण करवेल, पण या सर्वांहीपेक्षां चित्तनिग्रह करणें कठिण आहे. या श्लोकावरून मनोनिग्रहाचें दुष्करत्व लक्षांत येईल. मनोनिग्रहाप्रमाणें इंद्रियनिग्रहही दुष्करच आहे. परंतु हे दोन्ही साधन असले म्हणजे पुरुषाची बुद्धि स्थिर असण्यास प्रत्यवाय नाहीं. [सरलार्थबोधिनी गीता—पृ० ४१५.] ३. कुत्रा. ४. व्यभिचारिणीशीं संयोग.

धनाशा बद्ध करूं न शकती । परदारगमननिवृत्ती । ती तों स्वाधीन नसेची. ॥ १३८५ ॥ विषय प्राप्त जो न्यायें । आणि अनायासें स्वयें । तें प्रारब्ध मानूनि इंद्रियें । वर्तवी स्थितप्रज्ञ. ॥ १३८६ ॥ वासनारहित अंतःकरण[1] त्यास कां घडे यत्न करणें? । असोनि न दिसे इंद्रियगण । आवृतें कूर्मांगें जे रीती. ॥ १३८७ ॥ हें सिद्धाचें लक्षण । साधकें होऊनि विचक्षण । कंडू इंद्रियांची क्षण । सोसूनि स्वरूपीं चित्त द्यावें. ॥ १३८८ ॥ नाहींत विषय, नाहींत इंद्रियें, । अवघा आत्मा आहे स्वयें । 'जळीं तरंग' या न्यायें । आत्मयांत विश्व स्मरावें. ॥ १३८९ ॥ क्षत खाजवितां सुख । परी तत्काळ उपजे दुःख । जेव्हां चढे नखाचें विख । दुःख ये रीती विषयभोगीं. ॥ १३९० ॥ निश्चय असावा अंतःकरणीं । तें योजे चिदात्मस्फुरणीं । तेव्हां ते सिद्धाचीच धरणी । साधकासही साधेच. ॥ १३९१ ॥ पाठ एकास वेदऋचा । तेच अभ्यासकाची घोकींव वाचा । विसर न पडतां तिचा । तोही होय त्यासम. ॥ १३९२ ॥ एकाचा अभ्यास जाला । एकास अभ्यास आहे लागला । परंतु अभ्यासकर्ता वहिला । हाही होय **स्थितप्रज्ञ**[2]. ॥ १३९३ ॥ एवं **'यदा संहरते'** । आणि **'स्थितप्रज्ञस्तदोच्यते'** । या कृष्णवचनीं निघते । टीका ऐसी. ॥ १३९४ ॥ कीं जेव्हां कूर्म अंगें जैसा । आवरी इंद्रियें तैसा । तेव्हां **स्थितप्रज्ञ** ऐसा । भाव कीं तत्पूर्वी साधक. ॥ १३९५ ॥ अनायासें भोगी । अनायासेंचि त्यागी । ऐसें करोनि सर्वात्मयोगीं[3] । असतो **स्थितप्रज्ञ** गा! ॥ १३९६ ॥ हें तिज्या प्रश्नाचें उत्तर । जालें, परंतु अर्जुन चतुर । संदेह मानी युक्ततर । तो पुढिलिया श्लोकीं हरेल. ॥ १३९७ ॥ अनायासें प्रवर्तती । अनायासें परतती । इंद्रियें स्थितप्रज्ञाचीं ये रीती । देवाधिदेव[4] बोलिला. ॥ १३९८ ॥ सकामाचीं इंद्रियें । न प्रवर्तती काम्य निश्चयें । विषयासक्त जो स्वयें । न परतती इंद्रियें तयाचीं. ॥ १३९९ ॥ अनायासें वर्तवी । अनायासें परतवी । ऐसा स्थितप्रज्ञ गोसांवी[5] । पूर्वश्लोकीं ऐकिला. ॥१४०० ॥ आइकोनि धनंजयें । संदेह मानिला कीं इंद्रियें । विषयीं वर्तवी भलता स्वयें । नवल काय या गोष्टीचें. ॥ १४०१ ॥ कठिण इंद्रियें परतणें । स्थितप्रज्ञ सिद्ध या गुणें । तरी हें अन्यत्रही लक्षणें । दिसे काय तोही **स्थित**प्रज्ञ? ॥ १४०२ ॥

---

१. घाय, खरूज. २. समाधींत बुद्धि ज्याची स्थिर. ३. सर्वात्मस्वरूपाच्या समाधींत. ४. श्रीकृष्ण. ५. इंद्रियस्वामी. (गो+सांवी=इंद्रिय+स्वामी.)

ज्वरित आणि उपवासी । हेही न घेती विषयासी । विषयभोगही मानसीं । नाठवे जयां. ॥ १४०३ ॥ तेव्हां हा काय अधिक । कीं हें आइकावें कौतुक । हा भाव यदुकुलतिलक । समजोनि बोले हा श्लोक. ॥ १४०४ ॥

**विषया[1] विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

ज्या इंद्रियाचा जो विषय । तो तदाहार[2] हा निश्चय । **निराहार**शब्दें हे उभय । उपवासी लंघनीं ज्वरितही. ॥ १४०५ ॥ निराहार या प्रकारीं । देहाभिमानी देहधारी । स्रक्[3] चंदन आणि नारी । न लगती तयांसी. ॥१४०६॥ ते समयीं तों विषय । परतले परंतु निश्चय । पुढें भोगायाचा त्यांचा जय । जाला नाहीं. ॥ १४०७ ॥ वासनेस म्हणती रस । मनीं त्या रसाचा असे वास । जरी केला उपवास । काय जालें? ॥ १४०८ ॥ परतला विषयांचा विलास । परी परतला नाहीं वासनारस । स्थितप्रज्ञाचा तोही विरस । वासनारस असे ज्याला. ॥ १४०९ ॥ म्हणसी वासनारस । कीं जाला त्याचा विरस । तरी आत्मरस सुरस । सेविला याणें. ॥ १४१० ॥ अमृत पिऊं लागे रसना । तरी कांजी कां विरस होईना? । राग तो विराग जाला अर्जुना! । देखतां परमात्मयातें. ॥ १४११ ॥ स्वरूपगोडी लागतां मना । सकळ जाती कामना । भोगेच्छा सर्वथा असेना । स्थितप्रज्ञासी. ॥ १४१२ ॥ आत्मा बरा कळल्यावरी । विषयवासने कैंची उरी । तो इच्छा धरील कां परी । ऐसें श्रुतिही बोलती. ॥ १४१३ ॥ एवं कूर्मांगाचे परी । अनायासें इंद्रियें आवरी । तो **स्थितप्रज्ञ** हेचि खरी । गोष्टी अगा अर्जुना! ॥ १४१४ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सर्वज्ञ लोक । तेही परिसोत भावार्थे. ॥ १४१५ ॥ आत्मज्ञानी होउनी । इंद्रियें अनायासें आवरूनी । असे तेव्हां स्थितप्रज्ञ म्हणोनी । तृतीय प्रश्नोत्तरें बोलिला. ॥ १४१६ ॥ तरी जो ज्ञानीच जाला । सर्वही ब्रह्म कळलें ज्याला । इंद्रियें आटोपोनि त्याला । असणें कां लागलें? ॥ १४१७ ॥ हे शंका मानील पार्थ । ऐसें जाणे समर्थ । हे श्लोक दोनी तदर्थ । बोलतसे. ॥ १४१८ ॥

---

१. जो पुरुष निराहार आहे त्याजपासून इंद्रियविषय मागें परततात (दूर राहतात); पण त्या विषयांची रुचि (वासना) तशी मागें परतत नाहीं. परंतु परमेश्वर पाहिल्यावर ही रुचि (वासना) देखील नाहींशी होते. २. त्याचें खाणें. ३. हार.

**[१]यततो ह्यपि कौंतेय! पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

आईक गा! कुंतीसुता! । कळतां अधिष्ठान आत्मसत्ता । जग [२]विवर्त कळतां तत्त्वतां । तो सर्वज्ञ जाला हें खरें. ॥ १४१९ ॥ श्रवणमनननिदिध्यासें । आत्मा ओळखिला मानसें । त्याला सर्व कळलें ऐसें । श्रुतिही बोलती. ॥ १४२० ॥

श्रुतिः—**'मैत्रेयात्मनि खल्वरे! दृष्टे श्रुते मते विज्ञात इदं सर्वं विदितम् ॥'**

**याज्ञ**वल्क्य मुनी । त्याची स्त्री **मै**त्रेयी म्हणोनी । तीस म्हणे श्रवणादिकीं करूनी । जीस कळला आत्मा आपला. ॥ १४२१ ॥ आत्मा कळतां केवळ । विदित होय हें विश्व सकळ । कीं ओळखितां समुद्रजळ । ओळखिले तरंग सर्वही. ॥ १४२२ ॥ कळतां तंतु एक । पट कळले अनेक । कळतां एक [३]कनक । अलंकार सर्व कळतीच. ॥ १४२३ ॥ कळतां एक माती । कळल्या घटादि सर्व जाती । आत्मा कळतां चराचरमूर्ती । अवघ्याच कळल्या. ॥ १४२४ ॥ याकारणें आत्मज्ञ । तोचि जगीं सर्वज्ञ । सर्वज्ञास म्हणती अभिज्ञ । **'विपश्चित्'** म्हणूनी. ॥ १४२५ ॥ या श्लोकीं विपश्चिच्छब्द । ज्ञानियास म्हणे **मुकुंद** । त्याचा अर्थानुवाद । ये रीतीं. ॥ १४२६ ॥ विपश्चित् स्वयें सर्वज्ञ सर्वेश्वर । किंवा विपश्चित् सर्वज्ञ नर । दों सर्वज्ञांत अंतर । काय असे. ॥ १४२७ ॥ अलंकार घडी सोनार । ते [४]कशीं लावी पारखी नर । दोघे जाणती कीं अलंकार । सकळही एक सुवर्णचि. ॥ १४२८ ॥ आतां चराचर अलंकार । निर्माण करायाचा प्रकार । आणि सर्वसाक्षित्वादि सर्वेश्वर । तोचि जाणे. ॥ १४२९ ॥ तरी जो ज्ञानी नर । त्यास त्याचा काय आदर । हा स्वयें मोक्षींच तत्पर । तो याच सर्वज्ञत्वें साधतो. ॥ १४३० ॥ दुसरियाचें मन । भूत भविष्य वर्तमान । हें कळणें नव्हे अपरोक्षज्ञान । न खोळंबे मुक्ति यात्रिणें. ॥ १४३१ ॥ या सिद्धीचेही अंश । ज्ञानियांस लभ्य होती लेश । परी **श्रीगुरूचा** उपदेश । पाहों नको त्यांकडे. ॥ १४३२ ॥ आत्मलाभावांचोनी । आणिकही लाभ मानी । तो सकाम देहाभिमानी । तत्काळ होय. । ॥ १४३३ ॥ एवं याच्या कार्यसिद्धीपुरता । हा सर्वज्ञत्वीं जाला सरता । कीं

---

१. हे कुंतीपुत्रा! अर्जुना! मोक्षार्थ प्रयत्न करणाऱ्याही पंडितांचीं क्षुब्ध इंद्रियें बलात्कारानें त्यांच्या मनास विषयांकडे ओढून नेतात. २. जगत्परिवर्तन. ३. सुवर्ण. ४. कसोटीला.

सर्वही मिळोनि एक सत्ता । इतकें कळतां हा मुक्त. ॥ १४३४ ॥ अलंकार आले हाता । सोनें प्राप्त जालें तत्त्वतां । सोनाराची सर्वज्ञता । न पावे तरी धनवंत. ॥ १४३५ ॥ एवं जो आत्मज्ञ । तोचि विपश्चित् सर्वज्ञ । विपश्चिच्छब्दें [१]अभिज्ञ । अर्थ वाखाणिती ये रीती. ॥ १४३६ ॥ अर्जुनास म्हणे हरी । कीं सर्वज्ञ ऐसाही जरी । कूर्मांगासम इंद्रियें नावरी । तोंवरी नव्हे स्थितप्रज्ञ. ॥ १४३७ ॥ कीं सर्वही ब्रह्म खरें । कळलें जरी ऐसें बरें । अगा ! तरी [२]दुर्निवारें । पूर्वसंस्कारें इंद्रियें. ॥ १४३८ ॥ ते इंद्रिय आणि विषय । आणि भोगही ब्रह्म अद्वय । तथापि नव्हतां इंद्रियजय । स्थितप्रज्ञता साधेना. ॥ १४३९ ॥ अविद्या मरण जन्म । हें अवघें जरी ब्रह्म । तरी न चुकती भवश्रम । ज्ञानाविणें. ॥ १४४० ॥ तैसें कळलें कीं सर्वही ब्रह्म । आणि मोकळा सोडी इंद्रियग्राम । ब्रह्म विसरोनि पावे भ्रम । यत्न करावा यालागीं. ॥१४४१॥ ज्ञानी सर्वज्ञ ऐसे परी । इंद्रियजया यत्नही करी । तरी बळवंतें बलात्कारीं । इंद्रियें हरती मन त्याचें. ॥ १४४२ ॥ मन विवेकीं दडे । तेथें इंद्रियांची उडी पडे । मथन करितां लोणी सांपडे । तैसें पडे हातीं इंद्रियांच्या. ॥ १४४३ ॥ मनास मथिती ऐसीं । इंद्रियें विषयाचीं [३]पिसीं । हीं मथनशील यांसी । [४]प्रमाथी म्हणावें यालागीं. ॥ १४४४ ॥ एवं सर्वज्ञ यत्नशीळ । मन तयाचेंही [५]इंद्रियकुळ । हरणार ऐसीं प्रबळ । कुंतीसुता ! हीं इंद्रियें. ॥ १४४५ ॥ कुंतीसुता ! कौंतेया ! म्हणूनि म्हणतां शब्दांत या । सुचवी कीं अनादि माया । तिच्या प्रबळशक्ति इंद्रियें. ॥ १४४६ ॥ अगा ! इंद्रियांचीच वासना । स्त्रीसंग करवी सर्वां जनां । इंद्रिययोगेंचि [६]अंगना । पुरुष इच्छी. ॥ १४४७ ॥ सृष्टिप्रवाह ऐसा । हा इंद्रियांचा [७]वळसा । इंद्रियें नसतीं तरी कैसा । कुंतीस होतास तूं पुत्र ? ॥ १४४८ ॥ ऐशा अनादि इंद्रियशक्ति । मायाबळाच्या अभिव्यक्ति । यास अभ्यास आणि विरक्ति, । उपाय तिसरा असेना. ॥ १४४९ ॥ ऐसा सर्वज्ञ विरक्त । त्याचेंही ओढोनि नेती चित्त । स्थितप्रज्ञ यानिमित्त । आवरूनि असतो इंद्रियें. ॥ १४५० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तें परिसोत सर्वज्ञ लोक । ज्ञानाभिमान टाकुनी. ॥ १४५१ ॥ पूर्वश्लोकीं आत्मज्ञ । होऊनियां सर्वज्ञ । इंद्रियनिग्रहही [८]अभिज्ञ । करणार तो

---

१. जाणता. २. आवरण्यास कठीण. ३. वेडीं. ४. मथनशील. ५. इंद्रियगण. ६. सुंदर स्त्री. ७. आकर्षण, दमन. ८. विद्वान् , जाणता.

कां वर्णिला. ॥ १४५२ ॥ इंद्रियें त्याचेंही मन । हरिती करोनि मथन । हें आइकोनि अर्जुन । सशंक जाला. ॥ १४५३ ॥ कीं जालें आत्मज्ञान । आणि इंद्रिय जयाचें साधन । तेंही करितां मन । हरती जेव्हां इंद्रियें. ॥ १४५४ ॥ तेव्हां कांसवाचेपरी । इंद्रियें अनायासें आवरी । त्यास [1]उपाय कोण तरी । हें विचारावें. ॥ १४५५ ॥ ऐसा मनींचा भाव । जाणोनि देवाधिदेव । न पुसतां स्वयमेव । स्वभजनमहिमा सांगेल. ॥ १४५६ ॥ कीं अर्जुना! इंद्रियजय । करायास हे दोनी उपाय । तरावया भवसिंधु काय । उपाय तिसरा मी सांगों. ॥ १४५७ ॥ याही नावेवरी । पुरुष न बसे जोंवरी । तोंवरी तरेल केशापरी । अगा! अर्जुना! ॥ १४५८ ॥ परी ते नाव नेणार । मी सर्वेश्वर [1]कर्णधार । माझे ठायीं जो सादर । तो पैलपार पावे त्याचि नावेनें. ॥ १४५९ ॥ यालागीं पूर्वोक्त दोनी । उपायही असोनी । मीच थोर म्हणोनी । भजे मातें. ॥ १४६० ॥ तो कूर्मांगाचे परी । मग मत्प्रसादें आवरी । इंद्रियें म्हणूनि हरी । बोलतसे या श्लोकीं. ॥ १४६१ ॥

**[2]तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

अगा! तीं इंद्रियें आवरूनि । स्वस्वरूपीं चित्त योजूनि । असतो मत्पर होऊनि । सगुणभजनीं सादर. ॥ १४६२॥ कीं इंद्रियांतें नेमूनि । आणि स्वस्वरूपीं चित्त योजूनि । असतां तिहीं मन हरूनि । न्यावेंचि परी असे मत्पर. ॥ १४६३ ॥ मन ज्याचें मत्पर । तेथें मी सर्वेश्वर । प्रकटतां सगुण सुंदर । न हरती इंद्रियें मनातें. ॥ १४६४ ॥ मीचि आत्मा हा निश्चय । परंतु निर्गुण निर्विषय । मन उदक नीचभूमि विषय । तें धांवे तिकडेची. ॥ १४६५ ॥ इंद्रियांच्या वृत्ती । त्या मनाच्याच शक्ती । विषय कांहीं कल्पिती । तेधवां लागे तिकडेची. ॥ १४६६ ॥ विवेकें विषय सोडी । तथापि निर्गुणीं न घे गोडी। म्हणूनि इंद्रियग्राम जोडी । मागुती गोडी विषयांची. ॥ १४६७ ॥ मी निर्गुणचि अर्जुना ! । आकार कल्पूनि दावीं जनां । परी तो आकार [3]निरंजना । आत्मयासी भेटी करी. ॥ १४६८ ॥ ज्ञान जालियाही हें सगुण । स्मरतां

---

१. सुकाणूं धरणारा. २. त्या सर्व (इंद्रियांस) उत्तम प्रकारें आंवरून योगी मनुष्यानें मत्पर असावें, कारण कीं ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित (स्थिर) आहे असें समजावें. ३. प्रारब्ध नाहीं ज्याला, ईश्वर.

स्फुरेचि निखिल निर्गुण । सुवर्णमूर्तींत सुवर्ण । झांकेल काय? ॥ १४६९ ॥ जळास नव्हता विकार । मृदुजळ होय कठिण गार । असोनिही निराकार । साकारु दिसे. ॥ १४७० ॥ कठिण गार लागे हाता । धोंडा दिसे दृष्टीं पाहतां । परंतु [1]रसनेनें चाखतां । मृदु गोड रस निर्विकार. ॥ १४७१ ॥ मनास दिसे सगुण । परी त्यास निर्गुणत्वाचें स्फुरण । सुवर्णाकरितां जैसें भूषण । निर्गुणें स्फुरें सगुण मी. ॥ १४७२ ॥ मन भुले सुंदरपणा । तों निर्गुण स्फुरतां आपणा । विसरे तेथें इंद्रियगणा । ठाव कैंचा? ॥ १४७३ ॥ अगा! ऐसा मत्पर । ज्ञानी यत्नशील नर । कूर्मांगासम चतुर । असतो इंद्रियें आवरूनी. ॥ १४७४ ॥ मीच थोर जया तो मत्पर । ज्ञानी सगुणीं सादर । त्यास तारितों मी सर्वेश्वर । निरूपण होणार हें पुढें. ॥ १४७५ ॥ एवं ऐसा मत्पर । ज्ञाता प्रयत्नीं नर । त्यास इंद्रियपरिकर । वश होतो. ॥ १४७६ ॥ ज्यास वश इंद्रियें । तोचि स्थितप्रज्ञ स्वयें । प्रतिष्ठा पावली निश्चयें । प्रज्ञा त्याची. ॥ १४७७ ॥ एवं जो ध्यानतत्पर । तो स्थितप्रज्ञ नर । विषयध्यानाचें अंतर । तरीच पडे मनासी. ॥ १४७८ ॥ मन नव्हतां सगुणतत्पर । तें निर्गुणीं नव्हे स्थिर । ज्ञानियाचें मनही [2]पसर । धरी ध्यानीं विषयांच्या. ॥ १४७९ ॥ विषयध्यानें भ्रम । उपजे तेव्हां केले श्रम । व्यर्थ होती हा क्रम । बोले श्रीकृष्ण दों श्लोकीं. ॥ १४८० ॥

**[3]ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

विषयाचें ध्यान नर । जो करी त्यास सत्वर । विषयीं उपजे आदर । '[4]**संग**' म्हणावें तयासी. ॥ १४८१ ॥ विषय भोगणें बरें । यासंगें विषय-आदरें । भोगेच्छा एकसरें । उपजे तीव्र तो '**काम**'. ॥१४८२॥ जों तीव्र

---

१. जिव्हेनें. २. विस्तर. ३. विषयांचें ध्यान करणाऱ्या पुरुषाची विषयांच्या ठायीं आसक्ति उत्पन्न होते. (त्या) आसक्तीपासून अभिलाष उद्भवतो, अभिलाषापासून क्रोध उत्पन्न होतो, क्रोधापासून संमोह, संमोहापासून स्मृतिविभ्रम, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशाच्या योगानें त्या पुरुषाचा नाश होतो. ४. विषयासक्ती.

नाहीं काम । तों मनास मुरडूं सके नेम । ज्या नेमें मानिलें क्षेम । भोगत्यागीं. ॥ १४८३ ॥ तीव्र होतां कामना । कांहीं नियम नाठवे मना । हें कृष्ण सांगे अर्जुना । याउपरी. ॥१४८४॥ संग तोचि काम । काम तीव्र कामाचें नाम । तीव्र कामचि धाम । क्रोधाचें. ॥ १४८५ ॥ काम तेथें विघ्नकोटी । विघ्न होतां क्रोध पोटीं । उपजे ते वृत्ति खोटी । तमोगुणाची. ॥ १४८६ ॥ क्रोधें मोह उपजे । कार्य अकार्य तेव्हां न समजे । बरें वाईट कांहीं नुमजे, । नियमस्मृति मग कैंची ? ॥ १४८७ ॥ स्मृति नियमाची सांपडे । तरी भोगापासूनि मन मुरडे । मन मुरडतां ठायीं पडे । निश्चयात्मिका स्वबुद्धि. ॥ १४८८ ॥ ते स्मृतींत पडतां भ्रम । न होतां मनाचा संयम । नासे बुद्धि उत्तम । स्वहितनिश्चयाची. ॥ १४८९ ॥ स्वहिताच्या निश्चयें । गुरुशास्त्रबोधें स्वयें । इंद्रियमनाच्या जयें । होता मार्गीं मोक्षाच्या. ॥ १४९० ॥ तो भरला विषयवासनारानीं । फाडूनि खादला लांडग्यांनीं । एवंच जाला देहाभिमानी । यथापूर्व. ॥ १४९१ ॥ म्हणूनि त्यजूनि विषयाचें ध्यान । करूनि इंद्रियांचें दमन । आत्मस्वरूपीं योजूनि मन । स्थितप्रज्ञ व्हावें. ॥ १४९२ ॥ आतां निराकारीं मन। गोडी न घेतां इंद्रियदमन । करितांही बळेंकरून । इंद्रियें हरिती मनातें. ॥ १४९३ ॥ म्हणूनि म्हणे हरी । कीं मत्पर होय जरी । निर्गुणैक्यें सगुणध्यान करी । अनायासें आवरी इंद्रियें. ॥ १४९४ ॥ माझें सगुण ध्यान । करितां निर्गुणीं मन । होय तत्काळ उन्मन । आत्मज्ञानियाचें. ॥ १४९५ ॥ अन्यथा जरी आत्मज्ञ । जडही ब्रह्म कळतां सर्वज्ञ । इंद्रियें आवरूंही जाणे अभिज्ञ । तरी इंद्रियें मनातें हरितीच. ॥ १४९६ ॥ कीं विषयांचें घडे ध्यान। त्या ध्यानें थिटें[4] जालें साधन । तें हातींचें जातां इतर जन । तैसाच होतो यथापूर्व. ॥ १४९७ ॥ तदर्थ हे दोनी श्लोक । बोलिला श्रीउत्तमश्लोक । अत एव अव्यक्तोपासक[5] । क्लेशी बहुत हें पुढें बोलेल. ॥ १४९८ ॥ पुढें अध्याय[6] द्वादश । तेथें हाच उपदेश । कीं अव्यक्तोपासका क्लेश । होती बहु मोक्षमार्गीं. ॥ १४९९ ॥ आणि जे ज्ञानी होऊनि नर । सगुणभजनीं सादर । जे एथेंही बोलिला **'मत्पर'** । म्हणेल हे तरतील अनायासें. ॥ १५०० ॥ निर्गुणवादाभिमानी । एथें ऐसा अर्थ न मानी । पुसणार भेटतां निदानीं । अंगीकारी याचि अर्थ. ॥ १५०१ ॥ मत्परशब्दें निर्गुणपर । म्हणावा तरी

---

१. वळविण्यास, परतविण्यास. २. गूढ. ३. समान स्थिति, दमन. ४. आंखूड. ५. निर्गुणोपासक. ६. अध्याय १२ श्लोक ११–१७ पहा.

तो सर्वज्ञ नर । त्यासही इंद्रियें बळवंतें अनावर । तो निर्गुणपर नव्हे काय. ॥ १५०२ ॥ आधीं निर्गुणज्ञान । मग निर्गुणात्मत्वचिंतन । तदर्थ इंद्रियदमन । तें वश्य होतां स्थितप्रज्ञ. ॥ १५०३ ॥ तेव्हां तो निर्गुणतत्पर । जालाचि साधक नर । अव्यक्तोपासक जया सर्वेश्वर । पुढें द्वादशीं[1] वर्णील. ॥ १५०४ ॥ तशासही इंद्रियें । अनावरें बोलोनि निश्चयें । दुसऱ्या श्लोकीं म्हणतो स्वयें । कीं आंवरूनि असतो मत्पर. ॥ १५०५ ॥ यत्न करितांही अनावरें । स्वयेंचि हा बोलिला खरें । मागुती आवरूनि असतो हेंही बरें । स्पष्ट वदला स्वयेंची. ॥ १५०६ ॥ यत्न यासि दोनी । अभ्यास वैराग्य म्हणोनी । षष्ठाध्यायीं स्ववचनीं । श्रीकृष्णचि बोलेल. ॥ १५०७ ॥ अव्यक्तोपासक जन । स्वयत्नें जिंकू म्हणती मन । त्यांस दोनीच साधनें । अभ्यास आणि वैराग्य. ॥१५०८॥ तें न करितां सगुणभजन । इंद्रियें अनावरें हरिती मन । त्यांस घडेच विषयध्यान । क्रमें भ्रष्टती ऐसे. ॥ १५०९ ॥ भ्रष्टोनि कितीएक काळ । पुन्हा आरंभिती योगजाळ । द्वादशाध्यायीं बहुसाल । क्लेश वदेल ते हेची. ॥१५१०॥ आतां वैराग्याभ्यासपर । आणि भगवद्भजनीं तत्पर । त्यास म्हणे येथें **'मत्पर'** । तो इंद्रियें आवरूनि असतो. ॥ १५११ ॥ आतां सर्व यत्न करणार । तो वाखाणावा अज्ञानी नर । तेव्हां आत्मज्ञानी निर्गुणपर । आवरूनि असतो इंद्रियें म्हणावें. ॥ १५१२ ॥ तेव्हां अर्थ ऐसा होतो । कीं दरिद्री ज्या क्षुधेनें कष्टतो । तेंवी क्षुधा नासूनि असतो । अन्न भक्षूनि भूपती. ॥ १५१३ ॥ मुंगीस ओढितां कष्ट । तें हस्ती मोडितो काष्ठ । हें बोलणें दिसतें स्पष्ट । कीं सर्वज्ञ ऐसें न बोले. ॥ १५१४ ॥ आवरूं न सके अज्ञानी । तीं हीं इंद्रियें आवरी ज्ञानी । श्रीकृष्ण सर्वज्ञ होउनी । ऐसें वदेल हें न घडे. ॥१५१५॥ यालागीं न घडे अर्थ । पांडित्य याविषयीं व्यर्थ । तेव्हां अर्थ हाचि समर्थ । कीं मत्पर म्हणजे सगुणपर. ॥१५१६॥ आत्मज्ञानी नर । इंद्रियें आवरी अनावर । तो अनायासें आवरी मत्पर । कीं यत्नसिद्धिदाता मी तयाचा. ॥ १५१७ ॥ निर्गुणत्वें सगुणचिंतन । न करितां घडे विषयध्यान । त्याचें थितें[2] नासे साधन । क्रमें श्लोकद्वयोक्त. ॥ १५१८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । तें परिसोत सुज्ञ लोक । अर्थासहित. ॥ १५१९ ॥ ज्ञानी अभ्यासतत्पर । आणि कृष्ण म्हणे **'मत्पर'** । जरी इंद्रियें अनावर । अनायासें आवरती तयास.

---

१. बाराव्या अध्यायांत. २. असलेलें.

॥ १५२० ॥ न करितां सगुणचिंतन । अवश्य घडे विषयध्यान । तेव्हां आत्मज्ञानी साधक जन । अवश्य पावे भ्रष्टता. ॥ १५२१ ॥ एवं ज्ञानी सगुणतत्पर । जरी इंद्रियनिग्रहपर । तरीच स्थितप्रज्ञ नर । हें तृतीयप्रश्नीं सिद्ध जालें. ॥ १५२२ ॥ एथें अर्जुनास संदेह । कीं जों जिता प्रारब्धाचा देह । तोंवरी इंद्रियसमूह । आवरे कैसा? ॥ १५२३ ॥ त्यजील भोगेच्छा विचक्षण। परी न सुटे देहाचें रक्षण । ध्याननिष्ठ तरी क्षण । चाळीच इंद्रियें आपलीं. ॥ १५२४ ॥ कूर्मांगाचे दृष्टांतें । देहरक्षणार्थ इंद्रियांतें । विषयांत सोडील तेव्हां यातें । आढळतील रस विषयांचे. ॥ १५२५ ॥ गोडास गोड इंद्रियें । वाइटास वाईट म्हणती निश्चयें। तेव्हां अहंकारही स्वयें । तोंड दावी.॥१५२६॥ ऐशास सर्वेश्वर । निर्गुणत्वें सगुण सुंदर । नये ध्याना तेव्हां सगुणतत्पर । नव्हतां न घडे प्रसादही. ॥ १५२७ ॥ नव्हतां ईश्वर प्रसन्न । प्रसन्न होय न कधीं मन । ऐसें शंकतां अर्जुन । हे दोनी श्लोक बोलतो श्रीकृष्ण. ॥१५२८॥

**रागद्वेषवियुक्तैस्तु[1] विषयानिंद्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥**

अर्जुना विषयलालसा[2] । ज्यास त्यालाच अनर्थ ऐसा । जो सेवितो स्वात्मरसा । त्याचा विषयभोग आइक. ॥ १५२९ ॥ विषय लागला गोड । तरी तो न मानी कोडें[3] । कीं खाजवितां फोड । गोड वाटोनि दुःख दे. ॥१५३०॥ फेडूनि दोनी ऋणें । ज्यास साम्राज्यपदा जाणें । कां गुंतावें त्याणें । उभयपक्षीं ऋण फेडितां. ॥ १५३१ ॥ विषयसुखें पुण्यऋण । फेडितां न मानी ऐसें निपुण । कीं दावूनि येऊ हाचि गुण । ऋण करी हा मागुती. ॥ १५३२ ॥ विषय गोड वाटेना । परी न भोगितां प्रारब्ध सुटेना । दुष्ट धनिकाचें फिटेना । ऋण क्लेशभोगावांचुनी. ॥ १५३३ ॥ तें न फिटो ऋण । ऐसें न म्हणे विचक्षण । कीं ऋण फिटतां निपुण । साम्राज्यपदा जाणार. ॥ १५३४ ॥ कष्टी जाल्याविण । नव्हे फिटणार जें ऋण । द्वेष न करी निपुण । कीं जाणार साम्राज्यपदवीतें. ॥ १५३५ ॥ निर्गुणत्वें सगुण । भजतां जीवन्मुक्तपण। फिटतां प्रारब्धनिपुण । राग द्वेष कां मानी? ॥ १५३६ ॥ जो रागद्वेषयुक्त । तो केंवी होय जीवन्मुक्त? । याकारणें रागद्वेषरहित । इंद्रियसमूह ज्ञानियाचा. ॥ १५३७ ॥ गोड वाटतां विषय । पुन्हा भोगायाचा निश्चय । न करितां

---

१. परंतु जो पुरुष मनोजयी असतो तो रागद्वेषवियुक्त आणि आत्मवश्य अशा इंद्रियांनीं विषय सेवीत शांतीतें पावतो. २. अतिशयित इच्छा. ३. कौतुक.

वीतराग होय । समूह इंद्रियांचा. ॥ १५३८ ॥ गोड न वाटतां विषय । तो वाईट म्हणूनि द्वेष निश्चय । न करितां विगतद्वेष होय । समूह इंद्रियांचा. ॥ १५३९ ॥ रागानुराग म्हणजे प्रीती । द्वेष वाईट म्हणे याप्रती । हे दोनी इंद्रियांस नसती । जयाचिया. ॥ १५४० ॥ जो इंद्रियग्राम स्ववश । त्या इंद्रियां जरी विषयप्रवेश । आत्मत्वें सगुण हृषीकेश । ध्यातां पावे तत्प्रसादा. ॥ १५४१ ॥ मन हृषीकेशाकडे । प्राप्त विषयही भोगी रोकडे । रागद्वेषरहित निवडे । इंद्रियग्राम भोगार्थ. ॥ १५४२ ॥ ऐशा इंद्रियेंकरूनि योगी । प्रारब्धलब्ध विषय भोगी । मन वश जयालागीं । केलें तैसें तें होय. ॥ १५४३ ॥ निर्गुणत्वें सगुणध्यान । करितां ऐसीं इंद्रियें मन । ज्याचीं त्यास जगज्जीवन । प्रसन्न होय. ॥ १५४४ ॥ ज्या प्रसादें जीवन्मुक्तता । ज्ञानी पावे भजतां । त्या प्रसादातें तत्त्वतां । तो पावतो. ॥ १५४५ ॥ '**प्रसाद**' म्हणजे प्रसन्नता । ज्या प्रसादें जीवन्मुक्तता । द्यावी वाटे अनंता । '**प्रसाद**' एथें या नांव. ॥ १५४६ ॥ प्रसाद होतां ये रीती । त्याची होय कैसी स्थिती । ते सांगतो स्वयें **श्री**पती । या दुसरिया श्लोकीं. ॥ १५४७ ॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

प्रसाद पावतां ज्ञानी । होय सर्व दुःखाची हानी । चित्त त्या प्रसादेंकरूनी । प्रसन्न ज्याचें. ॥ १५४८ ॥ त्या प्रसन्नचित्ताची बुद्धि । पावते प्रतिष्ठा सिद्धि । जीवन्मुक्ति सुखसमृद्धि । जे बुद्धि त्याची अनुभवीं. ॥ १५४९ ॥ दुःखाचें बीज वासना । ज्या वासनेनें लिंगदेहरचना । ते निःशेष जातां असेना । दुःखलेश. ॥ १५५० ॥ वासना जातां चित्त । स्वरूपीं स्थिर निश्चित । तें स्वरूप सर्वगत । हाचि निश्चय बुद्धीचा. ॥ १५५१ ॥ चैतन्य सर्वगत असे । तोचि आत्मा सर्वत्र गवसे । तेंव्हां चित्तास न दिसे । प्रतिबिंबांश. ॥१५५२॥

---

१, गेला आहे राग (अनुराग—प्रीति) ज्याचा. २. मनाच्या प्रसन्नतेला. ३. दैवप्राप्त. ४. चित्तप्रसादानें काय होतें हें पुढील श्लोकांत वर्णिलें आहे:–'चित्तस्य हि प्रसादेन हन्ति कर्म शुभाशुभम् । प्रसन्नात्मात्मनि स्थित्वा सुखमक्षय्यमश्नुते' पंचदशी–योगानंद–श्लो० १४.] याचा भावार्थ:–चित्ताच्या प्रसादानें पुण्यप्रद अथवा पापप्रद कर्म नष्ट होतें; आणि प्रसन्नचित्त प्राणी ब्रह्माचे ठायीं राहून अक्षय्यसुख पावतो. ५. जेव्हां शांति प्राप्त होते तेव्हां त्याच्या सर्व दुःखाचा नाश होतो, कारण ज्या पुरुषाचें चित्त शांत असतें त्याची बुद्धि लवकर स्थिर होते.

समुद्राचे तीरीं । दरडीच्या[1] रूपें भूमीवरी । दरडीचें प्रतिबिंब नीरीं[2] । तें न दिसे जल स्पर्शतां दरडीतें. ॥ १५५३ ॥ भरतें[3] येतां दरडीवरी । पाणी चढतां प्रतिबिंब नीरीं । न दिसे सर्वत्र खरी । जलाधार भूमि एक. ॥ १५५४ ॥ तैसें चित्तांत प्रतिबिंब । तें चित्त देखे सर्वगत बिंब । ते वेळे त्यांत अवलंब[4] । प्रतिबिंबाचा दिसेना. ॥ १५५५ ॥ चैतन्यें दोन्ही सारिखीं । प्रसन्नचित्त हें पारखी । या निश्चयें नांव आणखी । बुद्धि म्हणोनि तेंचि पावे चित्त. ॥ १५५६ ॥ दीप पहात होती । ते दृष्टि देखे सूर्याप्रती । सूर्यप्रभेनेंच जगती[5] । पाहों लागे. ॥ १५५७ ॥ सूर्यप्रकाशें सृष्टि । देखतां दीप नाठवे दृष्टी । सर्वगतीं चित्ताची मिठी । पडतां नाठवे प्रतिबिंब. ॥ १५५८ ॥ आत्मा तो सर्वगत । ऐसा निश्चय प्रसन्नचित्त । करितां त्यातेंचि निश्चित । बुद्धि निश्चयात्मिका म्हणिजेते. ॥ १५५९ ॥ सत्त्वाचे चारी प्रकार । चित्त बुद्धि मन सात्विकाहंकार । निश्चयरूप निर्धार । बुद्धि म्हणावी ते वृत्ति. ॥ १५६० ॥ ते सर्वत्र आत्माचि पाहे । कीं सर्वही कार्य तें कारणचि आहे । अलंकार आहे म्हणणें न साहे । आत्मसुवर्णचि जडालंकाररूपी देखे. ॥ १५६१ ॥ त्यास ब्रह्मत्व निर्गुण । आणि ईश्वरत्व सगुण । जीवोपाधी त्रिगुण । निर्गुण दिसती हे सर्व. ॥ १५६२ ॥ या दृष्टीस अंतर । पाडी विषयवासना असार[6] । ते बुद्धि जातां निराकार । आकारमात्रीं देखे तें. ॥ १५६३ ॥ तेव्हां बुद्धि प्रतिष्ठा पावते, । कीं स्वरूपींच स्थिर राहते । ज्ञानियास हे सिद्धि होते । प्रसादें सगुणाच्या. ॥ १५६४ ॥ तो प्रसाद सगुणध्यानें । तें ध्यान निर्गुणज्ञानें । जो वर्णिला जगज्जीवनें । **'मत्पर'** म्हणोनि तो ऐसा. ॥ १५६५ ॥ येथें ज्ञानाभिमानी । म्हणती कीं जो जाला ज्ञानी । तो कां सगुणध्यानीं । लावील मन? ॥ १५६६ ॥ प्रसाद पूर्वश्लोकीं । कृष्ण वदला त्यास म्हणती कीं । चित्त विषयवासना टाकी । तो प्रसाद चित्ताचा. ॥ १५६७ ॥ भगवत्प्रसादाविण । चित्तप्रसन्नता पावे कोण? । ऐसें पुसतां म्हणती आपण । कीं हें ज्ञानाहूनि पूर्वी. ॥ १५६८ ॥ मागुती पुसावी गोष्टी वरी । कीं ज्ञान जाल्यावरी । चित्तप्रसाद कां तरी । पुन्हा होणें लागला. ॥ १५६९ ॥ रागद्वेषरहितें । इंद्रियेंकरूनि विषयांतें । सेवितो तैसाच सगुणातें । भजणें हा कां यत्न करूं नये? ॥ १५७० ॥ चित्तप्रसादोपाय । करितां भजला हरीचे पाय । तरी त्यास दोष काय । कीं अंगीं न करा हा अर्थ? ॥ १५७१ ॥ ज्ञानी न भजे सगुण ।

१. तुटलेली जमीन. २. पाण्यांत. ३. भरती. ४. आश्रय. ५. पृथ्वी. ६. खोटी.

तरी उपाय केले ते काय निर्गुण । काय बोलतां आपण म्हणूनि निपुण । श्रुतियुक्तीसही विरुद्ध. ॥ १५७२ ॥

श्रुति—'**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥**'

भक्ति देवाचे ठायीं । जैसी तैसीच गुरूचे पायीं । या दों भक्तींच्या उपायीं । गुरु बोलिला ते अर्थ प्रकाशती. ॥१५७३॥ दशोडीच्या[1] रूपें एक । तंतु दावितो व्यापक । पटीं तैसें कौतुक । जडीं चैतन्याचें दाखवी. ॥ १५७४ ॥ सुवर्णाचें पीतत्व[2] । दावूनि भूषणीं व्यापकत्व । दाखवी तैसें चिदात्मत्व[3] । जडीं दावी. ॥ १५७५ ॥ इत्यादि नाना अर्थ । जे गुरु बोलिला समर्थ । ते देवगुरुभजनें यथार्थ । अनुभवी याला प्रकाशती. ॥ १५७६ ॥ आधीं होय उपदेश । मग गुरु आणि हृषीकेश । भक्ति त्यांची करितां, प्रकाश । होय त्या उपदेशरहस्याचा. ॥ १५७७ ॥ असो पुढें द्वादशीं । बोलणें विशद[4] येविशीं । ज्ञान जालियाही गुरुदेवासी । भजतां **स्थितप्रज्ञ**[5] होइजे. ॥ १५७८॥ आत्मा कळतांचि आत्मज्ञ । जरी होय तो स्थितप्रज्ञ । तरी हे उपाय **कृष्ण** सर्वज्ञ । कां वदे त्याला? ॥ १५७९ ॥ न भजतां श्रीकृष्णाचे पाय । जितके वर्णिले उपाय । ते सकळही होती अपाय । क्लेश अधिक हे अवगुणोपासकां. ॥१५८०॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले **उत्तमश्लोक** । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । आइकोत. ॥ १५८१ ॥ ज्यास जालें आत्मज्ञान । निर्गुणत्वें सगुणध्यान । त्या प्रसादें चित्त प्रसन्न । तेव्हां प्रतिष्ठा बुद्धीची. ॥ १५८२ ॥ यास साधनभूतें । इंद्रियें रागद्वेषरहितें । हें आइकोनि **अर्जुना**तें । वाटलें ऐसें. ॥ १५८३ ॥ कीं जालें आत्मज्ञान । तेणेंकरूनि सगुणध्यान । ध्यानबळें करावें इंद्रियदमन । रागद्वेष मग कां उपजती? ॥ १५८४ ॥ आत्मज्ञानें ध्यान । करितां कृपा कृपाघन । करील तेव्हां इंद्रियदमन । सहजचि होणार. ॥ १५८५ ॥ हा भाव **उत्तमश्लोक** । जाणोनि बोलतो हा श्लोक । कीं इंद्रियजय हाचि एक । उपाय जीवन्मुक्तीसी. ॥ १५८६ ॥

**नास्ति[6] बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम्? ॥ ६६ ॥**

---

१. दशा; आंचळी. २. पिंवळेपण. ३. चिदात्मपणा. ४. स्पष्ट. ५. स्थिरता. ६. ज्यानें मनोनिग्रह केला नाहीं, त्याची बुद्धि स्थिर नसते, जो अयतेंद्रिय आहे त्यास भावना नाहीं, ज्याला भावना (ध्यान) नाहीं, त्याला शांति नाहीं, ज्याला शांति नाहीं त्याला सुख कोठून असणार?

रागद्वेषविरहित । तो इंद्रियग्रामसंयुक्त । ज्याचा इंद्रियग्राम अयुक्त । [1]**अयुक्त** म्हणावा तो पुरुष. ॥ १५८७ ॥ अयुक्त नरा नसे बुद्धि । बुद्धि जया तया ज्ञानसिद्धि । ज्ञान असोनिही असिद्धि । अयुक्त नरा ज्ञानाची. ॥ १५८८ ॥ मथूनि काष्ठाचे वेगळा । जोंवरी न काढिजे [2]अनळा । तों काष्ठीं असोनि दाहककळा । न दिसे तया अग्नीची. ॥ १५८९ ॥ जों न जाळी काष्ठातें । तों काष्ठीं नाहींच म्हणावें त्यातें । विझों लागे लागोनि काष्ठातें । तोही तैसा. ॥ १५९० ॥ वारा जाला निश्चळ । पेटतां राहिला अनळ । काष्ठीं असोनि त्यास फळ । काय जो विझों लागला? ॥ १५९१ ॥ आत्मविद्याग्नि ऐसा । काढिला काष्ठांतूनि अग्नि जैसा । तो बुद्धीस लागला तैसा । अग्नि जैसा काष्ठासी. ॥ १५९२ ॥ [3]इंद्रियसंयमसमीर । न लागतां विद्या[4]वैश्वानर । विझों लागे तो **अयुक्त** नर । नसे म्हणावी बुद्धि तया. ॥ १५९३ ॥ इंद्रियें पिसीं भोगें । बुद्धि लागली तयांमागें । [5]अविद्यासंस्कार विद्यायोगें । न नासो बुद्धि अयुक्ताची. ॥ १५९४ ॥ ये रीती अयुक्त । बुद्धिहीन विषयासक्त । म्हणसी सगुण नित्यमुक्त । ध्यातां तो इंद्रियें आवरील. ॥ १५९५ ॥ मग वश होईल बुद्धि । तरी अयुक्तास न घडे ज्ञानसिद्धि । जों नव्हे इंद्रियशुद्धि । तों [6]ध्यान कैसें बाणेल ? ॥ १५९६ ॥ जों न घडे ध्यान । तों शांतिपदीं न बसे मन । शांतीवांचूनि नसे नि[7]धान । दुसरें सुखाचें. ॥ १५९७ ॥ अशांतास नसे सुख । विषयासक्तास सर्वत्र दुःख । इंद्रियजयें शांतिसुख । देखतां सुखचि सर्वत्र. ॥ १५९८ ॥ भावनाशब्दें ध्यान । या श्लोकीं सर्वही जन । वाखाणिती परी ज्ञणीं मन । मानी ध्यान निर्गुणाचें. ॥ १५९९ ॥ भाविजे ते [8]भावना । म्हणजे सगुणध्यानकल्पना । [9]भावनाशब्दें घडेना । निर्गुणध्यान. ॥ १६०० ॥ कल्पवेल सकळ । परी न कल्पवे चैतन्य केवळ । स्वतःसिद्ध पाहतां निवळ । कल्पक मन होय उन्मन. ॥ १६०१ ॥ आणखी एथें पांडित्य । केलें तरी तें असत्य । असो तें बोलावें अगत्य । परी [10]ग्रंथ वाढेल बहु फार. ॥ १६०२ ॥ एवं इंद्रियें आवरी । सगुणध्यान बाणे तरी । तें ध्यान मांडी जरी । इंद्रियें आवरती अनायासें. ॥ १६०३ ॥ एवं विषयाचें

---

१. असमाहितांतःकरण (शंकराचार्य). २. अग्नीस. ३. इंद्रियांची समान स्थिति करणारा वारा. ४. ज्ञानाग्नि. ५. मायेचा किंवा अज्ञानाचा संस्कार. ६. भावना, ब्रह्मध्यान. ७. ठेवा. ८. ही 'भावना' शब्दाची व्याख्या आहे. ९. आत्मत्वाभिनिवेश. १०. ग्रंथविस्तारभयाचें हें या ग्रंथांत पहिलेंच उदाहरण होय.

भोजन । इंद्रियें करितां सावध मन । नसतां अनर्थसाधन । होणार म्हणतो या श्लोकीं. ॥ १६०४ ॥

**[1]इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥**

राग द्वेष नसोनिही । इंद्रियें सेविती विषय कांहीं । तथापि मन त्या प्रवाहीं । पडों न दीजे. ॥ १६०५ ॥ कीं एकाही इंद्रियाकडे । जरी मनाची उडी पडे । स्वरूपाहूनि बुद्धि [2]मुरडे । होय विषयीं आसक्त. ॥ १६०६ ॥ एकचि इंद्रिय परी । [3]प्रज्ञा ऐसी हरी । कीं वारा जैसा सागरीं । नाचवी [4]नाव. ॥ १६०७ ॥ अगा बुद्धि म्हणोनि नांव । परी ते भवसमुद्राची नाव । जरी विषयवासना [5]कुभाव । वारा सुटेना. ॥ १६०८ ॥ वासनेवेगळा विषयवारा । तो [6]प्रारब्धलब्ध इंद्रियांचा चारा । तथापि मन [7]कर्णधार बरा । सावध असावा. ॥ १६०९ ॥ तो होतां असावध । जालाच नावेचा [8]वध । प्रारब्धाचा तों संबंध । भोगिल्यावांचून सुटेना. ॥१६१०॥ मन एक इंद्रियांकडे । लागतां ऐसा अनर्थ जोडे । जरी सर्वांवरी उडी पडे । तरी घडेल तें काय सांगावें. ॥ १६११ ॥ तृतीय प्रश्नाच्या उत्तरीं । प्रसंग आला एथवरी । कीं अनायासें आवरी । इंद्रियें **स्थितप्रज्ञ**. ॥१६१२॥ एवं सिद्धांत हाचि एक । म्हणूनि बोलोनि उत्तमश्लोक । त्या प्रश्नांतीं हाचि श्लोक । सिद्धांत करूनि बोलतसे. ॥१६१३॥

**[9]तस्माद्यस्य महाबाहो ! निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

अर्जुना ! **तस्मात्** कारण । सर्व विषयांपासूनि [10]गण । इंद्रियांचा आटोपला सुलक्षण । त्याची प्रज्ञा [11]प्रतिष्ठा पावली. ॥ १६१४ ॥ तरीं तूंही हा यत्न करीं । ऐसा भाव अंतरीं । अगा! **महाबाहो**! म्हणे **हरि** । याचि भावें. ॥ १६१५ ॥ कीं मोठे तुझे बाहुदंड । शत्रु वश करिसी उदंड । ते काय गा! हा प्रचंड । वश करी ग्राम इंद्रियांचा. ॥ १६१६ ॥ आतां स्थितप्रज्ञ

---

१. वारा ज्याप्रमाणें नावेला पाण्यांत पाहिजे तिकडे ओढून नेतो, त्याप्रमाणें विषयसेवनार्थ भटकणाऱ्या इंद्रियांचे मागून जें मन जातें तें पुरुषाच्या बुद्धीला ओढून नेतें. २. वळते. ३. बुद्धि. ४. नौका. ५. दुर्वासना. ६. दैवानें प्राप्त झालेला. ७. सुकाण्या. ८. नाश. ९. यासाठीं हे महाबाहो अर्जुना! ज्या पुरुषाचीं इंद्रियें इंद्रियांच्या विषयांपासून निवृत्त झालीं आहेत, त्याची बुद्धि स्थिर असते. १०. समुदाय. ११. स्थैर्य.

कैसा । वर्तती चौथा प्रश्न ऐसा । या प्रत्युत्तरीं ज्ञानठसा । उत्तमश्लोक दावी या श्लोकीं. ॥ १६१७ ॥

**या[1] निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥**

तो वर्तती ऐसा अगा । कीं स्वस्वरूपीं नित्य जागा । चित्तचैतन्ययोगा[2] । न विसरे कधीं. ॥ १६१८ ॥ अगा ! निद्रा तेचि राती । दिवस तोचि जागृती । तो जागतो कैसा सुमती । तें सांगतों. ॥ १६१९ ॥ ब्रह्मनिष्ठा **अ**र्जुना । ऐसी जाली सर्वां जनां । कीं राती निजेला त्याच्या नयना । दिसेना कांहीं. ॥ १६२० ॥ ब्रह्मनिष्ठां सर्वांस राती । त्या राती याला जागृती । आवरूनि इंद्रियांच्या गती । स्वस्वरूपीं जागवी बुद्धीतें. ॥ १६२१ ॥ हा जगत्कारण चैतन्यसूर्य । जग मृगजळ याचें कार्य । दिवस रातीं आश्चर्य । दोनी न या सूर्यासी. ॥ १६२२ ॥ ब्रह्मनिष्ठां लोकांस राती । तेथें जागा हा आत्ममती । विषयनिष्ठेंत सर्वां जागृती । ते निशा[3] यास, दिवस लोकांतें. ॥१६२३॥ ते विषयनिष्ठा हा नेणे । परी विषयपटांतील तंतु हा जाणे । ब्रह्म सर्व हा बोध बाणे[4] । तई कैसा न देखे विषयांतें. ॥ १६२४ ॥ तथापि विषयाची वासना । तिचा विसर याच्या मना । ते विषयनिष्ठा ज्ञाननयना । दिसेना याच्या. ॥१६२५॥ एवं विषयनिष्ठा यासी राती । कीं वासनारहित याची मती । तथापि न निजे कीं स्वरूपीं जागृती । विषय देखे ब्रह्मत्वें. ॥ १६२६ ॥ विषय सर्वही जाणे । परी त्यांतील कामलोभादि नेणे । स्थितप्रज्ञता बाणे । तयासी. ॥ १६२७ ॥ नेत्रीं दिसे अंधकार । परी अंधकारीं जे जे प्रकार । ते न दिसती तैसे विकार । विषय दिसोनि त्यांतील न दिसती. ॥ १६२८ ॥ या भावें कृष्ण म्हणे । कीं **'सा निशा पश्यतो मुनेः'** । विषय देखोनि वासना नेणे । न दिसे तमीं जेंवी कांहीं. ॥ १६२९ ॥ एवं विषय मात्र दिसे । त्यावरी भोगवासना नसे । दृष्टि कारणींच वसे । पाहतां गवसे कार्यही. ॥ १६३० ॥ जरी दिसती विषय । मन नसे वासनामय । कीं हा संयमी[5] कोणी इंद्रिय । न सोडी वासनेनें. ॥ १६३१ ॥ दृष्टींत वासना न राहे । आणि ब्रह्मभावें विषय पाहे । कीं मनन

---

१. संयमी (पुरुष) जेव्हां जागतो तेव्हा सर्व भूतांची रात्र असते आणि जेव्हां सर्व भूतें जागृत असतात, तेव्हां पाहणाऱ्या मुनीची रात्र असते. २. बुद्धि आणि आत्मा यांच्या संयोगास. ३. रात्र. ४. ठसे. ५. इंद्रियें आवरून वर्तणारा.

निदिध्यास[१] घडला आहे । मुनि म्हणे हरि यास्तव. ॥ १६३२ ॥ सुवर्णक्रय-विक्रय[२] करी । अलंकार त्या सराफाच्या घरीं । वेश्यांची दृष्टि अलंकारीं । सराफ लक्षी सोनें. ॥१६३३॥ वेश्या देखे सरी । गळां घालायाची इच्छा करी । कांकणें देखतां करीं । लेऊं पाहे. ॥१६३४ ॥ सराफ सोनेंचि लक्षी । देखोनि आकारातें उपेक्षी[३] । जन भोगचि अपेक्षी[४] । ज्ञानी पाहे ब्रह्मत्वें. ॥ १६३५ ॥ स्तनपान करितां बाळ । पिता न घोटी लाळ । पशु धांवे तृण कोमळ । विषय न वाटे मनुष्यासी. ॥ १६३६ ॥ किंबहुना ओकिला ओक । श्वानें मक्षिका भक्षिती अनेक । घडोनीही त्याचा अवलोक । काय वासना उपजेल. ॥१६३७॥ यालागीं तो संयमी । म्हणे, वैकुंठनायक स्वामी । विषय देखोनीही श्रमीं । न पडे भोगवासनेच्या. ॥१६३८॥ अर्जुना ! पुससी कीं तो। **स्थितप्रज्ञ** कैसा वर्ततो। तरी ब्रह्मचि जग पाहतो । विनावासना संयमी. ॥१६३९॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त अभिज्ञ लोक । आइकोत. ॥१६४०॥ संयमी म्हणजे इंद्रियें । आवरूनि वर्ते स्वयें । हें आइकोनि धनंजयें । मानिली शंका ये स्थळीं. ॥१६४१॥ कीं इंद्रियें आवरूनि वर्ते । त्याणें विषय टाकिले पुरते । प्रारब्धभोग ते तों परते । न होणार. ॥ १६४२ ॥ भोग इंद्रियग्रामीं । होतां म्हणवे कैसा संयमी । याचें त्रैलोक्यनाथ स्वामी । समाधान करितो. ॥ १६४३ ॥ कीं काशीस पावला । तो काय म्हणावा वाट चुकला । विषय भोगूनीही चढला । शांतिपदीं. ॥ १६४४ ॥ वाट चुकवी वासना । ते ज्या पुरुषा असेना । त्याणें भोगिले विषय नाना । तरी पावेच तो शांति. ॥ १६४५ ॥ भोगीं वासनारहित । तो संयमीच जाणावा निश्चित । या प्रकारें अच्युत । समाधान करितो या श्लोकीं. ॥ १६४६ ॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥**[५]

अर्जुना ! नद्या कोटी कोटी । निघती समुद्राचे पोटीं । तरी स्वमर्यादा जे तटीं । न बुडवी तीरें. ॥ १६४७ ॥ ऐसी प्रतिष्ठा अचळ । महानद्यांस न

---

१. पुनःपुनः चिंतन. २. विकत घेणें आणि विकत देणें. ३. दुर्लक्ष करी. ४. इच्छी. ५. समुद्रामध्यें उदकाचा सतत प्रवाह चालला असून तो समुद्र अचलमर्यादायुक्त असतो, तसा ज्याच्या ठायीं सर्व कामनांचा प्रवेश होतो तोच पुरुष शांति पावतो, कामेच्छु पुरुषाला शांति प्राप्त होत नाहीं.

करवे चंचळ । त्यांत पर्जन्यबिंदूचें जळ । प्रवेशे जैसें. ॥ १६४८ ॥ तैसा जो आत्माराम । प्रवेशती त्यांत सकळ काम । तरी वासनायुक्त इंद्रियग्राम । नव्हे त्याचा. ॥ १६४९ ॥ त्या निजसुखाच्या समुद्रा । आत्मतृप्तीची नित्य मुद्रा । ते न लंघी भोगितां क्षुद्रा । विषयभोगातें. ॥ १६५० ॥ संपूर्ण पृथ्वीचीं नीरें । महानद्या एकसरें । मिळतां अचळ असिजे सागरें । जे रीतीं. ॥ १६५१ ॥ सार्वभौम रायापासुनी । देव आणि देवांचे गुरु मुनी । यांचीं सुखें यांत मेळवूनी । सुख ब्रह्मपदवीचें. ॥ १६५२ ॥ ब्रह्मनिष्ठाच्या सुखाचा अंश । तयापुढें हे दिसती लेश । म्हणोनि विस्तारें हा उपदेश । **ब्रह्मवल्ल्युपनिषदीं.** ॥ १६५३ ॥ या आनंदें तृप्त । ते तृप्ति ज्याची गुप्त । त्यास हें विषयसुख आप्त । काय वाटे. ॥ १६५४ ॥ ऐसा आपूर्यमाण अचळ । त्यांत विषयपर्जन्यजळ । प्रवेशतां होईल चंचळ । हें काय घडे ? ॥ १६५५ ॥ तो शांतीतें पावतो । पावतो म्हणजे अनुभवितो । ऐसा होऊनि मग तो । पुढें शांति पावतो हें न म्हणवे. ॥ १६५६ ॥ याचेंच नांव शांति । कीं ऐशा भोगांत अचळ मति । शांतीची त्यास उरली प्राप्ति । हें घडे तरी घडे तेंही. ॥ १६५७ ॥ जो नसे ऐसा संयमी । जो आसक्त इंद्रियग्रामीं । तो न अनुभवी कामकामी । या शांतीतें. ॥ १६५८ ॥ तो जैसा क्षुद्र ओहळ । ज्यास स्वयें नाहीं जळ । तैसें निजसुख केवळ । ठावें नसे कामकामिया. ॥ १६५९ ॥ वाहों लागे ओहळ । पडतां विषयमेघांचें जळ । भेटतां नदीजळ पुष्कळ । उफराटा वाहों लागतो. ॥ १६६० ॥ स्वयें भोगूं लागे विषय । वरी कांहीं धनाचा संचय । गर्वें फुगोनि धनाश्रय । मानूनि चाले उफराटा. ॥ १६६१ ॥ असो तो कामकामी । एवं पूर्वश्लोकोक्त संयमी । त्यास संतांचा स्वामी । समुद्र म्हणे. ॥ १६६२ ॥ आत्मानंदेंचि परिपूर्ण । ब्रह्मादिसुखें पूर्यमाण । तो विषयांचे कण । भोगितां मानील सुख काय ? ॥ १६६३ ॥ ब्रह्मादिसुख पाहे । तरी स्वसुखांशाचीही सरी न लाहे । तो तों उगलाच राहे । मी ऐसा ऐसें म्हणेना. ॥ १६६४ ॥ आदींच निजसुखें पूर्ण । ऐशा समाधानें पूर्यमाण । तो भोगितां विषयांचे कण । काय सुखी म्हणेल ? ॥ १६६५ ॥ एवं भोगिले विषय । तरी तो संयमी हा निश्चय । या गोष्टीनें धनंजय । समाधान पावला. ॥ १६६६ ॥ परी म्हणे हे पदवी । साधकें कैसी पावावी । हा मनोभावही गोसावी । जग-

---

१. लहानसान. २. परिपूर्ण. ३. भोगाची इच्छा धरणाऱ्याला. ४. पूर्ण.

द्धुरु समजला. ॥ १६६७ ॥ म्हणोनी सिद्धाचें लक्षण । तेंचि साधकास साधकपण । साधन सांगेल आपण । या श्लोकीं. ॥ १६६८ ॥

**वि[1]हाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

टाकोनि सकळ काम । स्वरूपसुखें सहज निष्काम । स्पृहे[2]रहित इंद्रियग्राम । जो ऐसा वर्तवी. ॥ १६६९ ॥ कोठें नसे ममता । देहीं नसे अहंता । तो शांतीतें तत्त्वतां । स्थितप्रज्ञ अनुभवी सिद्ध. ॥ १६७० ॥ साधक टाकोनि काम । विचारें होय जो निष्काम । करूनि निस्पृह इंद्रियग्राम । जो पुरुष वर्ततो. ॥ १६७१ ॥ सर्वत्र मोडितो ममता । टाकितो देहींची अहंता । तो शांतीतें तत्त्वतां । अगा ! पावतो. ॥ १६७२ ॥ हे स्थितप्रज्ञाची स्थिति । जे उपदेशिली अर्जुनाप्रति । तिचा महिमा श्रीपति । वर्णितो या श्लोकीं. ॥ १६७३ ॥

**ए[3]षा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**

पार्था ! हे तुजप्रति । सांगितली स्थितप्रज्ञाची रीति । हे परब्रह्मींची स्थिति । जाण तूं. ॥ १६७४ ॥ हे ज्यास त्यास आहे । परंतु बुद्धि ऐसें न पाहे । पाहे तरी न राहे । ब्रह्मस्थितींत. ॥ १६७५ ॥ ब्रह्म आत्मा आपुला । स्थितप्रज्ञे नाहीं आणिला । इतरीं नाहीं गमाविला । परी बुद्धि त[4]न्मय स्थितिप्रज्ञाची. ॥ १६७६ ॥ ब्रह्मीं नसे मूळवासना । कैंची सद्य भोगेच्छा कामना, । बुद्धि कोणाची ओळखेना । ब्रह्म ऐसें. ॥ १६७७ ॥ जरी ओळखे बुद्धि स[5]त्त्व । आत्मत्वें शुद्ध ब्रह्मतत्त्व । तरी पूर्वसंस्कारें अहंता म[6]मत्त्व । उपजवी विषयवासना. ॥ १६७८ ॥ धरी वैराग्य, करी अभ्यास । सगुणप्रसादें त्या निर्गुणास । झोंबोनि बुद्धि आपणास । विसरोनि ब्रह्मीं ब्रह्म होय. ॥ १६७९ ॥ तरी जैसें निर्धर्म । त्रिगुणरहित परब्रह्म । टाकितां वेगळे रज तम । बुद्धि ब्रह्मीं ब्रह्म होय. ॥ १६८० ॥ तेव्हां ब्रह्मस्थिति । ते पावली ह्मणावी शुद्धम[7]ति । तेथें पावतां तृप्ति । मग न मोहे कदापि. ॥ १६८१ ॥ कीं अमृताचे सागरीं । बुडी दिधलिया उपरी । तरंग बु[8]द्बुद कोणेपरी । वेगळें न देखे. ॥ १६८२ ॥ हे

---

१. जो पुरुष सर्व कामना टाकून, निःस्पृह, निर्मम आणि अहंकारशून्य राहतो, त्याला शांति प्राप्त होते. २. इच्छारहित. ३. हे अर्जुना ! ही ब्राह्मी स्थिति आहे. ही प्राप्त झाल्यावर पुरुषाला कधींही मोह होत नाहीं. ४. तद्रूप, ब्रह्मरूप. ५. सत्त्वगुण. ६. मीपणा. ७. बुद्धि. ८. बुडबुडे.

स्थिति पावल्या उपरी । पुरुष मोहेल कां परी । यालागीं म्हणतो श्रीहरी । कीं तो मग कधीं न मोहे. ॥१६८३॥ ब्रह्म वाटतां आपण । तेथें न वासना न मीपण । त्या स्थितीमाजीं निपुण । राहतां मोहे कां परी ?॥१६८४॥ ऐसा सिद्ध महाराज । साधकें धरावी ऐसी लाज । कीं आपण ब्रह्म कळोनि काज । वासनेचें कैसें धरावें ? ॥ १६८५ ॥ रजतमरहित सत्त्व । करूनि आपलें निर्गुणत्व । तेथें बुद्धीचें स्थिरत्व । संपादावें सर्वथा. ॥ १६८६ ॥ साम्राज्यसिंहासना । पावोनि भिक्षेचीच वासना । धरितों मी ऐसा लाजेना । तत्त्वज्ञही तो अज्ञतुल्य. ॥ १६८७ ॥ आतां म्हणसी यास । बहु काळ करावा अभ्यास । करितां बहु आयास । या स्थितीस पावावें. ॥ १६८८ ॥ तरी तैसीही नव्हे दुर्लभ । हे ब्रह्मस्थिति अतिसुलभ । म्हणूनि म्हणतो श्रीवल्लभ । या उत्तरार्धें. ॥ १६८९ ॥

**स्थित्वास्यामंतकालेऽपि[1] ब्रह्म निर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥**

**इति[2] श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥**

अगा! अंतकाळीं एक घडी । विषयवासनेंत न टाकी उडी । स्वस्वरूपीं मन दे बुडी । पावे तोही कैवल्य. ॥ १६९० ॥ अगा! काळाचाही काळ । आपण परब्रह्म केवळ । ऐसें न कळोनि फटकाळ । पडती मुखीं मृत्यूच्या. ॥ १६९१ ॥ अर्जुना! देहावसानीं । भाग्यें भेटे ब्रह्मज्ञानी । त्याच्या मुखें आत्मत्व समजोनी । एक घडी राहे या स्थितींत. ॥ १६९२ ॥ तोही जेव्हां कैवल्य लाहे । यांतही काय श्रम आहे । जो बहुकाळ या मार्गीं राहे । तो तों जितांच होय मुक्त. ॥ १६९३ ॥ परी हा अंतकाळ । अगा! उशाचा भुकेला व्याळ[3] । दूरि मानी तो फटकाळ । मुमुक्षु न म्हणवे. ॥ १६९४ ॥ मोक्ष इच्छितो मुमुक्षू । जैसा भोजन अपेक्षी बुभुक्षू । अतिशीघ्र लागे भक्षूं । सकळ भोग टाकुनी. ॥ १६९५ ॥ ऐसी जया जाली मुमुक्षा । मृत्यु समीप त्या दक्षा । वाटतो सर्व उपेक्षा । करी, धरी अपेक्षा या स्थितीची. ॥१६९६॥ स्थिति येउनी हाता । वांचला तरी जीवन्मुक्तता । तत्काळ देह पडतां अव-

---

१. ही स्थिति अंतकाळीं जरी प्राप्त झाली तरी तो पुरुष ब्रह्माचे ठायीं निर्वाण पावतो. २. याप्रमाणें श्रीमद्भगवद्गीतानामक उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत योगशास्त्रांतील कृष्णार्जुनसंवादाचा ‘सांख्ययोग’ नामक द्वितीय अध्याय आहे. ३. सर्प.

चिता । कैवल्य पावे. ॥ १६९७ ॥ यालागीं प्रतिक्षण । अंतचि मानी विचक्षण[1] । राहे या स्थितींत आपण । तोचि तरला अगा! पार्था! ॥ १६९८ ॥ तूं पार्थ पृथेचा सुत । धन्य ते आमुची आत । कीं हें आइकसी तूं पोटांत । जन्मलासि तिच्या. ॥ १६९९ ॥ वंश धन्य हे तों जननी । भाव ऐसा कृष्णवचनीं । कीं अत्यादरें हें जनीं । श्रवण करावें. ॥ १७०० ॥ हा अध्याय दुसरा । ज्यांत संक्षेप सारा । अठरा अध्यायांच्या सारा । वदे श्रीकृष्ण. ॥ १७०१ ॥ टीका त्याचेंच वचन । त्यावेगळा कैंचा वामन । हे टीका आणि मन । सकळ कृष्णार्पण यावरी. ॥ १७०२ ॥ पुढें अध्याय तिसरा । तेथें कर्मसिद्धांतसारा । वर्णील त्या नमो यदुवीरा । वामन म्हणे. ॥१७०३ ॥

विजित्यामरानानयामास योऽगं स कृष्णोऽर्जुनायादिशत्सांख्ययोगम् ।

सुराचार्यमुख्यान्निरस्य द्वितीयः कृतोऽध्याय आत्मैव यत्राद्वितीयः ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः ॥

---

## अध्याय तिसरा.

जय जय ब्रह्मादिजनक । जय जय जगदलंकारकनक[2] । जय जय निखिलजनक[3] । श्रीशेषशयन. ॥ १ ॥ जय जय निगमानन । जय जय निगमावन[4] । जय जय पतितपावन[5] । देवाधिदेव. ॥ २ ॥ जय जय कर्मबंधहर । जय जय अनाद्यविद्यासंहार[6] । जय जय सकलसंशयपरिहर । अर्जुनगुरो! ॥ ३ ॥ करूनि तूतें वंदन । तृतीयाध्यायार्थकथन । करीन जेथें कर्मबंधन । तुटे समर्पितां[7] तूतेंचि. ॥ ४ ॥ पूर्वाध्यायीं अर्जुन । कर्माहूनि थोर ज्ञान । ऐसें आइके भगवद्वचन । वारंवार. ॥ ५ ॥ परंतु कर्मेंचि चित्तशुद्धि । होतां मग ज्ञानसिद्धि । ऐसी कर्मप्रशंसाप्रसिद्धि[8] । ऐकोनिही विसरला. ॥ ६ ॥ मनीं युद्ध न करणें । त्यास प्रतिकूळ कर्माचरण । ज्ञानप्रशंसाप्रकरण । आयकिलें अधिक कर्माहूनी. ॥ ७ ॥ तितकाच धरिला आश्रय । युद्ध न करणें हा निश्चय । म्हणोनि मानूनि संशय । प्रश्न करी अर्जुन. ॥ ८ ॥

---

१. ज्ञानी, विवेकी. २. विश्वालंकाराचें सोनें. ३. सर्वपिता. ४. वेद (निगम+अवन=वेद+रक्षण) रक्षक. ५. पातक्यांस पावन करणारा. ६. अनादि मायेचें हरण करणारा. ७. देतां, कर्म तुला अर्पण केलें असतां. ८. कर्माचें उत्तम वर्णन.

अर्जुन उवाच—**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ! ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ! ॥ १ ॥**

कर्मापरीस थोर बुद्धि । जीस आत्मज्ञानसिद्धि । ऐसी ज्ञानप्रशंसाप्रसिद्धि । पूर्वाध्यायीं ऐकिली. ॥ ९ ॥

पूर्वाध्यायश्लोकार्ध—'**दूरेण[1] ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**'

टीका बहुत दुरूनि नीच । कर्मबुद्धीपरीस साच । ऐसें बोलिलास तूंच । सर्वज्ञ सर्वेश्वर. ॥ १० ॥ बुद्धियोग थोर निश्चित । कर्म नीच हें तुझें मत । जरी ऐसें तुज संमत । कां कर्मीं मज योजिसी ? ॥ ११ ॥ कर्म नीच, ज्ञान थोर, । तथापि माझें कर्म अत्यंत घोर । कां करूं सांगसी कर्म क्रूर । **ज**नार्दना ! ॥ १२ ॥ दुष्ट जनाचें अर्दन । करणार तूं श्री**ज**-नार्दन ! । परी मी कैसा करूं मर्दन । **भी**ष्मादिकांचें ? ॥ १३ ॥ अगत्य स्वधर्में तरावें । म्हणूनि हें घोर कर्मही करावें । तरी त्याहोनि कोटिगुणवैभवें । तूंच म्हणसी ज्ञान थोर. ॥ १४ ॥ त्या ज्ञानाचा आश्रय । करीन ऐसा हा निश्चय । धरूनि म्हणतो ज्ञान अद्वय । तरेन त्याणें मी आजि. ॥१५॥ आतां कर्में करितां । प्रसन्न होती कर्मांगदेवता । त्या क्षोभती कर्म टाकितां । म्हणोनि भिऊं. ॥ १६ ॥ तरी तूं श्री**के**शव ! । सकळ देवांचाही देव । तो मज देवा-धिदेव । भेटलासी. ॥ १७ ॥ सर्वांहूनि समर्थ । या **के**शवनांवाचा अर्थ । त्या भावें **पार्थ** । आळवी एथें या नांवें. ॥ १८ ॥ '**क**' ब्रह्मा '**ईश**' शिव । दोघे वश जया तो **के**शव । तो तूं शिरीं असतां देव । काय करितील माझें ? ॥१९॥ इत्यादि भाव पोटीं । तो म्हणे ऐसें **कि**[2]रीटी । कीं हे हिंसाक्रिया खोटी । कां योजिसी **के**शवा ! या कर्मीं ? ॥ २० ॥ आतां यापुढें श्लोक । बोले **पार्थ** पु-ण्यश्लोक । त्याचें निमित्त अभिज्ञ लोक । आयकोत गूढ अत्यंत. ॥ २१ ॥ बो-लोनि बोल ऐसें । मुखाकडे नेत्र सरिसे । करूनि पाहतां तो हांसे । मंद मंद श्री**कृ**ष्ण. ॥ २२ ॥ तों वाटलें ऐसें **अर्जुना** । कीं ऐकोनि माझ्या वचना । हास्य आलें **ज**नार्दना । अयुक्त बोलतों म्हणोनि. ॥ २३ ॥ तों तें आठवे मनीं । कीं क्षत्रियांस युद्धाहूनि । धर्म थोर नसे म्हणोनि । जें पूर्वाध्यायीं **ह**रि वदे. ॥ २४ ॥ हें स्मरतां म्हणे **ह**री । हेंचि स्मरोनि अंतरीं । हांसतो कीं याच अवसरीं । हें कैसें हा विसरला ? ॥ २५ ॥ तरी हा आपला बोल । आ-ठवूनि मज ऐसें म्हणेल । कीं प्रश्न तुझा [3]फोल । बोलसी न समजोनी.॥२६॥

---

१. अध्याय २ श्लोक ४९ पहा. २. अर्जुन. ३. व्यर्थ, निष्फळ.

याकारणें हेंही वचन । जें बोलिलासि म्हणतो अर्जुन । परी या मिश्रित वाक्यें मन । मोहिलें म्हणतो या श्लोकीं. ॥ २७ ॥

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

आजि कर्मही थोर । बोलिलासि हाही विचार । तेंही काय वारंवार । आइकिलें नाहीं. ॥ २८ ॥ घडी एक म्हणसी थोर कर्म । पुन्हा थोर जाणणें ब्रह्म । या मिश्रवाक्यें श्रम । न हरे माझा. ॥ २९ ॥ मिश्रवाक्य कानीं पडे । तों मन मोहांतचि बुडे । तूं मोहिसी म्हणतां झडे । जिव्हा कुष्ठी होऊनि. ॥ ३० ॥ म्हणूनि तूं न मोहिसी । तरी वाक्यें तूंचि बोलसी । यालागीं मूढत्वें मानसीं । मोह करितोसि हें वाटे. ॥ ३१ ॥ ऐसा भाव पोटीं । म्हणूनि बोले किरीटी । कीं मोहितोसीच ऐसी खोटी । गोष्टी वाटते मूढत्वें. ॥ ३२ ॥ तूं परम कृपेचा सागर । करावया माझा उद्धार । सकळ वेदार्थ निर्धार । उपदेशिसी. ॥ ३३ ॥ जरी माता घाली बाळासी विष । आणि विषरूप होय [1]पीयूष । तरी मोहकत्वदोष । लागे तुज. ॥ ३४ ॥ सूर्यमंडळीं थारा । जरी घडे अंधकारा । तरी या दोषाचा वारा । लागे तुज. ॥ ३५ ॥ कीं या स्थावरजंगमा । जाळूं लागे चंद्रमा । तरी हा दोष पुरुषोत्तमा ! । लागे तुज. ॥ ३६ ॥ आतां एकचि वि[2]शद । निश्चय करूनि मातें वद । कीं तो हृदयीं धरूनि शब्द । मी श्रेय पावें. ॥ ३७ ॥ आतां यापुढें श्लोक । बोलेल भगवान् उत्तमश्लोक । करितां त्याचा अर्थावलोक । शोक हरितो पार्थाचा. ॥ ३८ ॥ कीं मोहितोसि म्हणूनि । म्हणतां भ्याला बहु मनीं । हा दोष त्याचा परिहरूनि । बोलों पाहतो. ॥ ३९ ॥ आइकोत हें वचन । जें वदतो [3]कृपाघन । स्वतःसिद्ध पूर्ण षड्गुण । श्रीभगवान् स्वयें. ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाच—**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ! ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

आइक [4]अनघा अर्जुना ! । अघदोष तो तुज असेना । मोहितोसि तूं म्हणोनि वचना । बोलोनि घाबरा जालासि. ॥ ४१ ॥ तरी हें मीच बोलिलों कीं । दोंपरी निष्ठा या लोकीं । कीं जे आत्मानात्म[5]विवेकी । ज्ञानयोग त्या सां-

१. अमृत. २. स्पष्ट. ३. दयामेघ. (दयाळू.) ४. पापरहिता. ५. आत्मा काय आणि अनात्मा काय याविषयीं विचार करणारे.

त्यांला. ॥ ४२ ॥ कीं चित्तशुद्धि ज्यांची जाली । आत्मता वरी कळों आली । त्यांस निष्ठा म्यां बोलिली । ज्ञानयोगें. ॥ ४३ ॥ कीं तिहीं करावें ध्यान । ध्यानार्थ करावें इंद्रियदमन । स्वरूपीं योजूनि मन । असावें तिहीं. ॥ ४४ ॥ ज्यांस नाहीं चित्तशुद्धि । होणें असे ज्ञानसिद्धि । तीहीं करोनि निष्कामबुद्धि[1] । कर्म करावें. ॥ ४५ ॥ हें तुज वाटलें मिश्रित । ह्मणूनि मोहिलें तुझें चित्त । प्रश्न करितां दोष अत्यंत । मानूनि घाबरा जालासी. ॥ ४६ ॥ स्तन द्यावया तानयाकडे[2] । माय येतेच तों तें रडे । पाहतां ऐसें घडे । कीं दोष लाविला मातेसी. ॥ ४७ ॥ कीं न समजली बाळाची क्षुधा । तरी रडेल होतां क्षुधा-बाधा । हा दोष मातेस सुद्धां । लागलाची. ॥ ४८ ॥ परी त्याचा तो स्वभाव । तैसाच शिष्याचाही भाव । प्रश्न करितां नुरे ठाव । मर्यादेसी. ॥४९॥ गुरूसि न करितां प्रश्न । पोटीं वाटलें तेंचि वचन । न बोलतां संशय-निरसन । घडे कैसें ? ॥ ५० ॥ तथापि मर्यादापालन । करूनि बोलावें वचन । बोलोनि शंकलें तुझें मन । उचितचि हेंही. ॥५१॥ इत्यादि भाव पोटीं। धरूनि म्हणे अगा ! **किरीटी**[3] ! । तूं अनघा निर्दोष दृष्टी । नव्हे तुझी वाईट. ॥ ५२ ॥ परंतु युद्धाची टाळणी । करावया जे बोलसी वाणी । हें न घडे ह्मणतो चक्रपाणी । या श्लोकीं. ॥ ५३ ॥

**न[4] कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**

कर्माचा आरंभ न करीं । नैष्कर्म्यसिद्धि हे तोंवरी । न पावे गोष्टी खरी । वरी धरीं मनामाजीं. ॥ ५४ ॥ कर्माची सिद्धि ज्ञान । नव्हे हें साच वचन । परंतु कर्मे शुद्ध मन । तेव्हां ज्ञान त्यास होय. ॥ ५५ ॥ एवं कर्मेचि न ह्मणवे ज्ञान । म्हणोनि ज्ञानाचें नांव जगज्जीवन । **नैष्कर्म्य**[5] ह्मणे हें भग-वद्वचन । वाखाणावें या भावें. ॥ ५६ ॥ आतां ज्ञानास साधन । जालें जें कां शुद्ध मन । कर्मे मनाचें शोधन । जालें पाहिजे. ॥ ५७ ॥ या कारणें ब्रह्म सगुण । म्हणे कर्मारंभाविण । न घडे ज्ञान निर्गुण । कदापि. ॥ ५८ ॥ परी तें कर्म **कृष्णार्पण** । हें याच अध्यायीं बोलेल **कृष्ण** । तें निष्काम त्याचें विवरण । केलें मागिल्या अध्यायीं. ॥५९॥ कीं **नेहाभिक्रमनाशोऽस्ति**[6] । म्हणजे आरंभिल्या कर्माची समाप्ति । निर्विघ्न नव्हतांही फलप्राप्ति । फल तें ईश्वरा-

---

१. फळाची इच्छा न धरितां केलेलें कर्म. २. तान्ह्या मुलाकडे. ३. अर्जुना ! ४. हे अर्जुना ! केवळ कर्म न केल्यानें तो कर्मापासून मुक्त होतो असें नाहीं. ५. कर्मरहितपणा. ६. अध्याय २ श्लोक ४० पहा. ७. ईश्वराची कृपा.

ं नुग्रह. ॥ ६० ॥ ईश्वरानुग्रहें शुद्ध मन । ईश्वरानुग्रहें हें ज्ञान । म्हणूनि कर्मारंभसाधन । म्हणे ज्ञानाचें. ॥ ६१ ॥ आरंभशब्दें अर्थ । इतुकाच सुचवी समर्थ । हा अर्थ टाकितां व्यर्थ । आरंभ शब्द होतसे. ॥ ६२ ॥ उगेंचि कर्मांविणें । न घडे **नैष्कर्म्य** होणें । इतकेंचि कां श्रीकृष्णें । बोलों नये. ॥ ६३ ॥ हें आइकोनि **अर्जुन** । मनीं म्हणे मुमुक्षुजन । संन्यासें पावती ज्ञान । क्रिया [1]वर्णोचिता टाकिती. ॥ ६४ ॥ मज कां लावितो कर्म । मी संन्यासेंचि जाणेन ब्रह्म । तो हा मनाचा भ्रम । हरी **कृष्ण** उत्तरार्धें. ॥ ६५ ॥

**[2]न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

अरे ! ज्यांस संन्यासें ज्ञान । त्यांस [3]पूर्वाश्रमीं कर्मसाधन । अशुद्ध चित्ताचें मुंडण । व्यर्थाचार. ॥ ६६ ॥ संन्यासमात्रेंचि सिद्धि । नव्हे ज्ञानाची समृद्धि । कर्में न करितां नव्हे शुद्धि । चित्तास. ॥ ६७ ॥ तूं मुमुक्षु होउनि । एकचि वद दोहींतूनि । मज म्हणसि म्हणोनि । हें बोलतों तुजलागीं. ॥ ६८ ॥ सकामास एक काम्य । मुमुक्षूस कर्म आणि ब्रह्म । दोंही निष्ठांचें वर्म । पूर्वाध्यायीं वदलों यालागीं. ॥ ६९ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोलेल **उत्तमश्लोक** । याचें निमित्त मुमुक्षुलोक । परिसोत. ॥ ७० ॥ संन्यासेंकरूनि ब्रह्म । जाणोनि न करी [4]वर्णोक्त कर्म । हा **अर्जुनाचा** भ्रम । पूर्वश्लोकीं निवारिला. ॥ ७१ ॥ परी त्यास इष्ट संन्यास । कीं कंटाळला युद्धास । म्हणूनि संन्यास त्यास । घ्यावाच वाटे. ॥ ७२ ॥ एथें म्हणतील संत । जे जाणती वेदाचा सिद्धांत । कीं [5]वीतराग उपजतां पोटांत । संन्यास तेव्हांच बोलिला. ॥ ७३ ॥

श्रुति—**'यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत् ।'**

श्रुति म्हणे ज्याच दिवशीं । वैराग्य उपजे मानसीं । त्याच दिवशीं संन्यासी । जालें पाहिजे. ॥ ७४ ॥ ऐसें असोनि संन्यास । कां घेऊं नेदी **अर्जुनास** । ऐसें संतांचिया मनास । वाटेल एथें. ॥ ७५ ॥ तरी संन्यासाचा निषेध । न करूनि करवी युद्ध । कीं संन्यासाचें [6]तत्त्व शुद्ध । हेंचि वदेल अष्टादशीं. ॥ ७६ ॥ कीं काम्यकर्मांचा न्यास । म्हणजे टाकणें काम्यकर्मास । त्यास म्हणावें **संन्यास** । संन्यासाचें हें तत्त्व. ॥ ७७ ॥ तेव्हां टाकूनि काम्य । करावें

---

१. जातीस जीं उचित तीं (कर्में). २. केवळ संन्यासानें म्हणजे कर्मांच्या त्यागानें कार्याची सिद्धि पुरुषाला प्राप्त होत नाहीं. ३. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ्य व संन्यास हे चार आश्रम. ४. वर्णासाठीं शास्त्रानें सांगितलेलें. ५. वैराग्य, प्रेमाचा अभाव. ३. खरें स्वरूप.

नित्य निष्काम[1] कर्म । परी बंधक तोही स्वधर्म । ईश्वरार्पण न करितां. ॥७८॥. हें पांच श्लोकेंकरूनि । बोलावें हें मनीं धरूनि । केवळ कर्मत्याग न घडे म्हणूनि । आधीं बोलतो या श्लोकीं. ॥ ७९ ॥

**न[2] हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

अर्जुना ! जरी संन्यासी । डोई बोडोनि जालासी । तरी कैसा कर्में टाकिसी । क्षण एकही. ॥ ८० ॥ लंगोटीही टाकणें । आणि नग्न होऊनि असणें । तेंही नव्हे काय करणें । अगा ! कर्म. ॥ ८१ ॥ आवरूनि हात पाय । बसणें नव्हे कर्म काय । कांहीं न बोले कांहीं न खाय । तेंही कर्म. ॥ ८२ ॥ घट वर्ते तरीच माती । न वर्ततां काय अन्य जाती । कर्में रचिली देहाकृती । त्याग कर्माचा तो कैसा? ॥ ८३ ॥ भूचर टाकूनि भूमी । म्हणे पळोनि जाईन मी । पळतां पुढें रिकामी । भूमीच दिसे. ॥ ८४ ॥ गगन टाकूनि पक्षी । उडों लागला अंतरीक्षीं । तो तें सर्वत्र लक्षी । तेंचि गगन. ॥ ८५ ॥ याकारणें कोणी । कांहीं न करूनि कोणे क्षणीं । असों शकेल हे वाणी । सर्वथा मिथ्या. ॥ ८६ ॥ आतां उगेंचि बसणें । आणि मौन धरूनि असणें । हें नव्हे कर्म ऐसें अंगिकारणें । जरी लागलें तुझ्या भिडेनें. ॥ ८७ ॥ तरी प्रकृतीचे[3] गुण । आपलें कर्म एवंलक्षण । न सोडिती दर्शन श्रवण । वर्जिसी कैसा. ॥ ८८ ॥ प्रकृतीचे तिन्ही गुण[4] । विषय इंद्रियें अंतःकरण । सर्वां अवशां[5] स्ववशपणें । कर्में करविती. ॥८९ ॥ कोणी उगेच बसती । कांहींच कर्में न करिती । म्हणोनि म्हणसी तरी रीती । आइक त्यांची श्लोकीं या. ॥ ९० ॥

**कर्मेंद्रियाणि[6] संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

अगा ! वाचे न बोले । आणि पायेंकरूनिही न चाले । आणि हातही न हाले । धरितां कांहीं. ॥ ९१ ॥ गुदेंद्रियें न हागे । घडी एक शिश्नही न जागे । मुतेही ना ऐसा वागे । ग्रांम[7] कर्मेंद्रियांचा. ॥ ९२ ॥ जैसें बकाचें

१. फलेच्छारहित. २. कोणीही पुरुष कधींही क्षणभर देखील कांहीं कर्म केल्याशिवाय राहत नाहीं; कारण प्रकृतीचे गुण प्रत्येकास कर्म करण्यास लावतात. ३. स्वभावाचे. ४. सत्व, रज आणि तम हे प्रकृतीचे गुण होत. (अध्याय १४, श्लोक ५.) ५. वश नाहीं अशांला. ६. जो मूढबुद्धि पुरुष कर्मेंद्रियांला दाबून, इंद्रियार्थांचें मनांत स्मरण करीत राहतो त्याला दांभिक म्हणतात. ७. समूह.

ध्यान । मासेच आठवी मन । तैसें हें दांभिक भजन । मिथ्याचार. ॥ ९३ ॥ कीं कर्मेंद्रियें[1] आवरी । मनीं विषयाचें ध्यान करी । विषयवासनेनें अंतरीं । मूढबुद्धि. ॥ ९४ ॥ कर्मांवांचूनि शुद्धि । नव्हतां ऐसी दंभबुद्धि । ज्या कर्मे ध्यानसिद्धि । तें ऐक या श्लोकीं. ॥ ९५ ॥

**यस्त्विन्द्रियाणि[2] मनसा नियम्यारभतेऽर्जुन ! ।**
**कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

अगा ! मनेंचि मनीं । जो इंद्रियें आवरूनी । विहित कर्मे करूनी । आरंभितो कर्मयोग. ॥ ९६ ॥ कर्मफळीं नव्हे आसक्त । एका ईश्वरींच अनु[3]रक्त । अर्जुना ! तो होणार मुक्त । विशिष्ट याकरितां. ॥ ९७ ॥ एथें अर्जुनास हरी । अर्जुना म्हणोनि पाचारी । कीं अर्जुनवृक्षाचें नांव तरी । झणीं होसी वृक्षरूप. ॥ ९८ ॥ कीं पूर्वश्लोकीं कर्मेंद्रियें । आवरूनि दांभिक मनो[4]मयें । ज्ञानेंद्रियें चाळी स्वयें । विषयासक्त. ॥ ९९ ॥ हा वृक्षाचा गुण । कीं कर्मेंद्रियाविण । आयुष्य कंठी क्षण । तैसाचि बैसे दांभिक. ॥ १०० ॥ जरी अर्जुना ! वृक्षचि होणें । तरी अवश्य कर्मत्याग करणें । जरी अर्जुना मनुष्य म्हणवणें । तरी करीं कर्मे निष्काम. ॥ १०१ ॥ पोटीं धरूनि हा भाव । मुखीं या श्लोकीं अर्जुन नांव । बोले देवाधिदेव । अत्यंत गूढ. ॥ १०२ ॥ निष्कामें कैसीं कोणतीं । म्हणोनि पुससी तूं सुमती । तरी सांगतों तुजप्रती । या श्लोकें. ॥ १०३ ॥

**नियतं[5] कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**

न बोलोनि फलश्रुती । उगलेंच करा म्हणती श्रुती । नियत[6] कर्म त्यास म्हणती । संध्यादिक. ॥ १०४ ॥ नियत नेमिलें नित्यकर्म । ज्यास जें तो त्याचा स्वधर्म । त्यानें शुद्ध चित्त पावे ब्रह्म । तोचि संन्यास. ॥ १०५ ॥ तत्त्व संन्यासाचें । काम्यत्यागरूप साचें । तेव्हां करणें नित्यकर्माचें । प्राप्त जालें. ॥ १०६ ॥ करितां कर्मयोग । शुद्ध चित्तास शिखासूत्र[7]परित्याग । न

---

१. हात, पाय, मुख, गुद, उपस्थ. २. हे अर्जुना ! जो पुरुष मनानें इंद्रियांस आवरून आणि आसक्ति टाकून, कर्मेंद्रियांच्या साधनानें कर्म करतो तो फार श्रेष्ठ होय. ३. अनुराग-विशिष्ट. ४. मनःकल्पित. ५. हे अर्जुना ! तूं नियत कर्म कर, कारण अकर्मापेक्षां कर्म श्रेष्ठ आहे; तसेंच अकर्मानें तुझ्या शरीराचें रक्षणही सिद्ध होणार नाहीं. ६. संध्यादि नित्यकर्मे. ७. शेंडी आणि जानवें.

करी तरी हाचि संन्यासयोग । कीं टाकूनि काम्य नियत आचरें. ॥ १०७ ॥ तें नियत कर्म न करी । तरी ईश्वरदंड पडे शिरीं । करितां नियत कर्म संन्यास लौकरी । सिद्ध होय काम्य टाकितां. ॥ १०८ ॥ या भावेंकरूनी । "नियत कर्म करीं म्हणोनि । बोलोनि म्हणतो न करण्याहुनी । करणें नियत कर्म थोर. ॥ १०९ ॥ अर्जुना ! हाचि संन्यास ! । कर्मत्यागें न म्हणवे न्यास । कीं तो न घडेच कोणास । तो साधे केंवी तुज? ॥ ११० ॥ तुझ्या मनीं कर्मत्याग । तो न घडे संन्यासयोग । म्हणूनि सर्वथा कर्माचा वियोग । न करवे म्हणूनि बोलिलों. ॥ १११ ॥ तें लटिकें कीं खरें । आपणाचवरूनि पाहें बरें । हें बोलतों निर्धारें । या श्लोकाच्या उत्तरार्धें. ॥ ११२ ॥

**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

कांहीं कर्मे न करिसी । आणि उगला जरी बससी । तरी काय खासी कैसा हागसी । सांग सांग. ॥ ११३ ॥ या भावें म्हणे हरी । कीं शरीरनिर्वाह तोही परी । तुझा न चले जरी । कर्मे टाकूनि बैसलासी. ॥ ११४ ॥ वैराग्य उपजे चित्तीं । तेचि दिवसीं म्हणे श्रुति । कीं संन्यास घ्यावा तो श्रीपति । या श्लोकीं अर्जुनास उपदेशी. ॥ ११५ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त मुमुक्षु लोक । आइकोत इतरही निर्मत्सर. ॥ ११६ ॥ टाकीन म्हणे स्वधर्म । आणि जाणेन म्हणे ब्रह्म । त्यास अगत्य नियत कर्म । पदरीं बांधलें. ॥ ११७ ॥ निषेध काम्यकर्माचा, । साधला न चाळितां वाचा । कीं सर्व कर्मफलत्याग साचा । करितां नियत नित्य तें कर्मचि नेमिलें. ॥ ११८ ॥ तरी काम्याचा जो समूल त्याग । तो तरी होय कीं संन्यासयोग । परी नित्याचाही फलवियोग । जाला पाहिजे. ॥११९॥ नित्यकर्मासि श्रुति । पितृलोक फल उपपादिती । आणि पाहतांही वस्तुस्थिति । अनिवार्य गुण वस्तूचा. ॥ १२० ॥ उष्ण हो चंद्रमंडळ । म्हणतांही तें शीतळ । शीतळ हो म्हणतां अनळ । जाळूंच लागे. ॥ १२१ ॥ विषाचें नव्हे अमृत । अमृतही विष नव्हे निश्चित । परी धन्वंतरि याचा हस्त । लागतां विषही पीयूष होय. ॥ १२२ ॥ बचनाग खातां मरती । परी उत्तम वैद्याचिया हातीं । देतां तो करी त्याची प्रकृती । पूर्वगुणास विपरीत. ॥ १२३ ॥ बचनागाचा रस करी । तो थिंया रोगातें संहारी । कर्मे नव्हे बंध तरी । जरी

१. लाग. २. सांगतात. ३. अग्नि. ४. आयुर्वेदप्रवर्तक देववैद्य. ५. अमृत. ६. एक विषारी वनस्पति. ७. मूळच्या असलेल्या.

ईश्वरीं अर्पिजे. ॥१२४॥ यास म्हणावें त्याग । त्यागास अपेक्षी संन्यासयोग । त्यागेंचि जन्ममृत्युवियोग । श्रुति म्हणे. ॥ १२५ ॥

श्रुति–'**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः** ॥' [कैवल्य उ०]

मोक्ष नव्हे कर्में धनें । मोक्ष नव्हे पुत्रसंतानें । कीं अपुत्रास म्हणती परलोकगमन । असेना. ॥ १२६ ॥ अपुत्रास लोक नसे । वेदचि बोलती ऐसें । परी लोक शब्दें न गवसे । अर्थ मोक्षाचा. ॥ १२७ ॥ स्वर्ग परलोक। आणि इहलोकही लोक । मोक्ष तो [1]अलोक । [2]पुनरावृत्ति जेथें असेना. ॥ १२८ ॥ हे श्रुति याचि अनुसंधानें । म्हणे कर्में संतानें धनें । मोक्ष नव्हे कोण्याही साधनें । त्यागें एकेंचि मोक्ष. ॥ १२९ ॥ मोक्ष एकलियाचि त्यागें । न धनें न संतानें न कर्मयोगें । नित्यकर्मही पितृलोकभोगें । श्रुति बोलती बंधक. ॥१३०॥ मोक्ष तो मुख्य ज्ञानें । हीं ज्ञानप्राप्तीस साधनें । त्यांत त्याग वेदवचनें । म्हणे थोर. ॥ १३१ ॥ कोणी तेच श्रुति । त्याग संन्यास वाखाणिती । परी संन्यासाचें यदुपति । तत्त्व अष्टादशीं बोलेल. ॥ १३२ ॥ काम्यकर्मांचा त्याग । तोचि संन्यासयोग । पुन्हा सर्वकर्मफलत्याग । त्या संन्यासावेगळा म्हणेल. ॥ १३३ ॥ आणि त्यागावांचून संन्यास । न ये कोण्या प्रयोजनास । कीं काम्यावेगळ्याही कर्मांस । फळ देखिलें. ॥ १३४ ॥ कीं सर्वकर्मफलत्याग । त्यास म्हणावें त्याग । ऐसें स्वयें श्रीरंग । अष्टादशीं बोलेल. ॥ १३५ ॥

'**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः** ॥' [अध्याय १८ श्लोक २.]

काम्यकर्मांचा न्यास । तयास म्हणावें संन्यास । आणि सर्वकर्मफलास । त्यागणें त्याग त्या नांव. ॥ १३६ ॥ तेव्हां ईश्वरार्पणयोग । तरीच कर्मफलवियोग । एवं याचें नांव त्याग । कीं कर्मार्पण ईश्वरीं. ॥ १३७ ॥ भगवद्गीतेंत समर्थ । त्याग तो हाचि यथार्थ । याकारणें श्रुत्यर्थ । हाचि साच.॥१३८॥ आणि ईश्वरकृपेवीण । न ओळखवे आपणां आपण । तें ईश्वरकृपा कर्मार्पण । त्याग करितां. ॥१३९॥ आत्मज्ञान कोणे परी । प्राप्त नव्हे एक जरी । ईश्वर कृपा करी । तरीच हेही श्रुति बोलती. ॥ १४० ॥ त्या श्रुति आणि त्यांचे अर्थ । वर्णितां वाढेल अपार ग्रंथ । आणि हें प्रसिद्ध असतां व्यर्थ । कां श्रोतयां शिणवावें ? ॥ १४१ ॥ एवं सर्वकर्मपसारा । समर्पितां सर्वेश्वरा । कृपा ये-

---

१. लोक नव्हे तो. २. पुनर्जन्म.

तांच या नरा । ज्ञान उपदेशी गुरुरूपें. ॥ १४२ ॥ तेव्हां पूर्वील अनर्पितें[1] । जीं अगणितें संचितें[2] । तीं नासती या निमित्तें । मोक्ष त्यानेंचि एकलिया. ॥ १४३ ॥ एवं काम्यकर्मत्याग । आणि नित्यकर्म संन्यासयोग । तो पूर्वश्लोकीं श्रीरंग । सिद्ध करी नियत कर्मीं योजितां. ॥ १४४ ॥ सिद्ध होतां संन्यासयोग । त्यास सद्य अपेक्षित त्याग । त्यागाविणें फलसंयोग । अनिवार्य नियत कर्माचा. ॥ १४५ ॥ त्या त्यागाचें लक्षण । आणि त्या त्यागलक्षणावीण । इतरास न घडे म्हणे त्याग म्हणणें । हें उपदेशितो या श्लोकीं. ॥ १४६ ॥

**यज्ञार्थात्[3]कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**

यज्ञ तो विष्णु सगुणब्रह्म । तदर्थ त्यास अर्पावया केलें कर्म । त्या कर्मावांचूनि सर्व धर्म । आचरतां बद्ध हा लोक. ॥ १४७ ॥ विष्णु म्हणतां उगा । निर्गुण वाटेल जगा । यज्ञशब्दप्रयोगा । करूनि सुचवी श्रुति एथें.॥१४८॥

श्रुति—'**यज्ञो वै विष्णुः** ।'

यज्ञ तो विष्णु निर्धारें । श्रुति बोले या प्रकारें । तोचि जगीं यज्ञाकारें । सर्वयज्ञभोक्ता.॥ १४९ ॥ यज्ञशब्दें भगवद्वाणी। हे सुचवी कीं ज्ञणीं। कर्मे समर्पितील निर्गुणीं । निर्गुणें न तुटे कर्मबंध.॥ १५० ॥ निर्गुण अधिष्ठान थोर। जैसा मृषा[4] सर्पा आधार दोर। परी त्यास साव आणि चोर । सारिखे दोघे.॥१५१॥ दोरें न मरे असत्य साप । निर्गुणें न नासे पुण्य पाप। सर्प नासणें प्रताप । रज्जुज्ञानाचा. ॥ १५२ ॥ दोरें सर्प केला नाहीं । दोर सर्प न दवडी कांहीं । दोरें नासे तो सर्पही । दोरांत कैसा असेल ? ॥ १५३ ॥ अग्नींत काष्ठ प्रकाशे । परी न राहे, जळोनि नासे । न कळतां रज्जू सर्प भासे । कल्पांतवरी जों द्रष्टे[5] जीवेश्वर. ॥ १५४ ॥ रज्जूचें न जाणणें । त्याणेंचि मिथ्या सर्प होणें । कीं रज्जु जाणतां राहणें । न घडे सर्पाचें. ॥ १५५ ॥ जरी रज्जु कळला असता । तरी सर्प कां हो दिसता । जरी दिसता तरी कां नासता । रज्जु कळतां तो सर्प. ॥ १५६ ॥ एवं रज्जु न कळतां जाला । रज्जु कळतां नासला । कर्मप्रपंच मिथ्या भासला । निर्गुणदोरीं निर्गुण सर्प. ॥ १५७ ॥ एवं कर्म म्हणजे अविद्या । अविद्या नाशी ब्रह्मविद्या । ते विद्या शक्ति त्या आद्या[6] । ईश्वराची. ॥ १५८ ॥ तो म्हणावा सगुण । त्याच्या चरणीं कर्मार्पण । बोलेल तें ब्रह्म

---

१. ईश्वरार्पण केलीं नाहींत अशीं कर्मे. २. सांचलेलीं कर्मे. ३. यज्ञाच्या उद्देशानें केलेल्या कर्मांशिवाय इतर सर्व कर्मांनें हा लोक बंधन पावतो; यास्तव हे अर्जुना ! संग टाकून त्याच उद्देशानें कर्म कर. ४. खोट्या. ५. पहाणारे. ६. मूळच्या.

सगुण । नाश अविद्याकर्माचा. ॥ १५९ ॥ याच गीतेंत ब्रह्मार्पण । बोलेल तें ब्रह्म सगुण । कीं अविद्यानाशक निर्गुण । न घडे कधीं ऐसें. ॥ १६० ॥ ईश्वरोपाधि आणि निर्गुण । दोहींस म्हणावें सगुण । त्यांत फळची निर्गुणपण । मोक्षफलदाता ईश्वर. ॥ १६१ ॥ धनवंत आणि त्याचें धन । धनार्थें धनिकाचें भजन । धनप्राप्तीस साधन । न घडे भजन धनाचेंचि. ॥ १६२ ॥ एवं **विष्णु** म्हणावा तेथें । यज्ञ बोलिला जेथें । तो सगुणच ऐसा एथें । भगवद्भाव. ॥ १६३ ॥ जें कर्म नव्हे यज्ञार्थ । म्हणजे न **विष्णु**प्रीत्यर्थ । तें जालें बंधनार्थ[1] । मनुष्यलोकीं. ॥ १६४ ॥ तेव्हां इतर देवतार्पण । त्या कर्मीं असेच बंधकपण । कीं एका यज्ञार्थाविण । सर्वत्र बंध म्हणतसे. ॥ १६५ ॥ आतां यज्ञकुंडादि क्रियामय । तदर्थ कर्म हा निश्चय । तें एक करितां न होय । बंधक ऐसें म्हणावें. ॥ १६६ ॥ तरी यज्ञही कर्म निश्चयें । तेव्हां कर्मचि बंधक नव्हे स्वयें । अर्थ न साधे या अन्वयें । **यज्ञविष्णु** श्रुतिसिद्ध. ॥ १६७ ॥ यज्ञ यज्ञा कारण । तेव्हां कर्माकारणें कर्म करणें । तें बंधक नव्हे ऐसें कोण । बोलों सके. ॥ १६८ ॥ दरिद्रें दरिद्र फिटे । कीं अंधकारें अंधकार तुटे । बायको बायकोस कोठें । ऋतु दे पुत्रोत्पत्तीचा. ॥ १६९ ॥ आतां यज्ञशब्दें इतर देवता । तरी देवतांतरभजनवार्ता[2] । सर्वथा निषेधी हे भगवद्गीता । तेंही घडेना. ॥ १७० ॥ नवमाध्यायींही गोष्टी ऐसी । कीं **'यत्करोषि[3] यदश्नासि । तत्कुरुष्व मदर्पणं'** हें **पार्थासी** । अन्यत्रही स्थळोस्थळीं बोलेल. ॥ १७१ ॥ एवं **विष्णूस** कर्मार्पण । न करितां सर्वत्र बंधकपण । हाचि निर्णय ब्रह्म सगुण । श्री**कृष्ण** करी. ॥ १७२ ॥ आतां समर्पण सगुणा । तें नये बंधकपणा । तरी काम्यकर्मही त्याच निपुणा । **विष्णूस** अर्पूं. ॥ १७३ ॥ कदाचित् मनीं **पार्थ** । धरील ऐसा अर्थ । म्हणूनि हें निषेधितो समर्थ । श्री**कृष्ण** या उत्तरार्धें. ॥ १७४ ॥

**तदर्थं कर्म कौंतेय ! मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥**

त्या कारणेंही कर्म । करीं टाकूनि संगभ्रम[4] । त्यासही न अर्पितां श्रम । न तुटे फळबंधाचा. ॥ १७५ ॥ **अर्जुना** ! जों नाहीं मुमुक्षा । मुमुक्षा म्हणजे मोक्षापेक्षा[5] । ते नसतां नेदी मोक्षा । सर्वेश्वर. ॥ १७६ ॥ भोग अथवा मोक्ष । जें ज्यास सापेक्ष[6] । तेंचि देतो कीं कल्पवृक्ष । न मागतां कांहींच नेदी.

---

१. बंधन करणारें. २. इतर देवांच्या भजनाची गोष्ट. ३. अध्याय ९ श्लोक २७ पहा. ४. आसक्ति. ५. मोक्षाची इच्छा. ६. इष्ट, वांछित.

॥ १७७ ॥ ईश्वर दयालु केवळ । म्हणूनीच मागितलें फळ । देतो कीं सद्य विन्हळ । होय जन न देतां अपेक्षित. ॥ १७८ ॥ फळ इच्छी अंतःकरण । आणि करी तें कर्मार्पण । तरी फळचि दे सर्वज्ञ निपुण । कल्पवृक्ष. ॥१७९॥ एवं **विष्णू**स अर्पण । आणि ज्या कर्मीं निष्कामपण । यावेगळें कर्म स्वगुण । बंधकत्व सर्वथा न सोडी. ॥ १८० ॥ यालागीं वेदोक्तही काम्य । आइकतां जें कर्णास रम्य । तें अर्पितांही सगुण ब्रह्म । बंधक फळचि देणार. ॥१८१॥ एवं नित्यकर्म करावें । तें **विष्णू**स अर्पावें । त्यानेंचि पावावें । मोक्षफळ. ॥ १८२ ॥ याला म्हणावें त्याग । काम्यत्याग संन्यासयोग । **अर्जुना**स म्हणे **श्री**रंग । होई ऐसा. ॥ १८३ ॥ टाकूनि काम्याचरणें । नियत कर्मचि करणें । हा संन्यास पूर्वश्लोकीं खुणें । न बोलतां दाखविला. ॥ १८४ ॥ तें नियतही कर्म बंधक । म्हणोनि प्रवर्तला हा श्लोक । कीं जो **विष्णु** सगुण एक । त्यास अर्पावें. ॥ १८५ ॥ त्यांतही काम्य टाकावें । त्या कर्मास संन्यास म्हणावें । तेंही **विष्णू**स अर्पावें । हा त्याग. ॥ १८६ ॥ उगाच कर्मत्याग । **करणें** नव्हे संन्यासयोग । त्या प्रत्यवायें[1] नरकभोग । सिद्धि नव्हे या संन्यासें. ॥ १८७ ॥ यालागीं मागें देव । **'न च संन्यसनादेव'** । म्हणूनि बोलिला देवाधिदेव । कीं संन्यास तुज नव्हे योग्य. ॥ १८८ ॥ तों **अर्जुन**मनोगत । संन्यासावरीच अत्यंत । म्हणूनि पूर्वश्लोक वरी अनंत । काम्यत्याग संन्यास बोलिला. ॥ १८९ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले **उत्तमश्लोक** । त्याचें निमित्त सकळ लोक । परिसोत. ॥ १९० ॥ सांडूनियां काम्य । सोलींव नियत नित्यकर्म । तेंही जें सगुण ब्रह्म । त्यास अर्पावें. ॥१९१ ॥ पूर्वश्लोकवरी । हा उपदेश **कृ**ष्ण करी । तों दया उपजली अंतरीं । सकळ साधारणांची. ॥ १९२ ॥ कीं हे **भगवद्गीता** । संतां सर्वांस उपयोगी तत्त्वतां । एथें निष्कामताचि सिद्ध होतां । उडालें काम्य. ॥ १९३ ॥ अशुद्धचित्त निष्काम । **होणें** न घडे हा नेम । मन असोनि सकाम । ईश्वरार्पित हें निरूपिलें. ॥ १९४ ॥ त्रिविध जन हा नेम । मुमुक्षु मुक्त सकाम । मुमुक्षूस नित्य निष्काम । ईश्वरार्पित हें निरूपिलें. ॥ १९५ ॥ आतां जन सकाम । त्यांस अवश्य सकाम कर्म । म्हणूनि बोले सगुण ब्रह्म । त्यास प्रथम हा श्लोक. ॥ १९६ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

---

१. अडथळ्यानें.

तूं मुमुक्षु गा अर्जुना! । संन्यास बरवा वाटे मना । म्हणूनि सांडूनि कामना । नियत कर्म तूतें बोलिलों. ॥ १९७ ॥ परि इतरांस निश्चित । काम्य कर्मचि उचित । येविषयीं वेदविहित[1] । गुह्य सांगतों. ॥ १९८ ॥ ऐसा भाव पोटीं । तों कृष्ण म्हणे अगा! किरीटी! । ब्रह्मा निर्मितां प्रजांच्या कोटी । यज्ञही निर्मी त्यासांगातें. ॥ १९९ ॥ उपजतांचि बळ मुग्ध[2] । मातेच्या स्तनीं उपजे दुग्ध । हा मायागुण स्निग्ध[3] । अनादि. ॥ २०० ॥ तैसा प्रतिकल्पीं ब्रह्मा । सृष्टि करी हा अनादि महिमा । जीवांचिया जीवधर्मा । तोचि करी हेंही अनादि. ॥ २०१ ॥ एवं प्रजासांगातें । ब्रह्मा निर्मी यज्ञातें । निर्मूनि म्हणे प्रजांतें । ब्रह्मा असें. ॥ २०२ ॥ कीं हा यज्ञ बरवा । करितां वृद्धीतें तुम्ही पावा । हा यज्ञ तुम्हीं जाणावा । कामधेनु आपली. ॥ २०३ ॥ हा कामधेनु तुम्हां । हो म्हणे ब्रह्मा । त्या यज्ञफलप्रातिक्रमा[4] । बोलतसे या श्लोकीं. ॥२०४॥

**देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।**
**परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

या यज्ञेंकरूनि देवां । तुम्ही यजा पूजा सदैवा । ते देव फळ देती तेव्हां । तुम्हांसी. ॥ २०५ ॥ तुम्ही पुन्हा त्या देवां । त्या यज्ञेंचि करूनि भावा । ते पुन्हा तुम्हां सदैवां । पाळितील. ॥ २०६ ॥ ऐसी परस्पर । भावना घडतां सादर । विषयसुख वारंवार । पावाल हेंचि परम कल्याण. ॥ २०७ ॥ फळ देती भक्षूनि याग । मग तुम्ही नेदां त्याचा विभाग । तरी अपराधी व्हाल त्यांचा लाग । न सुटे म्हणतो या श्लोकें. ॥ २०८ ॥

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

तुम्हांस इष्ट भोग । ते देव देती भक्षूनि याग । तिहीं दिधलें त्यांतूनि विभाग । त्यांचा न देतां क्षोभती[5]. ॥ २०९ ॥ तिहींच दिधले पदार्थ । त्या पदार्थीं यज्ञ तदर्थ । जो न करी त्यास समर्थ । ते पीडिती. ॥ २१० ॥ तेव्हां अपराध लागेल थोर । जो ऐसा तो देवांचा चोर । ते न दिसती परी हा समोर । त्या देवांस सर्वत्र. ॥ २११ ॥ राजद्रव्य चोरी । त्यास राजा मारी । मग देव ऐसेपरी । करिती त्यावरी शासन. ॥ २१२ ॥ यालागीं त्यांस द्यावें । तेव्हां आपण तें खावें । अन्यथा पापफल भोगावें । लागेल. ॥ २१३ ॥ आतां

---

१. वेदप्रतिपादित. २. अज्ञ. ३. ममतेचा. ४. संबंध. ५. रुष्ट होतात.

यापुढें श्लोक। तो स्वयें बोले उत्तमश्लोक। पूर्वं श्लोकवरी कितीएक। शब्द वर्णिले ब्रह्मयाचे. ॥ २१४ ॥ कीं काम्ययज्ञमनोरथ। पूर्ण करिती देव समर्थ। परी तिहीं दिधलें जें त्याणें तदर्थ। न करितां यज्ञ ते दंडती. ॥ २१५ ॥ हें ब्रह्मयाचें वर्णिलें वचन। यास देतो स्वयें अनुमोदन। आणि सन्मार्गीं सर्व जन। लावितो या श्लोकीं. ॥ २१६ ॥

**यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः।**

वैश्वदेवादि यज्ञ करिती। वेदविहित जे आचरती। यज्ञशेष अन्न भक्षिती। ते सुटती सकळ पापापासुनी. ॥ २१७ ॥ प्रथम पाप थोर। कीं देवांचे होती चोर। तो चुके दंड घोर। यज्ञ करितां त्या अन्नाचा. ॥ २१८ ॥ आहुती-द्वारा देवांस तुष्टी। ते होतां करिती वृष्टी। न यजितां होती कष्टी। न वर्षती पर्जन्य. ॥ २१९ ॥ जेव्हां पर्जन्य न पडे। तेव्हां फळजीवहिंसा घडे। तें सकल पाप जोडे। यज्ञ न करी त्याला. ॥ २२० ॥ इतरांच्या यज्ञसुकृतें[२]। देव वर्षती वृष्टीतें। परी तो अपराध ठेवूनि यांतें। दंड करिती. ॥ २२१ ॥ देवांस होतां संतोष। जो भक्षी यज्ञशेष। अवृष्टिजनित सर्व दोष। चुकती याचे. ॥ २२२ ॥ ऐशा किल्बिषापासूनी[३]। सुटे यज्ञशेष तें भक्षूनी। कोणी [४]पंचसूना किल्बिषें म्हणूनी। एथें वाखाणिती. ॥ ॥ २२३ ॥ तोही अर्थ घडे। धर्मशास्त्रास अनुकूल पडे। परी पंचसूनादोष न झडे। या प्रायश्चित्तें. ॥ २२४ ॥

स्मृति—**कंडनी पेषणी चुल्ली उदकुंभी च मार्जनी।**

**पंचसूना गृहस्थस्य ताभिः स्वर्गं न विंदति** ॥[मनु०अ०३श्लो० ६८-६९.]

कांडणें दळणें। चुली पेटवणें, जळ घटीं भरणें। पांचवी सूना[५] सडा सारवणें। जीवहिंसा या पांचांत. ॥ २२५ ॥ कांडितां दळितां किडे। मरतां हिंसा घडे। काष्टांतही सवडी सांपडे। वसती कृमी त्यांतही. ॥ २२६ ॥ ओली कांहीं गोंवरी। तों किडेच नुसते अंतरीं। इत्यादि हिंसा खरी। घडे मुळें चुलीच्या. ॥ २२७ ॥ शेण रगडूनि शेणी। करितां जीवभोटींच्या श्रेणी[६]। मरती हेही करणी। चुलीनिमित्त. ॥ २२८ ॥ कीं झाडणें सडासारवण। म-

---

१. फलेच्छेनें यज्ञ करणाऱ्याच्या मनांतील इच्छा. २. पुण्यें. ३. पाप, दोष. ४. कांडण, दळण, चूल पेटवणें, पाणी भरणें आणि शेण सारवणें यांपासून जीवहिंसादि घडतात त्यांना पंचसूनादोष म्हणतात. [मनुस्मृति—अ० ३ श्लो०६८—६९.] ५. हिंसागृह. ६. पंक्ति.

रती जीव तें गणी कवण । हें पांचवे सुनेचें विवरण । या पंचसूना गृहस्थाश्रमीं. ॥ २२९ ॥ या पंचसूना यांचे दोष । जाती भक्षितां वैश्वदेवशेष । ऐसाही कांहीं घोष । प्रसिद्ध जगीं. ॥ २३० ॥ तरी ज्यांस करणें दंड । पुढें आहे उदंड । तैसेही लंडभंड । हातीं धरावे कार्यार्थ. ॥ २३१ ॥ कांहीं राजसेवा हातें । त्यांच्या घेती शेवटीं तयांतें । दंडिती तैसी रोकडी जनातें । हे शुद्धी. ॥ २३२ ॥ क्रिमिभोजननामक । यास बोलिले नरक । मारिले जे क्रिमि अनेक । ते नरकीं भक्षिती स्वहिंसका. ॥ २३३ ॥ यास भूतदया मनीं । गृहस्थें सकुटुंबें धरूनी । पंचही कर्मं विचारूनी । करितां मरती कां क्रिमी. ॥२३४॥ ज्यास नाहीं भूतदया । त्याची राक्षसाची काया । व्यर्थ त्याची सर्व क्रिया । भूतद्रोहें. ॥ २३५ ॥ काय या पांचचि सूना । कीं यावेगळी हिंसा घडेना । जीव कोटि काया मरेना । चालतां वाटे. ॥ २३६ ॥ न मारितांही ढेंकुण । आंगाखालीं होती चूर्ण । या दोषाचें गणन । कां न मोजिलें यांत. ॥ २३७ ॥ पांचचि या निवडिल्या । त्या उगाच सूना कां नाहीं बोलिल्या । त्या वेगळ्याच राहिल्या । न गणितां त्यांत. ॥२३८॥ एवं वर्णाश्रमानुसार । कर्म चालावया अधिकार । सुचविला पापपरिहार । याचा नव्हे इतकियानें. ॥ २३९ ॥ दया ज्याचिया मनीं । कंडनादिकर्में विचारूनी । करितां हिंसा न कळोनी । होतां दयाच तें पाप नाशील. ॥ २४० ॥ त्या दयेनें सर्वात्मा हरी । संतुष्ट होतां अज्ञान हरी । तेव्हां सकळ कर्में संहरी । दया थोर. ॥ २४१ ॥ 'पिशाचाचे हातीं कोलित' । तैसें हें प्रायश्चित्त । तेव्हां कां कांपेल चित्त । हिंसा करितां. ॥ २४२ ॥ कंडनादि क्रिया । करितां कांहीं करावी दया । तों ऐकतां प्रायश्चित्ता या । निसंतान जालें दयेचें. ॥ २४३ ॥ श्रीकृष्ण एथें हीं किल्बिषें । न म्हणे जाती यज्ञशेषें । स्मृतीच्या अर्थवादघोषें । वाखाणावी कां **गीता**? ॥ २४४ ॥ पंचसूनाप्रायश्चित्त । वैश्वदेवही घडो निश्चित । परी **गी**तार्थ नव्हे उचित । वाखाणणें एथें ये रीतीं. ॥ २४५ ॥ कीं याच श्लोकाचें विवरण । तीं श्लोकीं करील करुण । तेथें नराप्रति **नारा**यण । हेंचि बोलेल विशद. ॥ २४६ ॥ एवं भक्षितां यज्ञशेष । सकळ नासती किल्बिष । अन्यथा लिप्त होती दोष । हें उत्तरार्धें बोलतो. ॥ २४७ ॥

**भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

---

१.'कंडनी पेषणी चुल्ली चोदकुंभी च मार्जनी । पंचसूना गृहस्थस्य पंचयज्ञात्प्रणश्यति. ॥'
२. किडे. ३. कुलक्षय. ४. पापें. ५. करुणाकर, ईश्वर. ६. अर्जुनाला. ७. स्पष्ट.

केवळ आपणाच कारणें । अर्जुना! जो पाक करणें । तें पापचि खा[१]ताति जाण । ते पापी. ॥ २४८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सर्व लोक । आइकोत अर्थासहितही. ॥ २४९ ॥ पंचसूनादोष । वैश्वदेवें हरती हा घोष । अर्थवाद ये स्थळीं किल्बिष । परिहरे तें वेगळें. ॥ २५० ॥ कीं देवां न होतां तुष्टि । न करिती पर्जन्यवृष्टि । होती सर्व जीव कष्टी । हे सर्व दोष. ॥ २५१ ॥ हे दोष जाती लया । वैश्वदेवादि यजनक्रिया । करितां अगा! धनंजया! । हा भाव पूर्वीं काढिला. ॥ २५२ ॥ हा अर्थ या दों श्लोकीं क्रमें । बोलिजे तो पुरुषोत्तमें । तिसऱ्या श्लोकीं हाचि नेमें । सिद्धांत बोलेल श्रीकृष्ण. ॥ २५३ ॥

**अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

अन्नापासोनि होती भूतें[२] । कीं अन्नें होती शुक्रशोणितें[३] । तें अन्न पर्जन्यें होतें । तो पर्जन्य पूर्वोक्त यज्ञेंकरूनी. ॥ २५४ ॥ तो यज्ञ कर्मद्वारा । तो कर्मकलाप[४] सारा । वेदापासोनि अगा! वीरा । उत्पन्न होतो. ॥ २५५ ॥ अक्षरब्रह्मापासूनी । प्रतिकल्पीं उद्भवती म्हणोनी । वेद अनादि परि लय पावोनी । तेथूनच प्रकटती. ॥ २५६ ॥ त्या वेदाचे वेदपणें । कीं बोलावीं ब्रह्मलक्षणें । जरी सर्वत्रांतें ब्रह्म पूर्ण । तरी सांपडे वेदींच. ॥ २५७ ॥ तस्मात् त्याकारणें । जरी सर्वगत परिपूर्ण । तरी वेदींच सगुण निर्गुण । उभयलक्षण तें असे. ॥ २५८ ॥ एवं यज्ञ तेथें निगम[५] । निगम तेथें ब्रह्म । यालागीं जेथें यज्ञधर्म । तेथें ब्रह्म प्रतिष्ठित. ॥ २५९ ॥ दूध गायीच्या सर्व देहीं । परी स्तनीं प्रतिष्ठिलें तेंही । कीं पुच्छ पिळितां येणार नाहीं । प्राप्त दुग्ध सर्वगत. ॥२६०॥ काष्ठीं अग्नि सर्वगत । परी मथितांचि तो असे सांपडत । तो अग्निहोत्रींच प्रतिष्ठित । बोलावा. ॥ २६१ ॥ यज्ञें होतां चित्तशुद्धी । तेव्हां वेदार्थीं निवे[६] बुद्धि । ते वेदयज्ञीं ज्यांत सिद्धी । ब्रह्मज्ञानाची. ॥ २६२ ॥ एवं यज्ञादि धर्म । करितां पाविजे ब्रह्म । या भावें बोले सगुण ब्रह्म । कीं ब्रह्म यज्ञीं प्रतिष्ठित.

---

१. 'अघं स केवलं भुंक्ते यः पचत्यात्मकारणात्। यज्ञशिष्टाशनं ह्येतत्सतामन्नं विधीयते ॥' [मनुस्मृति–अ० ३ श्लो० ११८.] २. प्राणी. ३. रेत आणि रक्त. ४. कर्मसमूह. ५. वेद. ६. रिघे.

॥ २६३ ॥ तेव्हां कळे निर्गुणब्रह्म । जेव्हां कृपा करी सगुणब्रह्म । तें यज्ञांत सांपडे कीं यज्ञधर्म । करितां देव संतोषती. ॥ २६४ ॥ ते वर्षतां पर्जन्य । त्या अन्नें सुखी जन । जनसुखें भूतभावन । सगुणब्रह्म संतोषे. ॥ २६५ ॥ होतां पुण्याचिया राशी । कृपा उपजे ईश्वरासी । मग तो निष्कामियासी । घाली मार्गीं मोक्षाच्या. ॥२६६॥ ऐसी कर्मचक्रप्रवृत्ति[1] । वर्तवूनि जे यज्ञशेष[2] खाती । ते सर्व पापापासोनि सुटती । कीं मूळ न होती अवृष्टीसी. ॥ २६७ ॥ पर्जन्य यज्ञाविणें । नव्हतां नव्हे भूतांचें जिणें । ते सुटती याकारणें । या सर्व पापापासूनी. ॥ २६८ ॥ 'यज्ञशिष्टाशिनः संतो'[3] म्हणोनि । बोलिला पूर्वार्धेंकरूनि । तें या दों श्लोकांवरूनि । सिद्ध जालें. ॥ २६९ ॥ कीं पर्जन्य यज्ञापासूनि । न भक्षितां शेष यज्ञ करूनि । नव्हतां पर्जन्य अन्नावांचूनि । मरती जन पापें ते सर्व. ॥२७०॥ भक्षितां यज्ञशेषें । दूरि होती हीं किल्बिषें । हें प्रकट करावया विशेषें । बोलिला श्लोक हे दोनी. ॥ २७१ ॥ 'भुंजते ते त्वघं'[4] म्हणूनि । दोष वदला उत्तरार्धेंकरूनि । तें सिद्ध ज्या श्लोकावरूनि । करितो तो तृतीय हा श्लोक. ॥ २७२ ॥

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ! स जीवति ॥ १६ ॥**

ऐसें चक्र प्रवर्तविलें । तें ज्याणें नाहीं वर्तविलें । त्याचें जिणेंही न भलें । याच लोकीं. ॥ २७३ ॥ अरे! तो पशुरूप मनुष्य । कीं पापरूप त्याचें आयुष्य । पुढील नरकादि भविष्य । असोनि जितो तो हें व्यर्थचि. ॥२७४॥ कीं तो केवळ इंद्रियाराम[5] । जो पोषितो इंद्रियग्राम[6] । अन्नपाकादि काम । वैश्वदेवादि न करितां. ॥ २७५ ॥ अन्नादिकांची गोडी । घेणें इंद्रियांची सहज खोडी । परी तेचि पुण्यजोडी । वैश्वदेवादि करितां. ॥ २७६ ॥ हा अर्थ जाला सिद्ध । जो एथील एथें प्रसिद्ध । पंचसूनादि विरुद्ध । प्रायश्चित्त अर्थवाद. ॥ २७७ ॥ भक्षिल्या यज्ञशेषें । जीं जाती सर्व किल्बिषें[7] । तीं सर्व किल्बिषें विशेषें । वर्णिलीं या श्लोकीं. ॥ २७८ ॥ अवृष्टीनें भूतहिंसा[8] । पुढें होणार त्याचा कैसा । आतांच दोष जातो ऐसा । पूर्वपक्ष[9]. ॥ २७९ ॥ स्त्रीसंगाविण ऋतुकाळ । अतिक्रमितां[10] पुढें होणार बाळ । त्याची हत्या तत्काळ । लागते. ॥ २८० ॥ ऋतुकाळीं रती । करितांही नव्हे संतती । तरी पुरुष

---

१. कर्मांच्या चक्राचा प्रघात. २. वैश्वदेवादि यज्ञ करून राहिलेलें अन्न. ३. अध्याय ३ श्लो० १३ पूर्वार्ध पद्य. ४. अ० ३ श्लो० १३ उत्तरार्ध. ५. इंद्रियांस सुखरूपता. ६. इंद्रियसमूह. ७. पापें. ८. प्राणिनाश. ९. शंका. १०. व्यर्थ घालवितां.

पुढें सुटती । भ्रूणहत्येपासुनी[1]. ॥ २८१ ॥ यज्ञक्रिया करी । आणि पर्जन्य न पडेही जरी । तरी हीं पातकें दूरी । होती भक्षितां यज्ञशेष. ॥ २८२ ॥ असो; आतां पुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । आइकोत श्लोकार्थें. ॥ २८३ ॥ मुमुक्षु जो इच्छी मोक्षा । त्यास संन्यासाची अपेक्षा । तो काम्यत्याग ह्मणूनि शिक्षा । केली अर्जुनास नित्यकर्मांची. ॥ २८४ ॥ तो नित्यकर्मयोग । ईश्वरीं अर्पितां घडे त्याग । तोही जरी निःष्काम निःसंग[2] । तरीच त्याग ईश्वरार्पणें. ॥ २८५ ॥ मुमुक्षूस हें विहित । बोलोनियां अनंत । सकामास काम्य निश्चित । प्रसंगोपात्त बोलिला. ॥ २८६ ॥ आतां मुमुक्षूस कर्मविधि । कोण काळवरी त्याचा अवधि । बोलतो करुणामृतनिधि । या श्लोकीं. ॥ २८७ ॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

अर्जुना आत्मज्ञान । जालें परम पावन । आणि गोडी धरी मन । आत्मयाची. ॥ २८८ ॥ विषयमात्राची प्रीती । अणुमात्रहि नसे चित्तीं । ते आत्मस्वरूपरती[3] । 'अव्यभिचारिणी' म्हणावी. ॥ २८९ ॥ स्वपतीची आवडी । इतर पुरुषांचीही कांहीं गोडी । तरी त्या नारीची खोडी । 'व्यभिचारिणी' म्हणावीच. ॥ २९० ॥ जयाची आत्मरती । शिंदळी नव्हे कधीं प्रीतीं । अनन्यभावें आवडे पती । जे रीती पती पतिव्रतेस. ॥ २९१ ॥ अर्जुना! पुरुषसृष्टी । पतिव्रता न देखे काय दृष्टी । परी विषयबुद्धीनें उष्टी । दृष्टी न करी कदापि.॥२९२॥ तैसा अगा! आत्मरत । जड प्रपंच देखे निश्चित । परी विषय नमानी सर्वगत । आत्माच देखे. ॥२९३॥ आवडीनें सोनें अपेक्षी । तो अलंकारीं तेंचि लक्षी । चित्तबुद्धिनेंचि जो रक्षी । अलंकार सोनियाचे. ॥ २९४ ॥ ऐशियास कर्म नियत । तेंही करणें न लागे निश्चित । परी जरी असे तृप्तही अत्यंत । आत्मसुखीं. ॥ २९५ ॥ आत्मत्वींच आहे प्रीती । आणि विषयसुखें मानी तृप्ती । तरी तो अपक्व क्रियासमाप्ती । नसे त्याची. ॥ २९६ ॥ मृग देखोनि मृगजळ । धांवे मार्गी सांपडे जळ । त्यासही तेंच मृगजळ केवळ । मानूनि होतो मृग तृप्त. ॥ २९७ ॥ तैसें विषय सेवितां इंद्रियें । विषयीं सुख मानितो निश्चयें । तों तो अज्ञानीच स्वयें । आत्मज्ञ ऐसें न मानी. ॥ २९८ ॥

---

१. गर्भहत्या. २. संगरहित. ३. आत्मस्वरूपांत आसक्ति.

ज्ञात्यास प्रारब्ध[1] सारणें । विषय तो भोगी त्याकारणें । सुख तें आत्मसुख अंतःकरणें । सेवितां तृप्त जो जाला. ॥ २९९ ॥ आत्मज होऊनिही । विषयसुख आणि तृती कांहीं । मानूं लागला त्यास नाहीं । बाणली आत्मतृप्ती. ॥ ३०० ॥ तरी तो होऊनिही ज्ञानी । कर्मीच अधिकारी म्हणूनी । चतुर्थी त्रयोदशीं स्ववचनीं । कर्मीं समाधि त्याची वर्णील. ॥ ३०१ ॥ **'ब्रह्मार्पणं[2] ब्रह्म हवि'** । या श्लोकीं हेचि पदवी । चतुर्थी बोलेल गोसावी । जगद्गुरु श्रीकृष्ण. ॥ ३०२ ॥ **'ध्यानेनात्मनि[3] पश्यंति'** । त्रयोदशीं या श्लोकाचे अंतीं । **'कर्मयोगेन चापरे'** ऐसें श्रीपती । कर्मयोगें आत्मध्यान वर्णील. ॥ ३०३ ॥ यालागीं आत्मत्वींच तृप्ती । बाणतां कर्माची समाप्ती । **'आत्मतृप्तश्च'** म्हणूनि यदुपती । या भावें म्हणे या श्लोकीं. ॥ ३०४ ॥ ऐशियास म्हणे मानव । कीं अन्यथा पशु दैत्य दानव । जरी हें आत्मज्ञानवैभव । मानव तोची. ॥ ३०५ ॥ हें पुढें निरूपण । करील भगवान् आपण । एवंच मानवपण । तरी कीं जरी असे या मार्गीं. ॥ ३०६ ॥ आत्मरती आत्मतृप्ती दोनी । ज्ञानियाचीं लक्षणें वदोनी । त्यास कर्म करणें न लगे म्हणोनी । **'तस्य कार्यं न विद्यते'** म्हणतसे. ॥ ३०७ ॥ आत्मरत आत्मतृप्त जाला । जैसा अन्नरत अन्नें तृप्ति पावला । परी दक्षिणेकारणें असे भुकेला । दक्षिणा पावतां संतोषे. ॥ ३०८ ॥ आत्मरत आत्मतृप्त । त्याला किमपीहि नसे वांच्छित । तो अन्य पदार्थीं निश्चित । संतुष्ट नव्हे. ॥ ३०९ ॥ संतुष्ट स्वरूपीं नित्य । त्यास नलगे कर्म अगत्य । कीं त्यास उरलें नसे कृत्य । साधनाचें. ॥ ३१० ॥ **'आत्मन्येव च संतुष्टः'** म्हणोनी । हा भाव दावी या वचनीं । त्यास साध्यांश नसे कर्मेंकरूनी । हें बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ३११ ॥

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

अगा! कोणी एक अर्थ । कोणी एक पुरुषार्थ । केल्या कर्मे नसे कीं परमार्थ । समग्र साधला जयाला. ॥ ३१२ ॥ कर्म केल्या पुण्य न दिसे । न करितां प्रत्यवाय कांहीं नसे । मनीं जयाच्या न वसे । भय कांहीं. ॥ ३१३ ॥ कीं ब्रह्मादिस्तंभवरी । भूतरूपें चराचरीं । दैवतेंही तींचि परी । आश्रय नसे ज्यास कोणाचा. ॥ ३१४ ॥ करूनि यज्ञादि क्रिया । जरी यजाव्या देवता

---

१. संपविणें. २. अध्याय ४ श्लोक २४ पहा. ३. अध्याय १३ श्लोक २४ पहा.

या । तरी कोण्या अर्थाची तया । चाड नाहीं. ॥ ३१५ ॥ पक्कज्ञानियाचें हें लक्षण । साधकें पूर्वोक्तरीती कर्म करणें । तूं तरी मुमुक्षूच आपण । कर्म करीं म्हणतो या श्लोकीं. ॥ ३१६ ॥

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**

जें ज्ञान पक्क जालिया । कर्म नलगे **धनंजया!** । त्या ज्ञानाकारणें नित्यक्रिया । तूं बरे रीतीनें आचर. ॥ ३१७ ॥ होऊं नको फलासक्त । म्हणजे काम्यत्यागें हो विरक्त । बरे रीति ते हेचि कीं हरिभक्त । होऊनि अर्पावें सर्व त्याला. ॥ ३१८ ॥ कीं न अर्पितां **विष्णूस** कर्म । कर्ममात्राचें तुज वर्म । बोलिलों कीं बंधभ्रम । त्यावेगळें करी सर्वेही. ॥ ३१९ ॥ **'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र'**[१] । या श्लोकीं कर्म सर्वत्र । बंध करी एक त्यास मात्र । अर्पितां नव्हे बंध. ॥ ३२० ॥ तदर्थही मुक्तसंग । म्हणिजे फळीं होऊनि निःसंग । करी म्हणोनि मीच **श्री**रंग । तुज बोलिलों त्या श्लोकीं. ॥ ३२१ ॥ कीं अरे! कामनेनें सेवा । करितां न पाविजे देवा । निष्काम अर्पितां देवाधिदेवा । त्यासिच पाविजे ते. ॥ ३२२ ॥ असक्त कर्म आचर म्हणतां । तरी इतका अर्थ न निघता । **'समाचर'** म्हणतां तत्त्वता । भाव सूचविला इत्यादि. ॥ ३२३ ॥ **समाचर** म्हणजे जो प्रकार । त्या प्रकारें सम्यक् आचर । सम्यक् म्हणतां हा भाव कीं आधार । यास पूर्वोक्त **विष्णुसमर्पणविधीचा.** ॥ ३२४ ॥ भाव ऐसा मनीं । श्रीकृष्णाच्या म्हणोनी । बोलतो उत्तरार्धेंकरूनी । कर्मार्पणेंचि प्राप्ति ज्या पुरुषाची. ॥ ३२५ ॥

**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

अगा! फळीं न होऊनि आसक्त । कर्में समर्पी तरीच होय मुक्त । म्हणूनि निष्कामकर्में भक्त । पावतो परमपुरुषातें. ॥ ३२६ ॥ हें वेदशास्त्रें सिद्ध करूनी । आज्ञा केली कर्म करीं म्हणोनी । आतां संतांच्या प्रवृत्तीवरूनी । हेंचि करीं म्हणतो या श्लोकीं. ॥ ३२७ ॥

**कर्मणैव[२] हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**

अगा! जीवन्मुक्त । काम्यत्यागें संन्यासी विरक्त । नित्यकर्मार्पणें हरिभक्त । होऊनि सिद्धि बरी पावले. ॥ ३२८ ॥ या पूर्वोक्त भावें हरी । म्हणे कर्मेंचि

१. श्लोक ९ पहा. २. कर्मानेंच जनकादि पुरुष संसिद्धि पावले. केवळ लोकहिताकडे पाहून [हे अर्जुना!] तूं कर्म करण्यास योग्य आहेस.

करितां बरी । सिद्धि पावले जनकादि तरी । कर्मेंचि करीं अगा! तूंही. ॥ ३२९ ॥ पूर्वार्धपर्यंत गोष्टी । ऐसी सिद्धि होतां किरीटी । करीं विचार पोटीं । कीं कर्म नलगे मजलागीं. ॥ ३३० ॥ कीं जरी करूं कर्म । भीष्मादिवधें होतो स्वधर्म । तरी आत्मत्वें कळतां ब्रह्म । आत्मरतास कर्म नलगे. ॥ ३३१ ॥ मी नव्हे आत्मज्ञानी । मज कर्म करीं म्हणतो म्हणोनी । परी आत्मज्ञास कर्म नलगेसें करूनी । स्वयें देवची बोलिला. ॥ ३३२ ॥ तरी जो मज हे धर्म । सांगतो तो न सांगे कां ब्रह्म । मी शिष्य शरणही प्रपन्नधर्म । म्यां तों पूर्वाध्यायींच निवेदिला. ॥ ३३३ ॥ आतां आत्मरत आत्मतृप्त । आणि आत्मलाभेंचि असणें संतोषयुक्त । इत्यादि मत हें मज असे युक्त । कीं मी असें विरक्त सर्वत्र. ॥३३४॥ जिता भूमीच वरी । सार्वभौम होऊनिही जरी । निष्कंटक पावलों ये अवसरीं । तरी नलगे मज तें इंद्रपद. ॥ ३३५ ॥ कीं भीष्मादिवधाचा शोक । न नासे, पावलों जरी दोनी लोक, । पूर्वाध्यायीं उत्तमश्लोक । प्रार्थिला म्यां या वचनेंही. ॥ ३३६ ॥ विषयवासनाही माझी मेली । कीं जीवितेच्छाही माझी गेली । तनु माझी तुकडे केली । कौरवीं तरी तें मज इष्ट. ॥ ३३७ ॥ हेंही मीच बोलिलों । आणि शिष्य म्हणोनि शरण आलों । तरी हा लागला बोलों । कीं कर्मचि करीं. ॥ ३३८ ॥ मागुती बोलों हा प्रकार । तरी श्रीगुरूसी बोलों नये फार । बोलतां वारंवार । न कळे काय म्हणेल. ॥ ३३९ ॥ परंतु जरी सांगे ब्रह्म । आणि निवारी हें करणें कर्म । तरी माझें कल्याण परम । त्यांत असे. ॥ ३४० ॥ हा भाव अंतर्यामीं । जाणे श्रीकृष्ण स्वामी । परी म्हणे ब्रह्म केंवी सांगों मी । जो मुखें ब्रह्म सांगा म्हणेना. ॥ ३४१ ॥ आणि जरी असेच सांगणें ब्रह्म । तथापि हें या हातीं कर्म । करवणेंचि असे कीं हा नेणे वर्म । हें असे याच्या प्रारब्धीं. ॥ ३४२ ॥ हे अष्टादशीं शेवटीं । यास सांगों गुह्य गोष्टी । आतां ब्रह्मोपदेश करणें पोटीं । असे आमुच्या या मिसें. ॥ ३४३ ॥ आत्मनिष्ठास कर्म । नलगे हें याणें मनीं वर्म । धरिलें तरी जाणोनिही ब्रह्म । कर्म करणें लोकसंग्रहार्थ. ॥ ३४४ ॥ हेंचि बोलों याला । कीं ब्रह्म सांगणेंचि असे मजला । नाहीं ठाउकें तुजला । कां म्हणे? ॥ ३४५ ॥ ऐसें म्हणतांचि डोई । ठेवील ये क्षणींच पायीं । मग कोणत्याही उपायीं । वळेना कर्मी. ॥ ३४६ ॥ कीं जाणोनियां ब्रह्म । म्हणतो

---

१. अध्याय २ श्लो० ७ पद्य. २. लोकांस सन्मार्गास लावण्यासाठीं, लोकांचें स्वधर्माच्या ठायीं प्रवर्तन व्हावें म्हणून.

न करणें लागे कर्म । या प्रसंगीं सांगतां वर्म । गोष्टी खंडिलीच कर्माची. ॥ ३४७ ॥ यालागीं तूं तें नेणसी । प्रस्तुत बोलों नये गोष्टी ऐसी । पुढें सांगोनिही यासी । जनसंग्रहार्थ योजूं कर्मींच. ॥ ३४८ ॥ तरी तेंचि या प्रस्तुतीं । बोलों म्हणे संतांचा पती । म्हणूनि हें अर्जुनाप्रती । बोलतो या उत्तरार्धे. ॥ ३४९ ॥

**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

अगा! लोक सन्मार्गीं लावणें । त्या नांव 'लोकसंग्रहपण' । तें पाहोनिही तूं निपुण । करावया योग्य होसीच. ॥ ३५० ॥ पाहें पाहें हा जनक । जगदलंकारीं ब्रह्मकनक । देखोनिही लेंकरास जैसा जनक । जन ऐसा वर्तवी स्वधर्मीं. ॥ ३५१ ॥ कीं तो स्वयें जरी । वर्णाश्रमोचित[1] कर्म करी । लोक स्वधर्मीं वर्ततो तरी । हा भाव दावी या श्लोकीं. ॥ ३५२ ॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

अगा! श्रेष्ठ जो जैसें । आचरतो स्वयें तैसें । इतर जन आचरती ऐसें । प्रत्यक्ष दिसे. ॥ ३५३ ॥ आणि तो श्रेष्ठ सुजाण[2] । जें शास्त्र करी प्रमाण । जो मार्ग वर्तवी तोचि जाण । धरूनि वर्तती सर्वही. ॥ ३५४ ॥ जरी तो श्रेष्ठ कर्मातीत[3] । तरी कर्म करी निश्चित । येविषयीं मीच दृष्टांत । श्रीकृष्ण म्हणतो या श्लोकीं. ॥ ३५५ ॥

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

अगा! यावरूनि समज । कीं कर्तव्य कांहीं नसोनि मज । ऐश्वर्य अतर्क्य सहज । ज्या माझें. ॥ ३५६ ॥ त्रैलोक्यांत कांहीं । नाहीं प्राप्त मज ऐसें नाहीं । अथवा कांहीं प्राप्त व्हावें ऐसेंही । किमपि असेना. ॥ ३५७ ॥ ऐसें असोनिही मी । वर्तत आहेंच कर्मीं । कैसा न वर्तों मी जगाचा स्वामी । म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ३५८ ॥

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ! सर्वशः ॥ २३ ॥**

---

१. भिन्न वर्णाश्रमांसाठीं शास्त्रकारांनीं सांगितलेलें (कर्म). २. ज्ञाता. ३. कर्म करण्याचें कारण राहिलें नाहीं ज्याला.

अगा! आळस टाकोनि सर्वदा मी। जरी न वर्ते या स्वकर्मीं । तरी मनुष्यां सर्वांचा मी स्वामी। कीं ते सर्व मार्गीं माझ्याच. ॥ ३५९ ॥ माझीं कर्मे अद्भुतें। मानिती मी थोर त्यांच्या मतें । बरीं माझीं निश्चितें। कर्मे वाटती तयांस. ॥ ३६० ॥ मी आचरतों स्वधर्म। म्हणूनि तेही आचरती स्वकर्म। मज वाटतें मनुष्यजन्म। सफळ त्यांचा, मनुष्य तेच. ॥ ३६१ ॥ मी न वाटें ज्यांस थोर। ते पशु किंवा असुर घोर । नररूपी ते वानर खर[1]। मार्गीं माझ्या कां न वर्तती. ॥ ३६२ ॥ मी कल्पवृक्षस्वभावमूर्ती। त्यांची चिंता कां वाहों चित्तीं । त्यांकारणें कां प्रवृत्ती । कर्मीं करितों मी म्हणों. ॥ ३६३ ॥ ते नव्हती मनुष्य। पशुरूप ज्यांचें आयुष्य। त्यांचें प्रत्यक्ष दिसतें भविष्य। नरक आणि पशुयोनी. ॥ ३६४ ॥ कीं पशु चाविलें चाविती। हे सेविले विषय सेविती। परी पाहतां याहूनि बरी स्थिती । पशूंची. ॥ ३६५ ॥ पशु पडे अंधकूपीं[2]। निघणें असाध्यचि तथापि। चरफडी निघावया हे पापी। गृहांधकूपीं[3] सुख मानिती. ॥ ३६६ ॥ पशु पशुत्वापासूनी। सुटे हे चौर्‍यांशीं[4] लक्ष योनी। प्राप्त होती नरक भोगूनी । ऐसीं कर्मे आचरती. ॥ ३६७ ॥ असोत त्यांच्या गोष्टी। एवं इत्यादि भाव पोटीं। तों **कृष्ण** म्हणे अगा! **किरीटी!**। मनुष्य ते माझ्या मार्गीच वर्तती. ॥ ३६८ ॥ अनुलक्षूनि माझा मार्ग । वर्तती सर्व मनुष्यवर्ग । **'सर्व'**शब्दें **श्री**रंग। गहन भाव एथें सूचवी. ॥ ३६९ ॥ कीं लक्षकोटींत एक। मनुष्य धरी स्वहिताचा विवेक। त्यावेगळा इतर लोक। ईश्वर मी एक आहें हेंही नेणती. ॥ ३७० ॥ आणि मी बोलतों **श्री**पती। कीं सर्व मनुष्य माझ्या मार्गे अनुवर्तती । तेव्हां

---

१. गाढव. २. तृणादिकांच्या आच्छादनामुळें ज्याचें तोंड स्पष्ट दिसत नाहीं असा कूप, विहीर. ३. घर हाच अंधकूप यांत. ४. एकंदर योनी चौऱ्यायशीं लक्ष आहेत. या चौऱ्यायशीं लक्ष योनींची संख्या अशीः–२१ लक्ष अंडजखाणींत [९ लक्ष योनि सर्प, मुंगी इत्यादि, ४ लक्ष योनि जळचरांत, ८ लक्ष योनि पक्षिकुळांत,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष जारजखाणींत [९ लक्ष द्विपदयोनि, ४ लक्ष चतुष्पदयोनि, ८ लक्ष श्वापदयोनि,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष उद्भिज्जखाणींत [९ लक्ष अन्नधान्यादिक, ४ लक्ष सुगंधादिक पदार्थ, ८ लक्ष वृक्ष तृण इत्यादि,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष स्वेदजखाणींत [९ लक्ष तारागणादिक, ४ लक्ष मेघमाला, ८ लक्ष हिरे, रत्नमाणिकादि, मिळून २० लक्ष]; याप्रमाणें प्रत्येक खाणींत २१ मिळोन चार खाणींत ८४ योनि होतात. दुसऱ्या मताप्रमाणें २१ लक्ष वृक्षयोनि, ११ लक्ष कीटकयोनि, ३० लक्ष पशुयोनि, ९ लक्ष जलचरयोनि, १० लक्ष पक्षियोनि, आणि ४ लक्ष मनुष्ययोनि, मिळून ८४ लक्ष योनि होतात.

जे माझ्या सन्मार्गीं प्रवर्तती । तेचि मनुष्य. ॥ ३७१ ॥ एवं ऐशा कारणें । मज अगत्य स्वधर्म करणें । हें न करितां लोकांचा आपण । घातक होणार म्हणतो या श्लोकीं. ॥ ३७२ ॥

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥**

कर्म न करीं मी जरी । हे भ्रष्ट होती लोक तरी । कीं श्रीकृष्ण कर्म न करी । कर्म करणेंचि फटकाळ. ॥ ३७३ ॥ आतां मी स्वयें ब्रह्म । लोकांकारणें करितों कर्म । म्हणूनि भलत्या वर्णीं भलता धर्म । भलतिया वर्णींचा जरी करूं. ॥ ३७४ ॥ तुज ऐसा क्षत्रिय होऊनी । म्हणसी भक्षीन भिक्षा मी मागोनी । हा ब्राह्मणधर्म करीन म्हणोनी । इच्छितोसि जैसा. ॥ ३७५ ॥ संतान परपुरुषापासुनी । होय तें संकर म्हणोनी । म्हणिजे तें अभिज्ञजनीं । अगा! जैसें. ॥ ३७६ ॥ तैसा असोनि एकवर्णाश्रमीं । वर्ते अन्यवर्णाश्रमधर्मीं । संकर म्हणावें तें ज्या कर्मीं । व्यभिचार घडला. ॥ ३७७ ॥ ब्राह्मणां यजन याजन । आम्हां क्षत्रियां एक यजन । याजन करीं मी यदुनंदन । तरी तें कर्म संकर म्हणावें. ॥ ३७८ ॥ यजन म्हणजे यज्ञ यजणें । उचित आम्हां यज्ञचि करणें । दुसरिया हातीं यज्ञ करविणें । तें याजन निषिद्ध क्षत्रियां. ॥ ३७९ ॥ उचित आम्हां अध्ययन । ब्राह्मणां अध्ययन अध्यापन । आम्हां उचित देणें दान । प्रतिग्रह घ्यावा ब्राह्मणींच. ॥ ३८० ॥ एवं भिक्षा ब्राह्मणधर्म । आम्हां क्षत्रियां तो अधर्म । वेद पढवणें हेंही कर्म । उचित नव्हे आम्हांसी. ॥३८१॥ इत्यादि भाव मनीं । श्रीकृष्णें धरूनी । म्हणतो कीं संकर म्हणोनी । म्हणावें अनुचिता कर्मातें. ॥३८२॥ कीं संकर कर्माचा कर्ता । जरी मी होतों अगा! पार्था! । तरी सकळ प्रजांचा पुरता । मीच जाण घात करणार. ॥ ३८३ ॥ करूनिही कर्म । संकर होऊं नेदी धर्म । लोकसंग्रहाचें वर्म । अगा! ऐसें. ॥ ३८४ ॥ लोकसंग्रह करावया । तूंही अगा! धनंजया! । योग्य होतोसि टाकीं या । गोष्टी स्वधर्मत्यागपरधर्माश्रयाच्या. ॥ ३८५ ॥ जनसंग्रहाकारणें । जरी अगा! कर्म करणें । तथापि आदर न धरणें । हा भाव दावी आतां या श्लोकीं. ॥ ३८६ ॥

---

१. व्यर्थ. २. यज्ञ करणें. ३. यज्ञ करविणें. ४. वेदादि शिकविणें, पढविणें. ५. दान घेणें.

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ! ।**

**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

अगा ! ज्ञान नाहीं जयास । कर्मीं अत्यंत आदर तयास । कर्मचि तारील आम्हांस । हे कर्मश्रद्धा अज्ञजनां. ॥ ३८७ ॥ आणि हे गोष्टही खरी । कीं अज्ञानी जरी कर्मं न करी । तो तरेल कवणेपरी । त्यास असावाच आदर. ॥ ३८८ ॥ कर्मनिष्ठ आसक्त कर्मीं । याची निष्ठा सर्वगतब्रह्मीं । हाही श्रद्धा धरी क्रियाधर्मीं । तरी श्रद्धा ब्रह्मीं मग कैंची. ॥ ३८९ ॥ ज्ञानचि वाटे तारक । तरीच ब्रह्मत्वावलोक । सर्वत्र घडे आणिक एक । तारक म्हणतां हें कैंचें. ॥ ३९० ॥ म्हणोनि जरी कर्मचि न करी । लोकसंग्रह न घडे तरी । ज्ञान जालियावरी । जनोद्धारही आवश्यक. ॥ ३९१ ॥ याकारणें मनीं । कर्म तारक नव्हे म्हणोनी । करावें श्रद्धा टाकूनी । लोकसंग्रहाकारणें. ॥३९२॥ परी ते श्रद्धा धरूनि । करिती तुवां अश्रद्धेंहीकरूनि । तैसेंचि सांग करावें म्हणोनि । श्रीकृष्ण येथें भाव दावितो. ॥ ३९३ ॥ या प्रसंगें तूं **भा**रत ! । म्हणे **अ**र्जुनातें **अ**च्युत । कीं तूं **भ**रतकुलीं उत्पन्न तुज उचित । कीं युद्धीं मारावें या सर्वां. ॥ ३९४ ॥ तरीच श्रद्धा कर्मांची । तुझी दिसेल **स**व्यसाची । कीं तूं सव्यसाची ऐसाची । प्रसिद्ध या **भा**रतांत. ॥ ३९५ ॥ आतां आपणास अश्रद्धा । तथापि लोकांस कर्मीं श्रद्धा । उत्पन्न करावी हें प्रबुद्धां । अगत्य म्हणतो या श्लोकीं. ॥ ३९६ ॥

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**

**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥**

अगा ! ज्यांचें अंतरंग । कर्मीं रंगोनि कर्मसंग । धरिला जिहीं बुद्धिभंग । करूं नये त्यां अज्ञांचा. ॥ ३९७ ॥ सर्व कर्मीं तयांला । योजावें हें उचित

---

१. हे भारता ! ज्याप्रमाणें अज्ञ पुरुष कर्मांच्या ठायीं आसक्त होऊन कर्म करतात, त्याप्रमाणें विद्वान् पुरुषानें अनासक्त होऊन लोकसंग्रह करण्याच्या इच्छेनें कर्म करावें. २. कर्मांवर विश्वास. ३. ब्रह्म पाहणें. ४. वर्णाश्रमधर्मसंरक्षणासाठीं. ५. दोन्ही हातांनीं धनुष्यास बाण लावून सोडितां येत असल्यामुळें अर्जुनास पडलेलें नांव. अर्जुनाला 'सव्यसाची' असें नांव पडण्याचें कारण असें—'उभौ मे दक्षिणौ पाणी गांडीवस्य विकर्षणे । तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥' [महाभारत.] श्रीधरस्वामींनीं असा विग्रह केला आहेः— 'सव्येन वामेन हस्तेन साचितुं शरान्संधातुं शीलं यस्य स सव्यसाची.' ६. शाहण्यांस.

याला । कीं ज्ञान नाहीं जयांला । कर्मेंचि तयां फलप्राप्ती. ॥ ३९८ ॥ परी त्यांस देतां अनुमोदन । क्षणीं भ्रम पावे आपलें मन, । हें बोलतो मधुसूदन । चतुर्थ चरणीं. ॥ ३९९ ॥ कर्म करा म्हणोनी । त्यांस उपदेश करूनी । आपण अश्रद्धाही धरूनी । कर्में बरेच रीती आचरावीं. ॥ ४०० ॥ कीं ज्ञानी आपण । विदित आत्मत्वें ब्रह्मखूण । तेथें चित्तें निपुण । युक्त असोनि कर्में आचरावीं. ॥ ४०१ ॥ ऐसें युक्त स्वयें असोनी । आपणही कर्में आचरोनी । त्यांस कर्म करा म्हणोनी । कर्मींच योजावें. ॥ ४०२ ॥ परी करूं नयें बुद्धिभेद । कीं ज्ञानचि मुख्य म्हणतो वेद । या गोष्टीनें खेद । अनधिकारी पावती. ॥ ४०३ ॥ आतां ज्ञानी अज्ञानी सम । दिसती करितां कर्म । म्हणोनि अज्ञानियांचा भ्रम । बोलतसे या श्लोकीं. ॥ ४०४ ॥

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥**

प्रकृतीचे गुण । सत्त्व मन रज इंद्रियगण । देह पंचभूतांश लक्षण । तमोगुणाचा. ॥ ४०५ ॥ मन ज्याचा संकल्प करी । इंद्रियें धांवती त्यावरी । ऐसीं मन इंद्रियें शरीरीं । वर्तविती शरीरातें. ॥ ४०६ ॥ हें बुद्धीस न कळे । जे वेडी अहंकारें जळे । त्या बुद्धीनें खवळे[1] । मी कर्ता म्हणोनि अज्ञानी. ॥ ४०७ ॥ जो ज्ञानी तो नव्हे ऐसा । म्हणसील तरी तो कैसा । तरी ऐक सांगतों ऐसा । तत्त्वज्ञानी या श्लोकीं. ॥ ४०८ ॥

**तत्त्ववित्तु महाबाहो! गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥**

अर्जुना! तत्त्वें निवडूनी । जड चैतन्य भाग दोनी । जो जाणतो आत्मज्ञानी । तो तों 'तत्त्वज्ञ.' ॥ ४०९ ॥ जे सामग्रीनें कर्मसिद्ध । ते आपण नव्हे हें जाणे प्रबुद्ध । अहंकारापरतें आत्मत्व शुद्ध । तत्त्वज्ञ जाणे. ॥ ४१० ॥ उरला टाकोनि मीपण । तो तत्त्वज्ञ आपण । मी कर्ता न म्हणे निपुण । त्यजितां अहंकार. ॥ ४११ ॥ आणि कर्म तों घडतें । तें कर्म म्हणावें तयातें । कीं विषयभोग इंद्रियांतें । घडोनि येती. ॥ ४१२ ॥ विषय घेणें कर्म । तें कर्म इंद्रियांचे धर्म । [2]उभयविभागीं दिसे वर्म । अकर्तृतेचें. ॥ ४१३ ॥ इंद्रियें म्हणावीं गुण । कर्म विषयग्रहण । गुणकर्मविभाग कळणें । इतुकेंची.

१. उचंबळतो. २. दोहींचें पृथक्करण केल्यानें.

॥ ४१४ ॥ या दों विभागांचे ठायीं । इंद्रिय देखे स्वस्वविषयीं । तृणीं चरतां गाई । रक्षणीं न दिसती कोणा. ॥ ४१५ ॥ गाई चरती तृण । दोनी नव्हे द्रष्टा पुरुष आपण । तैसा गुणकर्मद्रष्टा निपुण । वेगळा. ॥ ४१६ ॥ जैशा गाई नाना तृणीं । तैसे गुणही गुणीं । रज इंद्रियें तमविषय म्हणोनि । गुणीं गुण वर्तती हें मानी. ॥ ४१७ ॥ मानावें हें मनाचें कृत्य । तें मन जाणे सत्य असत्य । आत्मा कळतां सत्य नित्य । अकर्ता मानी त्या आत्मयातें. ॥ ४१८ ॥ तें मन इंद्रियद्वारा । घेणार विषयवासनेचा चारा । विरक्त होऊनि निर्विकारा । पाहणारही तेंचि. ॥ ४१९ ॥ आत्मा अकर्ता मना तया । कळोनिही गोड विषया । मानी तेव्हां आत्मया । अकर्ता जाणोनिही कार्यसिद्धी. ॥ ४२० ॥ कीं मीपणावांचूनी । विषयापेक्षा नुपजे मनीं । मज भोग न हो म्हणतां कोठूनी । विषयवासना उठेल. ॥ ४२१ ॥ मज म्हणणें मीपण । तेथें सर्वकर्तृत्वलक्षण । एवं नव्हे तो विचक्षण । अकर्तात्माही कळोनी. ॥ ४२२ ॥ कीं आत्मा सर्वदाही अकर्ता । जरी मीपणें मानिला कर्ता । एवं मीपणाच वरता । कर्तृत्वाचा ठसा असे. ॥ ४२३ ॥ असो नसो मीपण । आत्मा अकर्ताचि आपण । परी तो व्यर्थ जों अहंस्फुरण । असे मनासी. ॥ ४२४ ॥ टाकितां तो अहंकारप्रत्यय । मनासि शुद्धात्मतेचा निश्चय । कळोनि अकर्ता आत्मा तन्मय । मन होतां अकर्ता पुरुष तो. ॥ ४२५ ॥ तथापि प्रारब्धाचा देह । जरी नसे विषयांचा स्नेह । भोग न चुके निःसंदेह । इंद्रियांस विषयांचा. ॥ ४२६ ॥ कळोनिही अकर्तृता । जरी विषयीं उपजे आसक्तता । ते मीपणाची कर्तृता, । अकर्तृता कैंची त्या पुरुषा? ॥ ४२७ ॥ प्रस्तुतीं अकर्तेपण । ज्याचें बोले श्रीकृष्ण । तो गुणीं वर्तती गुण । मानी ऐसें नव्हे आसक्त. ॥ ४२८ ॥ '**इति मत्वा न सज्जते**' । म्हणूनि भगवद्वाणी बोलते । तेथें भाव इत्यादि दाविते । कीं अकर्ता तरी जरी नव्हे आसक्त. ॥ ४२९ ॥ एवं कर्म करी अज्ञानी । लोकसंग्रहार्थ हांही ज्ञानी । कर्मचि करी ऐसा म्हणोनी । महदंतर असे त्यास यास. ॥ ४३० ॥ परी त्यांत जे काम्यपर । ते शास्त्र बोले फळीं सादर । त्यास खवळूं नये ऐसें सर्वेश्वर । म्हणतो आतां या श्लोकें. ॥ ४३१ ॥

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।**

**तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥**

अगा! प्रकृतीच्या तिन्ही गुणीं । अहंकर्तृत्वाची मांडणी । ते मागिल्या

या श्लोकगणीं । दाविली तुज. ॥ ४३२ ॥ एवं कर्म करी अज्ञानी । कीं सात्त्विक अहंकार मनीं । राजस अहंकार इंद्रियगणीं । तामस देहात्मपणीं. ॥ ४३३ ॥ या तिहीं अहंकारीं बुद्धि मूढ । बुद्धि विषयीं इंद्रियद्वारा दृढ । आसक्त भोगीं निरूढ । वासना ज्याची. ॥ ४३४ ॥ आणि केवळ मूर्खही नसती । शास्त्रज्ञ विवेकीही दिसती । तथापि वेदवाणी नुसती । वाखाणिती कर्मविषयींच. ॥ ४३५ ॥ एवं जरी शास्त्रज्ञ । तथापि नव्हती सर्वज्ञ । कीं पाहतां जैसे अज्ञ । तैसे वर्तती. ॥ ४३६ ॥ या भावें म्हणे मुकुंद । कीं ते अकृत्स्नवित् आणि मंद । डोळे असोनि अंध । गुणीं प्रकृतीच्याच ते मूढ. ॥ ४३७ ॥ तैसीयांस निष्काममार्गकथा । सांगोनि कां खवळावें वृथा । कीं मोक्षमार्गीं न सर्वथा । प्रवर्तती ते. ॥ ४३८ ॥ याकारणें तयां । चाळूंच नये गा धनंजया! । कीं काम्यापासूनि चाळिलिया । उभयभ्रष्टही ते होती. ॥ ४३९ ॥ बुद्धि चाळितां ते खवळती । निष्कामीं तों न वळती । थिल्या पुण्यकर्मापासूनि चळती । चाळूं नये तयांलागीं. ॥ ४४० ॥ पूर्वाध्यायाचे ठायीं निंदा । त्यांची करणें लागली मुकुंदा । एथें म्हणतो कीं तथापि त्या मंदां । खवळूं नये सर्वज्ञें. ॥ ४४१ ॥ जो गुणकर्मीं नव्हे मूढ । ज्यास अकर्तृता बाणली दृढ । त्याणें त्यांस आपलें गूढ । सांगों नये चाळूं नये. ॥ ४४२ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । आइकोत भावार्थें. ॥ ४४३ ॥ अर्जुनास आत्मज्ञान । अद्यापि नसोनि मधुसूदन । ज्ञानियांस बोलिजे वचन । तैसें बोलिला. ॥ ४४४ ॥ कीं लोकसंग्रहाकारणें । तरी तुज लागेच कर्म करणें । भाव कीं या हातीं कर्म करवणें । अपरोक्षोपदेश जाल्यानंतरही. ॥ ४४५ ॥ या प्रसंगें कितीएक । श्लोक बोलिला उत्तमश्लोक । कीं कर्म करिती लोक । तैसें न करी तत्त्वज्ञ. ॥ ४४६ ॥ आतां अर्जुनासही ज्ञान । पुढें देऊं पाहे करुणाघन । तेव्हां जें सांगावें तें वचन । कर्माविषयीं सांगतसे आतांच. ॥ ४४७ ॥ कीं ज्ञान जालियावरी । कर्मार्पण माझे ठायीं करीं । जें पूर्वीं बोलिला हरी । तें या प्रसंगीं दृढ करितो या श्लोकीं. ॥ ४४८ ॥

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

---

१. प्रबळ. २. नव्हेत जे सर्वज्ञ; नव्हेत जे तत्त्वज्ञ. ज्यांना सर्व स्थिति ठाऊक नाहीं ते पुरुष. ३. असलेल्या. ४. दयाघन (कृष्ण).

अगा! 'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र'[1] । या श्लोकीं कर्म मात्र । तुज बोलिलों बंधक अपवित्र । जें नव्हे यज्ञाख्य[2] विष्णुकारणें. ॥ ४४९ ॥ अगा! मीच तो यज्ञ । ज्यास अर्पावे सर्व यज्ञ । आतां तूं होऊनिही तत्त्वज्ञ । समर्पीं माझे ठायीं तूं कर्में. ॥ ४५० ॥ या भावें सगुण ब्रह्म । म्हणे अगा! सर्वेही कर्म । अर्पूनि माझे ठायीं स्वधर्म । करीं युद्ध तगबग[3] ठाकूनी. ॥ ४५१ ॥ ज्ञान जालियावरी । लोकसंग्रहार्थ तरी कर्म करीं । म्हणूनि म्हणतों तें यापरी । करीं अर्जुना! ॥ ४५२ ॥ कीं अध्यात्मचित्तेंकरूनी[4] । सर्व आत्मा ऐसें स्मरोनी । आशाममतारहित होऊनी[5] । करीं कर्म. ॥ ४५३ ॥ आशाममतारहित । कर्म करितां निश्चित । मीपणास नव्हे विदित । कर्म तें. ॥ ४५४ ॥ आशाममतारहितता । तेव्हां बाणे अकर्तृता । आणि कर्मीं दिसे ब्रह्मता । कीं असे स्पर्शिलें चित्ता अध्यात्म[6]. ॥ ४५५ ॥ ऐसा होऊनिही । कर्में करिसी जीं कांहीं । तीं समर्पीं[7] माझे ठायीं । जो मी सगुण साकार. ॥ ४५६ ॥ जरी टाकिला अहंकार । तरी मनीं त्याचा संस्कार । यालागीं वारंवार । कर्म अर्पावें मजलागीं. ॥ ४५७ ॥ आणि कर्में अर्पी तोचि दास । मग मी त्याचेविषयीं नव्हे उदास । योगसिद्ध्यर्थ प्रयास । लागों नेदीं मी त्याला. ॥ ४५८ ॥ **'ब्रह्मार्पणं ब्रह्म हवि'**[8] । चतुर्थाध्यायांत हेंचि गोसावी । बोलतील एथें पहावीं । वचनें तींच गूढभावें. ॥ ४५९ ॥ निर्गुणवादाभिमानी । तो एथें ऐसें न मानी । कीं जाला आत्मज्ञानी । तो कां कर्में समर्पील? ॥ ४६० ॥ आणि **'अध्यात्मचेतसा'** । म्हणोनि एथें कृष्ण ऐसा । बोले त्याचा भलतसा । वाखाणिती अर्थ. ॥ ४६१ ॥ ऐसेंचि द्वादशाध्यायीं[9] । श्रीकृष्ण म्हणेल माझे ठायीं । कर्में अर्पिती आणि माझे पायीं । तत्पर मीच थोर म्हणोनी. ॥४६२॥ त्यास मी उद्धरणार[10] । मृत्युसमुद्रपैलपार । पाववीन म्हणे आणि थोर । तो निर्गुणोपासकापरिस. ॥ ४६३ ॥ निर्गुणोपासक ज्ञानी । कर्में समर्पणार तो जरी अज्ञानी । तरी तो थोर ज्ञानियाहूनी । हें स्ववचनाशीं विरुद्ध कां बोलेल? ॥ ४६४ ॥ सर्वत्रही ज्ञानी । थोर सकळांहूनी । स्वयें म्हणोनि अज्ञानी । द्वा-

---

१. अ० ३ श्लो० ९ पहा. २. यज्ञ नांव ज्यास आहे असा विष्णु. ३. तगमग. ४. एकाग्रचित्तानें. ५. निष्काम होऊन आणि कर्माविषयीं अभिमान सोडून. ६. ब्रह्मज्ञान. ७. सर्व कर्में मला अर्पण करावीं. ८. अध्याय ४ श्लोक २४ पहा. ९. अध्याय १२ श्लोक ६–७ पहा. १०. संसारसागरापासून वर उचलून घेणार (अध्याय १२ श्लोक ७).

दर्शी कां म्हणेल थोर त्यापरिस. ॥ ४६५ ॥ एथेंही त्याच्या कुयुक्ति नाना । कीं स्ववचनाची स्थापना । होय ऐसी कल्पना । असे परी ते होतसे असिद्ध. ॥ ४६६ ॥ एवं आत्मज्ञानियास भक्ति । नलगे म्हणतील त्यांच्या कुयुक्ति । न चलती ऐशा उक्ति । सर्वज्ञ त्या अध्यायींच बोलेल. ॥ ४६७ ॥ या ज्ञानाभिमानगोष्टी । दीर्घदृष्टीचीही अदीर्घदृष्टी । तेथेंचि विशद होणार वृष्टी । जेथें भक्ति सुरसामृताची होणार. ॥ ४६८ ॥ एवं जरी ज्ञान जालें । तरी पाकास पाहिजे आलें । ज्ञानियानें पाहिजे केलें । सगुणभजन यालागीं. ॥४६९॥ अर्जुनास म्हणतो म्हणोनी । कीं अध्यात्मचित्तेंकरूनी । कर्मे करूनि मज अर्पूनी । करीं युद्ध स्वधर्म. ॥ ४७० ॥ कीं ज्या आसनीं बैसला । त्याच आसनीं ज्ञान त्याला । देणार मग युद्ध करणें ज्याला । लागेल कर्म. ॥ ४७१ ॥ देशाधिपत्य दीधलें नाहीं । परंतु देणार ऐशासही । राजे सांगती जें कांहीं । कर्म करावें पदारूढ जालिया. ॥ ४७२ ॥ तैसा एथें अर्जुन । त्यास न म्हणावें कीं नाहीं ज्ञान । '**अध्याध्मचेतसा**' हें वचन । या भावें श्रीकृष्ण बोलिला. ॥ ४७३ ॥ आतां नसोनिही ज्ञान । मज सकळ कर्मार्पण जन । करितील तेही मधुसूदन । तरतील म्हणतो या श्लोकीं. ॥ ४७४ ॥

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।**
**श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

अर्जुना! हें माझें मत । कीं मज अर्पावें निष्काम नियत[1] । ते मानवही निश्चित । मुक्त होती. ॥ ४७५ ॥ ऐसे मानव तेही । तरती संदेह कांहीं । न धरीं कीं ज्ञान नाहीं । म्हणोनि. ॥ ४७६ ॥ तेही कर्मापासोनि सुटती[2] म्हणोनी । बोलतां भाव या वचनीं । ऐसा कीं होऊनि ते ज्ञानी । मुक्त होतील. ॥ ४७७ ॥ माझ्या प्रसादें निश्चित । ज्ञान होणार जें माझें मत । अनुष्ठिती[3] कर्म विहित । निःसंग अर्पूनि मजलागीं. ॥ ४७८ ॥ असोनिही माझ्या मतीं । दोनी गोष्टी असाव्या चित्तीं । माझ्या श्रवणकीर्तनीं भक्ती । आणि मज समजणें निर्दोष. ॥ ४७९ ॥ म्हणूनि म्हणतो कीं श्रद्धावंत । श्रद्धा भक्ति ती करूनि युक्त । आणि माझे ठायीं असूयारहित[4] । कीं दोष न ठेवणें मजवरी. ॥ ४८० ॥ अगा! मी सर्व सम । विषमफळ देतां दिसतों विषम । कीं

---

१. संध्यादि नित्यकर्म. २. कर्माच्या बंधनापासून मुक्त होतील. ३. करतात, वागतात. ४. दोषबुद्धिरहित.

जैसें ज्याचें कर्म । फळ देतों तदनुरूप. ॥ ४८१ ॥ ज्यास हेंही वर्म कळे । त्याचेही धुरें भरती डोळे । माझ्या थोरपणेंही [1]चावळे । दोष ठेवी मजवरी. ॥ ४८२ ॥ कीं ईश्वर सर्वकर्ता । तरी तोचि सर्व करवितो हे वार्ता । बोलतां बैसतो ठसा वर्ता । निर्दयत्वाचा. ॥ ४८३ ॥ कीं मी करवितों पाप । आणि जीव भोगितो नरकादि ताप । तेव्हां माझ्या ईश्वरत्वाचा प्रताप । [2]अवसान पावला निर्दयत्वीं. ॥ ४८४ ॥ इत्यादि एथें भाव । ते [3]पंचमाध्यायांत बोलेल देव । येथें म्हणतो देवाधिदेव । कीं दोष न ठेवितां मजवरी. ॥४८५॥ मी थोर ऐसें समजती । कर्तृत्व निर्दोष माझें उमजती । आणि कर्में करूनि मज भजती । ते मुक्ति पावतील आत्मज्ञानेंकरूनी. ॥ ४८६ ॥ दोष मज जे न लाविती । तेच मत माझें अनुष्ठिती । जे माझ्या मतातेंचि दूषिती । ते आईक म्हणतो या श्लोकीं. ॥ ४८७ ॥

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥**

हा निवृत्तिमार्ग पार्था! । जे प्रवृत्तिमार्गीं सर्वथा । ते काम्यतत्पर हे कथा । उडविती दोष ठेवूनी. ॥ ४८८ ॥ काम्यपरां फळापेक्षा । निष्काम कर्म नाणिती लक्षा । कीं निष्कामता देणार मोक्षा । तो मोक्षचि म्हणती फटकाळ. ॥ ४८९ ॥ वेदांतवक्ता **वेदव्यास** । काम्यकर्मीं मुमुक्षुजनांस । [5]निघों नेदी परंतु अनधिकारियांस । उभयभ्रष्टता म्हणे या प्रसंगें. ॥ ४९० ॥ कीं मोक्षरुचीनें काम्य टाकिती । आणि अशुद्धचित्त निष्कामही न होती । मोक्ष आणि स्वर्ग दोनी गती । अंतरती तयांच्या. ॥ ४९१ ॥ आपण तों मोक्ष बडिवार । बोलिलों वारंवार । आपणचि त्याचा निंदाप्रकार । बोलतां सन्मार्गच बुडतो. ॥ ४९२ ॥ म्हणुनि वेदव्यास मुनी । जो शिष्य आपला [6]जैमिनी । बडबड करी म्हणोनी । म्हणे त्याला. ॥ ४९३ ॥ असो हें पूर्वाध्यायीं । याच टीकेच्या ठायीं । बोलोनि तें पायीं । अर्पिलें हरीच्या. ॥ ४९४ ॥ एवं तो जैमिनी । मुक्तीच लटकी म्हणोनी । बोलिला तेव्हां तो कां जनीं । निष्काममार्ग स्थापील? ॥ ४९५ ॥ एवं त्याचें वचन । साच मानी ज्यांचें

---

१. बरळतो. २. समाप्ति. ३. अध्याय ५ श्लोक १४-१५ पहा. ४. परंतु जे पुरुष माझ्या मताला दूषण लावतात, आणि त्या मताप्रमाणें वागत नाहींत, ते सर्व ज्ञानविमूढ नष्ट आणि विवेकशून्य आहेत असें समज. ५. रिघूं. ६. हा मीमांसादर्शनाचा कर्ता.

मन । ते काम्यतत्पर जन । दोष ठेविती यावरी. ॥ ४९६ ॥ या भावें म्हणे हरी । कीं नसता दोष माझ्या मतावरी । ठेविती अनुष्ठान तरी । न करितीच कीं. ॥ ४९७ ॥ ते आपणास शास्त्रज्ञानी । मानिती स्वमताभिमानी । परी ते जें जें जाणतों म्हणती मनीं । त्या त्या ज्ञानीं ते मूढ. ॥ ४९८ ॥ ऐसें तूं जाण अर्जुना! । ज्ञणीं ज्ञाते म्हणसी त्या जनां । मनीं या माझ्या वचना । दृढ धरीं. ॥ ४९९ ॥ काम्यचि करिती यथेष्ट । सन्मार्ग निंदिती ते दुष्ट । स्वहितापासोनि भ्रष्ट नष्ट । जाले ऐसें जाण तूं. ॥ ५०० ॥ अगा! शास्त्र न कळे जया । परम मूढा जना तया । काम्यकर्मीं योजावें या । शास्त्रज्ञ पंडितीं. ॥ ५०१ ॥ आणि तिहीं स्वयें । निष्कामीं वर्तावें निश्चयें । ऐसें असोनि अविद्यामयें । काम्यकर्मेंचि ते आचरती. ॥ ५०२ ॥ वेदांचे अर्थ कळती । तथापि स्वहितीं ते न वळती । देखोनि मोक्षपथ खवळती । वेदीं पुराणीं. ॥ ५०३ ॥ जैमिनीचे बोल । परमार्थहीन फोल । ते मानूनि अत्यंत खोल । वाखाणिती. ॥ ५०४ ॥ त्या जैमिनीचा गुरु व्यास[1] । दूषिती त्याच्या मतास । दुष्ट करिती उपहास । मोक्षमार्गाचा. ॥ ५०५ ॥ शास्त्रें स्वयें वाचिती । कांहीं नवींही रचिती । म्हणोनि सुबुद्ध त्यांतें चित्तीं । ज्ञणीं मानिसी. ॥ ५०६ ॥ ते जाण बुद्धिहीन । व्यर्थ त्यांचें सर्वही ज्ञान । दृढ धरूनि माझें वचन । संग न धरीं तयांचा. ॥ ५०७ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुज्ञ लोक । परिसोत. ॥ ५०८ ॥ पूर्वश्लोकीं सर्वेश्वर । निंदिता जाला काम्यतत्पर । तो अर्जुन परम चतुर । सशंक[2] जाला ये स्थळीं. ॥ ५०९ ॥ म्हणे ज्यांच्या मनीं कामना । काम्यकर्मही त्या जनां । आवडे ते या मधुसूदना । न आवडती. ॥ ५१० ॥ यास आवडती ज्ञानी । त्यांतही कोणी विषयसेवनीं । वर्तती ज्ञान असोनी । विकारीं इंद्रियांच्या. ॥ ५११ ॥ तेव्हां ज्ञानियांसहि कामना । जैसी काम्यपरांचिया मना । तेही या जगज्जीवना । अप्रिय नव्हती यापरी. ॥ ५१२ ॥ हें अर्जुनाचे मनीं । तो सर्वसाक्षी समजोनी । बोलतसे हास्य करूनी । दों श्लोकें. ॥ ५१३ ॥

**सदृशं[3] चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ? ॥ ३३ ॥**

---

१. व्यास हा वेदांताचा प्रवर्तक होता. २. शंकायुक्त. ३. ज्ञानवान्‌ही पुरुष आपल्या प्रकृतीप्रमाणें वागतो, प्राणिमात्र आपल्या प्रकृतीला अनुसरतात, तर येथें मनोनिग्रहाचें काय चालणार आहे ?

अरे! ज्ञानवंत जरी जाला । प्रारब्धें प्रकृति लागलीच त्याला । कीं भोगें क्षय बोलिला । प्रारब्धाचा. ॥ ५१४ ॥ परी जेव्हां जाला ज्ञानी । मग त्याची जे म्हणावी प्रकृति म्हणूनी । ते प्रारब्धरूपिणीच त्यावांचूनी । प्रकृति मूलाविद्या म्हणवेना. ॥ ५१५ ॥ कळला आत्मानात्मविवेक । समाधिसुखें नाहीं ज्ञानपरिपाक । जरी जाणे अन्वयव्यतिरेक । ज्ञानसाधकचि तो म्हणावा. ॥ ५१६ ॥ जों त्याचा उपाधी । पावोनियां ब्रह्मात्मसमाधी । निर्विकल्प अथवा सविकल्प साधी । समाधि तो तों साधक. ॥ ५१७ ॥ तों त्यास असेच मूलप्रकृती । कीं न अनुभविली ब्रह्मात्मसमाधिस्थिती । समाधिसुख बाणतां चित्तीं । मग प्रकृति प्रारब्धावेगळी म्हणवेना. ॥ ५१८ ॥ अज्ञदशेचें कर्म । तें प्रारब्ध जालें हें वर्म । जैसा आचरला धर्माधर्म । तैसेंचि फळ भोगावें. ॥ ५१९ ॥ जरी विरक्त विषय फटकाळ । मानूनि असे तरी भोगकाळ । प्राप्त होतां काम्य व्याळ[1] । प्रारब्ध याला डसवितें. ॥ ५२० ॥ येतां भोगकाम्यविषयांच्या लहऱ्या । इंद्रियवृत्ति होती घाबऱ्या । होती मूर्च्छिता निजसुऱ्या । विवेकवृत्ती. ॥ ५२१ ॥ याकारणें ज्ञानी । प्रारब्धें प्रकृतीस वश होउनी । नाचतो प्रकृतीं सारिखा मनीं । नसोनिही विषयवासना. ॥ ५२२ ॥ कीं पंचभूतांशभूतें । ज्या प्रकृतीनें निर्माण जालीं तीतें । वश होतीच त्या कर्मफळप्रकृतीनें । सकळही. ॥ ५२३ ॥ त्यांत याचाही देह । प्रारब्धाचाच निःसंदेह । जरी सोडिला विषयस्नेह । प्रारब्ध उपजवीच घडि एक. ॥५२४॥ ज्ञान जालें आलीकडे । देह कर्माचा हें घडलें पलीकडे । भोगकाळ येतां भोग घडे । विरक्त ज्ञानियांसही. ॥ ५२५ ॥ रायाच्याही शासनबळें । न चुकती वृक्षाचीं फळें । प्रारब्धबळ आगळें[2] । परमेश्वरशक्तीकरितां. ॥ ५२६ ॥ पुत्राचीच जोड परी । माता ज्या धान्याचा पाक करी । त्या अन्नाच्या कूसरी[3] । त्यांत शक्ति मातेची. ॥ ५२७ ॥ जीवांचेंचि निवडूनि कर्म । शरीरें करी सगुणब्रह्म । जरी गेला वासनाभ्रम । तो प्रारब्ध यथाकाळीं भोगवी. ॥ ५२८ ॥ ज्ञानी जाला निस्पृह । जरी केला इंद्रियनिग्रह । प्रारब्ध प्रकृति निःसंदेह । भोगीं इंद्रियें वर्तवी. ॥ ५२९ ॥ प्रारब्ध प्रकृति मन हरील । तेव्हां निग्रह काय करील । काय म्हणूनि आवरील । ज्ञानीही तेव्हां मनातें? ॥ ५३० ॥ एथें कोणी म्हणती । कीं जरी भोग अचूक होती । तरी दाटून होईल भोगप्राप्ती । ज्ञानियातें.॥५३१॥ प्रकृतीसारिखा कां परी । चेष्टे आणि अंतरीं । कां

१. सर्प. २. मोठें, थोर. ३. कौशल्य.

निग्रहें मन नावरी। भोग अप्रार्थित इंद्रियांसी. ॥ ५३२ ॥ तरी हा नव्हे अनुभवी ज्ञानी। कांहीं विवेकसंपन्न म्हणोनी। ज्ञानवंत या शब्देंकरूनी। तो बोलिजेला भगवंतें. ॥ ५३३ ॥ तरी ऐसी नव्हे हे भगवद्वाणी। आणि शब्दशक्ति नसे [1]अहाचवाणी। 'ज्ञानवानपि' म्हणे चक्रपाणी। '**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृते**' म्हणोनी. ॥ ५३४ ॥ जरी ज्ञानवंत म्हणावा साधारण। जो नेणे अनुभवाची खूण। तो प्रकृतिबद्धचि आपण। नवल काय चेष्टतां प्रकृतीसारिखा? ॥ ५३५ ॥ प्रकृतीसारिखा चेष्टतो। हा शब्द गहन भाव देतो। जो प्रकृतिविलक्षण होऊनि असतो। तो प्रारब्धें चेष्टतो प्रकृतीसारिखा. ॥ ५३६ ॥ प्रकृति आणि पुरुष। हे दोनीच सकळ तत्त्वांचे घोस। पुरुष चिन्मात्र निर्दोष। जड विकार अवघे प्रकृतीचे. ॥ ५३७ ॥ त्यांत चिन्मात्र जो पुरुष। तो निर्गुण निर्धर्म निर्विशेष। शुद्ध सत्त्व निर्दोष। खूण आत्मत्वाची त्याकरितां. ॥ ५३८ ॥ जो सुषुप्तींत निराळा पडे। जेव्हां सत्त्व तमीं बुडे। तों आत्मा ठायीं पडे। त्याच सत्त्वीं. ॥ ५३९ ॥ '**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा**' म्हणूनी। याच अध्यायांतीं [2]स्वमुखेंकरूनी। श्रीकृष्ण म्हणेल ते बुद्धि सज्जनीं। सत्त्वशब्दें वाखाणिली. ॥ ५४० ॥ आत्मा बुद्धीपरता। परी त्या बुद्धीनेंच जाणावा तत्त्वता। व्यतिरेकें अन्वयें कळतां पुरता। सर्व तोचि. ॥ ५४१ ॥ ऐसा बुद्धीकरूनी। चराचर आपणचि म्हणोनी। प्रकृतीतरंगा पुरुषजीवनीं। तेव्हां प्राकृत जग पुरुषरूपें देखतो. ॥ ५४२ ॥ त्यास बुद्धि शुद्धसत्त्व प्रकृती। रज इंद्रियें तम विषयाकृती। या प्रकृतिभेदीं पुरुषस्थिती। वाणे अलंकारीं जैसें सुवर्णत्व. ॥ ५४३ ॥ पाहे जडत्वें इंद्रिया। जडत्वें पाहे विषया। प्रकृतिबद्धपुरुष ऐशिया। प्रकृतिभेदा ऐसा पाहतो. ॥ ५४४ ॥ पूर्वी ऐसाच होता निश्चित। तो गुरुकृपेनें जाला ज्ञानवंत। ज्ञान बाणतां अत्यंत। न चेष्टे प्रकृतीसारिखा. ॥ ५४५ ॥ इंद्रियास जड इंद्रियत्वें पाहणें। विषय जडत्वें तिहीं स्वीकारणें। भोगेच्छेनें सत्त्वें मनें स्थिर राहणें। हें चेष्टणें प्रकृतीचें ॥ ५४६ ॥ ज्ञानी बुद्धीकरूनी। इतकियासही आवरूनी। सर्वही आत्मा म्हणोनि। निग्रहशील असतो. ॥ ५४७ ॥ त्यास म्हणे भगवंत। कीं प्रारब्धभोगकाळीं ऐसाही ज्ञानवंत। प्रकृतीसारिखा अत्यंत। चेष्टों लागे. ॥ ५४८ ॥ इंद्रियत्वें इंद्रिया। विषयत्वें विषया। पाहों लागे आत्मया। तत्प्रकाशका विसरोनी. ॥ ५४९ ॥ हें प्रकृतीचें चेष्टणें। प्रारब्धें क्षण एक वेष्टणें। बुद्धीस

---

१. सरासरीपणानें. २. अध्याय ३ श्लो० ४३ पहा.

होती तेव्हां निपुणें । निग्रहशीलेंही करावें काय? ॥ ५५० ॥ एवंच तो अनुभवी ज्ञानी । प्रकृतीविलक्षणही होउनी । प्रकृतीसारिखा प्रारब्धेंकरूनी । चेष्टतो[1] म्हणे भगवंत. ॥ ५५१ ॥ सरतां तितका भोगकाळ। होऊं नेदी प्रकृतीचा विटाळ । रज्जुविस्मरणें क्षणैक व्याळ । वाटला तो मग न देखे अधिष्ठानीं. ॥ ५५२ ॥ एवं पूर्वश्लोकीं कर्मनिष्ठ । सर्वज्ञानविमूढ नष्ट । तेच भगवंतास न इष्ट । ज्ञानी ऐसाही आवडे. ॥ ५५३ ॥ कीं आवडे तो म्हणोनी । म्हणे परम दयेंकरूनी । कीं काय करील निग्रहें आवरूनी । असतो तरी. ॥ ५५४ ॥ एवं सर्वदा विरक्त । योगी सर्वात्मभक्त । क्षणभरी जाला विषयानुरक्त । तें प्रारब्ध म्हणावें दुर्निवार. ॥ ५५५ ॥ तें प्रारब्ध भोग दे परी । त्याच्या स्थितीचा भ्रंश न करीं । भ्रंश करणार दोघे वैरी । त्यांस वश न व्हावें म्हणतो या श्लोकीं. ॥ ५५६ ॥

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे[2] रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥**

अर्जुना ! इंद्रिया इंद्रियालागीं । आपल्या आपल्या विषयभोगीं । दोनी दोनी प्रकृति आंगीं । लागल्या अनादि त्या ऐशा. ॥ ५५७ ॥ गोड विषयीं प्रीति । गोड न लागे तेथें अप्रीति । परि ज्ञानियानें होतां विषयप्राप्ति । न व्हावें वश या दों गोष्टींस. ॥ ५५८ ॥ यास म्हणावें राग द्वेष । विघ्नकारक हेचि दोनी दोष । ज्ञानियास विशेष । हेच वैरी. ॥ ५५९ ॥ जरी प्रारब्धाच्या बळें । भोगावया कर्मफळें । चेष्टला भोगेच्छाछळें । प्रकृतीसारिखा घडी एक. ॥ ५६० ॥ प्रारब्ध विषयेंद्रियसंयोग । करवूनि देईल भोग । तेथें रागद्वेषांचा[3] संयोग । नसे तरी काय लेखा तयांचा? ॥५६१॥ प्रारब्धभोग न चुके[4] परी राग द्वेष दोष जाऊं शके । कीं अविद्याविकार तितके । जाती बळें विवेकाच्या. ॥ ५६२ ॥ अनादि अविद्या गेली । अनादि वासना मेली । अनादि प्रकृति मिथ्यात्वें नेली । तथापि उरलें प्रारब्ध. ॥ ५६३ ॥ प्रारब्ध भोगवी फळें । तेथें मन राग द्वेष मळें । मळोनि वासनाबळें । भ्रंश करी बुद्धीचा. ॥ ५६४ ॥ रागद्वेषांस नव्हतां वश । नव्हे कधीं बुद्धीचा भ्रंश । म्हणूनि म्हणे हृषीकेश । कीं वश न व्हावें याच दो शत्रूंस. ॥ ५६५ ॥ प्रारब्धभोग अनिवार जैसे ।

---

१. वागतो, वर्ततो. २. प्रत्येक इंद्रियाचे राग आणि द्वेष हे त्या इंद्रियाच्या विषयाच्या ठायीं दृढ बसलेले आहेत, कोणीही यांच्या अधीन होऊं नये, कां कीं ते त्यांचे शत्रु होत. ३. प्रीति आणि द्वेष यांचा. ४. पाड.

रागद्वेष नव्हती तैसे । ठाणें विवेकवैराग्याचें बैसे । रागद्वेष तेथें न राहती. ॥ ५६६ ॥ एवं प्रारब्ध आपलें भोगी । वश नव्हे रागद्वेषांलागीं । तो प्रियतम मज योगी । अप्रिय पूर्वोक्त असर्वज्ञ. ॥ ५६७ ॥ या दों श्लोकीं भाव । ऐसा दावी देवाधिदेव । स्वदासास जो वासुदेव । सोडवी रागद्वेषांपासूनी. ॥५६८॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत अनुसंधान कळावया. ॥ ५६९ ॥ 'मयि[1] सर्वाणि कर्माणि' । या श्लोकीं चक्रपाणी । बोलिला कीं कर्में माझे ठायीं अर्पुनी । युद्ध करीं टाकूनि तगबग. ॥ ५७० ॥ कर्में करावीं हा सिद्धांत । स्थापूनि बोलिला श्रीकांत । कीं युद्ध करीं म्हणोनि निश्चित । युद्धीं योजिला अर्जुन. ॥ ५७१ ॥ परंतु कर्मप्रशंसाप्रसंगें । हे गोष्टी पडिली मागें । कीं निष्काम अर्पणें हें श्रीरंगें । मत आपुलें म्हणोनि उपपादिलें. ॥ ५७२ ॥ हें माझें मत अनुष्ठिती । ते सर्व पापापासूनि सुटती । ज्ञानें भवपाश तुटती । त्यांचे ऐसें बोलिला स्वगर्भ[2]. ॥ ५७३ ॥ हें एका श्लोकीं बोलिला । प्रसंगें दुसरा श्लोक चालिला । कीं सर्वत्र मूढ जाण त्यांला । जे न अनुष्ठिती माझें हें मत. ॥ ५७४ ॥ त्या श्लोकीं कामनापर । शास्त्रज्ञ निंदिले नर । तों अर्जुनास फावला अवसर । संदेहाचा. ॥ ५७५ ॥ कीं जे काम्यतत्पर । ते यास न आवडती नर । तरी ज्ञानीही विषयभोगपर । कोणी कोठें दिसतीच. ॥ ५७६ ॥ तेव्हां यांची न कां अप्रीति । हा अर्जुनाचा भाव श्रीपति । समजोनि बोलिला कीं प्रारब्धप्रकृति । ज्ञानियासही अनिवार्य. ॥ ५७७ ॥ प्रकृतीच्या गुणानुसार । चेष्टे[3] ज्ञानीही नर । जरी निग्रहतत्पर । प्रारब्ध नावरे निग्रहातें. ॥ ५७८ ॥ तथापि बाधक नव्हे त्याला । भोगकामना नसे ज्याला । या प्रसंगें श्रीकृष्ण बोलिला । आणीकही श्लोक एक. ॥ ५७९ ॥ कीं वैरी ते दोवेच विशेष । विषयप्रीति विषयद्वेष । विघ्नकारक हेचि दोनी दोष । ज्ञानियांसी. ॥ ५८० ॥ वश न व्हावें या दोघांस । भाव कीं जो वश नव्हे यांस । प्रारब्धें नाचविलें जरी तयास । तरी तो न भ्रष्टे ज्ञानापासुनी. ॥ ५८१ ॥ एवं त्याहूनि पूर्वश्लोक । त्याचा भाव सिद्ध करी उत्तमश्लोक । तेव्हां काम्यपराचा अविवेक । त्याहूनि पूर्वश्लोकीं सिद्ध जाला. ॥ ५८२ ॥ निष्काम कर्म भगवंताचें मत । न अनुष्ठितां वाईट निश्चित । तेव्हां ते धन्य अत्यंत । जे त्या मागिल्या श्लोकीं वर्णिले. ॥५८३॥

---

१. अध्याय ३ श्लोक ३० पहा. २. आपलें रहस्य. ३. वागतो, चालतो.

कीं माझें मत हें जे अनुष्ठिती । ते सकळ कल्मषापासोनि सुटती । हें बोलिला जें श्रीपती । तें सिद्ध जालें. ॥ ५८४ ॥ तेव्हां तेंही जालें सिद्ध । कीं कर्में मज अर्पून करीं युद्ध । या गोष्टी अर्जुन प्रबुद्ध । समजला. ॥ ५८५ ॥ कीं **'मयि सर्वाणि कर्माणि'** । या श्लोकें चक्रपाणी । जे बोलिला स्ववाणी । ते स्मर्या करावी. ॥ ५८६ ॥ त्या श्लोकाचा अर्थ । मनीं आठवी पार्थ । कीं मज बोलिला ऐसें समर्थ । कीं **'मयि सर्वाणि कर्माणि'.** ॥ ५८७ ॥ कीं अध्यात्मचित्तेंकरूनी । मज सर्व कर्में अर्पूनी । आशा ममता टाकूनी । युद्ध करीं. ॥ ५८८ ॥ या सर्वही उत्तम गोष्टी । परि युद्ध म्हणतां होतो कष्टी । कीं पाहतां धर्मदृष्टी । दोष हिंसादि युद्धांत. ॥ ५८९ ॥ स्वधर्म परी वाईट । यांत स्वजनवधदोष उत्कट । जो अहिंसात्मक चोखट । तो धर्म म्यां कां न करावा? ॥ ५९० ॥ भाव इत्यादिक । अर्जुनाचा उत्तमश्लोक । समजोनि बोले हा श्लोक । श्रीकृष्ण आतां. ॥ ५९१ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

अर्जुना! जो स्वधर्म । त्यांत असलें जरी गुणहीन कर्म । तरी त्याणेंचि कल्याण हें वर्म । रहस्य सर्वा वेदांचें. ॥ ५९२ ॥ इतर वर्णांचा धर्म । तो गुणयुक्त उत्तम । अनुष्ठानास बरा, तरी स्वधर्म । तोचि श्रेय आपणा. ॥५९३॥ करितां स्वधर्माचरण । त्या धर्मामुळें आपणा मरण । आलें तरी अगा! शरण । असावें स्वधर्मासी. ॥ ५९४ ॥ इतर वर्णांचा बराही । धर्म करितां बरें नाहीं । त्याणें नरकादि भयच परी कांहीं । कल्याण न दिसे. ॥ ५९५ ॥ याकारणें स्वधर्म करूनी । सर्व कर्में मज अर्पूनी । युद्ध करणें हें धरीं मनीं । हा पूर्वोक्त अर्थ सिद्ध केला. ॥ ५९६ ॥ आतां याउपरी एक । अर्जुनाचा प्रश्नश्लोक । त्या प्रश्नाचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत. ॥ ५९७ ॥ मागें बोलिला हरी । कीं ज्ञानी एके अवसरीं । प्रकृतीसारिखा [1]चेष्टे अंतरीं । इंद्रियनिग्रहशीलही. ॥ ५९८ ॥ एथें वाटलें अर्जुना । कीं वाईट कर्म नावडे मना । ऐसें असोनि त्या जना । कोण वाईट कर्मीं योजितो? ॥ ५९९ ॥ कीं निग्रहशील ज्ञानी । भोगेच्छाही नसोनी । प्रारब्धें तरी कैसें मनीं । विषयभोग अपेक्षितो? ॥ ६०० ॥ प्रारब्धही कोणे रीतीं । याची भोगीं उपजवी रती । या भावें श्रीपतीप्रती । प्रश्न करितो अर्जुन. ॥ ६०१ ॥

---

१. वागतो, चालतो.

अर्जुन उवाच—**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय! बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

अथ यानंतर । म्हणजे ज्ञानी होऊनि नर । इंद्रियनिग्रहतत्पर । असोनिही. ॥ ६०२ ॥ यानंतरही त्या नरा । म्हणसी तूं जी **वृ**ष्णिवीरा! । कीं भरोनि प्रकृतीचा वारा । प्रकृतिसारिखा तो चेष्टतो. ॥६०३॥ तरी त्यासही अजी! । कोण पापी विषयकर्मीं योजी । कीं नसोनि मनामार्जीं । चेष्टतो प्रकृतीसारिखा ? ॥६०४॥ जैसा कोणी एक स्वयें निर्मळ । नातळे मळमूत्रादि ओंगळ । त्याहातें बळात्कारें प्रबळ । तें दाटूनि जैसा काढवी. ॥ ६०५ ॥ तैसा असोनिही कुशल । आणि इंद्रियनिग्रहशील । तोही प्रकृतीसारिखा चेष्टतो ओंगळ । जाणों प्रारब्धें बळें योजिला. ॥ ६०६ ॥ त्यास विषयाचें सेवन । पाप वाटे ऐसा प्रवीण । न इच्छितांही भोग कवण । पापीं योजी तें सांग ? ॥ ६०७ ॥ प्रकृतीसारिखा ज्ञानी । चेष्टे निग्रहशील म्हणोनी । देव बोलिला ज्या भावेंकरूनी । तो न समजोनि हा प्रश्न. ॥ ६०८ ॥ कीं तो जरी निष्काम । प्रारब्ध उपजवी त्यास काम । विषय निष्कामा करी सकाम । न समजला हा भाव **अर्जुना**. ॥ ६०९ ॥ या प्रश्नाचें उत्तर । देतो आतां **दा**मोदर । अध्याय संपे तों प्रकार । प्रसंगें कामाचा जयाच्या वर्णिला. ॥ ६१० ॥ त्यांत आधीं जो प्रश्न जाला । कीं हा **न** इच्छितां कोण याला । भोगीं योजितो हें **पार्थ** बोलिला । तें **सं**जय म्हणतो कीं. ॥ ६११ ॥

श्रीभगवानुवाच—**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

म्हणे **भ**गवान् पूर्णकाम । कीं अनर्थासी मूल हाचि काम । क्रोधही याचेंचि नाम । जो उपजे रजोगुणापासूनी. ॥ ६१२ ॥ अगा! एक ऋण देतो । एक ऋण घेतो । एक घेववितो आणि फेडवितो । धनी आपण उभयत्र. ॥ ६१३ ॥ जीव कर्में करी । तें कर्म ऋण होय त्याचे शिरीं । फेडी भोगोनि अन्य शरीरीं । प्रारब्धाच्या. ॥ ६१४ ॥ तें कर्में कामचि करवी । तें भोगें ऋणचि फेडवी, । अज्ञानियांस पुढें जोडवी, । अहंकारें भोगेच्छेंकरूनी. ॥ ६१५ ॥ मी कर्ता मज हें प्रिय । मज तें नलगे जें मज अप्रिय । ऐसा रागद्वेषविषय[1] । मीपणें भोगवी हा काम. ॥ ६१६ ॥ ऐसा अज्ञानियांचा भोग । ज्ञानियांस

---

१. प्रीतीचा आणि द्वेषाचा विषय.

नसे मीपणाचा रोग । परी भोगसमयीं त्याचा वियोग । प्रारब्ध करी कामबळें. ॥ ६१७ ॥ त्यांत पुण्यवृक्षचि फळती । तीं फळें अनायासें येती । तथापि भोगीं मीपणातें स्पर्शती । नव्हे **योग** मीपणावांचूनी. ॥ ६१८ ॥ अहंकारीं प्रतिबिंब मिळालें । तेव्हां पूर्वकर्म उपजलें । त्या दोघींही पाहिजे भोगिलें । जैसें केलें ते रीतीं. ॥ ६१९ ॥ कोणीं निष्काम कर्म केलें । आणि ईश्वरीं नाहीं अर्पिलें । त्यासही ज्ञान जालें । पुढें अर्पितां ईश्वरीं. ॥ ६२० ॥ परी पूर्वील निष्काम अनर्पित[1] । तें बंधक जालें निश्चित । परी निष्कामत्वें न उपजला मनांत । काम ज्ञानियाच्या तया. ॥ ६२१ ॥ ज्ञान जालियावरी । दैवयोगें अकस्मात् भोग शरीरीं । होय तत्पूर्वीं न शिरतां अंतरीं । तयांच्या काम. ॥ ६२२ ॥ त्यांची गोष्टी एथें नाहीं । ते **ज**नकादि नित्य विदेही[2] । कीं भोग भोगूनिही देहीं । नसे वस्ती कामाची. ॥ ६२३ ॥ एथें जो स्वयें ज्ञानी । प्रकृतीस घडी एक वश होउनी । तदनुरूप[3] चेष्टे[4] म्हणोनी । जो मागें वर्णिला. ॥ ६२४ ॥ तो त्या जन्मांतरीं । सकाम पुण्यकर्में करी । कांहीं पापही तदंतरीं । आचरे. ॥ ६२५ ॥ त्यानंतर जन्म । एथें करितां ईश्वरार्पण कर्म । ज्ञान जालें परी प्रारब्धभ्रम । कर्मानुरूप घडी एक उपजवी. ॥ ६२६ ॥ त्याचा एथें प्रश्न । करीतसे **अर्जुन** । त्यास उत्तर दे **म**धुसूदन । कीं त्यास नाचवी हा काम. ॥ ६२७ ॥ कीं या कामेंचि कर्म करविलें । एकें जैसें **ऋण** देवविलें । त्याणेंचि बलात्कारें फेडविलें । तो हा काम. ॥ ६२८ ॥ अगा! **काम** उपजला । त्यास **क्रो**धही निश्चयें स्पर्शला । परंतु तो **काम**चि जाला । **क्रो**धरूप. ॥ ६२९ ॥ या भावें श्री**घन**श्याम[5] । म्हणे **क्रो**धही हाचि **काम** । ज्या **का**मास जन्म । रजोगुणापासूनी. ॥ ६३० ॥ त्या **का**माचें लक्षण । सांगतो कमलेक्षण । कीं **महाशन**[6] म्हणजे महाभक्षण । पाहिजे जयासी. ॥ ६३१ ॥ याचेंचि रूप दुसरें । **क्रो**ध तो पापी एकसरें । कीं घडे **क्रो**धाच्या भरें । परहिंसा निश्चयें. ॥ ६३२ ॥ कामरूपें **महाशन** । कीं दुर्भर जैसा हुताशन[7] । तृप्त नव्हे त्रिभुवन । भोगितांही. ॥ ६३३ ॥ इच्छित पदार्थेंही तृप्त केला । तरी **का**म असेच भुकेला । घृतें अग्नी विझवितां देखिला । परी विषयें न विझे हा **कामाग्नि**. ॥ ६३४ ॥ कांहीं पडतां अंतर । खवळोनियां अति सत्वर । दावी

---

१. न अर्पिलेलें. २. विरक्त. ३. त्याप्रमाणें. ४. वर्ते, वागे. ५. श्रीकृष्ण. ६. महा+अशन=मोठें+भक्षण=मोठा अधाशी. ७. अग्नि.

तत्काळ क्रोधाकार । हाच काम. ॥ ६३५ ॥ तो मोठा पापी । ज्यास त्यास मारीनच म्हणोनि दापी[२] । परपीडा न फावे कदापी । तरी हाणों लागे स्वदेहातेंचि. ॥ ६३६ ॥ आपली डोई आपण । फोडूनि रक्ताचें शिंपण । करी ज्याच्या देहीं दारुण । क्रोधवारें संचरे. ॥ ६३७ ॥ तरी या क्रोधाचें रूप पहिलें । तो हा कामचि बोलिलें । काम नसतां कोणास आलें । कैंपरें क्रोधाचें. ॥ ६३८ ॥ ज्या पदार्थाची ज्या जना । मनीं नसेल कामना । त्याच्या प्राप्तीस विघ्न होतां मना । क्रोध चढेल हें न घडे. ॥ ६३९ ॥ षंढास एक कन्या देतो । त्यास एक देऊं नको म्हणतो । क्रोध न करी षंढ तो । विघ्नकर्त्यावरी. ॥ ६४० ॥ एक[३] स्मार्त एकादशीचा व्रती । त्यास भागवत जातां आमंत्रणाप्रती । एक नको म्हणतां चित्तीं । क्रोध कां व्रतस्था येईल ?॥६४१॥ व्रतस्था नलगे भोजन । त्याच्या आमंत्रणीं जो करी विघ्न । त्यावरी कां त्याचें मन । होईल तप्त ? ॥ ६४२ ॥ शीतज्वरें कांपतो । त्यास एक चंदन लावूं पाहतो । एक नको म्हणतां ज्वरित तो । क्रुद्ध कां परी होईल ? ॥ ६४३ ॥ एवं नसतां काम । क्रोध नुपजे हा नेम । एवं कामचि पावला नाम । रूप तें क्रोध म्हणोनी. ॥ ६४४ ॥ दों रूपांचीं लक्षणें दोनी । **महाशनो महापाप्मा**[१] म्हणोनी । अतृप्त सर्वभक्षही होऊनी । तो महाशन काम पापी क्रोध. ॥ ६४५ ॥ एवं क्रोध तोचि काम । जरी दोनी रूपें दोनी नामें । परंतु क्रोध तो तम । काम रजोगुण. ॥ ६४६ ॥ ऐसें असोन एथें । बोलिजेल कृष्णनाथें । कीं क्रोधही रजापासूनि तेथें । संदेह उपजेल शोधकांसी. ॥ ६४७ ॥ तरी काम म्हणजे जल । त्यासच म्हणावें गढूळ नितळ । थिल्लरीं[४] उदक चंचल । होतां गढूळ तें होतसे. ॥ ६४८ ॥ जलास आधार कर्दम[५] । तैसा रजास आधार तम । रज खवळतां क्रोधभ्रम । तम करी रजासी. ॥ ६४९ ॥ चिखलविना उदका । वाळोनि होय मृत्तिका । काम नसतां क्रोधशंका । मग कैंची. ॥ ६५० ॥ एवं जोंवरी पाणी असे । तों तें नितळ[६] गढूळही दिसे । नितळ काम क्रोध गढूळ ऐसे । दोनीही भेद उदकाचे. ॥६५१॥ या भावें श्रीघनश्याम । क्रोधही म्हणे हाचि काम । गढूळ म्हणणें जळाचेंचि

---

१. महापाप्मा. २. भय दाखवितो. ३. हें वर्णन वामनानें स्वकालानुरूप केलें आहे. पंडितांच्या काळीं अनेक पंथांतील लोकांत द्वेषभाव जाज्वल्य होता असें दिसतें. ४. डबक्यांत. ५. चिखल. ६. स्वच्छ.

नाम । त[1]मयुक्त कामही रजचि. ॥ ६५२ ॥ काम तोचि क्रोध । कैसा म्ह-
णोनि करितां शोध । कांहीं अत्यंत गूढार्थबोध । ये स्थळीं सूचवी श्रीकृष्ण.
॥ ६५३ ॥ कीं तम तें विषय । रजोगुण जो तें इंद्रिय । काम इंद्रियवास-
नामय । विषयाधारें. ॥ ६५४ ॥ जैसें भूमीवरील स[2]लिल । सलिलयोगें भूमि
चिखल । गढूळ जालें चिखलाचिवरील । होय तेंचि नितळ अन्यत्र. ॥६५५॥
तें भरतां पात्रांतरीं । गढूळता न दिसे तया नीरीं । काम भगवद्भक्तींत या-
परी । न परिणाम पावे क्रोधाचा. ॥ ६५६ ॥ गोड चरित्र ऐकावें । तेंचि
मधुरकंठीं गावें । तालमृदंगप्रभावें । कीर्तन करावें बहु गोड. ॥ ६५७ ॥
चांगलें रूप स्मरावें । कीं चांगलें भ[3]गवदर्चन करावें । ऐशा अ[4]पेक्षेतें भरावें ।
हाही काम. ॥ ६५८ ॥ संसारवनातें तोडी । हरिभक्तीची कुऱ्हाडी । परी
त्याच वनाच्या काष्ठाची दांडी । घालावी तीस. ॥ ६५९ ॥ कीं कामावांचूनि
मन । भलत्या गोष्टीचें न करी साधन । मनें मोक्ष मनेंचि बंधन । हा सिद्धांत.
॥ ६६० ॥ संसारअरण्याचेंची । काम काष्ठ परी त्याची । करितां दांडी भ-
क्तिकुऱ्हाडीची । मनचि तोडी वन संसाराचें. ॥ ६६१ ॥ एवं विषयवासने-
वेगळा । तो काम मोक्षदायक मोकळा । पदक त्याचें बांधावें गळां । भक्ति-
न[5]वरत्न जोडोनी. ॥ ६६२ ॥ मग त्यास न म्हणावें काम । ज्यास इच्छिती
आत्माराम । ज्यांत विषयवासनेचें धाम । तो वाईट. ॥ ६६३ ॥ काम
निर्विष[6]य । तेथें रजोगुणाचा लय । शुद्ध स[7]त्वाचा उदय । भक्ति म्हणावी.
॥ ६६४ ॥ कामविषयाश्रित । तो वाईट अत्यंत । म्हणूनि वर्णितो भगवंत ।
चतुर्थचरणीं या श्लोकाच्या. ॥ ६६५ ॥ अर्जुना ! काम ऐसे परी । या
ज्ञानमार्गीं जाण वैरी । याच्या बळें प्रारब्ध करी । विरक्तांसही घडी एक वि-
षयासक्त. ॥ ६६६ ॥ इच्छा नसोनिही अजी ! । कोण वाईट कर्मीं योजी ।
हा प्रश्न तुझ्या मनामाजी । समज कीं योजितो काम. ॥ ६६७ ॥ आतां
यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परि-
सोत. ॥ ६६८ ॥ निग्रहशीलही ज्ञानी । कोणे भोगीं योजिलें बळेंकरूनी ।
हा प्रश्न अर्जुनाचा म्हणोनी । काम वर्णिला. ॥ ६६९ ॥ हें ऐकोनि अ-
र्जुना । वाटलें कीं ऐसें जिज्ञासुजना । घडी शके आत्मज्ञाना । पावला त्यास

---

१. तमोगुणासहित. २. पाणी. ३. भगवंताचें अर्चन. ४. इच्छेतें. ५. नवविधभक्ति.
६. विषयरहित. ७. सत्त्वगुणाचा.

कैंचा काम? ॥ ६७० ॥ अनुतप्त विरक्त मन । गुरूनें देखोनि दीधलें ज्ञान । असतां तो ज्ञाननयन । कामें अंध होईल? ॥ ६७१ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । दृष्टांतमुखें देवाधिदेव । उत्तर देतो या श्लोकीं. ॥ ६७२ ॥

**धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

अगा! अग्नि वेष्टिजे धूमें । तैसें हें ज्ञान वेष्टिलें कामें । काष्ठ समय जळतां नेमें । विझे नासूनि तो धूम्र. ॥ ६७३ ॥ जों प्रारब्धभोग असे । तों भोगीं कामही दिसे । तें प्रारब्ध सरतां जैं नासे । तैं त्यास मोक्ष कैवल्य. ॥ ६७४ ॥ तेव्हां समुद्रचि केवळ । नसे ज्ञानाचाही कल्लोळ । कर्पूर जाळोनि अनळ । विझे उरे स्थळ मात्र. ॥ ६७५ ॥ जों काष्ठांशांचें शेष । तोंवरी धूम्राचा असेच दोष । तैसें ज्याचे प्रारब्धीं पूर्वकल्मष[1] । ज्ञान त्याचें ये रीती. ॥६७६॥ कीं प्रसंग त्याचाच असे । जनकादिकांचा प्रसंग न दिसे । सकाम कर्मपाकीं गवसे । भोगकाळीं काम हा. ॥ ६७७ ॥ एवं अग्नि वेष्टिला धूमें । तैसें ज्ञान वेष्टिलें कामें । परी संयमसमीरें[2] साधकोत्तमें । धूम शमवी अग्नी पेटवी. ॥ ६७८ ॥ ज्ञाता ज्ञानाग्नि पेटवितो । जरी धूमा[3] बाधक मानितो । परी काष्ठांशशेष तोंपर्यंत तो । धूम दिसेच कांहींसा. ॥ ६७९ ॥ अग्नीस लागलाच असे धूम । ज्ञानास प्रारब्धें वेष्टीच काम । ज्ञानियास सर्व मिथ्या सर्व ब्रह्म । परी प्रारब्धयोगें काम लागला. ॥ ६८० ॥ त्यांत ओलें काष्ठ जाळी । धूम्र फार दिसे त्या अनळीं । शुष्क काष्ठ जाळितां ज्वाळीं । कांहीं दिसोनि लय पावे. ॥ ६८१ ॥ सनकाचा[4] ज्ञानानल । होऊनि उरला इंगळ । जनकाचा पुण्यागरु केवळ । जळे तो धूम्र वाईट न दिसे. ॥ ६८२ ॥ म्हणसी जिज्ञासु सभाग्य । जेव्हां जाला उपदेशयोग्य । कामत्यागें पूर्ण वैराग्य । होतें तया. ॥६८३॥ ज्ञान जालिया विशेष । काम जावा निःशेष । हा मागुती त्याच्या ज्ञानास दोष । देखिला काम. ॥ ६८४ ॥ तरी अर्जुना! हे गोष्टी खरी । ज्ञान जालिया कामवार्ताही दूरी । परंतु प्रारब्धाची दोरी । नाचवी ज्ञातया. ॥ ६८५ ॥ अगा! ब्रह्मज्ञान सदा निर्मळ । त्यास कोण बोलेल मळ । परी ज्या सत्त्वें कळे ज्ञान केवळ । तें प्रारब्धें मलिन क्षणें होय. ॥ ६८६ ॥

---

१. पूर्वील पाप. २. विरुद्ध अशा वाऱ्यानें. ३. धुरास. ४. विधीचा मानसपुत्र.

अगा! शुद्ध सत्त्वाचा आरसा। त्यांत पुरुष आपणास जैसा। पाहे सत्त्वीं निजानुभव तो तैसा। प्रांजळ दिसे. ॥ ६८७ ॥ जो ज्ञानाचा आरसा। म्हणावा निर्मळ आरसा जैसा। प्रारब्ध मलस्पर्शें ठसा। चढे मळाचा त्याहीवरी. ॥६८८॥ तथापि वैराग्याभ्यासबळ। करुनि घांसितां होय निर्मळ। परी भोगमात्राची वेळ। तोंवरी मळ चढेच कामाचा. ॥ ६८९ ॥ इंद्रियविषययोग। मना सत्त्वा त्याचें नांव भोग। विषयतम इंद्रियें राजसें याग। याचा सत्त्वास मळ तोची. ॥६९०॥ एवं जिज्ञासु निर्मळ। त्यास ज्ञान जालें केवळ। तरी प्रारब्ध प्रबळ। मलिन करी घडी एक. ॥ ६९१ ॥ म्हणसी जें शुद्ध सत्त्व। ज्यास कळलें ब्रह्मात्मतत्त्व। जें टाकूनि त्रिगुणत्व। ब्रह्मीं उपरमों लागे.॥६९२॥ येतां प्रारब्धभोगाचा काळ। अवलंबावें ब्रह्म केवळ। तेथें हा काम खळ। स्पर्शेल कैसा. ॥ ६९३ ॥ ऐसें असोनि त्याला। कां म्हणावें काम लागला। तरी आईक अर्जुना! माझे या बोला। दृष्टांतमुखें. ॥ ६९४ ॥ अगा गर्भाची खोळ। त्यास वेष्टी जैसा गर्भनाळ। तैसा येतां भोगकाळ। सत्त्वास काम वेष्टितो. ॥६९५॥ गर्भाचा उत्पत्तिकाळ। प्राप्त होतां स्वयेंचि तें नाळ। वेढे उकलतां जें बाळ। वेगळें पडे त्यांतूनी. ॥ ६९६ ॥ सरतां भोगाचा काळ। सत्त्व मोकळें होय तत्काळ। एवंच हा वैरी प्रबळ। अगा! काम. ॥ ६९७ ॥ नाहीं सरला भोगकाळ। तों गर्भास जाणों वेष्टी नाळ। तेव्हां ब्रह्मीं केवलीं केवळ। सत्त्वास होणें हें कैचें? ॥ ६९८ ॥ परंतु सरतां भोगकाळ। नाहींसाच होय तत्काळ। आगळें ज्ञानाचें बळ। काय लेखा[1] कामाचा? ॥ ६९९ ॥ जरी हा गोड वाटता। तरी ज्ञानियाचे मनीं नित्य दाटता। कीं हा वैरीच तत्त्वतां। वाटे हें आईक या श्लोकीं. ॥ ७०० ॥

**आवृतं[2] ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा।**
**कामरूपेण कौंतेय! दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

अगा! ज्ञानियास हा नित्य वैरी। जो ज्ञानधनास नित्य चोरी। जो नाना विषयाकारीं। स्वयें रूपें दाखवी. ॥ ७०१ ॥ सर्वरूपीं ज्ञानी स्वरूप। पाहे तों हा विषयरूप। भासवी त्या रूपीं प्रकोप[3]। करी मनीं जेव्हां हा काम. ॥ ७०२ ॥ ऐसा हा काम पापरूपी। वासना उपजवी त्या रूपीं। विसर

१. मोठेपणा. २. हे कुंतीपुत्रा! ज्ञानी पुरुषांचा कामरूप जो नित्य वैरी त्यानें ज्ञान आच्छादिलें आहे. हा (काम वैरी) अग्नितुल्य आणि दुष्पूर आहे. ३ क्षोभ.

पाडी चित्स्वरूपीं । ज्ञानियांस. ॥ ७०३ ॥ भोग भोगूनि मना । अधिकाधिक उपजवी कामना । आवरण करी ज्ञानियांच्या ज्ञाना । नित्य वैरी. ॥७०४॥ हा न सोडी वैरी । म्हणोनि कोणी जरी भोगें तृप्त करी । तरी घृतबिंदु वैश्वानरीं[1] । तैसा वाडे. ॥ ७०५ ॥ ऐसा हा दुर्भर[2] । पेटे जेंवी वैश्वानर । नित्य वैरीपणाचा प्रकार । याचा ऐसा. ॥ ७०६ ॥ अज्ञानियांही काम तृप्त । नव्हे तरी ते मानिती आप्त । परी कामामुळें दुःख प्राप्त । वैरी सकळांचाही ऐसा. ॥ ७०७ ॥ परी ज्ञानियास नित्य वैरी । कीं आप्त न वाटे कोणेपरी । ज्ञानसूर्यास अस्तगिरी । भोगकाळीं जो होतो. ॥ ७०८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । आइकोत. ॥ ७०९ ॥ ज्ञानियास हा काम वैरी । जो घडी एक ज्ञानलोप करी । निग्रहशीलासही ऐशापरी । नित्य वैरी हा काम. ॥७१०॥ परंतु ज्ञानी निग्रहशील[3] । भोगूनही भोग सकळ । भोग सरतांचि तत्काळ । आयताच योगी निष्काम तो. ॥ ७११ ॥ जीं जीं कामाचीं स्थळें । ज्यांच्या योगें प्रारब्धफळें । भोगणें तीं निष्कामें सकळें । क्षणक्षणें तो करी. ॥ ७१२ ॥ इतकियास आत्मस्वरूप । सर्वत्र लक्षितां कामरूप । नाहींसाच होय जैसा दीप । प्रकाशतां तमा ठाव नुरे. ॥ ७१३ ॥ कीं ज्ञानप्रकाश आड । प्रारब्ध लावी कामाचें वेंड[4] । तेंव्हां उपजे त्यास चाड[5] । विषयभोगाची. ॥ ७१४ ॥ ईश्वरशक्तीकरूनी । प्रारब्ध असे तें वाड धरूनी । न निघे ज्ञानियास म्हणोनी । जों असे काळ भोगाचा. ॥ ७१५ ॥ प्रारब्धभोग सरला । तरी तो आडपडदा उरला । परी त्याचा धनी तो झुरला । काढितां नलगती श्रम मग. ॥ ७१६ ॥ हें ज्ञानियाचें लक्षण । तो आत्मसुखलाभेंचि निपुण । ज्याच्या आंगीं जिज्ञासूपण । यत्न लागती तयासी.॥७१७॥ ज्ञानियाच्या ज्या ज्या स्थळीं । प्रारब्धबळें काम छळी । त्या त्या स्थळीं तो स्वयेंचि बळी । इतर जनांचिया. ॥ ७१८ ॥ तैसाचि अद्यापि अर्जुन । त्याणें शुद्ध करूनि मन । जाणोनि आत्मा आनंदघन । त्या कामास नासावें.॥७१९॥ मग प्रारब्ध क्षणभरी । त्या मृत कामा सजीव करी । तरी न दिसे जे अवसरीं । प्रारब्धभोग असेना. ॥ ७२० ॥ यालागीं कामाचा जय । अर्जुनें करावा हा निश्चय । परंतु जाणोनि आत्मा अद्वय । काम मारावा. ॥७२१॥ हें

---

१. अग्नींत. २. भरून पूर्ण करावयास कठीण तो. ३. मन आवरण्याचा स्वभाव ज्याचा असा. ४. आवरण. ५. इच्छा.

सांगणें अर्जुनाप्रति । म्हणोनि आधीं श्रीपति । ज्ञानियांच्या प्रसंगें कामस्थिति । सांगतो या श्लोकीं. ॥ ७२२ ॥

**इंद्रियाणि[1] मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

अगा ! इंद्रियें आणि मन । आणि बुद्धि या कामाचें अधिष्ठान[2] । यांहीं-करूनि वेष्टूनि ज्ञान । देहधारियातें मोही तो. ॥ ७२३ ॥ ज्ञानसूर्यास अस्ता-चळ । मोहूनि इंद्रियमनबुद्धिस्थळ । करूनि कामतस्कर[3] प्रबळ । अनुभवधन[4] चोरूनि देतसे. ॥ ७२४ ॥ एथें म्हणे हरी । कीं जो देहधारी । त्यास हा काम मोह करी । ज्ञानानुभव आच्छादुनि. ॥ ७२५ ॥ एथें भाव गहन । सू-चवीतसे जगज्जीवन । कीं ज्ञानियास सर्वदा चिंतन । सर्वगताचें. ॥ ७२६ ॥ जो ऐसा त्यासही । कां श्रीकृष्ण म्हणे एथें देही । ऐसें विचारील यास कांहीं । गहनत्व नुमजेल भोगाचें. ॥ ७२७ ॥ कीं सुखदुःखभोक्तेपण जयाला । प्रति-बिंब देहधारी म्हणावें तयाला । या प्रारब्धाचा पूर्वकर्मकर्ता बोलिला । तो जो बिंबैक्य आतां जयासी. ॥ ७२८ ॥ मीच कर्ता म्हणोनी । कर्म करी देहाभि-मानी । तो त्याचें फळ भोगितां मानी । मी भोक्ता म्हणोनि अविवेकें. ॥ ७२९ ॥ ज्या मापें उसनें घ्यावें । त्याच मापें तें फेडावें । ज्ञानियासही घ-डावें । भोगीं घडी एक प्रतिबिंबत्व. ॥ ७३० ॥ धार्मिक राजा त्याचा सुत । प्रजापुत्रास ताडण बहुत । करूनि निघे[5] पोटापटांत । पितयाच्या. ॥ ७३१ ॥ तों अपराध सांगे प्रजा । तेव्हां वस्त्राबाहेर ढकली राजा । दंड करूनि पुन्हां आत्मजा[6] । आलिंगितो. ॥७३२॥ तैसा प्राप्त होतां भोग । बुद्धीस घडे अहं-कारयोग । चिदंश प्रतिबिंबोनि संयोग । त्यांत घडे सुखदुःखाचा. ॥ ७३३ ॥ तें प्रारब्धफळ । त्यास भोगणें समूळ । देहीं देहधारी केवळ । म्हणावें त्याला. ॥ ७३४ ॥ तो पूर्व कर्मकर्ता म्हणोनि । प्रारब्धबळें मनबुद्धिइंद्रियें करूनि । काम मोहितो वेष्टूनि । ज्ञान त्याचें. ॥ ७३५ ॥ कीं ज्ञानही त्याचें । ज्याणें ओळखिलें बिंबैक्य साचें । बिंबास तों कर्म कैचें । कीं फळ भोगणें लागे. ॥ ७३६ ॥ पावोनिही बिंबैक्यता । प्रतिबिंब कैंवी होतो मागुता । तरी दृष्टांतें

१. इंद्रियें, मन आणि बुद्धि हीं ह्या कामाचीं अधिष्ठानें आहेत असें म्हणतात. यांचे यो-गानें हा मनुष्याचें ज्ञान झांकून मनुष्यास मोहांत पाडतो. २. आश्रयस्थान. ३. काम हाच चोर. ४. अनुभव हेंच धन. ५. रिघे. ६. पुत्राला.

प्रमाणें तत्त्वतां । सिद्ध होतो हा अर्थ. ॥ ७३७ ॥ जरी [१]अविद्यांश गेला । जळरूपें सत्त्वोपाधि असे उरला । त्यांत भोगकाळीं दिसों लागला । प्रतिबिंबत्वें चिदंश. ॥ ७३८ ॥ देहनदी कर्ममूळ । सत्त्वोपाधिजळ निर्मळ । उदकाबाहेरील तटस्थळ । प्रतिबिंबे जळीं नदीच्या. ॥ ७३९ ॥ नदीतट एक बाहेरी । एक त्याचें बिंब नीरीं । तें जळ चढतां तटावरी । बिंबचि असे जळीं नसे प्रतिबिंब. ॥ ७४० ॥ नदीजळींही भूमि असे । परी बाह्यभूमीचें प्रतिबिंब दिसे । तटावरी जळ चढतां न गवसे । दृष्टीस पाहतां प्रतिबिंब.॥७४१॥ जेव्हां ओहटोनि नदी वाहे । तेव्हां आंत तें प्रतिबिंब आहे । एवं अहंकारीं ज्ञानी पाहे । प्रतिबिंबास. ॥ ७४२ ॥ सात वितीच शरीर । सात वितीच अहंकार । देहाबाहेर तिळ अंतर । असतां न तुटे तें शस्त्रें. ॥ ७४३॥ पदांगुळीपुढें तिळभरी । अग्नि असला जरी । न पोळे मी पोळलों हा अंतरीं । न उपजे प्रत्यय. ॥ ७४४ ॥ मी जात होतों सोंवळा । तिळाच्या अंतरें गेला ओंवळा । म्हणूनि विटाळ नाहीं जाला । ओंवळियाचा मज. ॥ ७४५ ॥ एवं देह जेवडा । अहंकारही तेवडा । सर्वत्र धावे घोडा । मनाचाचि. ॥ ७४६ ॥ तें सर्वत्र बिंब पाहे । तों आत्मा तोचि आहे । परी मागुती येऊनि राहे । जेथें प्राण. ॥ ७४७ ॥ जैसा पक्षियास दोर । बांधोनि सोडिला बहु थोर । तो सर्वत्र उडोनि गगनचर । ये मागुती जेथें दोर बांधला. ॥ ७४८ ॥ तैसें मन भलते तेथें । फिरोनि ये प्राण जेथें । एवं प्राण देहींच येथें । मन ये मागुती त्या स्थळा. ॥ ७४९ ॥

**'प्राणबंधनं हि सोम्य! मन इति ॥'** [छांदो०]

सामवेदाच्या शिरोभागीं । उद्दालकश्वेतकेतुलागीं । म्हणे, 'मनास बंधन जगीं। प्राणप्रकारें पक्षियाच्या.'॥७५०॥एवं मन सत्त्वगुण । सर्वगत बिंबात्मयाची खूण । समजोनि विश्वात्मभावें निपुण । मन चढे जळ जैसें नदीचें. ॥७५१॥ तो स्वदेहीं आणि चराचरीं । एक चैतन्य जैसें भूमी नीरीं आणि बाहेरी । तेव्हां न दिसे सत्त्व जळांतरीं । अहंकार आणि प्रतिबिंब. ॥७५२॥ सत्त्वें स्फुरे अहंकार । तो अहंकार जितकेंचि शरीर । तितक्यांतचि प्रतिबिंबरूपें ईश्वर । डळमळूं लागे. ॥७५३॥ तें पसरतां सत्त्वजळ । बिंबभूमिच केवळ । न स्फुरे अहंकार कीं त्याचें मूळ । सत्त्व पसरे बिंबावरी. ॥ ७५४ ॥ देखोनियां परिमित । त्यास मी म्हणोनि

---

१. अज्ञानांश.

मानी चित्त । बिंब चैतन्य अनंत । मी म्हणणें मग कैचें? ॥ ७५५ ॥ भोगसमयीं प्रतिबिंब । तेव्हां अहंकाराचा अवलंब । तेव्हां कुशळ बुद्धी स्मरे जरी बिंब । घाबरा करी अहंकार प्रतिबिंबा. ॥ ७५६ ॥ सुखीं दुःखीं प्रतिबिंब । तेव्हां सत्त्वगुणीं अहंकारावलंब । सरतां भोग विलंब । न असे बिंबीं ऐक्याचा. ॥ ७५७ ॥ इत्यादि नाना दृष्टांत । लिहितां ग्रंथ वाढेल अत्यंत । हें विशद पंधरावियांत । होईल. ॥ ७५८ ॥

**'उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।**

**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥'** [अ० १५ श्लोक० १०.]

**'ममैवांशो जीव'**[1] म्हणोनी । जो निरूपिला स्ववाचेकरूनी । त्यास पाहती बरे रीतीं ज्ञानी । न पाहती मूढ. ॥ ७५९ ॥ कीं बिंबीं ऐक्यपण । तेंचि ज्ञानियाच्या चिदंशाचें उत्क्रमण[2] । भोगकाळीं मिळोनी असणें । गुणांमाजी. ॥ ७६० ॥ तरी कैसें उत्क्रमणें । कैसें याचें गुणीं मिळोनि असणें । कैसें याचें भोगणें । पाहती ज्ञानी ज्ञानदृष्टी. ॥ ७६१ ॥ बिंब कळल्याविण । न सांपडे प्रतिबिंबाचें लक्षण । मुखाचें नाक धरितां आपण । नाक सांपडे प्रतिबिंबाचें. ॥ ७६२ ॥ यालागीं यातें ज्ञानी । तेंचि पाहती म्हणोनी । बोले श्रीकृष्ण गा वचनीं । पंधरावियांत. ॥ ७६३ ॥ एवंच भोगणें यासी । भोगणें नसे बिंबात्मयासी[3] । जड मनादिकां तो कैसी । वार्ता बोलेल भोगाची? ॥ ७६४ ॥ कलियुगीं कोणी अपक्व ज्ञानी । जड द्रष्टा मात्र समजोनी । प्रतिबिंबचि ब्रह्म म्हणोनी । सांगती शिष्या. ॥७६५॥ न कळे ब्रह्म सर्वगत । कीं प्रतिबिंबास भोक्ता म्हणावा निश्चित । भोक्ता पुसतां शिष्यातें संत । मन भोक्तें म्हणूनि बोलती. ॥७६६॥ ज्यास भोग त्यास मोक्ष । तेव्हां मनासचि मोक्ष हा पक्ष । ऐसें पुसती जेव्हां दक्ष । तोंड वासिती ते तेव्हां. ॥ ७६७ ॥ मोक्ष म्हणतां मना । जडास मोक्ष हें घडेना । युक्ति उदंड चाळिती त्या त्यांच्या वचना । खंडिजेल पुढें अध्याय पंधरावियांत. ॥ ७६८ ॥ भोक्ता हाचि प्रतिबिंबांश । स्वयें बोले हृषीकेश । श्रुतींतही अर्थलेश । हाचि असे. ॥ ७६९ ॥

**'आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव च ।**

**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥**

---

१. अध्याय १५ श्लोक ७ पद्य. २. बिंबांत प्रतिबिंबाचें ऐक्य. ३. विश्वात्म्यास.

**इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ।**
**आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥'** [कठ०]

आत्मा रथी रथाचा धनी । शरीर जाण रथ म्हणोनी । बुद्धि सारथि असे धरूनी । वाग्दोरे[1] मनाचे. ॥ ७७० ॥ वाग्दोरे जेव्हां मन । इंद्रियें घोडे तें-दधीन[2] । विषय तया गोचर म्हणोन । इंद्रियाश्वां मार्ग विषय ते. ॥ ७७१ ॥ आत्मा इंद्रिय बुद्धीकरूनी । युक्त होऊनी भोक्ता होउनी । भोगितो विषय म्हणोनी । श्रुति म्हणे म्हणती कीं बुद्धिमंत. ॥ ७७२ ॥ एवं ते नव्हती बुद्धिमंत । जे मन आदि जडा भोक्ता म्हणती निश्चित । ऐसीं प्रमाणें पाहतां बहुत । भोक्ता म्हणती आत्मयासी. ॥ ७७३ ॥ तें बिंबास भोगणें नसे । जडास भोक्तेपण तों न दिसे । तेव्हां प्रतिबिंबांश भोक्ता गवसे । जो **'ममैवांशो[3] जीव'** ऐसा पंचदशीं वर्णिला. ॥ ७७४ ॥ आतां प्रारब्धाचा क्षय । भोगेंचि म्हणूनि निश्चय । वेदीं वेदांतीं त्याचा अन्वय । ये रीतीं समजावा. ॥ ७७५ ॥ कीं बिंबैक्य पावला ज्ञानी । बिंबास भोग न घडे नित्य अकर्तेपणेंकरूनी । भोगकाळीं प्रतिबिंबांश म्हणोनी । बोलावा तो ऐशा अनुभवें. ॥ ७७६ ॥ **'सदृशं चेष्टते स्वस्या'** म्हणोनी । मागें **भ**गवंत या **गी**तावचनेंकरूनी[4] । ज्ञानियांसही मोह बोलिला त्यापासुनी । हें प्रकरण चालिलें येविषयीं. ॥ ७७७ ॥ भोगकाळ होतां प्राप्त । ज्ञानी जरी अनुभवयुक्त । तरी अनुभव होतां गुप्त । नाचे प्रकृतीसारिखा. ॥ ७७८ ॥ त्यास मूळ हाचि काम । क्रोधही त्याचें दुसरें नाम । त्याचीं अधिष्ठानें सांगतो **मे**घश्याम[5] । देही म्हणे ज्ञानियास या भावें. ॥ ७७९ ॥ कीं भोगाकारणें । क्षण एक न लागे प्रतिबिंब होणें । त्यास अहंकारयोगें भोगणें । जो कर्मकर्ता देहात्मपणें[6] जन्मांतरीं. ॥ ७८० ॥ एवं इंद्रियें मन बुद्धि अधिष्ठान । या कामाचें इहींकरूनि ज्ञान । वेष्टून देही प्रतिबिंब यास मोही म्हणोन । श्रीकृष्ण बोले या श्लोकीं. ॥ ७८१ ॥ आतां यापुढें तीन श्लोक । ते कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुज्ञलोक । परिसोत. ॥ ७८२ ॥ अर्जुन अद्यापि नसे ज्ञानी । परी सांगणेंचि असे म्हणोनि । कामजयोपाय[7] या श्लोकेंकरूनी । सांगों पाहे. ॥ ७८३ ॥ ज्यांस इंद्रियभोगीं वैराग्य । तेचि मुमुक्षु सभाग्य ।

---

१. लगाम. २. त्याच्या स्वाधीन. ३. अध्याय १५ श्लो० ७ पहा. ४. अध्याय ३ श्लोक ३३ पहा. ५. भगवान् कृष्ण. ६. देह हाच आत्मा अशा भावानें. ७. काम जिंकण्याचे उपाय.

अपरोक्षज्ञानास होती योग्य । हा सिद्धांत वेदांतीं. ॥ ७८४ ॥ इंद्रियांचा संयम । करितां स्ववश होय काम । तेव्हां मुमुक्षु निष्काम । योग्य गुरूच्या उपदेशा. ॥ ७८५ ॥ गुरुमुखें आत्मा वेगळा । इंद्रियें मन बुद्धि यांहूनि निराळा । कळतां मन बुद्धि इंद्रियांसहित जाला । आत्मरज्जूंत सर्प काम. ॥ ७८६ ॥ परंतु तो आत्मा कळाया । आधीं आवरावें इंद्रियां । आत्मा कळोनि कामा तया । नासावें समूळ. ॥ ७८७ ॥ मग प्रारब्धभोगकाळ । प्राप्त होतां रज्जु न कळोनि व्याळ[1] । घडी एक जाला तरी फटकाळ । घात करूं शकेना. ॥ ७८८ ॥ कीं भोगकाळ सरला । मागुती आत्मा रज्जु स्मृतीस आला । तेचि क्षणीं पळाला । मन बुद्धि इंद्रियांसहित हा काम. ॥ ७८९ ॥ परंतु जरी ज्ञान उपदेशाहूनि आधीं । इंद्रियजयें निष्कामता साधी । तरी भोगक्षण सरतां नित्य समाधी । मागुती जोडे. ॥ ७९० ॥ जरी आधीं इंद्रियें न जिंके । आणि निष्काम होऊं न शके । आणि ज्ञानमार्गही शिके । तरी हा काम नाशी तें ज्ञानविज्ञानही. ॥ ७९१ ॥ म्हणूनी एका श्लोकेंकरूनी । आधीं इंद्रियजय सांगोनी । मग दों श्लोकीं स्ववचनीं । आत्मज्ञानें कामनाश बोलेल. ॥ ७९२ ॥

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ! ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

अगा! इंद्रियें मन बुद्धि अधिष्ठूनी । ज्ञानियाचेंही ज्ञान वेष्टूनी । क्षण एक मोह करी म्हणोनी । पूर्वश्लोकीं बोलिलों तूतें. ॥ ७९३ ॥ त्याकारणें तूं अर्जुना! । वीरा! आइक भरतकुलोत्पन्ना! । ज्ञानाहोनि आधीं लागें यत्ना । इंद्रियेंसंयमाच्या[2]. ॥ ७९४ ॥ आधीं जिंकोनि इंद्रियें । मना निष्काम करीं निश्चयें । कीं तूं पराक्रमी थोर स्वयें । या भरतकुळीं. ॥ ७९५ ॥ सर्वा क्षत्रियांत थोर । या भरतवंशाचे वीर । त्यांत तूं श्रेष्ठ अत्यंत धीर । तरी जिंकीं आधीं हीं इंद्रियें. ॥ ७९६ ॥ आधींच म्हणजे ज्ञानाहुनी । पहिलाच इंद्रियांचा नियम करूनी । मग मारीं आत्मज्ञान पावोनी । या पापिया कामातें. ॥ ७९७ ॥ कीं हा ज्ञान आणि विज्ञान दोहींसी । ज्ञान जालियाही नासी । जरी न जिंकिसी इंद्रियांसी । आधीं ज्ञानाहुनी. ॥ ७९८ ॥ ज्ञानव्यतिरेकें[3] शुद्धात्मतत्त्व[4] । विज्ञानविशिष्टज्ञानान्वयें[5] सर्वात्मकत्व । दोहींस अनुभवी जें शुद्धसत्त्व[6] ।

---

१. साप. २. इंद्रियदमनाच्या. ३. एकावेगळें एक पाहणें. ४. आत्मा. ५. विशेष ज्ञानानें. ६. शुद्धसत्वगुण.

त्यास नाशील हा काम. ॥ ७९९ ॥ राजनीतीचा अभ्यास केला। मग जो सिंहासनीं बैसला । त्याचाच नाहीं नासला । भोग राजकार्याचा. ॥ ८०० ॥ सिंहासनीं आधीं बैसला । मग राजनीतीचा अभ्यास मांडिला । तो सिंहासनाखालीं लोटला । बहुतांही. ॥ ८०१ ॥ आधींच इंद्रियांचा जय । न करितां ज्ञानविज्ञाननिश्चय । कळला तरी नासूनि भय । उपजवी संसाराचें हा काम. ॥ ८०२ ॥ खाकेस[1] घेऊनियां श्वान । सोंवळा जाला करूनि स्नान । तैसा इंद्रियभोगासक्त ज्ञान । पावला मुखें गुरूच्या. ॥ ८०३ ॥ यालागीं अर्जुना! आधीं । इंद्रियजयोपाय साधीं । मग प्रारब्धें काम उपजला कधिंबधीं । तरी आत्मरज्जु स्मरतां नुरे तो सर्प. ॥ ८०४ ॥ पूर्वश्लोकानुसंधान । पाहतां इंद्रियें बुद्धि मन । सांगितलें कामाचें अधिष्ठान । या श्लोकीं जय इंद्रियांचा. ॥८०५॥ तरी बुद्धि आणि मन । यांच्या जयाचा कां न करावा यत्न । ये स्थळीं करितील सुज्ञ जन । प्रश्न ऐसा. ॥ ८०६ ॥ तरी अन्न आणि उदक । कोंडितां गडकोटाचे लोक । वश होती ऐसा विवेक । एथें सूचवी श्रीकृष्ण. ॥८०७॥ सर्वदा भोगावे विषय । हा बुद्धींत कामाचा निश्चय । मग नाना संकल्परूप होय । मन बळें कामाच्या. ॥ ८०८ ॥ तथापि जो तो भोग । घडे होतां इंद्रियविषययोग । भोगीं वैराग्य होतां, लागे रोग । कामास जो असे मनबुद्धींत. ॥ ८०९ ॥ बुद्धींत भोगाचा निश्चय । त्यास साधन इंद्रियें आणि विषय । मनही इंद्रियविषयमय । करी संकल्प विकल्प. ॥ ८१० ॥ त्या इंद्रियांचा करितां नियम[2] । न थारे[3] मनबुद्धींत काम । पाणी कोंडितां वाळोनि भस्म । होय विषांकुराच्या शेताचें. ॥ ८११ ॥ यालागीं कामाधिष्ठान[4] । पूर्वश्लोकीं बुद्धि इंद्रियें मन । सांगोनि कामजयसाधन । इंद्रियनियम बोलिला या श्लोकीं. ॥ ८१२ ॥ एवं ज्ञानियाच्याही मनीं । क्षण एक प्रारब्धबळें वेष्टूनी । काम मोह करी म्हणोनी । बोलिलें प्रकरण. ॥ ८१३ ॥ त्यास ज्ञानाहूनि आधीं । जरी निष्कामता साधी । तरी प्रारब्धभोग सरतां बोधीं । न थारे ठाणें या कामाचें. ॥ ८१४ ॥ तरी ज्ञानाहूनि पूर्वीं मन । कामभोगेच्छेनें असेल मलिन । तरी तो काम ज्ञानविज्ञान । नाशील हा सिद्धांत. ॥ ८१५ ॥ यालागीं या श्लोकीं हरी । म्हणे अर्जुना! आधीं इंद्रियनियम करीं । मग मारीं ज्ञान जालियावरी । रज्जू ओळखोनि कामसर्प. ॥८१६॥ तें आत्मज्ञान कवणेपरी । होय हें याउपरी । अर्जुनास सांगे हरी । या श्लोकीं. ॥ ८१७ ॥

---

१. काखेस. २. निग्रह, संयम. ३. स्थिर होई. ४. कामाचें ठिकाण.

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

अगा ! आत्मा म्हणजे आपण । तें प्रतीतीस[1] जें आत्मपण । तेचि आधीं धरूनि खूण । होय कीं नव्हे हा करावा विचार. ॥ ८१८ ॥ स्थूळ देह मी हा प्रत्यय । प्रथम आत्मत्वाचा निश्चय । त्याहोनि पलीकडे इंद्रियमय । लिंग-देह. ॥ ८१९ ॥ देह मी ऐसें म्हणे । तें जरी देहास देह जाणे । तरी शव कां रे ! नेणे । मी देह म्हणोनि देहातें. ॥८२०॥ स्वप्नीं कल्पनेचा देह दिसे । तेव्हां तोचि मी म्हणोनि वाटतसे । यावरूनि हाही लटिका भासे । आत्मत्वें मी देह म्हणोनी. ॥ ८२१ ॥ इत्यादि भाव पोटीं । तो मुखनेत्रसंकेतें समजे किरीटी । कीं इंद्रियें पलीकडे म्हणतांचि गोष्टी । कळली कीं इंद्रियें पलीकडे स्थूलाहुनी. ॥ ८२२ ॥ स्थूल देहचि आपण । तरी इंद्रियग्रामें दर्शन श्रवण । तीं तरी लिंगदेहीं इंद्रियें ऐसी खूण । ठावकी अर्जुनातें. ॥ ८२३ ॥ स्थूलदेहीं नेत्रकर्णादिकें । हीं तों इंद्रियांचीं गोलकें । जैसीं पात्रांत उदकें । इंद्रियीं गोलकें ये रीती. ॥ ८२४ ॥ मी देखतों मी आइकतों । प्रत्यय लिंग-देहेंकरूनि हा होतो । तरी अहंकारयोगें प्रत्ययास येतो । आत्मत्वें लिंग-देह. ॥ ८२५ ॥ इंद्रियें म्हणतां पलीकडे । स्थूलपलीकडे लिंगदेह हा भाव जडे । आत्मप्रत्यय लिंगदेहीं घडे । उठे आत्मता स्थूलदेहाची. ॥ ८२६ ॥ इंद्रियें म्हणतां शब्दादिविषय । आत्मा नव्हे हा सूचविला निश्चय । कीं विषयास जाणे इंद्रिय । इंद्रियावीण आत्मा नेणे विषयांतें. ॥ ८२७ ॥ आणि येथें देव । श्रुतिप्रमाण सूचवी स्वयमेव । कीं इंद्रियें पलीकडे हा भाव । बोलती म्हणोनि. ॥ ८२८ ॥ बोलती म्हणजे बोलणार । वेद ऐसा शब्दचमत्कार । भाव कीं हा विशद[2] प्रकार । श्रुतीही बोलती. ॥ ८२९ ॥ त्या श्रुतीचा संक्षेप । बहुत अर्थाचा थोडियांत आटोप । ऐसा हा श्लोक वेदार्थरूप । स्वयें बोलोनिही श्रुति सूचवी. ॥ ८३० ॥

श्रुति—'**इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥**
**महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः ।**
**पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥**' (कठ०)

---

१. प्रत्ययाला. २. स्पष्ट.

स्थूलापलीकडे इंद्रियें। हें सूचविलें श्रीकृष्णें निश्चयें। तीं इंद्रियें विषयमयें। तेव्हां विषयही आत्मा घडेना. ॥ ८३१ ॥ हा कृष्णाचा भावार्थ। कीं श्रुतींत इंद्रियांपलीकडे अर्थ। अर्थशब्दें पदार्थ। शब्द स्पर्श रूप रस गंध. ॥८३२॥ अर्थ इंद्रियांपलीकडे। ते शब्दादि पांचही रोकडे। वर्णिले उरला श्रुत्यर्थ घडे। तरी मागें पडेल श्लोकार्थ. ॥ ८३३ ॥ श्लोकार्थ अवघा जाल्यावरी। श्रुतीही वाखाणिजेल वरी। आतां इंद्रियांहूनि पलीकडे हरी। मन म्हणे. ॥ ८३४ ॥ स्थूल सूक्ष्म दोनीच देह। सर्व शास्त्रसिद्ध निःसंदेह। ते दोनी आत्मा हा मोह। निरसितां त्यापुढें मन आत्मा. ॥ ८३५ ॥ कीं मन असे जेथें। आत्मा स्फुरे तेथें। तेव्हां अज्ञानदशेंत येथें। मन आत्मा हें वाटे. ॥ ८३६ ॥ कीं स्वप्नदेह मनोमय। तो मी म्हणोनि आत्मत्वाचा निश्चय। तेव्हां होय मृतप्राय। स्थूल देह हा. ॥ ८३७ ॥ ओळखावें त्या मना। करितां नाना कल्पना। ते कल्पना कांहीं दिसेना। सुषुप्तींत. ॥८३८॥ सुषुप्तींत मन तें न उरे। अथवा बुद्धीचें बोद्धव्यही न स्फुरे। परी जागा होतां सुख स्मरे। ते बुद्धि. ॥ ८३९॥ मी सुखें निजलों होतों। आणि कांहीं जाणत नव्हतों। बुद्धि जागी करितां हे तों। रूप करी दोहींचें. ॥ ८४० ॥ कीं सुख तें आत्मा आपण। आणि तेथें कांहीं न कळणें। हें आपलें जडपण। प्रगट करी बुद्धीच. ॥ ८४१ ॥ जैसें घडी एक मौन धरूनी। जिभेस घडी एक आवरूनी। मागुती बोलतां त्याच जिभेंकरूनी। रूपें होती दोहींचीं. ॥ ८४२ ॥ जीभचि म्हणे राहिला होता शब्द। जिभेवीण आत्मा तो निःशब्द। परी जीभ नाहींशीच जाली स्तब्ध[1]। आत्मा होतां स्वप्रकाश. ॥ ८४३ ॥ मौनी नव्हतें बोलणें। तें जिभेनेंचि वर्णिलें अबोलणें। तैसें सुषुप्तींत बुद्धीचें न जाणणें। बुद्धीच बोले. ॥ ८४४ ॥ एवं मन जेथें नसे। बुद्धीही तेथें सुषुप्तींत न दिसे। परी मनाची कल्पना नव्हती हें जाणतसे। बुद्धीच ते. ॥ ८४५ ॥ जेव्हां मनापलीकडे बुद्धि। मनास न घडे आत्मत्वसिद्धी। म्हणोनि **'मनसस्तु परा बुद्धि'**। ऐसें बोले श्रीकृष्ण. ॥ ८४६ ॥ मनासही जाणे बुद्धि। एवं मनापलीकडे बुद्धीची सिद्धी। तेव्हां मन आत्मा या प्रत्ययाची प्रसिद्धी। उडोनि गेली. ॥८४७॥ आतां बुद्धिच आत्मा गमे। तरी तेही सुषुप्तींत उपरमे। बुद्धीचें [2]बोद्धव्य उपशमे। उरे आनंद आत्मा सुषुप्तींत. ॥८४८ ॥ तेथें आत्माही नाहीं

---

१. स्तब्ध रहाते, नाहींशी होते. २. जाणण्यास योग्य.

म्हणावा । तरी आनंद कैसा गणावा । बुद्धीनें तेथील आनंद जाणावा। जागृतींत त्याच आत्मयाकरितां. ॥८४९॥ एवं आत्मयाचकरितां । बुद्धीस बोलावी सचेतनता । आणि बुद्धीनेंचि ते आत्मसत्ता । ओळखावी. ॥८५०॥ जिभेच्या चालकतेवीण । अबोलपणा ही ऐसी खूण । जिभेनेंचि बोलावी ऐसें निपुण । बुद्धीपलीकडे आत्मा ओळखती बुद्धीनें. ॥ ८५१ ॥ म्हणोनि जगद्गुरु बोलतो। कीं बुद्धीपलीकडे तों तो । हा व्यतिरेक आणि येथेंचि सिद्ध होतो । अन्वय उपदेशणें. ॥ ८५२ ॥ एका वेगळें एक । पाहणें याच नांव व्यतिरेक । जैसें दूध आणि उदक । हंस करिती दो ठायीं. ॥ ८५३ ॥ दूध उदक मिळवणें । दोन्हींस एकत्र करणें । हे तों अन्वयाची खूण । लोकरीती. ॥ ८५४ ॥ कीं पाणी दूध वेगळें दिसे । दूध पाण्यावेगळें कळों येतसे । आत्मानात्मव्यतिरेक अन्वय तैसे । न बोलवती. ॥ ८५५ ॥ कीं आत्मा स्वप्रकाश तत्त्वतां । अनात्मयास ह्यावीण नसे सत्ता । सुषुप्तींत दोहींचा आयता । हा विचार. ॥८५६॥ मिसळती तमोगुणी । इंद्रियें मन बुद्धि देहाची श्रेणी । जागे होतां अनात्मपणीं। नव्हता प्रत्यय कांहींच. ॥ ८५७ ॥ आनंद मात्र आत्मा होता । तेचि म्हणावी आत्मसत्ता । इंद्रियें मन बुद्धि देहवार्ता । जागृतींत स्फुरे त्याकरितां. ॥८५८॥ कीं जों सुषुप्तीचें सुख । त्यावीण कोण जाणे त्या जडातें आणिक । यालागीं अर्जुना! देख । आत्मसत्ता ते एकचि. ॥ ८५९ ॥ एवं असों शके जें इतराविण । त्यांत सत्ता आहे म्हणती प्रवीण । एकाकरितां स्फुरे त्यास निपुण । म्हणती सत्ताविवर्जित. ॥ ८६० ॥ जैसें तरंगावीण । उदक असे आपण । उदकावांचूनि न कळे खूण । तरंगाची. ॥ ८६१ ॥ पटावांचूनि तंतु असे । परी तंतूवांचूनि पट न गवसे । तेव्हां सत्ता तंतूस दिसे । पट सत्ताविवर्जित. ॥ ८६२ ॥ अलंकारावीण । असों शके सुवर्ण । सुवर्णावीण खूण । न कळे अलंकाराची. ॥ ८६३ ॥ तेव्हां सोनेंचि असे । अलंकार नसोनि त्यांत दिसे । आत्मयावांचूनि जड कांहीं न गवसे । आत्मा जडावेगळाही स्वप्रकाश. ॥ ८६४ ॥ एवं हे जितके दृष्टांत । त्यांत स्वयें स्फुरे तें अधिष्ठान निश्चित । ज्याच्या आधारें भासे तो विवर्त । रज्जूआधारें सर्प जैसा. ॥ ८६५ ॥ या श्लोकें इंद्रियें पलीकडे । म्हणतां स्थूलदेह आलीकडे । स्थूल इंद्रियें मन बुद्धि यांचा प्रत्यय घडे । जो बुद्धीपलीकडे म्हणूनि बोलिला. ॥ ८६६ ॥ एवं बुद्धी-

---

१. ही व्यतिरेक व अन्वय यांची व्याख्या आहे. २. पंक्ति. ३. लाटेशिवाय.

पलीकडे आत्मा तो तों दोर । तो अनंत थोराहूनि थोर । त्यावेगळा वांझेचा पोर । प्रपंच सर्व सकळही. ॥ ८६७ ॥ त्या आत्मरज्जूवीण । नये जडप्रपंचाची खूण । तो आत्मा सुवर्ण म्हणती निपुण । प्रपंच अलंकार. ॥ ८६८ ॥ तो आत्मा तंतु देखती । तदाश्रयें प्रपंच पट लेखिती । प्रपंच तरंग ओळखती । आत्मसमुद्र तयाचा. ॥ ८६९ ॥ एवं सकळांपलीकडे । त्यावीण हें सकळही न सांपडे । अन्वयज्ञान ठायीं पडे । अनुभवियास या श्लोकीं. ॥ ८७० ॥ या श्लोकीं इंद्रियें मन बुद्धि । एकापलीकडे एकाची सिद्धी । सांगतां होते गणनासिद्धी । सकळ तत्त्वांची. ॥ ८७१ ॥ इंद्रियें म्हणतां पलीकडे । स्थूल घातलें जें आलीकडे । स्थूल पंचभूतें त्यांतचि घडे । गणना शब्दस्पर्शरूपरसगंधांची. ॥ ८७२ ॥ आकाशादि पंचक । शब्दादिक गुण एकाचा एक । एवं पाहतां गणनाविवेक । दहा तत्त्वें गेलीं स्थूलांत. ॥८७३॥ स्थूल टाकितां आलीकडे । दहा इंद्रियें बोलिलीं पलीकडे । हें वीस इंद्रियांपुढें सांपडे । मन एकविसावें तें बोलिलें. ॥ ८७४ ॥ मन म्हणतां मनाचें कारण । तो अहंकार अहंस्फुरण । कार्यांत कारण आटलें हे खूण । तत्त्वज्ञ समजती. ॥ ८७५ ॥ तरंग म्हणतां जल । आलेंचि गणनेंत केवळ । हें बावीस उरलें तत्त्वयुगुळ । बुद्धि चित्त हीं दोनी. ॥ ८७६ ॥ महत्तत्त्व तें बुद्धि। अव्यक्त तत्त्व चित्त ऐसी प्रसिद्धी । कार्यकारणाची सिद्धी । बुद्धि कार्य तिचें कारण अव्यक्त. ॥ ८७७ ॥ मन म्हणतां एकवीस । त्याच्या कारणासहित बावीस । बुद्धि तेवीस परी जाली चौवीस । तिच्या कारणा अव्यक्तास लेखितां. ॥ ८७८ ॥ जो बुद्धीपलीकडे आत्मा तों तो । ऐसें श्रीकृष्ण ज्यास म्हणतो । तो पंचविसावा म्हणतां लेखा होतो । सव्विसावियाचा त्यांतचि. ॥ ८७९ ॥ पंचविसावा ज्याचें प्रतिबिंब । तो सर्वगत सव्विसावा त्याचें बिंब । प्रतिबिंबास कैंचा अवलंब । विना बिंब करितां उपाधीवेगळें. ॥ ८८० ॥ या श्लोकें तत्त्वें राहिलीं । तीं कार्यकारणत्वें गणनेंत दाविलीं । श्रुतींत स्पष्ट बोलिलीं । जे श्रुति सूचवी येथें श्रीकृष्ण. ॥ ८८१ ॥ ते श्रुति मागें याच श्लोकीं । लिहोनि वाखाणिली नाहीं कीं । आदीं श्लोकार्थ अभिज्ञ लोकीं । आद्यंत अवलोकावा. ॥ ८८२ ॥ आतां तेचि श्रुति । पुन्हा दावूनि अर्थस्थिती । बोलिजेल संक्षेपें यथामती । याउपरी. ॥ ८८३ ॥

---

१. वांझेचा पोर हा अभाव आहे.

श्रुति—**इंद्रियेभ्यः परा० ॥ महतः पर० ॥**

परमपुरुषापासूनि आदीं प्रकृती । तेथूनि जडतत्त्वें जों हे क्षिती । ऐसी तत्त्वांची उत्पत्ती । उफराटा यांचा संहार. ॥ ८८४ ॥ संहार म्हणजे प्रलय । प्रलयाचें प्रकारद्वय । एक प्रलय दुसरा निश्चय । अद्वैतबोधाचा. ॥८८५॥ प्रलयीं ब्रह्म एकचि उरे । उपदेशीं ब्रह्मचि सर्वेही स्फुरे । ज्यास प्रपंच म्हणती निंजसुरे । तो होय नाहींसाच. ॥ ८८६ ॥ प्रलयकालीं ब्रह्मचि काळ । तेथें काळाचाही नसे विटाळ । गिळोनियां मायामृगजळ । ब्रह्मसूर्यचि उरे तेव्हां. ॥ ८८७ ॥ तें ब्रह्म प्रलयशेष । ज्ञानें कळावें तें निषेधशेष । कीं त्यावेगळीं तत्त्वें निषेधितां अवशेष । तेंचि उरोनि गिळी तत्त्वें. ॥८८८॥ एवं स्थूलापुढें जें तें इंद्रिय । हेंच कीं श्रुतितात्पर्य । श्रीकृष्णें सूचवूनि केला निर्णय । कीं इंद्रियें पलीकडे स्थूलाहुनी. ॥ ८८९ ॥ श्रुति इंद्रियांहूनी । म्हणते विषय पलीकडे म्हणोनी । तेव्हां इंद्रियांआलीकडे स्थूलदेह हें सज्जनीं । या **गी**ताश्लोकेंही समजावें. ॥८९०॥ स्थूलीं निषेधलीं पंचभूतें । इंद्रियें दहा लिंगदेहीं निश्चितें । तीं इंद्रियें विषय घेतां चित्तें । समजावीं कल्पनेकरितां मनाच्या. ॥ ८९१ ॥ यालागीं इंद्रियें आलीकडे । विषय त्याही पलीकडे । एवं वीस तत्त्वांची गणना घडे । येथवरी जीं निषेधिलीं. ॥ ८९२ ॥ पंचभूतें निषेधिलीं स्थूलदेहा । निषेधितां आणि इंद्रियें तों दहा । एवं पंधरा विषयपंचक हा । एवं वीस तत्त्वें अनात्मत्वें निषेधिलीं. ॥ ८९३ ॥ विषयापलीकडे मन । तें एकविसावें निषेधी वेदवचन । मनापलिकडे बुद्धि म्हणतां गहन । अर्थ या बुद्धिशब्दाचा. ॥ ८९४ ॥ कीं महत्तत्व बुद्धीपलीकडे । त्या महत्तत्त्वास बुद्धिपण घडे । तेव्हां बुद्धिशब्दें ठायीं पडे । अर्थ अहंबुद्धि म्हणोनी. ॥ ८९५ ॥ कीं तेरावा अध्याय । येथें करितां तत्त्वनिश्चय । तेथें महत्तत्त्व न लेखितां निर्णय । बुद्धींत दावील महत्तत्त्वाचा. ॥ ८९६ ॥ महत्तत्त्व म्हणतां आली बुद्धि । कीं ब्रह्मा बुद्ध्याभिमानी हे प्रसिद्धी । कीं महत्तत्त्वाचीच रूपवृद्धि । चतुर्मुख ब्रह्मा. ॥ ८९७ ॥ एवं मनापलीकडे बुद्धी । ते अहंबुद्धिसत्त्वास अहंकारप्रसिद्धी । एवं तत्त्वगणनासिद्धी । बावीस संख्या येथवरी. ॥ ८९८ ॥ बुद्धीपलीकडे आत्मा आणि महत्तत्त्व । आत्मा म्हणजे सूत्रात्मा त्रिगुणत्व । महत्तत्त्वास सूत्रात्मयास एकत्व । म्हणुनी त्यापलीकडे दोनी श्रुति म्हणे. ॥ ८९९ ॥

---

१. निद्रालुजन.

सृष्टीची प्रथम इच्छा जाली । ते त्रिगुणसूत्ररूपें प्रगटली । सूत्रात्मा म्हणवूनि पावली । ते त्रिगुणेच्छा हें नांव. ॥ ९०० ॥ इच्छा कीं सृष्टीकरण । तेथें प्रबळ क्रियाशक्ति रजोगुण । त्यास सूत्रात्मा नांव हे खूण । त्रिगुण सूत्राची. ॥ ९०१ ॥ परी इच्छा सृष्टि करावयाची । हे ज्ञानशक्तीवांचूनि कैंची । ज्ञानशक्ति सत्त्वगुणाची । तेंव्हांचि नांव त्याचें महत्तत्त्व. ॥ ९०२ ॥ तें महत्तत्त्व जालें ब्रह्मा । सृष्टी करावी हा त्याचा महिमा । बुद्धि जे स्थावरजंगमा । ते सर्व अंश त्या महत्तत्त्वाचे. ॥ ९०३ ॥ एवं मनापलीकडे अहंबुद्धि । त्या अहंकारा एकवीस तत्त्वांची कारणत्वसिद्धि । त्याच्याही कारणत्वाची प्रसिद्धि । महत्तत्त्वास बुद्धि ते. ॥ ९०४ ॥ एवं मनासहित एकवीस । त्याच्या कारणा अहंकारासहित बावीस । त्याच्याही कारणा महत्तत्त्वासहित तेवीस । संख्या जाली येथवरी. ॥ ९०५ ॥ सृष्टि करावी इच्छा ऐशी । जाली ब्रह्मीं शुद्ध सत्त्वासी । ते ईश्वरोपाधि तयासी । जाणावें अव्यक्त. ॥ ९०६ ॥ त्या अव्यक्तशुद्धसत्त्वाचे अंश । तें चित्त ज्यांत प्रतिबिंबपुरुषाचा प्रवेश । मूळ अव्यक्ततत्त्वीं हृषीकेश । बिंब त्या प्रतिबिंबचिदंशाचें. ॥ ९०७ ॥ यालागीं अध्यायीं तेराविया । लेखन अव्यक्ता तत्त्वासि या । चित्तावेगळें धनंजया । न सांगेल कीं तेंचि तें. ॥ ९०८ ॥ अव्यक्तोपाधीनें देव । सर्वभूतीं वसे तो वासुदेव । म्हणोनि वासुदेव स्वयमेव । दैवत चिदंश चित्ताचा. ॥ ९०९ ॥ एवं महत्तत्त्ववरी तत्त्वें तेवीस । त्यापलीकडे अव्यक्त नांव ज्यास । त्यासहित जालीं चोवीस । पंचविसावा पुरुष त्यापुढें. ॥ ९१० ॥ ऐसा बोलोनि व्यतिरेक । त्या एकीं अन्वयेंही अनेक । पहावीं हाही श्रुति कांहींएक । अर्थ सूचवी चरणीं शेवटिल्या. ॥ ९११ ॥

श्रुतिः—**'पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ।'**

श्रुति शेवटीं म्हणे कांहीं । त्या पुरुषापरतें नाहीं । तोचि परमगति ही । जे समजती तत्त्वविचार हा तयाचा. ॥ ९१२ ॥ तो सकळांपरता । त्यापरतें हें किमपि नाहीं सर्वथा । कीं रज्जूवेगळी सत्ता । सर्पास नसे. ॥ ९१३ ॥ श्लोकार्थीं अन्वय । तदनुरूप श्रुतीचा निर्णय । एवं आत्मत्त्वाचा ऐसा निश्चय । श्रीकृष्ण म्हणे अर्जुना. ॥ ९१४ ॥ या मागिलिया श्लोकीं । श्रीकृष्ण ऐसें बोलिला कीं । ज्ञानाहूनि आदि इंद्रियें जिंकीं । मग ज्ञानें मारीं या कामातें. ॥ ९१५ ॥ तो ज्ञानप्रकार कैसा । अर्जुन म्हणेल तरी ऐसा । परंतु हा ज्ञा-

नमार्ग परिसा । परोक्षरीतीचा दाखविला. ॥ ९१६ ॥ कीं या पुढिलिया श्लोकीं । अर्जुनाप्रति म्हणेल कीं । ऐसा आत्मा जाणोनि काम पातकी । मारीं हा. ॥ ९१७ ॥ एथेंचि अपरोक्ष आत्मा तयाला । जरी म्हणावा उपदेशिला । पुढिल्या अध्यायीं बोलेलें[1] बोला । कीं **'तद्विद्धि[2] प्रणिपातेन'** म्हणोनी. ॥ ९१८ ॥ म्हणूनि **'किं[3] तद्ब्रह्म'** ऐसा प्रश्न । अष्टमाध्यायीं करील **अर्जुन** । तेव्हां **'अक्षरं[4] ब्रह्म'** हें वचन । अपरोक्ष उपदेशाचें बोलेल. ॥ ९१९ ॥ त्याउपरी ज्या त्या वचनीं । **'पश्य[5] मे योगमैश्वरं'** म्हणोनी । पाहें पाहें म्हणूनि नवमापासूनी । अपरोक्षभावें बोलेल. ९२० ॥ या एथें ज्ञानरीती । अनुभविया तों अपरोक्ष वाटती । परी या शब्दाच्याच गती । न कळती श्रीकृष्णकृपा नसे तयांसी. ॥ ९२१ ॥ ऐसेचि **अर्जुना** । शब्दचि ऐकों आले काना । परी अनुभवकळा मना । समजली नाहीं. ॥ ९२२ ॥ या पुढिलिया श्लोकीं । उत्तमश्लोक म्हणेल कीं । ऐसें समजोनि आत्मा मग हा पातकी । मारीं काम. ॥ ९२३ ॥

**एवं[6] बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**

**जहि शत्रुं महाबाहो ! कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥**

पूर्वश्लोकीं ज्या विचारें । आत्मा बोलिलों त्या या प्रकारें । तूं जाण आत्मतत्त्व निर्धारें । **अर्जुना !** ॥ ९२४ ॥ जाणोनि मारीं हा काम । क्रोध याच पापियाचें नाम । परंतु कळोनिही आत्माराम । होसी तरी मरेल हा पापी. ॥९२५॥ या भावें म्हणतो **अर्जुना !** । बुद्धि करूनि त्या आत्मस्वरूपीं मना । निश्चय करूनि शत्रुदमना । मारीं या शत्रुकामातें. ॥ ९२६ ॥ पूर्वश्लोकीं तुज आदीं । बोलिलों कीं इंद्रियजयातें साधीं । म्हणुनि ज्ञान जालियावरी तधीं । क्षणीं आळस करसी. ॥ ९२७ ॥ राजनीति पहिली शिकली असावी । रा-

---

१. बोलेल बोला—हें इंग्रजी व्याकरणाप्रमाणें Cognate accusative चें उदाहरण आहे. २. अध्याय ४ श्लो० ३४ पहा. ३. अध्याय ८ श्लो० १ पहा. ४. अध्याय ८ श्लो० ३ पहा. ५. अध्याय ९ श्लो० ५ पहा. ६. याप्रमाणेंच बुद्धीहून जो वेगळा आहे त्याला जाणून आणि आत्म्यानें आत्म्याचा निग्रह करून हे महाबाहो ! अर्जुना ! ह्या सांपडायाला कठिण अशा कामरूप शत्रूला मार.

ज्यप्राप्तीउपरि तेचि [1]चाळावी । तरीच राज्यपदवी । जतन होते. ॥ ९२८ ॥ शास्त्र कळलें मनास । त्याउपरी सोडीं अभ्यास । तरी तें शास्त्र तयास । अंतर देणार निश्चयें. ॥९२९॥ एवं ज्ञान जालियावरी । बुद्धि निर्मळ विवेकें वरी । शुद्धि करूनि त्या बुद्धीनें स्थिर करीं । आत्मस्वरूपीं मन. ॥ ९३० ॥ अगा! देहरथाचे घोडे इंद्रियें । मन [2]वागोरे बुद्धि सारथि स्वयें । कीं मन इंद्रियें वागवावीं निश्चयें । बुद्धीचिया. ॥ ९३१ ॥ तरी बुद्धीपरता आत्मा समजोनी । त्याच निश्चयात्मक बुद्धीकरुनी । मन त्या स्वरूपीं योजूनी । मारीं वैरी हा काम. ॥ ९३२ ॥ जों मन न योजिसी स्वरूपीं । तों हा काम नाना विषयरूपी । होऊनि नाश करील पापी । आत्मानुभवाचा. ॥ ९३३ ॥ म्हणुनि कामरूपी म्हणावा । ज्ञानावांचूनि हा असाध्य गणावा । ज्ञानें आत्मरज्जु कळतां यावा । होय जैसा मिथ्या सर्पाचा. ॥ ९३४ ॥ मग जरी पूर्वकर्मफळें । हा उपजला प्रारब्धाच्या बळें । तो रज्जुविस्मरणें क्षणैक [3]व्यालें । मुख दाखविजे तैसा दिसेल. ॥९३५॥ सरतां प्रारब्धभोग । मागुती चित्तचैतन्ययोग । तेव्हां यथापूर्व त्याचाही योग । तत्काळ होय. ॥ ९३६ ॥ जन्मांतरीं निःष्काम कर्म । करूनि ईश्वरीं न अर्पिला धर्म । त्याच्या बळें भोगी ब्रह्म । स्फुरे भोगकाळीं ही. ॥ ९३७ ॥ कीं न करितां ईश्वरार्पित । फळबंध उपजला निश्चित । तें प्रारब्ध न करी कामासक्त । निष्काम संस्कारें. ॥ ९३८ ॥ या जन्मीं ईश्वरार्पण । कर्म करितां ज्ञानें जाला निपुण । तो त्या कर्मफळीं नव्हे आपण । भोगूनिही कामीं आसक्त. ॥ ९३९ ॥ तथापि भोगीं काम । जरी देखिला तरी तो आत्माराम । नव्हे भ्रष्ट हा नेम । अधिष्ठानीं असतां सावध. ॥९४०॥ याकारणें अर्जुना! । बुद्धी करूनि मना । स्वस्वरूपीं योजूनि शत्रुदमना । महाबाहो! मारीं या शत्रूतें. ॥ ९४१ ॥ ऐसा अध्याय तिसरा । येथें [4]कर्मकलापाचा पसारा । न बाधी निष्काम परमेश्वरा । अर्पितां हा अर्थ जेथें सिद्ध जाला. ॥ ९४२ ॥ येथें मागुतीं मागुतीं । कृष्णीं कर्म अर्पितां परम गती । ऐसें स्वयें सर्व संतांची सद्गती । बोलिला श्रीकृष्ण. ॥ ९४३ ॥ अर्थ गीतेचा पाहे । तो सद्य हे पदवी लाहे । कीं दैवत एक हरीच आहे । मोक्ष कर्में अर्पितां तयास. ॥ ९४४ ॥ पुढें अध्याय चतुर्थ । तेथें ज्ञान कर्म दोनी अर्थ । निरूपील परमसमर्थ । स्वयें श्रीकृष्ण. ॥ ९४५ ॥ हें अध्यायार्थनिरूपण ।

---

१. पुनःपुनः पहावी, उजळणी करावी. २. लगाम. ३. सापानें. ४. कर्मसमूहाचा.

त्याचे चरणीं समर्पण । करूनि चतुर्थाध्यायनिरूपण । करूं आतां. ॥ ९४६ ॥ ऐसें म्हणतांही मन । लाजलें कीं स्वयें कर्ता [1]गरुडगमन । यालागीं उगेंचि करावें नमन । वामन म्हणे. ॥ ९४७ ॥

स्तनविषमपि दत्वा पूतनाया मृतत्वं व्रजति कथमजेऽस्मिन्न्यस्तकर्मामृतत्वम् । तदितरकृतकर्मप्राणिनां क्षिप्रबंधं जनयति विदितं तत्प्राप्य गीताप्रबंधम् ॥ १ ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ॥

---

## अध्याय चवथा.

जय जय जगदीश्वर । जय जय सकलेश्वरेश्वर । जय जय विश्वेश्वर । लक्ष्मीपते ! ॥१॥ जय जय जगन्निवास । जय जय निखिल जगदाभास । जय जय श्रीनिवास । मायापते ! ॥२॥ जय जय सकलरूप । जय जय सकलरूपातीतारूप । जय जय सच्चिदानंदस्वरूप । जगद्गुरो !॥३॥ जय जय शेषफणिगुण । जय जयानंत कल्याणगुण । जय जय सगुण निर्गुण । पार्थसारथे ! ॥ ४ ॥ वंदूनि तुझे श्रीचरण । गीताचतुर्थाध्यायविवरण । करीन म्हणतो शरण । सर्वभावें. ॥५॥ सर्वही तूंचि हा ठसा । ठसावला तुझ्या कृपारसें मानसा । तो तूं गीताकारचि कैसा । टीकाकार नव्हसी म्हणों मी? ॥ ६ ॥ आतां देवाधिदेवा ! । या मिसें शरणागताची सेवा । अंगीकारितोसि वासुदेवा ! । कर्ता स्वयें अकर्ता तूंचि. ॥ ७ ॥ पूर्वाध्यायाचे अंतपर्यंत । जो उपदेश करितां जाला अनंत । तो अनादि परंपरागत । ऐसें कळावें शिष्यास. ॥ ८ ॥ तथापि स्वयें गुरु अनादि । ज्यापासूनि मोक्षमार्ग ब्रह्मादि । प्रवर्तविते जाले जगदादि । काळापासूनी. ॥९॥ तोचि मी या मार्गाचा प्रवर्तक । म्हणोनि संप्रदायकौतुक । सांगतो श्रद्धाहेतुक । या श्लोकें. ॥ १० ॥

श्रीभगवानुवाच—**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥**

अगा ! हा योग अव्यय । कीं ज्याचा कदापि न घडे व्यय । अव्ययशब्दें अविनाशी तेव्हां निश्चय । कीं योग हा अनादि. ॥ ११ ॥ कीं अनादि अविद्यालिंगदेह । याचा ज्ञानें नाश निःसंदेह । अनादीस नाश परंतु [2]निर्वाह ।

---

१. गरुडवाहन (कृष्ण.) २. चालविणारा.

कीं अविनाशीस आदि म्हणवेना. ॥ १२ ॥ नाश नाहीं जयास । आदि नाहींच तयास । या भावें म्हणे योगास यास[1] । कीं हा अव्यय म्हणिजे अविनाशी. ॥ १३ ॥ एवं हा जो सूर्य । त्यास मी हा योग अव्यय । बोलता जालों स्वयें अद्वय । पूर्वकाळीं. ॥ १४ ॥ तो आपुल्या पुत्रा मनूला । 'श्राद्धदेव' म्हणावें जयाला । तयास हा योग बोलता झाला । दिवाकर[2]. ॥ १५ ॥ त्या श्राद्धदेवा मनूचा पुत्र । इक्ष्वाकुनामें पवित्र । त्यास हा योग विचित्र । [3]तो बोलिला. ॥ १६ ॥ तो योग भूमंडळा । येऊनि भूतळीं खंडला । अव्ययत्वें कोठें कोठें राहिला । म्हणूनि म्हणतो या श्लोकीं. ॥ १७ ॥

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**

**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ! ॥ २ ॥**

ऐसा परंपरेनें[4] प्राप्त जाला । **राजर्षि** जाणती जयाला । त्यास काळ बहुफार क्रमला । आलीकडे. ॥ १८ ॥ प्रस्तुत हा योग या श्लोकीं । अगा ! **अर्जुना** ! नाशला कीं । या योगाचे जाणते वक्ते विवेकी । न दिसती कोण्ही यास्तव. ॥ १९ ॥ एथें **परंतपा** म्हणोनी । **अर्जुना**तें या नांवें करूनी । आळवी[5] कीं यावरूनी । युद्ध करावें **अर्जुनें**. ॥ २० ॥ पर जे शत्रु त्यांस ताप । उपजविसी ऐसा तुझा प्रताप । तो तूं मानिसी संताप । झगडों कैसा म्हणोनी? ॥ २१ ॥ तरी हे सूर्यवंशींचे राजे । इक्ष्वाकुआदि ज्यांस ऐसें जे जे । त्यांचें भूमंडळीं यश विराजे । कीं ज्ञाते होऊनिही महायोद्धे. ॥ २२ ॥ ज्ञान आणि स्वकर्म । दोन्ही रक्षावीं हा तुझा धर्म । झणीं[6] जाणोनियां ब्रह्म । कर्म टाकिसी हें युद्ध. ॥ २३ ॥ म्हणोनि म्हणतां परंतपा । ज्ञान देऊनि चेतवी त्याच्या प्रतापा । आतां तो योग तुज बोलिलों ऐसी कृपा । दाऊनि बोलतो या श्लोकीं. ॥ २४ ॥

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**

**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

जो सूर्यास मी सांगता जालों । तोचि योग आजि तुजला बोलिलों । योगामृतातें वर्षलों । कृपामेवें. ॥ २५ ॥ कीं हा योग पुरातन । कल्पांतीं मजमाजी होता जतन । मी योगनिद्रेपासूनि उठतां वचन । हेंचि बोलिलों

---

१. या योगास. २. सूर्य. ३. श्राद्धदेव. ४. क्रमाक्रमानें. ५. प्रार्थी. ६. सत्वर, तत्काळ.

आदी ब्रह्मयासी. ॥ २६ ॥ हें रहस्य ऐसें परम । तुज बोलिलों उत्तम । याकारणेंच अगा निगम । प्रवर्तले सकळ. ॥ २७ ॥ तो योग आजि या श्लोकीं । अर्जुनाकारणें बोलिलों कीं । तूं भक्त आणि सखा विवेकी । अगा ! अत्यंत. ॥ २८ ॥ आतां यापुढें श्लोक । तो पांडुपुत्र पुण्यश्लोक । बोलेल त्याचें सुज्ञ लोक । निमित्त परिसोत. ॥ २९ ॥ हा श्रीकृष्ण परमेश्वर । हें जाणोनि अर्जुन सादर । आळविता जाला वारंवार । मधुसूदना ! जनार्दना ! इत्यादि. ॥ ३० ॥ तों तृतीयाध्याय सरतां । कृष्ण बोलिला कीं बुद्धीपरता । तो आत्मा जाणोनि चित्तैकाग्रता । करूनि मारीं हा कामशत्रु. ॥ ३१ ॥ जरी बुद्धीपरता आत्मा तो ज्ञेय । तेव्हां ज्ञेय तोचि परमेश्वर होय । इतकियानें उडाला निश्चय । जो होता कृष्ण परमात्मा म्हणोनी. ॥ ३२ ॥ जरी तो आत्मा अर्जुनास होता अपरोक्ष । तरी विश्व जितकें प्रत्यक्ष । तें हें कृष्णरूप दिसतें परंतु परोक्ष । हा उपदेश जाला पूर्वोक्त. ॥ ३३ ॥ अर्जुनास एक ठावें । कीं ज्ञेय त्यास परमेश्वर म्हणावें । गुरुमुखें वेदीं जाणावें । त्याच परमेश्वरा. ॥ ३४ ॥ कृष्णचि परमात्मा तो । म्हणूनि मी मानीत होतों । आतां याच्याच मुखें आइकतों । कीं आत्मा तो जो बुद्धीपलीकडे. ॥ ३५ ॥ कृष्ण नव्हे परमेश्वर । इतका बुद्धीचा पदर । सांपडतां प्रकटले डोंगर । असंभावनेचे. ॥ ३६ ॥ गुरु नव्हे सर्वेश्वर । इतका उठतां बुद्धिसमीर । खवळे अविद्यासागर । मग संशयतरंगां काय वाण? ॥ ३७ ॥ तों कृष्ण आणि अर्जुन । दोघांचा एक जन्मदिन । त्यास आठवूनि अर्जुनाचें मन । म्हणे पुरातन गोष्टी कां याला? ॥ ३८ ॥ कीं इक्ष्वाकु सूर्यपुत्राचा सुत । त्यास मरोनि काळ लोटला बहुत । हा कंसबंदिशाळे प्रसूत । जे दिनीं ते दिनींच उपजलों मीही. ॥ ३९ ॥ त्या इक्ष्वाकूहीहूनी । पूर्वीं सूर्यास स्वमुखेंकरूनी । बोलिलों हा योग म्हणोनी । हा काय म्हणतो. ॥ ४० ॥ तरी याची भीड कायसी । हें न पुसों कां यासी । म्हणोनि हेंचि अनादिपुरुषासी । संजय म्हणे पुसतो अर्जुन. ॥ ४१ ॥

अर्जुन उवाच—**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

तुझा जन्मकाळ अलीकडे । सूर्यवंशिया रायांचें जन्म पलीकडे । ऐसें

१. वेद. २. पलीकडे. ३. बुद्धि हाच वायु. ४. कमताई.

असोनि कैसें घडे । कीं आदिकाळीं तूं बोलिलासी हें त्यातें. ॥ ४२ ॥ पिता[1] आपणचि पुत्र म्हणोनि । स्पष्ट बोलिलें वेदवचनीं । अर्जुन म्हणतो या भावेंकरूनी । कीं सूर्यास जरी तूं हें बोलिलासी. ॥ ४३ ॥ तुझा जन्मदिवस आलीकडे । सूर्यवंशराजांचा जन्म पलीकडे । या भावें हें बोलणें तुझें न घडे । म्हणे अर्जुन. ॥ ४४ ॥ अन्यथा सूर्याची उत्पत्ति पलीकडे । आणि कृष्णाचा संभव अलीकडे । जाला तरी कां न घडे । उपदेश धाकट्याच्या मुखें वडिलांसी. ॥ ४५ ॥ देवहूति जननी । तिचा पुत्र कपिलमुनी । तीस तो स्वमुखेंकरूनी । सांगे तत्त्वोपदेश. ॥ ४६ ॥ सूर्य वडील म्हणोनी । उपदेश अघटित यावरूनी । अर्जुन बोलिला म्हणतां येणेंकरूनी । बोल लागतो ग्रंथासी. ॥ ४७ ॥ हें न पाहतां दीर्घदृष्टीकरूनी । सूर्यास पलीकडे जन्म तुजहुनी । याकरितां त्यास तूं वदलासि न हें घडे म्हणोनी । ऐसें वाखाणूं नये एथें. ॥ ४८ ॥ सूर्यास्तवचि सूर्याचा वंश । त्या राजयांचा मृत्युमुखीं प्रवेश । जाला त्यांस न बोलवे तुझा उपदेश । कीं[2] जन्म अलीकडे तुझा हा भाव. ॥ ४९ ॥ एथें ऐसेंचि वाखाणावें । कीं अर्जुन बोलिला या भावें । म्हणोनि म्हणतो आम्हीं केंवी जाणावें । कीं आदीं बोलिलासि हें सूर्यातें. ॥५०॥ आतां याचें उत्तर । देतसे कृष्ण सर्वेश्वर । आपलें ईश्वरत्व अनादि चतुर । सुचवूनि बोलतसे श्रीभगवान. ॥ ५१ ॥

श्रीभगवानुवाच—बहूनि[3] मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

संजय म्हणे धृतराष्ट्रराया ! । पूर्ण षड्गुणांच्या उत्तरा या । आईक भवसिंधु तराया । मृगजळवाय करूनी. ॥ ५२ ॥ कृष्ण म्हणे आईक या बोला । कीं बहुत जन्म लोटले मला । आणि बहुत जन्म लोटले तुजला । अगा! अर्जुना! ॥ ५३ ॥ भाव कीं कोणे एके पूर्वील जन्मीं । सूर्यास हा योग बोलिलों मी । नव्हते पडले मृत्यूच्या [4]संयमीं । वंशज त्याचे ते समयीं. ॥५४॥ म्हणसी जन्म तुज जैसे । बहुत मजही तैसे । लोटले तुजचि कैसे । ठाउके तुझे ते जन्म. ॥ ५५ ॥ तरी ते मी जाणतों सारे । तूं नेणसी अर्जुन! अरे! । आपले तुझे अवघे बरे । मी जाणें ते जन्म. ॥ ५६ ॥ भाव

१. 'आत्मा वै पुत्रनामासि' इत्यादि. २. कारण कीं. ३. हे परंतपा! अर्जुना! माझे अनेक जन्म झाले आणि तुझेही झाले. ते सर्व मी जाणतों, पण तूं त्यांस जाणत नाहींस. ४. बंधनांत.

कीं मी ईश्वर । भूत भविष्य वर्तमान माझे व्यापार । मी जाणें अनादि तुज विसर । नेणसी तूं यास्तव. ॥ ५७ ॥ हाचि भाव मनीं । अर्जुनास म्हणे 'परंतपा' म्हणुनी । कीं तूं जीवकर्में करूनी । जन्मलासि शत्रुसंहाराकारणें. ॥ ५८ ॥ हा भाव अर्जुन । समजला यालागीं कृपेचा घन[1] । वर्षला ऐसें हें शब्दजीवन[2] । कीं भाव बोलवला मागुती तत्काल. ॥ ५९ ॥ यथापूर्व[3] जाला भाव[4] । समजला कीं हा देवाधिदेव । बुद्धिपलीकडे जाणावा तो स्वयमेव । हाचि सर्वात्मा आत्मत्वें. ॥ ६० ॥ ऐसा यथापूर्व सावध जाला । परि पुन्हा संदेह कांहीं उपजला । कीं हा ईश्वर तरी कैसे याला । नाना जन्म. ॥ ६१ ॥ कीं आम्हांस जन्ममरण । लागलें कर्मानुगुण । हा अविनाशी ईश्वर आपण । कर्मबंधातीत. ॥ ६२ ॥ हा भाव साक्षी[5] बुद्धीचा । जाणोनि अवतारप्रकार साचा । बोलतो निगमसार[6] स्ववाचा । या श्लोकीं. ॥ ६३ ॥

**अजोऽपि[7] सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

अर्जुना! वाटलें तुज । कीं हा जन्मशून्य अज । अविनाशी ईश्वर सहज । कैसा जन्मतो नसतां कर्मबंध म्हणोनि. ॥ ६४ ॥ तरी मी होऊनिही अज । आणि नसोनिही नाश मज । भूतांचा ईश्वरही सहज । असोनि मी स्वयें अनादि. ॥ ६५ ॥ कर्मबंध मज नसे म्हणोनी । अगा! लेशही लेप[8] नसोनी । आत्ममाया शुद्ध विद्या ती करूनी । आपली मूर्ति अधिष्ठूनी जन्मतों. ॥ ६६ ॥ आत्ममायेकरूनी । आपली प्रकृति अधिष्ठूनी । मी जन्मतों म्हणोनी । म्हणतो येथें श्रीकृष्ण. ॥ ६७ ॥ आत्ममाया म्हणिजे । नित्य आत्मानुरूपिणी जे । जे अनादि ब्रह्मविद्या विराजे । मज निर्गुणीं निर्गुणत्वें. ॥ ६८ ॥ निर्गुणीं आपण निर्गुण । हेही न सांपडे खूण । ब्रह्म म्हणणें आपण । हेही माया. ॥ ६९ ॥ ते आत्ममाया म्हणावी । तिचा मीच एक धनी गोसावी । तीचेकरूनि मी जन्मतों ठावी । मज नसे अविद्या. ॥ ७० ॥ तुम्हां जीवांस अविद्येंकरूनी । जन्म होती म्हणोनी । तीचेकरूनी मीही जन्मत असेन म्हणोनि मनीं । झणीं मानिसी. ॥ ७१ ॥ अविद्येचे तीन गुण । विषय

---

१. मेघ. २. उदक. ३. पूर्ववत्. ४. समज. ५. द्रष्टा ईश्वर. ६. वेदांचें रहस्य. ७. यद्यपि मी अज आणि अव्ययात्म आहें, [आणि] यद्यपि मी सर्व प्राण्यांचा स्वामी आहें, तथापि मी माझी प्रकृति माझ्या अधिकारांत ठेवितों आणि मी आत्ममायेनें जन्म घेतों. ८. कलंक.

देह तम जाण । इंद्रियें रजोगुण ऐसी खूण । मन बुद्धि चित्त सत्त्व. ॥ ७२ ॥ तें सत्त्व निर्मळ । जैसा आरसा उज्ज्वळ । उरला भागही लोखंड केवळ । परि प्रकाश दिसे निर्मळत्वींच. ॥ ७३ ॥ तैसा सत्त्व गुण । ब्रह्मीं त्याकरितां आत्मत्वाची खूण । इंद्रियें देह रजतमलक्षण । ब्रह्मरज्जूवरी सर्प जैसा. ॥ ७४ ॥ रज तम इंद्रियें विषय । हे मिथ्या सर्प ऐसा निर्णय । सत्त्वदृष्टीं भ्रममय । रज्जूच भासे सर्प जिला. ॥ ७५ ॥ परि दृष्टि स्पर्शे रज्जूस । तेव्हां सर्प भासे तीस । तैसें भ्रमयुक्त सत्त्व आत्मयास । स्पर्शोनि देह इंद्रियें साच मानी. ॥ ७६ ॥ ऐसा सत्त्व गुण । ज्यास्तव आत्मस्वरूपीं आत्मपण । परि अविद्याभ्रमाचें लक्षण । कीं देह मी म्हणे अहंकारें. ॥ ७७ ॥ त्या प्रसंगें मी कर्त्ता म्हणोनी । त्रिगुणात्मकें कर्मे करूनी । त्या कर्मांचीं फळें नाना योनी । तुम्हां जीवां. ॥ ७८ ॥ तैसें अविद्येंकरूनी । मज जन्म घेणें नसे म्हणोनी । आत्ममायेकरूनि जन्मतों या वचनीं । भाव इतुका सूचविला. ॥ ७९ ॥ अतएव जे मूर्ति प्रकट करीतसें । तें रूपचि मी न मानी ऐसें । सोनेंच दिसतां कैसें । रूप साचें मानूं अलंकाराचें. ॥ ८० ॥ या भावें करूनी । **'प्रकृतिं स्वामधिष्ठाय'** म्हणोनी । बोले श्रीकृष्ण या वचनीं । अर्थ भावार्थही ऐसा. ॥ ८१ ॥ कीं प्रकृति म्हणिजे आकृती । ते स्वप्रकृति म्हणिजे स्वस्वरूपमूर्ती । अलंकारीं सुवर्णस्फूर्ती । तैसी प्रतिमा अधिष्ठूनि जन्मतो. ॥ ८२ ॥ अधिष्ठूनि आकार । सोनेंचि प्रकटे निर्विकार । तैसा साकार मी दिसोनि निराकार । अगा ! प्रकटतसें. ॥ ८३ ॥ म्हणसी सर्वदेहीं तूं ऐसा । तरी या रूपींच हा विशेष कैसा । तरी त्या देहीं अविद्यांश जैसा । तैसा शुद्धसत्त्वीं माझ्या असेना. ॥ ८४ ॥ अतएव आत्ममायेंकरूनी । मी संभवतों म्हणोनी । तुज बोलिलों यावरूनी । विशेष इतरांहूनि हा समज. ॥ ८५ ॥ अविद्या आणि कर्मबंध । नसतां कांहींच संबंध । मी जन्मतों ज्यास गंध । ठावा नसे पंचभूतांचा. ॥ ८६ ॥ ईश्वरावतार देह । पांचभौतिक[1] नव्हे निःसंदेह । हा येथेंच नवम श्लोकीं संदेह । निरसेल सकळांचा. ॥ ८७ ॥ आतां याहीपुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही साधुलोक । परिसोत आतां. ॥ ८८ ॥ पूर्वश्लोकार्थभाव । परिसतां हा स्वयमेव । देहधारी देवाधिदेव । अर्जुन ऐसें समजला. ॥ ८९ ॥ ऐसें समजला परी । म्हणे मनीं कीं कां परी । हा देह धरितो म्हणूनि हरि यावरी । प्रयोजन सांगतो या श्लोकीं. ॥ ९० ॥

---

१. पंचभूतांपासून झालेला.

**[1]यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ! ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

जे जे काळीं धर्महानी । होते अधर्माच्या बळेंकरूनी । ते ते काळीं देहधारी होऊनी । प्रकटतों निर्मितों आपणातें. ॥ ९१ ॥ आपणातें आपण । निर्मूनि काय करितो निपुण । तेंही सांगतों स्वाचरण । या भावें बोलतो हा श्लोक. ॥ ९२ ॥

**[2]परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

अगा ! होतां धर्माची क्षीणता । होतसे साधूंस दुःखचिंता । अधर्म वृद्धीतें पावतां । पापी लोक प्रबळ होती. ॥ ९३ ॥ त्या साधूंस माझें स्मरण । माझा तरी कल्पवृक्षाचा गुण । मातें स्मरे जो निपुण । मी त्यास पावतों स्वभाव हा माझा. ॥ ९४ ॥ त्या साधूंचीं संरक्षणें । अगा ! करावयाकारणें । मज लागतें देह धरणें । युगायुगाप्रती. ॥ ९५ ॥ त्यामुळें जे पाप करणार । त्यांचा करावा लागतो संहार । कीं न नाशतां अंधकार । प्रकाश नेत्रांचा घडेना. ॥ ९६ ॥ एवं साधुसंरक्षण । संहारावे पापी जन । या दों गोष्टींकारण । युगयुगाप्रति संभवतों. ॥ ९७ ॥ संहारितों पापी जन । साधूंचें होत दुःखशमन । धर्माचें होत संस्थापन । हें प्रयोजन तिसरें. ॥ ९८ ॥ प्रतियुगीं धर्माची हानी । अगा ! होते म्हणोनी । मीही प्रतियुगीं अवतरोनी । धर्म धार्मिक रक्षितों. ॥ ९९ ॥ कैसा जन्मतो ईश्वर । तो पूर्वश्लोकीं प्रकार । किंनिमित्त करितो अवतार । तरी तें वर्णिलें या दों श्लोकीं. ॥ १०० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । आइकोत बरव्या प्रकारें. ॥ १०१ ॥ तिन्ही अवतारप्रयोजनें । आइकिलीं बरीं अर्जुनें । परंतु शंका येथें मनें । घेतली ते उपयोगी जगासी. ॥ १०२ ॥ कीं साधूंचें पालन । आणि दुष्टांचें निर्दलन । आणि तिसरें धर्माचें स्थापन । काय कठिण या ईश्वरा. ॥ १०३ ॥ कीं याच्या संकल्पमात्रें । ब्रह्मांडें अनंतें विचित्रें । उपजती नाशती आणि मायासूत्रें । नाचवी बुद्धि सर्वांच्या. ॥ १०४ ॥ हीं

---

१. हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना ! ज्या ज्या वेळीं धर्माची ग्लानि आणि अधर्माची वृद्धि होते त्या त्या वेळीं मी जन्म घेतों. २. साधूंच्या रक्षणासाठीं आणि दुष्टांच्या शासनासाठीं आणि धर्माची उत्तम स्थापना करण्यासाठीं प्रत्येक युगीं मी जन्म घेतों.

तीन कामें तयास। करावया काय प्रयास। संकल्पमात्रें जयास। सुखसाध्य कार्यें हीं तिन्हीं. ॥ १०५ ॥ काळचक्र ज्याचें आयुध। त्यानें कां दैत्यांशीं करावें युद्ध। जो संकल्पमात्रें नव्हतां क्रुद्ध। संहरी ब्रह्मांडें शतकोटी. ॥१०६॥ स्वयें अनादि अज। म्हणवी देवकीवसुदेवांचा आत्मज। नित्य विरक्त जो सहज। सहस्र सोळा स्त्रिया कां तयासी. ॥ १०७ ॥ चराचरीं ज्याचा वास। तो येतो हस्तिनापुरास। द्वारकेंत म्हणती तयास। कीं येथें नाहीं श्रीकृष्ण. ॥ १०८ ॥ पाहतां दूरदृष्टीं। अवतारप्रयोजनाच्या गोष्टी। बोलिला त्या वारा मुष्टीं। धरूनि दिधला मज मूर्खासी. ॥ १०९ ॥ हे तों मूर्खसमजावणी। करितो हा चक्रपाणी। अर्जुन ऐसा अंतःकरणीं। साशंक जाला. ॥ ११० ॥ सर्वसाक्षी देव। समजोनि हा शिष्याचा भाव। तो पुसे तों स्वयमेव। हांसोनि बोलतो हा श्लोक. ॥ १११ ॥

**[1]जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन! ॥ ९ ॥**

अगा! अवतारीं मुख्य कारणें। हींचि कीं जन्मकर्ममग्नांतें तारणें। जन्ममृत्युदुःखें निवारणें। अनादि या जीवांचीं. ॥ ११२ ॥ सर्वांसही उपायांतर। मी करूं शकें सर्वेश्वर। परी जीवांचा दुःखसंसार। या रोगास औषध हेंचि एक. ॥ ११३ ॥ तुटावया संसारव्यथा। औषध नाहींच अन्यथा। माझ्या चरित्रामृतकथा। या व्यथेतें नाशिती. ॥ ११४ ॥ वाढवावया कथारस। या गोष्टी दिसती सुरस। ज्या पूर्वश्लोकीं बोलिलों मी श्रीनिवास। तुजप्रती. ॥ ११५ ॥ मुख्य अवतारप्रयोजन। तें सांगाया पूर्वोक्तवचन। बोलिलों कीं रक्षावया साधुजन। वधावया दुष्ट धर्म संस्थापावया. ॥ ११६ ॥ कीं भूमीस भार जाला। ते बोलिली वि[2]धातयाला। तो मज शरण आला। कीं करावें स्थापन धर्माचें. ॥ ११७ ॥ तेव्हां देवकीच्या उदरीं। मी जन्मलों श्रीहरी। ऐसें वर्णितां अलौकिक [3]परी। गंभीर माझी [4]पुराणें वर्णिती. ॥ ११८ ॥ कीं प्राची दिशा स्वोदरीं। जैसी पूर्णचंद्रातें धरी। देवकी श्रीकृष्णास यापरी। धरिती जाली उदरांत. ॥ ११९ ॥ लोकांसारिखीं माझीं जन्में। लोकांसारिखीं माझीं कर्में। नव्हती हीं दिव्यें ऐसीं वर्में। सांपडती वेदीं पुराणीं. ॥ १२० ॥

---

१. हे अर्जुना! जो खरेपणानें माझें दिव्य जन्म आणि कर्म जाणतो तो देहाला टाकून पुनः जन्म पावत नाहीं, मला येऊन मिळतो. २. ब्रह्मदेवाला. ३. प्रकार, रीती. ४. अठरा पुराणें.

तेथें अवताराचीं कारणें । बोलिलीं कीं साधूंतें संरक्षणें । आणि दुष्टांतें मारणें । स्थापणें धर्म. ॥ १२१ ॥ म्हणोनि हीं तुजलागीं । निमित्तें बोलिलों कीं त्या प्रसंगीं । बिंबेल तुझिया अंतरंगीं । कीं अलौलिकें[1] जन्मकर्में ईश्वराचीं. ॥ १२२ ॥ दों परी कथाश्रवण । एक समजोनि एक मूढपण । मूढपणेंही आपला गुण । कथांमाजी दावितीच. ॥ १२३ ॥ कीं नेणतांही मलिन । अग्नीवरी पडे आपलें वैसन[2] । तरी त्याचें होय दहन । पाप ऐसें कथामृतें. ॥ १२४ ॥ नकळत अरण्यांतील पाला । शाक म्हणोनि जरी भक्षिला । तरी तो गुण आपला । करीच कीं. ॥ १२५ ॥ घृत दुग्ध पुष्टिकारक । हें नेणे जरी बाळक । तथापि पुष्ट होतें तें कौतुक । वस्तुमहिमेचें. ॥ १२६ ॥ माझ्या कथांचा अद्भुत गुण । न कळोनिही घडे श्रवण । तरी पवित्र न करिती ऐसें कवण । बोलों शके. ॥ १२७ ॥ परंतु दिव्यें माझीं चरित्रें । लोकांसारिखीं नव्हती निश्चितें । ऐसें समजेल जो त्यातें । मोक्षच्चि होय. ॥ १२८ ॥ माझे जन्म दिव्य सकळ । जो जाणेल त्यास हें फळ । कीं जन्म न पावे तो केवळ । मजच्चि पावे. ॥ १२९ ॥ अगा! मज पावला । त्याचा कर्मबंध अवघा नासला । म्हणोनि जन्मा नाहीं आला । पुनरपि. ॥ १३० ॥ माझें जन्म तत्वतां । दिव्य ऐसें कळतां । पुन्हां जन्म नाहीं **पांडुसुता**! । अगा! जे रीती. ॥ १३१ ॥ कळतां दिव्य माझें कर्म । तुटे कर्मबंध हें वर्म । एवंच जाणावें जन्म कर्म । दिव्य माझें. ॥ १३२ ॥ पंचभूतदेहसंबंध । त्यास निमित्त कर्मबंध । तरी मज ठावका नसे गंध । कर्मनिमित्ता अहंकाराचा. ॥ १३३ ॥ जो स्वयें परिमित । त्यास तें अहंकार निमित्त । कीं मी एवढा तें हेतु निश्चित । परिमितपण कर्मासी. ॥ १३४ ॥ मी अनंत अपरांपर । मज न सांपडे अहंकाराचा पदर । आणि ठाव नाहीं कीं जेथें मी ईश्वर । कर्में करूं. ॥ १३५ ॥ बाहेर ना आंत । आणि आदि ना अंत । कर्में तो मी अनंत । केवीं करूं. ॥ १३६ ॥ न उपजतां कर्म । न घडे पंचभूतदेहजन्म । शुक्रशोणितसंबंध[3]धर्म । कर्मानुबंधें. ॥ १३७ ॥ म्यां कर्म करावें । तरी कोठूनि कोठें जावें । काय घ्यावें काय टाकावें । मीच अवघा. ॥ १३८ ॥ कोणाशीं मी बोलों । कोण्या मार्गें कोठें चालों । ऐसा अद्वय असतां पोटा आलों । कैसा कोणाच्या? ॥ १३९ ॥ **देवकी कौसल्या** अदिती[4] । अनुसूया[5] **विकुंठा**[6] **देवहूती**[7] । रे-

१. चमत्कारिक, अलौकिक. २. वस्त्र. ३. रेतरक्त. ४. कश्यपऋषिभार्या. ५. दत्तात्रेयाची माता. ६. रैवतमन्वंतरांतील विष्णूचे अवताराची माता. ७. कपिलाची माता.

णुका पृश्नी सत्यवती । इत्यादि माता माझिया. ॥ १४० ॥ यांच्या पोटीं जगन्निवास । कैसा सांठवलों कीं गर्भवास । मज घडला म्हणावा नवमास । कर्मबद्धां परिमितां जीवांसारिखा. ॥ १४१ ॥ अगा ! सर्वगत अवकाश । आहेच सर्वघटीं आकाश । मजवांचूनि कैंचा चित्प्रकाश । पोटीं देवकी कौसल्यादिकांच्या. ॥ १४२ ॥ आहेंच त्यांच्या उदरीं । जो मी वसतों चराचरीं । पुराणें बोलती यापरी । मज गर्भवास. ॥ १४३ ॥ अलिप्त सर्वत्र असोनी । आकाश तैसा मी सर्व गर्भीं वसोनी । अलिप्त साक्षी न स्पर्शोनी । असें सर्पांत रज्जु जैसा. ॥ १४४ ॥ तंतु नातले पटातें । माती न शिवे घटातें । मी जगत्कारण संकटातें । न शिवें गर्भीं असोनि गर्भाच्या. ॥ १४५ ॥ जीवांचिया मती । प्रपंच साचा मानिती । रज्जु नेणतां भीती । मिथ्या सर्पाची. ॥ १४६ ॥ आणि ते माझे प्रतिबिंबांश । जळीं जळापुरताच अवकाश । त्या जीवां घडों शके प्रवेश । कर्मबंधें गर्भीं मातेच्या. ॥ १४७ ॥ पित्याच्या देहीं रिघोनी । त्याच्या वीर्यासवें तेथूनी । मातेच्या शोणितीं मिसळोनी । अवयव पावती गर्भांत. ॥ १४८ ॥ देह वाढे जैसा । प्रतिबिंबांश वृद्धि पावे तैसा । त्यास गर्भवास ऐसा । घडों शके. ॥ १४९ ॥ जीवांस पंचभूतशरीरें । त्यांस गर्भवास या प्रकारें । मी स्वेच्छा कल्पित आकारें । असतों मनीं पित्याच्या मातेच्या. ॥ १५० ॥ योगी मातें ध्यानीं । ध्याती जैसे कल्पूनि मनीं । तैसा स्वेच्छेंकरूनी । मूर्ति कल्पितों मनीं पित्याच्या मातेच्या. ॥ १५१ ॥ पंचभूतें ही माझीच कल्पना । परि त्या देहांस हा महिमा येना । कीं जीवाचिया कर्मबंधना । कारणें तीं म्यां कल्पिलीं. ॥ १५२ ॥ अविद्येनें कर्में करिती । ते या पंचभूतांचे देह धरिती । अनादि संकल्प ये रीती । पंचभूतें कल्पितां. ॥ १५३ ॥ अगा लोखंडाच्याच शृंखळा करिती । आणि लोखंडाचींच शस्त्रें घडिती । परि तीं शस्त्रें त्या शृंखळा तोडिती । जेव्हां सोडिती बंधासी. ॥ १५४ ॥ माझीच कल्पना पंचभूतें । ज्या पंचभूतांचीं शरीरें अद्भुतें । मनुष्य देहींच्या कर्में बहुतें । जे अविद्येनें भोगिती हे जीव ॥ १५५ ॥ ते अविद्या आणि संचित । क्रियमाण कर्मासहित । नाशावया निश्चित । संकल्प करूनि कल्पितों हे अवतार. ॥ १५६ ॥ इत्यादि माझ्या जन्मरीती । अलौकिक दिव्य माझ्या मूर्ति । ऐसें जाणोनि माझ्या अव-

---

१. परशुराममाता. २. सुतपा. प्रजापतीची स्त्री. हीच पुढें कृष्णमाता देवकी झाली. ३. व्यासमाता. ४. अंतर. ५. चैतन्यप्रकाश.

तारकीर्ती । जे गाती ऐकती निरूपिती. ॥ १५७ ॥ ते पुन्हां जन्मा न येती । देह टाकूनि मातेंचि पावती । मुख्य अवतारप्रयोजनरीती । अर्जुना! या माझ्या. ॥१५८॥ या भावें श्रीपती । बोलिला अर्जुनाप्रती । कीं माझें जन्म दिव्य ऐसें जे जाणती । ते जन्मा न येती पावती मजलागीं. ॥ १५९ ॥ ऐसेंचि दिव्य कर्म । कीं हें सगुण ब्रह्म । विना अविद्या अहंकारभ्रम । कर्म घडे तें ईश्वराचें. ॥१६०॥ कीं हा अपादपाणी । म्हणोनि बोले वेदवाणी । हा स्वमायेंकरूनि चक्रपाणी । कर्में दावी जगदीश्वर. ॥ १६१ ॥ याणें केल्या बाइला । लोकरीती वर्तवी त्या स्त्रियांला । आणि लेंक लेंकीही यांला । परि नसे यास कर्मबंध. ॥ १६२ ॥ जीव पूर्वकर्मांच्या बळें । पावती पुत्रकलत्रादि फळें । तो कर्मबंध समूळें । नसे याला. ॥ १६३ ॥ लोकदृष्टीं कर्में दावी । परी अकर्ताचि गोसावी । ऐसीं दिव्यकर्में समजावीं । अगा! माझीं. ॥ १६४ ॥ या भावें म्हणे हरी । कीं माझें दिव्य कर्म यापरी । ऐसें समजे तो गर्भकुहरीं । न रिघे पावे मजचि तो. ॥ १६५ ॥ मुख्य अवतारप्रयोजन । ऐकोनि निःसंदेह जाला अर्जुन । तथापि शंकित जालें मन । कांहींसें. ॥ १६६ ॥ कीं याचें दिव्य जन्म । आणि दिव्य याचें कर्म । समजे त्यास मोक्ष हा नेम । स्वयें हाचि करितो. ॥१६७॥ आणि मोक्ष तरी विना ज्ञान । नव्हे ऐसें वेदांचें वचन । तेव्हां जें बोलतो कमलनयन । हें केवीं घडे. ॥१६८॥ ऐसा मनांतील भाव । जाणोनि बुद्धिसाक्षी देव । उत्तर देतो देवाधिदेव । संदेह आणीकही निरसूनी. ॥१६९॥ कीं खरेंचि ज्ञानावांचूनि मुक्ति नाहीं । आणि दिव्य जन्मकर्म जाणणें हेंही । विना ज्ञान न कळे कांहीं । दिव्यपण माझ्या जन्मकर्मांचें. ॥ १७० ॥ याकारणें हरी । उत्तर देतो या श्लोकाचभीतरीं । एका शब्दें दोन्ही सूचवी यापरी । कां '**एवं यो वेत्ति तत्त्वतः**'. ॥ १७१ ॥ अगा! तत्त्व म्हणिजे आत्मत्त्व यास्तव । जन्मकर्म दिव्य ऐसें वास्तव । जाणे त्याचें हें प्रातिवैभव । बोलिलों तुज. ॥ १७२ ॥ कीं आत्मा जरी कळे । तरी लिंगदेह तेव्हां जळे । ज्ञानाग्नीतें आतळे । चित्त जेव्हां. ॥ १७३ ॥ आत्मयाकरितांच चित्त । सर्वदा प्रकाशे निश्चित । तेंचि गुरुमुखें अधिगत । जालें यासी. ॥ १७४ ॥ परंतु जेव्हां समाधी । चित्तवृत्तिनिरोधें साधी । कीं सर्वही ब्रह्म या सर्वात्मबोधीं ।

---

२. करचरणरहित. २. अपत्यें, स्त्रिया वगैरे. ३. गो+सावी=इंद्रिय+स्वामी=जितेंद्रिय. ४. गर्भस्थानीं. ५. आत्मत्त्वामुळें. ६. खरेपणें. ७. स्पर्शे. ८. अवगत, प्राप्त.

चित्त थारे. ॥ १७५ ॥ या समाधि दोन्ही । एक तरी बाणे या दोहींतूनी । तरीच सुटे जन्मकर्मबंधापासुनी । पक्कज्ञानी तेधवां. ॥ १७६ ॥ आत्मा कळोनिही तो । शब्दज्ञानीच बोलिजेतो । अनुभवी तेव्हां जेव्हां पावतो । समाधीतें. ॥ १७७ ॥ समाधिप्राप्तीकारणें । दोंपरी लागे यत्न करणें । एक निर्गुण अंतःकरणें । प्रयत्नें ध्याती. ॥ १७८ ॥ त्यास हें सगुण गुणकीर्तन । अथवा सगुणमूर्तीचें ध्यान । जन्मकर्म दिव्य हें चिंतन । असेना. ॥ १७९ ॥ नित्य निर्गुणत्वेंचि ध्याती । त्यांस अव्यक्तोपासक म्हणती । हें द्वादशाध्यायाच्या ठायीं **श्री**पती । विशद बोलेल. ॥ १८० ॥ आणि आत्मा कळोनी । तत्पर सगुणभजनीं । अवतारगुणश्रवणकीर्तनीं । जे सादर. ॥ १८१ ॥ तें भगवंताचें जन्म दिव्य । आणि दिव्य कर्म कर्तव्य । तत्त्वविचारें जाणती कीं सेव्य । निर्गुणत्वें सगुण ज्यांला. ॥ १८२ ॥ ते ज्ञानी सगुण भक्त । भजोनि नव्हती विभक्त । सेव्यसेवक अविभक्त । जयांतें. ॥ १८३ ॥ भक्त आणि ज्ञानी । तो श्रेष्ठ सकळांहूनी । तो अनायासें मोक्ष पावे म्हणोनी । द्वादशीं श्री**कृष्ण** बोलेल.॥१८४॥ न करितां वृत्तीचा निरोध । आयताच बाणे समाधिबोध । **हरि**गुणकीर्तनश्रवण शोध । अनायास होय चित्ताचा. ॥ १८५ ॥ निर्गुणोपासकां श्रम । अपार ध्यातां केवळ ब्रह्म । जे निर्गुण कळोनि सगुण ब्रह्म । भजती अनायासें समाधि तयांसी. ॥ १८६ ॥ त्यांसी हाचि उपाय थोर । जो या श्लोकीं बोले सर्वेश्वर । कीं दिव्य जन्मकर्म माझें ऐसें जो नर । जाणे तो पुन्हा नये मज पावे.॥१८७॥ या भावें **हरी** । या श्लोकाचे भीतरीं । म्हणे धरूनि हा भाव अंतरीं । कीं **'एवं यो वेत्ति तत्त्वतः'**. ॥ १८८ ॥ आतां ज्ञानेंचि मोक्ष होणार । तरी जन्मकर्म दिव्य हा प्रकार । कळणें याचा काय बडिवार[२] । कोणी म्हणतील एथें. ॥ १८९ ॥ तरी आत्मा कळल्याच वरी । निर्गुणोपासकां श्रम नाना परी । ते प्रयास न लागतां **हरी** । गति म्हणे यांस हाचि बडिवार. ॥ १९० ॥ यानिमित्त पूर्वापार । **गी**तावाक्याचा विचार । करूनि केला निर्धार । ये रीती. ॥ १९१ ॥ ज्ञान जालिया वरी । सगुणगुणभजन कां पैरी[३] । बोलती कोणी या प्रकारीं । तरी ज्ञानपरिपाकार्थ हा सिद्धांत. ॥ १९२ ॥ हें मुख्य अवतारप्रयोजन । हें **भा**गवतीं प्रतिपदीं वर्णन । तें एथें आणितां मन । ग्रंथविस्तारें शिणेल श्रोतयांचें. ॥ १९३ ॥ हें अवतारांचें मुख्य कारण । परिसतां **अर्जु**-

---

१. स्थिरावे. २. पहाड, मोठेपणा. ३. रीति.

नाचें अंतःकरण । समाधान पावलें पुढें निरूपण । या प्रसंगींच होतें या श्लोकीं. ॥ १९४ ॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

अगा ! आत्मा कळल्या ज्ञानियाचें । तप थोर हेंचि साचें । कीं दिव्यत्व माझ्या जन्मकर्माचें । जाणोन करी श्रवण कीर्तन. ॥ १९५ ॥ यास म्हणावें ज्ञानतप । या तपाचा अद्भुत प्रताप । कीं सकळां पापांचें मूळ पाप । अनादि वासना ते नासे. ॥ १९६ ॥ आगंतुक पाप मात्र । नासे ज्याचें तोही म्हणावा पवित्र । परंतु पापमूळ वासना अपवित्र । असतां न[1] पावे परंपदा. ॥ १९७ ॥ म्हणोनि म्हणे **कमलनेत्र** । कीं या ज्ञानतपें पवित्र । ते पुन्हां जो गर्भवास अपवित्र । नातळती तयासी. ॥ १९८ ॥ कीं पावले माझिया भावासी । मद्रूप होऊनि वैकुंठवासी । किंबहुना जितांच तयांसी । मुक्ति आणि भक्तिही माझी. ॥ १९९ ॥ कीं ज्ञान जालियावरी । जितांच मुक्ति व्हावी परी । काम क्रोध आणि भय वैरी । हे जों तों न म्हणवे जीवन्मुक्त ॥ २०० ॥ जे पवित्र या ज्ञानतपें । कामक्रोधभयें त्यांचीं त्या प्रतापें । गेलीं ज्या आत्मज्ञानियास सोपें । भजन जन्मकर्मांचें माझिया. ॥ २०१ ॥ जयाचा काम गेला । कीं विषयानुराग न असे ज्याला । तेव्हां भय कैंचें तयाला । क्रोध किमर्थ उपजेल ? ॥ २०२ ॥ ऐसे ते वीत[2]रागभयक्रोध । हा त्यांच्या जीवन्मुक्तदशेचा शोध । यास कारण विश्वात्मबोध । त्यासही कारण भजन भगवज्जन्मकर्मांचें. ॥ २०३ ॥ हे दोन्ही सूचवूनी । **मन्मय**[3] आणि **मदुपाश्रित**[4] म्हणोनी । म्हणे श्री**कृष्ण** या वचनीं । अर्थ दोन्ही हे विशद[5]. ॥ २०४ ॥ **मन्मय** म्हणिजे मी ईश्वर । जो माझा नित्य अनुभवप्रकार । चित्त ज्यांचें तदाकार । ते मन्मय ह्मणावे. ॥ २०५ ॥ सर्व भूतें आपणांत । मृगजल जैसें किरणांत । जे या माझ्या अनुभवांत । ते **मन्मय** म्हणावे. ॥ २०६ ॥ **मन्मय** या वचनीं । ऐसा भाव हा यावरूनी । कीं याच अध्यायीं पुढें कृपेंकरूनी । हेंचि बोलेल. ॥ २०७ ॥ कीं **अर्जुना** ! संतांच्या मुखें । ज्ञान जालिया मग सुखें । सर्व भूतें विश्व[6]तोमुखें । आपणामध्यें अशेष देखसी. ॥ २०८ ॥ ऐसिया सर्वात्मकपणातें । पावसी तेव्हां आपणातें । मजमाजी देखसी या खु-

१. पावत नाहीं. २. ज्यांचीं प्रीति, भय आणि क्रोध हीं गेलीं आहेत. ३. अनन्यभावेंकरून माझ्या ठायीं चित्त ठेवणारे. ४. माझा आश्रय करणारे. ५. उघड. ६. सर्वत्र.

णेतें । समजणें मजशीं तेंचि ऐक्य. ॥ २०९ ॥ पुढें याच अध्यायांतरीं । हेंचि बोलेल परी । तें स्थळ कळावया या अवसरीं । लिहिजेल संगती पुढील श्लोकार्धीं. ॥ २१० ॥

**'येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥'** [अ० ४ श्लो० ३५.]

हें पुढें आइकेल **धनंजय** । प्रस्तुतीं म्हणे कीं ते **मन्मय** । काम-क्रोध आणि भय । गेलीं जयाचीं हीं तिन्हीं. ॥ २११ ॥ एवं विश्वात्मकत्व । जयास त्यास म्हणे मन्मयत्व । यासही कारण जाणोनि आत्मत्व । माझा आ-श्रय जरि असे. ॥२१२॥ म्हणे या भावेंकरूनी । कीं ते मदाश्रित म्हणोनी । भाव कीं दिव्य जन्में कर्में जाणोनी । श्रवण कीर्तन माझें करिती. ॥ २१३ ॥ मीचि तारक ऐसा । ज्यांस सर्वथा भरंवसा । आयता आत्मप्रीतीचा ठसा । उमटे चित्त शुद्ध होतां गुणीं माझ्या. ॥ २१४ ॥ प्रीति ज्याची धरी चित्त । तेथें आत्मयास सुख व्हावें हें निमित्त । स्त्री पुत्र गृह वित्त । आवडती आ-त्मयाकारणें. ॥ २१५ ॥ ज्यांची ज्यांची आवडी । त्यां त्यांची कधीं तरी ना-वडी । होणार परी न दिसे ते घडी । कीं जींत अप्रिय वाटेल हा आत्मा. ॥ २१६ ॥ आत्मप्रीतीचा ऐसा । आयता अनादि चित्तावरी ठसा । परी वि-षयवासनेचा वळसा । ठसा झांकला तो यामुळें. ॥ २१७ ॥ अविद्यासंस्कारें मलिन चित्त । ठसा आत्मप्रीतीचा यानिमित्त । मलिन जाला तो उमटे नि-श्चित । हरिगुणें चित्त क्षालितां. ॥ २१८ ॥ आत्मत्व जेव्हां कळलें । अविद्या आवरण तेव्हां गेलें । परंतु विस्मृतींत शेष उरलें । संस्कारें देहात्मतेच्या. ॥ २१९ ॥ जेव्हां हा सगुणाचे गुण । दिव्य समजोनि निपुण । गाई आणि नाचे आइके जों तों खूण । बाणों लागे आत्मस्वरूपस्थितीची. ॥ २२० ॥ विषयप्रीति तों तों दुरावे । आत्मप्रीति तों तों ओलावे । चराचरतरंगांसहित हेलावे । आत्मसमुद्र. ॥ २२१ ॥ आइकतां सगुणजन्मकर्मगुण । दिव्यत्वें स्फुरे आत्मत्वखूण । देहीं विदेह तेव्हां निपुण । होय उमटतां ठसा आत्मप्रियत्वाचा. ॥ २२२ ॥ गाई उडे नाचे हरिकीर्तनीं । 'अच्युतानंत वासुदेव' म्हणोनी । तों सर्वात्मतेचा ठसा मनीं । उमटों लागे. ॥ २२३ ॥ म्हणतां 'अच्युता ! अच्युता !' । च्यवेना कधीं ते चिदात्मसत्ता । सर्वभूतीं स्फुरे तत्त्वतां । अच्युत सुवर्ण नैश्वरा अलंकारीं. ॥ २२४ ॥ 'अनंता ! अनंता !' म्हणूनि गाय । तों

---

१. पडदा. २. उमटों लागे. ३. खवळे. ४. पतन पावेना. ५. नाशवंत.

चित्त [1]सप्तावरणांपुढें जाय । ब्रह्मांड सावरण चित्तांत माय । त्याही पुढें स्फुरे अनंत. ॥ २२५ ॥ 'वासुदेवा! वासुदेवा!' । म्हणोनि गातां देवाधिदेवा । सर्वभूतीं त्या चिदात्मदेवा । देखे सर्व भूतें त्यामधें. ॥ २२६ ॥ तत्त्वज्ञानें तत्त्वतां । दिव्य जन्मकर्में हरीचीं कळतां । ध्यातां गातां आइकतां । अनुभव ऐसा जयांचा. ॥ २२७ ॥ त्यांस म्हणे अच्युत । कीं ते मदाश्रित । ईश्वरमय या अनुभवें ते निश्चित । म्हणून म्हणे **मन्मय** म्हणूनी. ॥२२८॥ एवं दिव्य भगवज्जन्मकर्म । हें आत्मज्ञानावीण न कळे वर्म । यास म्हणावें **भागवत धर्म** । कीं ज्ञानें श्रवण कीर्तन सगुणाचें. ॥ २२९ ॥ हें ज्ञानयुक्त तप । या तपाचा ऐसा प्रताप । कीं विषयवासना भय कोप । हरूनि मुक्ति दे [2]जितांचि. ॥ २३० ॥ हा ज्ञानतपप्रकार । [3]अनुष्ठूनि बहुत नर । मज पावले म्हणे सर्वेश्वर । भाव कीं अनादि हा भक्तिमार्ग. ॥२३१॥ आतां यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । आइकोत आतां.॥२३२॥ तपें कार्याची सिद्धी । लोकीं वेदीं ऐसी प्रसिद्धि । [4]ज्ञानपरिपाकार्थ तपसमृद्धी । ज्ञान तप पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ २३३ ॥ ज्ञानयुक्ततपें मोक्ष । पावले जे पुरुष दक्ष । त्यांस बोलिला [5]कमलपत्राक्ष । कीं ते **मन्मय** आणि **मदुपाश्रित**. ॥२३४॥ **मन्मय**शब्दें विश्वात्मक ज्ञान । **मदुपाश्रित**शब्दें दिव्यत्वें सगुणचिंतन । हा तदाश्रय कीं सगुणगुणभजन । या दोंपरी ज्ञानतप बोलिला.॥२३५॥ एवं ज्ञान जालियावरी । सगुणाश्रय जो न धरी । दिव्यत्वें सगुणगुणभजन न करी । तप न घडे तयासी. ॥२३६॥ परी तो करुनि इंद्रियदमन । सर्वभूतीं समत्वें भजन । निर्गुणीं वृत्तिनिरोधें मन । योजूनि भजे सर्वदा. ॥ २३७ ॥ तोही ईश्वराश्रित । होयचि कीं निश्चित । कीं सगुण निर्गुण यांत । भेद नसे अणुमात्र. ॥ २३८ ॥ ऐसें असोनि अच्युत । कां त्यातेंचि म्हणे **मदाश्रित** । जे सगुणगुणभजनीं रत । आत्मज्ञ होउनी. ॥ २३९ ॥ ये विषयीं अर्जुन । [6]द्वादशीं करील प्रश्न । कीं ज्यांस अक्षर अनिर्देश्य अव्यक्ताचेंचि भजन । ते बरे कीं हे बरे आत्मज्ञ सगुणाश्रित. ॥ २४० ॥ तेथें कृष्ण देईल उत्तर । कीं क्लेश अधिकतर । त्यांस ज्यांचें चित्त तत्पर । अव्यक्तींच. ॥ २४१ ॥ या कारणें त्यांपरीस । ज्यांस सगुणभजनीं [7]सौरस । ते बरे कीं मृत्युसंसारसागरीं

---

१. पंचकोश, अहंकार आणि माया हीं सात आवरणें. २. जिवंतपणींच. ३. करून. ४. ज्ञान पूर्ण होण्यासाठीं. ५. कमललोचन (वासुदेव). ६. अध्याय १२ श्लो० ३ पहा. ७. गोडी.

त्यांस । उद्धरणार स्वयें मी. ॥ २४२ ॥ एवं निर्गुणींच सादर । आणि सगुणीं अनादर । तेही मजचि पावती नर । परि क्लेश अधिकतर तयांसी. ॥२४३॥ द्वादशीं ऐसें अनंत । बोलेल कीं ऐसाच तत्त्वतां सिद्धांत । परि विचारितां यांत । विषमता लागते निर्दोषियासी. ॥ २४४ ॥ हा अर्जुनें प्रश्न करावा । परि अद्यापि हा सिद्धांत नाहीं ठावा । द्वादशीं समजेल बरवा । 'क्लेशोऽधिकतरस्तेषां' हें आयिकतां. ॥२४५॥ तेव्हां तेथें हा प्रश्न अर्जुन । करितो येथेंचि जगज्जीवन । स्ववैषम्यपरिहारवचन । बोलतो या प्रसंगीं या श्लोकीं. ॥२४६॥

**ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ! सर्वशः ॥ ११ ॥**

अगा! जो मी निर्गुण । पार्था! तोचि मी सगुण । सुवर्णीं सुवर्णप्रतिमा निपुण । भिन्न न देखती लेशही. ॥ २४७ ॥ परि कल्पवृक्षस्वभाव । अगा! मी देवाधिदेव । ज्या रूपीं ज्याचा जैसा भाव । त्या रूपें तैसींच मी फळें देतों. ॥ २४८ ॥ परंतु निर्गुणीं नसे गुणधर्म । जेथें हा उपासक, मी उपास्य ब्रह्म । हेही वृत्ति नसे तेथें श्रम । करिती अव्यक्तोपासक. ॥ २४९ ॥ जेथें कांहीं नसे गुण । तेंचि आम्हांस पाहिजे निर्गुण । ऐसा भाव ज्यांचा मी सगुण । केंवी उद्धरूं तयांसी? ॥२५०॥ करावा एकाचा उद्धार । गुणवृत्तीचा प्रकार । मी सगुण वृत्तिविचार । ज्यास तो केंवी उद्धरूं तयासी? ॥२५१॥ जे सगुणत्व नलगे म्हणती । निर्गुणत्वेंचि मज भजती । मी सगुण श्रीपती । केंवी उद्धरूं तयांसी? ॥२५२॥ कीं जे जैसे जैशा मला । भजती मी तैसा तैशां तयांला । भजतों पावतों या बोला । हृदयीं धरीं अगा! पार्था! ॥ २५३ ॥ प्राप्तिस्थळचि निर्गुण । ते प्राप्ति देणार मी सगुण । धनी सांडुनि धनातेंचि भजणें । ऐसी उपासना ते त्यांची. ॥ २५४ ॥ अगा! मी जैसा कल्पतरू । जे भजती कीं हा आम्हां सगुण उद्धरू । मी प्रतिक्षणीं तयां जगद्गुरू । सद्बुद्धि देतों विघ्नातें हरूनी. ॥ २५५ ॥ हा भाव हृदयांत । तो पुढें दशमाध्यायांत । बोलेल तीं श्लोकीं भगवंत । ते हे श्लोक. ॥ २५६ ॥

**'मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥**

---

१. ठाउका. २. अध्याय १२ श्लो० ५ पहा. ३. भक्त.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥**
**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥'**

[अध्याय १० श्लो० ९-११.]

या तीं श्लोकांची विशद[१] । पुढें टीका होईल प्रतिपद । येथें मथितार्थ[२] मात्र सांप्रत[३] । बोलिजेतो. ॥ २५७ ॥ कीं माझे ठायीं प्राण चित्त । परस्पर माझें गुणामृत । बोधिती कथिती रमती अत्यंत । संतोष पावती मद्भजनें. ॥ २५८ ॥ ऐसें प्रीतिपूर्वक । भजती त्यांस उत्तम विवेक । ज्यांत तो बुद्धियोग मी **श्री**-वत्सांक । देतों तयां. ॥ २५९ ॥ त्या बुद्धियोगें मजप्रती । ते मज भजणार पावती । त्यांचें अविद्याआवरण आणि जडत्वभ्रांती । व्यतिरेकें अन्वयें मी नाशितों. ॥ २६० ॥ एवं जे मज भजती । मी बुद्धियोग देतों त्यांप्रति । हें बोलिला प्रस्तुतीं । तोचि भाव या श्लोकीं चतुर्थाध्यायाच्या. ॥ २६१ ॥ कीं जे जैसे भजती । मी तैसाच भजतों त्यांप्रती । सगुणत्वें भजतां मी **श्री**पती । सद्बुद्धि देतों विघ्नें हरितों ज्ञानापरिपक्कांची. ॥ २६२ ॥ जे निर्गुणत्वेंचि भजती । मी निर्गुणचि होतों त्यांप्रती । कीं जैसा यत्न तैसे पावती । ज्ञानपरिपाकयोगसिद्धीतें. ॥२६३॥ मनाचे लय विक्षेप । हरावे नेणे हें निर्गुणस्वरूप । त्यांचिया योगप्रयत्नाचा प्रताप । सिद्धि जे देईल तितकीच. ॥ २६४ ॥ प्रारब्धकर्मफळ । भोगितां चढे मनावरी मळ । तें पुन्हां होतां निर्मळें[४] । कष्ट लागती. ॥ २६५ ॥ विघ्न करिती देव । इंद्रियांस दाविती विषयभाव । तेथें ते स्वयमेव । यत्न करितां कष्टती. ॥ २६६ ॥ हीं सकल विघ्नें हरावीं । साधनें निर्विघ्न करावीं । प्रारब्धभोग सरतांच इंद्रियें आवरावीं । हें कृपाळुत्व माझें सगुणत्वीं. ॥ २६७ ॥ ते भजतां शुद्ध निर्गुण । मी जरी पावें त्यांस सगुण । तेव्हां मी सर्वसम आपण । विषम होतों. ॥ २६८ ॥ कीं मनुष्य जितके । माझ्याच मार्गीं आहेत तितके । जो जें फळ आयिके । तो तदर्थींच भजे मजलागीं. ॥ २६९ ॥ जो ज्याकारणें भजे मला । मी कल्पवृक्ष तेंचि देतों त्याला । तें मी निर्गुणोपासकाला । फळ केंवी देऊं सगुणोपासनेचें ? ॥२७०॥ म्हणोनि मज कल्पवृक्षा । करणें लागते त्यांची उपेक्षा । म्हणूनि निर्गुणमात्रो-

---

१. स्पष्ट, उघड. २. सारांश. ३. प्रस्तुत. ४. पवित्र, शुद्ध.

पासकपक्षा । कष्ट अधिक. ॥ २७१ ॥ हें पुढें द्वादशीं बोलणें आहे । तेथें विषमता प्राप्त होणार हें । तेंचि या अवतारप्रसंगीं पाहे । म्हणूनि परिहरी विषमता. ॥ २७२ ॥ कीं ज्ञानतपें पूत । अनायासें पावले मज बहुत । ते कामक्रोधभयरहित । जितांचि मुक्ति पावले. ॥ २७३ ॥ कीं त्यांचा करितों उद्धार । अनायासें मी सगुण सर्वेश्वर । हें पुढें बोलणार । ते हे भक्त पूर्वश्लोकोक्त. ॥ २७४ ॥ तेव्हां विषमता प्राप्त जाली । ते या श्लोकीं ऐसी हरिली । कीं जो जैसा भजेल तैसी जाली । सिद्धि त्याला मी सम. ॥२७५॥ कीं जरी ऐसा न हों मी सर्वजगत्पती । मनुष्य सर्व माझ्या मार्गीं वर्तती । जो जैसा भजे तैसेच रीतीं । मी भजतों तयासी. ॥ २७६ ॥ एथें म्हणे श्रीघननीळ । कीं माझ्या मार्गीं मनुष्य सकळ । वर्तती म्हणूनि येथें केवळ । गहनभाव. ॥ २७७ ॥ कीं मनुष्यांच्या कोटी । पाहतां विरळाचि[2] आढळे शुद्ध रहाटी[3] । कीं स्वहित धरूनि पोटीं । वर्तती मार्गीं या परमेश्वराच्या. ॥ २७८ ॥ एवं आकारें मनुष्यकुळ । परंतु पशुच ते केवळ । जे माझ्या मार्गीं तेचि सफळ । **'मनुष्य'** ऐसा भावार्थ. ॥ २७९ ॥ द्विपदत्वें मनुष्य होय । तरी पक्षियांसही दोनच पाय । दाढीनें मनुष्य तरी काय । दाढी नसे बोकडासी ?॥२८०॥ हात आहेत यावरूनी । म्हणावें मनुष्य म्हणोनी । तरी मर्कटासही दोनी दोनी । असती हस्त. ॥ २८१ ॥ सुरतसुखें म्हणावे नर । तरी तें सुख पावती वानर खर । मनुष्य निर्मिती म्हणावें घर । तरी पक्षीही गृह निर्मिती. ॥ २८२ ॥ पुँढील[4] चिंता कोणासी । नसे ती एक मनुष्यासी । या गुणें म्हणावें मनुष्यत्व यांसी । तरी पक्षियांसही ते असे. ॥ २८३ ॥ प्रसूत नाहीं तोंचि चिमणी । अंडियांकारणें गर्भिणी । कापूस आणि मृदुतृणीं । सेजें[5] करी. ॥ २८४ ॥ चारा सांडूनि वेंची । कापूस धरधरूनि चोंचीं । ने ऐसी चिंता संतानाची । करी जों उपजलीं तीं नसती. ॥ २८५ ॥ ऐसा पाहतां विचार । पशुपक्षियां समान विहार । निद्रा मैथुन आहार । पशूंस तैसे मनुष्यांसही. ॥ २८६ ॥ एवं भजन सर्वेश्वराचें । करिती त्यांचें मनुष्यत्व साचें । म्हणूनि वाक्य भगवंताचें । कीं माझ्या मार्गीं वर्तती मनुष्य सर्व. ॥ २८७ ॥ एवं मनुष्य सकळ । माझ्या मार्गीं त्यांस फळ । मीच देतों परि केवळ । जो जें मागे तेंचि देतों. ॥ २८८ ॥ ऐसा कल्पवृक्षस्वभाव । तो मी देवाधिदेव ।

---

१. अध्याय ४ श्लो० १० पहा. २. क्वचित्. ३. चालचलणूक. ४. पुढची चिंता. ५. शय्या.

सगुणत्वीं नसतां भाव । निर्गुणीं भजतां सगुण मी कैंवि पावों ? ॥ २८९ ॥ एवं जाणोनि निर्गुण । निर्गुणत्वें भजती सगुण । ते ज्ञानतपें पवित्र निपुण । अनायासें मज पावती. ॥ २९० ॥ हे अनायासें पावती मला । पुढें बोलणें असे या बोला । क्लेश अधिकतर अव्यक्तोपासकांला । बोलले जेथें. ॥ २९१ ॥ ते विषमता सर्वेश्वरें । हरिली येथें या प्रकारें । आतां विषमता प्रकारांतरें । प्राप्त होते ते हरितो या श्लोकीं. ॥ २९२ ॥

**कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

अगा ! सगुण भजतां मी सगुण । निर्गुण भजतां मी निर्गुण। भजनानुरूप मी निपुण । विषम फळ देऊनिही नव्हे विषम. ॥ २९३ ॥ परि या दोघांसही फळ मोक्ष । कीं ज्ञानें मातेंचि जे भजती दक्ष। मोक्ष न पावे तो पैक्ष[1] । जे सकाम इतर दैवतां भजती. ॥ २९४ ॥ तीं दैवतेंही माझेच देह । फळदाता मीच निःसंदेह । परि कर्मसिद्धीचाच स्नेह । ज्यांस ते इतर दैवतांस भजती. ॥ २९५ ॥ अपेक्षूनि कर्मांच्या सिद्धी । संकल्पूनि कामनासमृद्धी । इतर देवतांचे पायीं मनबुद्धी । लावूनि पूजिती तयांतें. ॥ २९६ ॥ अगा ! सर्व कर्मांचें क्षेत्र[2] । हा मनुष्यदेह विचित्र । जे धरिती कामनामात्र । तेचि सिद्धि पावती शीघ्र ते. ॥ २९७ ॥ त्या कर्मजनिता सिद्धी । मीच देतों कीं त्यांच्या बुद्धी । त्याच अपेक्षिती समृद्धी । मी काय करूं ? ॥ २९८ ॥ ज्यांस वांछा जैसी । मी पुरवितों त्यांची तैसी । यांत विषमता कैसी । लागे मज? ॥२९९॥ ज्ञानें माझीच उपासना । करिती मोक्ष त्या जनां । इतरांस मोक्ष मी देना । कीं नसे मुमुक्षा आणि मद्भजन त्यांस. ॥ ३०० ॥ एवंच मी सर्वसम । विषम फळ देऊनि नव्हे विषम । वैषम्यपरिहार सर्वोत्तम । करी ऐसा आपला. ॥ ३०१ ॥ भजनफळीं विषमता । दिसे ते हरिली तत्त्वतां । आतां विषमसृष्टि रचितां । दिसे तेही हरितों या श्लोकीं. ॥ ३०२ ॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । एकापरीस एक क्षुद्र[3] । जो मी सर्व कृपासमुद्र । चारी वर्ण ते म्यांच निर्मिले. ॥ ३०३ ॥ मीच त्यांचा कर्ता । जाण जो

१. बाजूचे लोक, उपासक. २. स्थान. ३. नीच.

करूनि अकर्ता। कीं कर्तृत्व सम मायेचें मी सत्ता। प्रकाशक त्या मायेचा. ॥ ३०४ ॥ तो मी अकर्ता अव्यय। कांहींच न करीं हा निश्चय। परंतु जड जग मायामय। सत्ता नसे मायेला. ॥ ३०५ ॥ जिभेवीण आत्मा न बोले। परि त्याच्या सत्तेनें ते जीभ हाले। शब्द जे जे निघाले। ते आत्मसत्तेनें. ॥ ३०६ ॥ आत्मा अबोलणा स्वयें। परि तोचि बोलतो म्हणावा निश्चयें। कीं त्यावांचूनि इंद्रियें। अवघीं वृथा. ॥ ३०७ ॥ इंद्रियांवीण तो असे। परि [1]इंद्रियग्राम त्यावीण न दिसे। सत्ता पाहतां उल्लसे। आत्मस्वरूपीं. ॥ ३०८ ॥ मायेचें कार्य जग आणि ते स्वयें माया। प्रलयकाळीं गिळूनियां। स्वयें उरे मागुति तया। पासूनि माया उपजते. ॥ ३०९ ॥ कीं सत्ता असे ज्याला। आणि सत्ता नसे मायेला। या कारणें म्हणे मला। जाण कर्ता अकर्ता यातें. ॥ ३१० ॥ आपणास अकर्ता म्हणतां। सुचवी कीं आपण सत्ता। परि ज्यासि अकर्तृत्वसत्ता तोचि कर्ता। म्हणूनि मी कर्ता म्हणे मागुती. ॥३११॥ हें रूप आपलें आणि मायेचें। करी मायेंचकरूनि साचें। आपलें अबोलणें बोलणें जिभेचें। जिभेनेंचि बोले पुरुष जैसा. ॥ ३१२ ॥ [2]परा पश्यंती मध्यमा वैखरी यांचा। चालक हाचि पुरुष साचा। परि घेऊनि चाऱ्ही वाचा। दोन्ही रूपें तोचि करी. ॥ ३१३ ॥ कीं मी अबोलणा। बोलकेपण वाचेस जाणा। दोन्ही वाचेनेंचि सांगे खुणा। परि न चळे वाणी त्याविण. ॥३१४॥ म्हणोनि म्हणे मागुतीं। कीं मीच बोलका वाचेचा पती। ऐसी आपली आणि मायेची स्थिती। मी कर्ता अकर्ता म्हणतां सूचवी. ॥ ३१५ ॥ कोणी म्हणतील ये स्थळीं। कीं जाणूनि पुरुष वाचा चाळी। तैसा इच्छा धरूनि सकळी। सृष्टि करी तेव्हां कर्ताच. ॥ ३१६ ॥ तेव्हां अकर्तेपण उडालें। कर्तेपणचि आलें। म्हणूनि या [3]बोलें। उडविती दृष्टांत वाचेचा. ॥ ३१७ ॥ तरी अबोलणा पुरुष बोले कीं वाचा। हा तों दृष्टांतचि साचा। कीं प्रकार आपला आणि मायेचा। निरूपणें हेंही मायेनें. ॥ ३१८ ॥ आतां इच्छेनें सृष्टि करणें। तेचि इच्छा माया त्रिगुणें। परि त्या गुणांस इच्छारूपें स्फुरणें। न घडे सत्तेवांचूनी. ॥ ३१९ ॥ भ्रमणें लोहाचा गुण। परि न चळे [4]चुंबकावीण। सत्ता चुंबक पाषाण। भ्रमण लोहधर्म लोहाचा. ॥ ३२० ॥ कर्मास नसे सत्ता। सत्तेस नसे कर्तृता। दोन्हीं मिळतां तत्त्वतां। क्रिया घडे भलतीही. ॥ ३२१ ॥ आतां इच्छा बोलायाची। तेही शक्ति बोलत्या पुरुषाची। पुरुषावांचूनि इच्छा

---

१. इंद्रियसमूह. २. हे वाणीचे (बोलाचे) चार भेद आहेत. ३. उक्तीनें. ४. लोहचुंबक.

कैंची । समर्थ स्वयें उठाया? ॥ ३२२ ॥ इच्छेस नसे सत्ता । इच्छेवांचूनि यास नसे कर्तृता । मज इच्छा म्हणतां हेही अहंता । पुरुषसत्ता याहीपलीकडे. ॥ ३२३ ॥ प्रकाश तो काष्ठाग्नींचा । प्रकाश काष्ठास कैंचा । परी [1]काष्ठवातीगोवरीकाशाचा । योग नसतां दिसेना प्रकाश. ॥ ३२४ ॥ तैसी मायेवीण । न बोलवे आत्मसत्तेची खूण । म्हणूनि मायेचेनि कृष्ण निपुण । रूप करी आपलें आणि मायेचें. ॥ ३२५ ॥ काष्ठ गोवरी अथवा कांहीं । प्रकाशहीनातें स्वप्रकाशही । न घेतां आपलें रूप कांहीं । न दाखवी जैसा. ॥३२६॥ प्रकाशहीना काष्ठें करूनी । त्या प्रकाशहीनातें आणि आपणातें अग्नी । प्रकाशी तैसा माया ब्रह्म ऐसें म्हणोनी । मायेचेनि रूप करी श्रीकृष्ण. ॥ ३२७ ॥ परि तो अग्नि अग्निप्रकाशेंचि असे । काष्ठ प्रकाशहीन त्या प्रकाशेंचि दिसे । ब्रह्म आणि मायारूप दोहींचें गवसे । ब्रह्मसत्ताप्रकाशेंच. ॥ ३२८ ॥ पुढें आणितां [2]दर्पण । पुरुष आपणातें आपण । देखे तैसा शुद्ध सत्त्वगुण । आत्मप्रत्यय त्याकरितां. ॥ ३२९ ॥ निजरूप नव्हे दर्पणें । तैसें सत्त्व नव्हे आत्मा आपण । जरि सत्त्वा दर्पणावांचूनि खूण । न सांपडे आपली. ॥ ३३० ॥ दर्पणावीण पुरुष असे । दर्पणीं पुरुषावीण पुरुषाकार न दिसे । मायेंत तैसा न गवसे । ब्रह्मसत्तेवांचूनी. ॥ ३३१ ॥ जें न देखती नेत्र । तें देखती उपनेत्र । तैसें ब्रह्म सत्तामात्र कर्तव्य । अवघें मायेचें. ॥३३२॥ नेत्रांविना उपनेत्र । न देखती तरी म्हणावें देखती नेत्र । तैसें ब्रह्म सत्तामात्र । न करूनि करी सर्वही. ॥ ३३३ ॥ कर्तृत्व मायेचें परी । ते मजअधीन माझे सत्तेनें करी । विषम नव्हे मी याहीपरी । विषय सृष्टि करूनिही म्हणे या भावें. ॥ ३३४ ॥ कीं देखतां ब्राह्मण । क्षत्रियास वाटे स्वनीचपण । त्याहूनि नीच आपण । वैश्य वैश्याहूनिही शूद्र. ॥ ३३५ ॥ परि हे विषमता । मज न लागे तत्त्वतां । कीं गुणकर्मविभागें रचिता । मी प्रतिसृष्टि यांचा होतसें. ॥३३६॥ कीं मी जैसा अनादी । तैसी माझी माया प्रसिद्ध वेदीं । तिच्या तिहीं गुणांच्या कर्मभेदीं । होती चारी हे वर्ण. ॥ ३३७ ॥ सत्त्वगुणें ब्राह्मण उत्तम । सत्त्वरजमिश्र ते क्षत्रिय मध्यम । रजोगुणमात्रें वैश्य अधम । अति नीच शूद्र तमोगुणें. ॥ ३३८ ॥ हे गुणांचे विभाग । गुणानुरूप कर्माचे योग । कर्मानुरूप फलभोग । हा अनादिप्रवाह मायेचा. ॥ ३३९ ॥ परि

---

१. काष्ठ, वाती, गोवरी आणि काश (गवत) यांचा. २. आरसा.

तेही माया मजअधीन । मजमाजीं उपजे, असे, होय लीन, । जैसें उष्णांत मृगजीवन[1] । निघे, असे, लय पावे. ॥ ३४० ॥ मज नसे उत्पत्ति लय । या भावें म्हणे जाण अव्यय । व्यय नसोनि दिसे व्यय । प्रळयीं मायेचा ते न दिसतां. ॥ ३४१ ॥ माया प्रकटतां तीन्ही गुण । गुणानुरूप चान्ही वर्ण । होती एवं आपण । अकर्त्ता कर्ता होउनी. ॥ ३४२ ॥ एवं कोणचीही विषमता । मज न लागे तत्त्वतां । अकर्त्ता होऊनिही कर्त्ता । जन्ही जालों. ॥ ३४३ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां वोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त उपासक । परिसोत परमेश्वराचे. ॥ ३४४ ॥ ईश्वराचें भजन । जे करिती महाजन । ते दिव्यत्वें श्रवण कीर्तन चिंतन । करिती ईश्वराच्या गुणाचें. ॥३४५॥ सगुणगुणभजनाविणें । न घडे संसारसिंधुतरणें । यानिमित्त अवतार करणें । हें कृपाळुत्व जगदीशाचें. ॥ ३४६ ॥ स्वयें समर्थ होउनी । जनोद्धार न धरी मनीं । तो म्हणावा महाजनीं । निर्दय. ॥ ३४७ ॥ वैषम्य आणि निर्दयत्व । नसे आणि समत्व सदयत्व । असे तेथें ईश्वरत्व । त्या ईश्वरातें भजावें या भावें. ॥ ३४८ ॥ दयाळुत्वें सांगितले अवतार । भजनानुरूप फळ देणें हा वैषम्यपरिहार । त्या प्रसंगें सृष्टिरचनाप्रकार । सांगतां सृष्टिवैषम्यही परिहरिलें. ॥ ३४९ ॥ कीं ईश्वरभजनीं हा निश्चय । आदीं असावा कीं सम सदय । सर्वथा नव्हे विषम निर्दय । तोचि ईश्वर. ॥ ३५० ॥ ईश्वरास तरी भजतो । आणि गोष्टी ऐशा समजोनि बोलतो । कीं विषम आणि निर्दय तो । सिद्ध होतो । त्या गोष्टीनें. ॥ ३५१ ॥ आमचा धणी बहु भला । कीं पाळितो तस्कराला[2] । या स्तुतीनें न लावितां लागला । दोष त्या धणियासी. ॥ ३५२ ॥ ईश्वर स्वयें स्वतंत्र । तो लोकांस फळ देतो विचित्र । एकास देतो भाग्य कर्ण नेत्र । एकास अभाग्य बधिरत्व अंधत्व. ॥ ३५३ ॥ उत्कर्ष ऐसा बोलतां । वैषम्य दोष लावी न लावितां । ऐसियास सादरही भजतां । कृपा नव्हे ईश्वराची. ॥ ३५४ ॥ दोष लावितां ईश्वरा । दोष लागती त्या पामरा । निर्दोष समजे त्या नरा । ईश्वर करी निर्दोष. ॥ ३५५ ॥ हें करणेंही त्यापाशीं । नसे याचीच भावना यासी । सदोष निर्दोष करी ऐसी । सत्ताच ईश्वराची.॥३५६॥ हा कल्पवृक्ष अन्न देतो।म्हणतां अन्नचि देतसे तो । हा धोंडे देतो म्हणजे तों । धोंडमार होतो त्यावरी. ॥ ३५७ ॥ म्हणूनि भगवद्वाणी[3] बोलते । कीं, 'ये

१. मृगजल. २. चोरांला. ३. भगवंताची वाचा.

**यथा मां प्रपद्यंते'** । कीं जे जैसे भजती होते । सिद्धि तैसी तयांसी. ॥३५८॥ एवं ईश्वराचें समत्व सदयत्व । समजोनि भजतां तें महत्त्व । हाही पावतों हें तत्त्व । पूर्वींच सूचविलें श्रीकृष्णें. ॥ ३५९ ॥ कीं माझें जन्म दिव्य । आणि दिव्य माझें कर्तव्य । जाणें त्याचें भवितव्य । दिव्यचि कीं मज पावे. ॥ ३६० ॥ याकारणें मी सर्वोत्तम । अवतार तों हें दयालुत्व परम । हें बोलोनि प्रसंगें मी सम । विषम नव्हें हें बोलिला. ॥ ३६१ ॥ भाव कीं समत्व सदयत्व । जाणावें जैसें जन्मकर्मदिव्यत्व । कीं जैसें माझें जाणोनि महत्त्व । भजे तैसें फळ पावे. ॥ ३६२ ॥ आतां बोलतो जो श्लोक । त्यांत फळांतरीं हें उत्तमश्लोक । स्पष्ट बोलेल तें सुज्ञ लोक । या श्लोकीं परिसोत. ॥ ३६३ ॥

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ १४ ॥**

अगा ! चहूं वर्णांची विषम सृष्टी । करूनि नसे मज विषमदृष्टी । पूर्वश्लोकीं हे बोलिलों गोष्टी । कीं करूनि मी अकर्ता. ॥ ३६४ ॥ म्हणूनि मज सर्व कर्मैं । लिप्त नव्हती अकर्तृत्वधर्में । परि कर्तृत्वरहित ब्रह्म । असे जीवत्वींही. ॥ ३६५ ॥ परि जीवांचे उपाधी । अहंकर्तृत्वें कर्तृत्वाच्या व्याधी । पावले कर्मफळसिद्धी । अपेक्षितां योगें अहंकाराच्या. ॥ ३६६ ॥ उपाधि ज्याचा अकर्ता । आत्मा लक्षूनि जाला तोचि नव्हे कर्ता । कीं कर्मफळाची वार्ता । नसे जया निरहंकारियासी. ॥ ३६७ ॥ अगा! अहंकारही टाकिला । परि वासनामळें फळेच्छा त्याला । उपजवितां गेला अहंकार आला । कीं फळ मज हो म्हणोनी. ॥ ३६८ ॥ एवं कर्मफळाची अपेक्षा । नसे ज्यास त्याच दक्षा । अकर्ता म्हणावें कीं मोक्षा । तो योग्य अलिप्त सर्वत्र. ॥ ३६९ ॥ मज तों नसेच बंध । कीं मी नेणें अविद्येचा गंध । अहंकारकर्मफलेच्छासंबंध । मज कैंचा? ॥ ३७० ॥ यालागीं सर्वदा सर्व कर्मैं । मज न लिंपति अकर्तृत्वधर्में । कीं नसे फलस्पृहा हीं वर्में । जाण तूं अगा! अर्जुना ! ॥ ३७१ ॥ कीं येथवरी माझे गुण । वर्णिले ते जो निपुण । जाणे तो आपण । कर्मीं बांधला नैव जाय.[1] ॥ ३७२ ॥ 'इति' शब्दें इतुकें । या प्रसंगीं गुण वर्णिले जितके । जो जाणे त्यास होऊं न शके । कर्मबंध कदापि. ॥ ३७३ ॥ या भावें म्हणे श्रीपती । कीं, **'इति मां योऽभिजानाति । कर्मभिर्न स बद्ध्यते'** हे फ-

१. जात नाहीं.

ळश्रुती । कळतां निर्दोष आपुलें गुणकर्म. ॥ ३७४ ॥ आणि हा एकगुणषड्गुणी । जे प्रथमाध्यायमंगलाचरणीं । वर्णिले कीं जो हें धरी अंतःकरणीं । तोही भगवंत षड्गुण. ॥ ३७५ ॥ कर्मे करूनि कर्मफळस्पृहा । नसणें वैराग्य गुण हा । समत्व सदयत्व पूर्वोक्त महा । धर्मगुण समग्र भगवत्पदाचा.॥३७६॥ नवमाध्यायांत ऐश्वर्यगुण । तैसीच ज्ञानादिगुणांची खूण । स्थळस्थळीं भगवान् षड्गुण । स्वयेंचि वर्णील. ॥ ३७७ ॥ एवं भगवद्गुण । दिव्यत्वें जाणेल तो निपुण । जिता देहीच आपण । भगवान् षड्गुण बोलावा. ॥ ३७८ ॥ आतां यापुढें जो श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त उपासक । आइकोत भगवंताचें. ॥ ३७९ ॥ कीं त्रिकांड वेद । कर्म उपासना ज्ञान हे तिन्ही भेद । तिहीं अनुष्ठानीं नासे खेद । अविद्याकर्मबंधाचा. ॥३८०॥ त्यांत सकामाचें कर्म । आणि त्याचा उपासनाधर्म । फळ देऊनि दे श्रम । पुन्हां जन्ममरणाचा. ॥ ३८१ ॥ मुमुक्षूचें निष्काम कर्म । आणि निष्काम उपासनाधर्म । त्यास ईश्वरप्रसादें ब्रह्म । कळे, सुटे जन्ममरणापासूनी. ॥ ३८२ ॥ ज्ञानें आत्मानात्मविवेक । कळोनियां मग कितीएक । होती निर्गुणमात्रीं उपासक । कोण्ही सगुणभक्तीनें समाधीतें पावती. ॥ ३८३ ॥ परंतु दोहींसही जों ज्ञान होय । तोंवरी कर्म उपासना कांडद्वय । मुमुक्षूस पाहिजे हा निश्चय । वेदांतवेदपुराणांचा. ॥ ३८४ ॥ पहिलें कर्म, दुसरें कांड उपासना, । तिसरें ज्ञान, चौथें कांड असेना, । [1]तीं कडियांची सांखळी जना । दिसे जैसी. ॥ ३८५ ॥ मधिले कडीस दोन्हीं । दोहींकडील कडिया असती स्पर्शोनी । मधील कडी असे धरोनी । दोहींकडिल्या दोहीं कडियांस. ॥ ३८६ ॥ मध्यें उपासनाकांड पडे । कांडद्वय दोहींकडे । उपासनेस कर्मही सांपडे । सांपडे ज्ञानकांडही. ॥ ३८७ ॥ उपासनाकांड म्हणिजे भक्ती । पाहतां सांखळीची युक्ती । कर्म ज्ञान दोहींची प्रसक्ती । लागली भक्तियोगास. ॥ ३८८ ॥ कर्मकांडाचीच कडी । धरूनि लोंबती ते उडी । कामसमुद्रीं टाकूनि बुडी । देतां कष्टती जन्ममरणें. ॥ ३८९ ॥ जे तिन्ही कडिया लंघूनी । विद्यातीत कैवल्यसदनीं । चढले ते झाले **'ज्ञानी'** । तिसरे कडीस. ॥ ३९० ॥ कर्मकांडाची कडी पहिली । ते भक्तिकांडाचे कडीतें लागली । मुमुक्षुसेना चढली । कर्मकांडावरूनि भक्तिकांडीं. ॥ ३९१ ॥ एवं मुमुक्षुजन । कर्मकांडें करूनि भजन । भक्तिकांडीं पावोनि [2]भवभंजन । तिहीं प्रसन्न केला. ॥ ३९२ ॥ कीं न अर्पितां ई-

१. तीन. २. भव म्ह० संसार याचा भंजन म्ह० नाशक. (ईश्वर.)

श्वरीं । जो निष्कामही कर्म करी । तें तों बंधकचि यापरी । सिद्धांत जाला अध्यायीं तिसरिया. ॥ ३९३ ॥ ज्यास कर्मसमर्पण । तो ईश्वर सगुण । त्याच्या गुणांची खूण । निर्दोष ऐसी कळावी. ॥ ३९४ ॥ कीं जो भाविजे जैसा । कल्पवृक्ष फळ दे तैसा । सर्वसम सदय ऐसा । भावितां निर्दोष करी दोषियां ॥ ३९५ ॥ हें पूर्वश्लोकपर्यंत । स्वगुण स्वयें बोलिला भगवंत । समजोनि ऐसें म्हणतो अनंत । कर्म करीं म्हणोनि या श्लोकीं. ॥ ३९६ ॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

अगा ! ऐसें जाणोनि कर्म । करणें हाचि मुमुक्षूचा धर्म । ज्या कर्मे शुद्धचित्त पावे ब्रह्म । तेंही जाणोनि ऐसें करावें. ॥३९७॥ कीं ईश्वर सम सदय । तो कदापि नव्हे विषम निर्दय । कर्मे करूनि अलिप्त अव्यय । कर्मफळीं स्पृहा नसे जयासी. ॥ ३९८ ॥ ऐसें मज जाणोनी । पूर्वकल्पींही मुमुक्षुजनीं । केलें कर्म कीं ऐसिया मज समर्पूनी । करूनि अलिप्त अकर्ते ते आले. ॥ ३९९ ॥ हें मुमुक्षूचें कर्म । हाचि होतो **भागवत धर्म** । कीं सम सदय सगुण ब्रह्म । जाणोनि समर्पिती तयासी. ॥ ४०० ॥ प्रथम कर्मकांड धरूनी । दुसरिया भक्तिकांडास त्यावरूनी । आरूढ जाले कीं मज ऐसें समजोनी । केलीं कर्मे. ॥ ४०१ ॥ भाव कीं ईश्वरार्पण । तें एक बंधक नव्हे त्याविण । सर्व कर्म बंधक हे मी खूण । पूर्वाध्यायांत बोलिलोंचि. ॥ ४०२ ॥ त्या ईश्वरास ऐसें समजणें । आणि त्यास कर्मे समर्पणें । निर्दोषी आवडी उपजणें । हाचि भक्तियोग. ॥ ४०३ ॥ जें दिव्यत्वें जन्म कर्म । जाणणें आणि विश्वचि सगुण ब्रह्म । ज्ञानतपें हा भक्तियोग उत्तमोत्तम । तो या भक्तियोगें ज्ञान जालिया. ॥ ४०४ ॥ ज्ञान जालिया निर्गुणीं । सगुण सोडूनि राहिले कोणी । पूर्वीं तों सगुणीं । भजलेच ते. ॥ ४०५ ॥ परि पहिली भक्तीची पायरी । हेचि कीं कर्मे **परमेश्वरीं** । अर्पणें ज्यास ऐसेपरी । जाणोनी. ॥ ४०६ ॥ या भावें म्हणे **हरी** । कीं जाणोनि ऐसेपरी । मुमुक्षुजनीं चतुरीं । कर्म केलें. ॥ ४०७ ॥ **अर्जुना ! तस्मात्**कारणें । तुवांही कर्मचि करणें । मी सम सदय अलिप्त ऐशा स्मरणें । माझिया. ॥ ४०८ ॥ हें कर्मही ऐसें जाण । कीं पूर्वील जे भले सुजाण । तिहींही केलें या गुणें । कीं कर्मे हीं अनादि म्हणोनी.

---

१. अध्याय ३ श्लो० १८ पहा. २. मानिती. ३. इच्छा.

॥ ४०९ ॥ कीं अनादि अविद्या जैसी । हे कर्मप्रवृत्तिही तैसी । या कर्मे चित्त शुद्ध होतां मनासी । आत्मा कळतां अविद्या नासते. ॥ ४१० ॥ कर्म ऐसें समजोनी । मज पूर्वोक्त रीतीं ऐसें जाणोनी । केलें कर्म पूर्विल्या मुमुक्षुजनीं । तस्मात् कर्मेचि तूं करीं हा श्लोकार्थ. ॥४११॥ आतां यापुढें श्लोक । तो किमर्थ बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त मुमुक्षु लोक । समजोनि परिसोत अर्थही. ॥ ४१२ ॥ ईश्वरीं अर्पिलें कर्म । तें कर्मचि होतें अकर्म । कीं बचनाग विषही वैद्य उत्तम । रसायन करितां नव्हे विष तेंचि. ॥ ४१३ ॥ हे मुख्य अकर्माची खूण । आणि कर्मचि न करणें हेंही अकर्मपण । यालागीं मोहेले जे भले निपुण । तेही येथें. ॥ ४१४ ॥ हें सांगावया कर्मतत्त्व । बोलणें द्विविध अकर्मत्व । हें न जाणोनि कर्म करितां सत्त्व । न पावे शुद्धीतें. ॥ ४१५ ॥ इत्यादि कर्मांचा उकल । होय ऐसें बोलों पाहतो बोल । तें तुज सांगेन म्हणतो आधीं सखोल । कर्मतत्त्व म्हणतो या श्लोकीं. ॥ ४१६ ॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**

**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६ ॥**

अगा! कैसें काय तें कर्म । आणि कैसें तें अकर्म । हें न कळतां येथें भ्रम । विवेकीही पावले. ॥ ४१७ ॥ तरी तें कर्म तूतें । सांगेन कीं जाणोनि त्यातें । त्याच्या अशुभा बंधातें । तूं न पावसी सुटसी त्यापासुनी. ॥ ४१८ ॥ पूर्वार्धीं अकळ कर्म अकर्म । म्हणूनि उत्तरार्धीं म्हणतो हें कर्म । तुज सांगेन याचें वर्म । प्रकट करितो या पुढलिया श्लोकीं. ॥ ४१९ ॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोधव्यं च विकर्मणः ।**

**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

अगा! गति कळावी कर्माची । आणि गति कळावी विकर्माची । आणि गति कळावी अकर्माची । गहन कर्माची गति म्हणोनी. ॥ ४२० ॥ पूर्व श्लोकीं कर्म अकर्म । अकळ म्हणोनि तुज सांगेन कर्म । म्हणोनि बोलिला या श्लोकीं विकर्म । तिसरें वदोनि म्हणतो गहन गति कर्माची. ॥ ४२१ ॥ भाव कीं कर्म तेंही कर्म । आणि कर्मचि तेंही जें अकर्म । आणि कर्म जें म्हणावें विकर्म । गहन गति या त्रिविध कर्माची. ॥ ४२२ ॥ जें ज्यास वेदेंविहित तें

१. मोहांत पडले. २. बोध, खुलासा. ३. मार्ग, स्वरूप. ४. वेदोक्त.

कर्म । जें वेदीं निषेधिलें तें करणें **विकर्म** । वेदविहित न करणें **अकर्म** । कर्म म्हणावें तिहींसही. ॥ ४२३ ॥ ज्यांत मारक दोष । त्यास म्हणावें विष । बंधकारक हे तिन्ही विशेष । फलबंध कर्मांचे. ॥ ४२४ ॥ वेदोक्तें कर्में करणें । त्यांत नसती फलविवरणें[1] । परि पितृलोक फळ त्या आचरणें । निष्कामासही. ॥ ४२५ ॥ या गोष्टीचा सिद्धांत । पूर्वीं जालाच पूर्वाध्यायांत । कीं ईश्वरीं अनर्पित त्या कर्ममात्रांत । बंधकत्व विषांत मारकत्व जैसें. ॥ ४२६ ॥ अरे! अरे! विषा! । तूं टाकीं आपल्या दोषा । मज मरणेच्छारहितपुरुषा । मारूं नको मी भक्षितों तुजलागीं. ॥ ४२७ ॥ टाकितां मरणेच्छाही मारी । परि तेंचि अर्पितां धन्वंतरीचे[2] करीं । तो रसराज[3] करितां मृत्युही वारी । ऐसें कर्म ईश्वरार्पित. ॥ ४२८ ॥ एवं निष्कामासही वेदविहित । फलबंध बाधेच निश्चित । हे सुवर्णाची बेडी पायांत । तरी तोही बद्धचि निष्काम. ॥ ४२९ ॥ एवं बंधकचि विहित कर्म । वेदीं निषेधिलें तें तों विकर्म । नरकप्रद तैसेंचि अकर्म । कीं नरक वेदोक्तविहित टाकितां. ॥ ४३० ॥ तिन्ही बंधकेंचि यास्तव । तिहींत कर्म म्हणावें हा भाव । कीं जें बंध करी त्याचें नांव । कर्म मारक तितकें विष जैसें. ॥ ४३१ ॥ म्हणोनि म्हणतो श्रीपती । कीं गहन कर्मांची गती । गहन म्हणिजे खोल कीं जे बुडती । ते भूमिका[4] न पावती सुटकेची. ॥ ४३२ ॥ फळ भोगूनि सुटणें । तें सुटकेचें नव्हे लक्षण । सुटती बहुत जन । करचरण कापून घेऊनी. ॥ ४३३ ॥ गहन[5] जळीं बुडाले । ते देह फुगोनि तीरा लागले । ते न म्हणावे तरले । तया गहन उदकातें.॥४३४॥ कर्मांची गहन गती । कीं फळभोग कधीं न चुकती । त्या कर्मांच्या तीन रीती । कर्म अकर्म विकर्मही. ॥ ४३५ ॥ एवं वेदोक्तकर्ताही[6] नव्हे अभिज्ञ । विकर्माकर्मपर ते तों अज्ञ । कर्मतत्त्व समजे तो सर्वज्ञ । श्रीजगद्गुरु निजमुखें प्रकटितो या श्लोकीं. ॥ ४३६ ॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

अगा! कर्म करूनि विहित वेदोक्त । जो ईश्वरीं समर्पितो भक्त । तो त्या कर्मींच कर्मफलविरक्त । अकर्म देखे. ॥ ४३७ ॥ कीं रसायन जालें विष ।

---

१. फलप्राप्तीचें विशेष कथन. २. सद्वैद्याचे. ३. रसायन, औषध. ४. स्थानें. ५. खोल. ६. वेदोक्त कर्म करणारा.

त्यास औषध म्हणिजे देखोनि निर्दोष। तैसें नित्यकर्म निःशेष। ईश्वरीं अर्पितां देखे अकर्म कर्मीं तया. ॥ ४३८ ॥ हें मुख्य अकर्माचें लक्षण। ज्यास्तव चाललें हें निरूपण । दुसरें अकर्म अवलक्षण । कर्मत्यागरूप पूर्वश्लोकीं वर्णिलें. ॥ ४३९ ॥ त्या अकर्मीं देखे कर्म। कीं बंधकास कर्म म्हणावें हें वर्म। कर्मत्यागीं अकर्म अधर्म। नरकप्रद तें अकर्मही कर्म यास्तव. ॥४४०॥ म्हणूनि कर्मत्यागरूप अकर्म टाकुनी । कर्म करूनि तें निष्काम ईश्वरीं अर्पुनी। यापरी कर्मीं अकर्म अकर्मीं कर्म देखे म्हणोनी। म्हणे देव. ॥४४१॥ एवं कर्मीं देखे अकर्म । आणि अकर्मीं देखे कर्म । तो बुद्धिमंत मनुष्यांत परम। तो योगी तो सर्व कर्म करणार. ॥ ४४२ ॥ म्हणतां तो बुद्धिमंत। विकर्माचें तत्त्वही भगवंत। सुचवी कीं बुद्धिमंत विवेकी अत्यंत। निषिद्ध वि-कर्म आचरेचि ना. ॥ ४४३ ॥ कीं वेदोक्त न करणें तें अकर्म । टाकिलें जैसें आचरोनि कर्म । तैसें टाकिलें निषिद्ध विकर्म । कीं बुद्धिमंत कर्त्ता सकळ वेदोक्त कर्माचा. ॥ ४४४ ॥ ऐसा श्लोकार्थ जाला। परि कर्मीं अकर्म देखे भला। ऐसें श्रीकृष्ण बोलिला। तो बोल वाखाणिला ये रीतीं. ॥४४५॥ कीं ईश्वरीं अर्पितां कर्म । चुके बंध म्हणोनि अकर्म। कर्मीं देखे ऐसें वर्म। वाखाणिलें परी नसे ईश्वरार्पण. ॥ ४४६ ॥ म्हणूनि कोण्ही म्हणती। तरी अकर्म कर्मीं देखे कोणे रीतीं। हें पुसतां बोलती । कीं निष्काम निरहंकारित्वें. ॥ ४४७ ॥ तरी निष्काम निरहंकारपण । या श्लोकीं तों नसे हें बोलणें। पूर्वापरविचारें म्हणतां भगवदर्पण। बंधक नव्हे हें पूर्वाध्यायांत. ॥ ४४८ ॥ एवं पूर्वापरविचाराविण । न सांपडे तेथें कर्मीं अकर्मरूप। तेव्हां अकर्मत्वास कारण। ईश्वरार्पणचि हा सिद्धांत. ॥४४९॥ '**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधन**'[2] म्हणूनि पद्मनेत्र। तत्त्वचि बोलिला कीं बंधक अन्यत्र। एका **विष्णुसमर्पणावांचुनी.** ॥ ४५० ॥ एवं ईश्वरार्पण हा बोल। जेथें नसेल तेथें सखोल। भाव हा कीं नव्हे फोलें[3]। कर्मबंध ईश्वरार्पणावांचूनी. ॥४५१॥ आतां यापुढें श्लोक । कोण्या प्रसंगें बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त आधीं सुज्ञ लोक। परिसोत. ॥ ४५२ ॥ कर्म ईश्वरीं अर्पित। तें बंधक नव्हे निश्चित । हें श्रीकृष्णें एथपर्यंत। अर्थें भावार्थें निरूपिलें. ॥ ४५३ ॥ तरी हें क्रियमाण कर्म। ईश्वरीं अर्पितां जालें अकर्म। कीं न करी बंध म्हणूनि वर्म। कळलें क्रियमाणाचें. ॥ ४५४ ॥ परि पूर्वसंचिताचे पर्वत। उरले आहेत



---

१. वाईट. २. अध्याय ३ श्लोक ९ पहा. ३. व्यर्थ, विफल.

अपरिमित । तीं फळें भोगावीं निश्चित । साध्य काय कर्मीं अकर्म देखो-निही. ॥४५५॥ मुमुक्षु येथें म्हणती । कीं बंधपरिहार श्रीपती[1] । क्रियमाणाचा बोलिला ये रीतीं । न बोलिला नाश संचित कर्मांचा. ॥ ४५६ ॥ तरी कर्म-बंधपरिहारप्रकरण[2] । येथें संचितकर्मनाशनिरूपण[3] । केलें पाहिजे हें सर्वज्ञ निपुण । विचारिता जाला ये स्थळीं. ॥ ४५७ ॥ परी ईश्वरीं अर्पितां कर्म । श्रीगुरुरूपें तेंचि सगुण ब्रह्म । अपरोक्षानुभव[4] देतां भस्म । ज्ञानाग्नीनें होय संचित कर्मांचें. ॥ ४५८ ॥ त्या ज्ञानियांत कितीएक । सगुण सांडूनि झाले निर्गुणोपासक । निर्गुणानुभवें सगुणसेवक । होती कोण्ही. ॥ ४५९ ॥ परि ज्ञान जालियावरी । उपासक जे हे दोंपरी । दोहींचीं कर्में वैश्वानरीं[5] । जळती ज्ञानाचिया. ॥ ४६० ॥ परी दोघांचे दोनी प्रकार । वेगळे त्यांत जो नर । निर्गुणमात्रीं सादर । कर्मनाश त्याचा बोलतो प्रथम या श्लोकीं. ॥ ४६१ ॥

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

अगा! ज्ञानाग्नीनें कर्म । जो जाळूनि करी भस्म । त्यातें वशिष्ठादि ज्ञानी परम । **पंडित** म्हणती. ॥ ४६२ ॥ कर्मीं देखे अकर्म । पूर्वीं वर्णिला ज्याचें क्रियमाण कर्म । बंधक नव्हे तो कर्मयोगी परम । परि नव्हे ज्ञानी. ॥४६३॥ तोचि कर्म करितां ईश्वरार्पित । ज्ञान पावोनि होतो पंडित । पंडित तो जो अनुभवी अत्यंत । शास्त्रज्ञास उगाच बडिवार[6] त्या नांवें. ॥ ४६४ ॥ तो ज्ञानाग्नीकरूनी । कर्में जाळितो म्हणोनी । म्हणतां सूचवी यावरूनी । कीं कर्में संचितें बहुतां जन्मांचीं. ॥ ४६५ ॥ जाळितो ये जन्मींचीं कर्में । तरी तीं ज्ञानाहूनि पूर्वींही अकर्में । होताति ऐसें पुरुषोत्तमें । निरूपिलें पूर्वीं. ॥ ४६६ ॥ याकारणें जाळूनि भस्म । ज्ञानाग्नीनें जें करितो कर्म । तें संचित जें अनेक जन्म । उरलें प्रारब्धें भोगितां. ॥ ४६७ ॥ अतएव हा पंडित । कीं पूर्वोक्त तो अपंडित । हा पंडितज्ञानमंडित[7] । जो जाळी संचितें कर्में अ-वघीं. ॥ ४६८ ॥ परि ज्यास निर्गुणमात्रीं उपासना । तो हा कृष्णें सांगितला अर्जुना । यास सगुणभक्ति असेना । ज्ञान जालियाउपरी. ॥ ४६९ ॥ हा ज्ञान जालियावरी । कर्में न अर्पी ईश्वरीं । ज्ञानाग्नीनेंच भस्म करी । संचित

---

१. श्रीकृष्ण (कमलनयन). २. कर्म बंधक न होण्याचे प्रकरणीं. ३. संचित कर्मनाशाचें कथन. ४. प्रत्यक्ष अनुभव. ५. अग्नींत. ६. मोठेपणा. ७. ज्ञान्याच्याही ज्ञानांस भूषित करणारा.

क्रियमाणही. ॥ ४७० ॥ ज्ञानाग्नीनें संचितें जाळी । आणि अकर्तात्मपणें क्रियमाणकाळीं । अहंकर्तृत्वाच्या विटाळीं । ओंवळें न करी चित्तासी. ॥ ४७१ ॥ कीं ज्याचे समारंभ सकळ । कामसंकल्पवर्जित निर्मळ । कीं कामना आणि अहंकर्तृत्वाचें मूळ । दोन्हीं समूळ नसती जयासी. ॥ ४७२ ॥ अगत्य कर्मांचे आरंभ । त्यास म्हणावें **समारंभ** । ते म्हणे **क**मलनाभ । कामसंकल्पवर्जित जयांचे. ॥ ४७३ ॥ अगत्य कर्मारंभ म्हणिजे । देहास अगत्य जें पाहिजे । अन्नोदकादि पदार्थ जे जे । देहनिर्वाहार्थ मेळवावे. ॥ ४७४ ॥ अगत्य कर्मारंभ ऐसे । तेथें काम आणि संकल्प वसे । तो काम आणि संकल्पही नसे । अगत्यकर्मारंभींही जयांच्या. ॥ ४७५ ॥ क्षुधेस मिष्टान्न मिळावें । तृषेस गोड शीतळ जळ व्हावें । अगत्यकर्मारंभीं पाहावें । रूप इत्यादि कर्माचें. ॥ ४७६ ॥ अगत्यदेहनिर्वाहार्थही असा । नसे ज्यास कामाचा वळसा । आतां देहनिर्वाह जैसा तैसा । हो माझा हा संकल्पही असेना. ॥ ४७७ ॥ निःशेष गेलें मीपण । जो अनंत सर्वगत आपण । न स्फुरे मी म्हणायाची खूण । त्यास माझा निर्वाह हो हा संकल्प कैंचा? ॥ ४७८ ॥ मी आणि माझें । वृत्तीस हें नसेच ओझें । संकल्प त्या योगिराजें । करावा काय? ॥ ४७९ ॥ मुखीं पडे ग्रास । तो गिळतांही प्रयास । नसती आयास जयास । कामसंकल्पाचे. ॥ ४८० ॥ पाजिलें कोण्हीं जळ । तें गोड क्षार उष्ण कीं शीतल । मज कैसें लागतें हाही समूळ । संकल्प नसे जयासी. ॥ ४८१ ॥ बैसला निजेला जेथें । मळमूत्र टाकी तेथें । हागेन मुतेन हाही येथें । न वाहे संकल्प. ॥ ४८२ ॥ मी बैसलों कीं निजलों येथें । हें न स्फुरोनि मळमूत्र तेथें । टाकी, न साहे संकल्प जेथें । मी हागेन मुतेन इतकाही. ॥ ४८३ ॥ हे अगत्य देहकर्मांचे आरंभ । ऐसेही जयाचे समारंभ । तेही म्हणे **क**मलनाभ । ऐसे **कामसंकल्पवर्जित**. ॥ ४८४ ॥ काम जेथें नसे । संकल्प जेथें न दिसे । ब्रह्मीं चित्त समरसें । असे जयाचें. ॥ ४८५ ॥ त्यासही मी एक कर्त्ता । स्फुरेल कोठूनि हे वार्ता । एवं जो ऐसा अकर्ता । क्रियमाणलेप कैंचा तया? ॥ ४८६ ॥ एवं समाधींत चित्त । ज्ञानाग्नीनें भर्जितां[1] संचित । जळे आणि क्रियमाण तों निश्चित । न शिवे जया अकर्तया. ॥ ४८७ ॥ ऐशाचेंही शरीर । जितें हा प्रारब्धाचा वडिवार । तें भोगें सरे हा त्रिप्रकार । लय ज्ञानियांच्या कर्माचा. ॥ ४८८ ॥

---

१. जाळितां.

निर्गुणोपासनाच अत्यंत । तो हा वर्णिला ज्ञानवंत । कीं ऐसा त्यास म्हणती संत । पंडित म्हणोन. ॥४८९॥ येथें भाव दावी हरी । कीं हा ज्ञान जालियावरी । निर्गुणमात्रीं उपासक परी । भक्त नव्हे **भागवत.** ॥ ४९० ॥ म्हणुनि म्हणे कीं पंडित । इतकेंचि यासि म्हणती संत । तेथूनि चौथ्या श्लोकीं अनंत । ज्ञानी भक्त या प्रसंगींच वर्णील. ॥४९१॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त आधीं सुज्ञ लोक । परिसोत अर्थ त्यावरी. ॥४९२॥ पूर्वश्लोकीं हरी । अकर्त्रात्मपणाची परी । बोलिला तों ते खरी । अजगरवृत्ति पाहतां. ॥ ४९३ ॥ कीं अकस्मात येऊनी । जें पडे अजगराचे आननीं । असें तें तितकेंच गिळूनी । वृत्ति ऐसी ज्ञानियाची. ॥ ४९४ ॥ तरी अजगरवृत्ती-वांचूनी । क्रियमाण लेप न चुके म्हणोनी । सिद्धांत जाला ऐसें मनीं । अर्जुनादिकांच्या वाटेल. ॥४९५॥ प्रारब्धाच्या तरी गती । नाना प्रकारींच्या दिसती । न धरितां अजगरवृत्ती । राज्यें हीं जनकादिकीं चालविलीं. ॥ ४९६ ॥ ज्याचें प्रारब्धही ऐसें । कीं शरीर जैसें तैसें । आयुष्य सरिजे तों अनायासें । वांचावें. ॥४९७॥ ज्ञान आणि ऐसें प्रारब्ध । घुणाक्षरन्यायें झालें लब्ध । तो नित्य समाधिस्थ स्तब्ध । अकर्त्रात्मत्वें ऐसा वर्णिला. ॥ ४९८ ॥ कीं नसोनिही ज्ञान । अंध मूक बधिर जन । त्यांची देहयात्रा उदक अन्न । ऐसेंचि चालतें.॥४९९॥ प्रारब्ध ऐसें असोनी । अमित निष्काम पुण्यें जाला ज्ञानी । तो अकर्ता सहज ऐसा म्हणोनी । उत्तमकोटींत पडला. ॥ ५०० ॥ आतां अकर्त्रात्मयोग । बाणला असोनि विचित्र भोग । ज्यास घडती त्याचा प्रसंग । श्रीरंग बोलतो या श्लोकीं. ॥ ५०१ ॥

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥**

अगा! कर्मफल आणि संग । कीं मी कर्ता ऐसा प्रसंग । टाकूनि तृप्त अंतरंग । ज्ञानें सर्वदा जयाचें. ॥५०२॥ स्वयें अनंत सर्वगत । सर्वही मृगजल निजाश्रित । आपणास आपण आश्रय निश्चित । **निराश्रय** ऐसा. ॥ ५०३ ॥ तो प्रारब्धें कर्म अशेष । करी सर्वकर्मीं वर्ते पुरुष । तरी अकर्ता निर्दोष ।

१. आइतोजीपणा, आयत्या पिठावर रेघ ओढणारा असा स्वभाव, उद्योगविमुखता, आळशांचा राजा असा स्वभाव, सुस्तपणा. २. घुणा म्हणून जो किडा असतो तो स्वेच्छेनें काष्ठ कोरीत असतां सहजरीत्या क ख इ० अक्षरें कोरलेलीं दृष्ट होतात; पण तीं त्याचीं बुद्धिकृत नव्हत तसें; दैवयोगानें, दैववशात.

कांहींच नाहीं करीत तो. ॥५०४॥ हा जें टाकितो कर्मफळ । तें नव्हे वेदोक्त केवळ । कीं वेदोक्तकर्मी अकर्म समूळ । जिज्ञासुदर्शेतही वर्णिलें. ॥ ५०५ ॥ ज्ञान जालियावरी । कर्मफलत्याग यापरी । कीं प्रारब्धें कर्मी प्रवर्त्ते परी । विषयसुखेच्छा न धरी कदापि. ॥ ५०६ ॥ जो जें कर्म करितो । त्या कर्में सुख हो म्हणतो । कोणही सुखेच्छेवांचूनि तों । न करी कर्मी प्रवृत्ती. ॥ ५०७ ॥ तैसा नव्हे हा ज्ञानी । कर्मी प्रवर्ततां मज सुख हो म्हणोनी । न म्हणे ऐसें कर्मफल टाकूनी । निःसंग कर्मी प्रवर्ततो. ॥ ५०८ ॥ संग हा कीं हा मी कर्ता । हे त्याच्या चित्तीं नसे वार्ता । कीं त्या निराश्रय अनंता । कर्तृत्व कैंचें? ॥५०९॥ योग[1]क्षेमार्थ आश्रय । नसे ज्यास तो हा निराश्रय । निराश्रयशब्दार्थनिर्णय । ऐसें न घडे ये स्थळीं. ॥ ५१० ॥ कीं जनकासारिखा ज्ञानी । अकर्ता सर्व कर्में करूनी । तो योगक्षेमार्थ आश्रय न धरी म्हणोनी । निराश्रय केंवी न म्हणावें? ॥ ५११ ॥ टाकिलें कर्माचें फळ । संग टाकिला समूळ । हें वर्णूनि उदरार्थ केवळ । आश्रय न करी म्हणे हें व्यर्थ. ॥ ५१२ ॥ योगक्षेम दोंपरी । एक स्वदेहमात्र निर्वाह करी । कुटुंब एकाचे घरीं । हे दोघे दों श्लोकीं यापुढें वर्णील. ॥ ५१३ ॥ [2]त्यक्तसर्वपरिग्रह । आणि शरीरमात्राचा निर्वाह । करी जो तोही अलिप्त निस्पृह । हें या पुढील श्लोकीं वर्णील. ॥ ५१४ ॥ [3]यदृच्छालाभसंतुष्ट ज्ञानी । तो कुटुंबी या भावेंकरूनी । वर्णूनि तोही लि[4]प्त नव्हे म्हणोनी । त्या पुढिल्या श्लोकीं श्रीकृष्ण वर्णील. ॥ ५१५ ॥ ऐशा भिन्नभिन्न उक्ती । प्रतिश्लोकीं तरीच चुकती पुनरुक्ती । अन्यथा याहूनि पूर्वश्लोकींच [5]अभिव्यक्ती । कर्मनाशाची वर्णिली. ॥ ५१६ ॥ एवं निराश्रय म्हणजे अनंत । ज्यास आद्यंत तें पराश्रित । स्वयें सर्वाश्रय निश्चित । हा स्वरूपानुभव जयाचा. ॥ ५१७ ॥ आणि जो जाला ज्ञानी । तो टाकितो कर्मफळ म्हणोनी । येथें म्हणों नये कीं कर्मी अकर्म देखे म्हणोनी । ज्ञान पावला निष्काम. ॥ ५१८ ॥ कर्मी अकर्म पाहे । कीं त्या कर्मी बंधकत्व न साहे । फळ टाकणें हें तों घडत आहे । जिज्ञासुदर्शेतही. ॥ ५१९ ॥ ज्ञान जालियावरी । कर्म फलत्याग अन्यत्रही हरी । बोलेल परि भाव अंतरीं । कीं विषयसुख तें कर्मफळ. ॥ ५२० ॥ ज्यास जें कर्म करणें । तें विषयसुखाचकारणें । तें आत्मसुख अनुभवाविणें । टाकणें घडेना. ॥ ५२१ ॥ येथें विषयसुखचि कर्मफल । आणि संग अहंकर्तृत्वादि-

---

१. योग=संपादन करणें व क्षेम=लब्धाचें पालन. २. त्यक्तोपाधि. (श्लो० २१.) ३. ईश्वरेच्छेनें मिळतें त्यांत संतोषी. ४. आसक्त. ५. स्पष्टीकरण.

मळ । टाकूनि सर्वकर्मीं प्रवर्तला निर्मळ । तरी नित्यतृप्त कांहींच नाहीं करीत तो. ॥ ५२२ ॥ तृप्त नित्यसुखेंकरूनी । अनित्य विषयसुखेच्छा टाकी म्हणोनी । प्रारब्धें सर्वकर्मीं प्रवर्तला ज्ञानी । तरी कांहींच नाहीं करीत तो. ॥ ५२३ ॥ नित्यतृप्त कर्में करितो । तरी क्षुधित अन्नादितृप्ति इच्छितो । एवं ऐसा जरी तरी तो । त्या कर्मीं न लिंपे म्हणतो या श्लोकीं. ॥ ५२४ ॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**

ज्या कर्में रक्षावें शरीर । तें म्हणावें शारीर । तेंही केवळ कीं नव्हे सादर। रसनादिकीं रसग्रहणाद्यपेक्षेंत. ॥ ५२५ ॥ भलत्या आहारें प्राण । स्थिर होतो हा मुख्य गुण । या प्राणवृत्तीनें अन्नादि मेळवणें । शरीर कर्म ऐसें केवळ. ॥ ५२६ ॥ इंद्रियांस पाहिजे रस विचित्र । प्राणांस आहार मात्र । टाकूनि इंद्रियवृत्ति अपवित्र । प्राणवृत्तिपवित्रपणें हा वर्ते. ॥ ५२७ ॥ कीं कामना टाकूनि विरक्त । नियत ज्याची बुद्धि आणि चित्त । तो शरीरनिर्वाह करूनि निश्चित । पावत नाहीं कर्मबंधातें. ॥५२८॥ ज्याणें टाकिला सर्व परिग्रह । म्हणिजे न स्त्री पुत्र अथवा गृह । तो केवळ शरीरनिर्वाह । करी तऱ्ही न पावे कर्मबंधातें. ॥ ५२९ ॥ मातीच्या भिंती । मातीनेंच लिंपिती । कर्में जाले देह ते वर्तती । कर्मेंचि करूनी. ॥५३०॥ क्षुधेस पाहिजे अन्न । तृषेस पाहिजे [1]जीवन । बरें वाईट [2]आच्छादन । शीतनिवृत्तीकारणें. ॥ ५३१ ॥ क्षुधादिबाधेनें विकळ । होतां चित्तीं होय डळमळ । तेव्हां चित्त शुद्ध जरी केवळ । स्थिर नव्हे स्वस्वरूपीं. ॥ ५३२ ॥ याकारणें ज्ञानी । विषयवासना टाकूनी । शरीरनिर्वाह करितां त्या कर्मेंकरूनी । पावत नसे किल्बिषातें. ॥ ५३३ ॥ पापास किल्बिष म्हणावें । तें पाप एक किल्बिषाच्या नांवें । या प्रकरणीं या भावें न घ्यावें । कीं पाप पुण्य दोन्ही पापचि. ॥५३४॥ सोनियाची बेडी । आपणाकरणें घडी । तऱ्ही बंधचि जोडी । बेडी तेही. ॥ ५३५ ॥ पाप पुण्य मिळोनी । कर्म संचित क्रियमाण दोनी । दोहींतें पापेंचि म्हणोनी । वेदांतीं **ब्रह्मसूत्रीं** प्रसिद्धि ऐसी. ॥ ५३६ ॥

ब्रह्मसूत्र—**'तदधिगमे उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ ।'**

सूत्रार्थ—जाला असतां ब्रह्मानुभव । पुढें जो पापाचा संभव । त्याचा नव्हे लेप लेश लव । आणि नाश पूर्विल्या पापांचा. ॥ ५३७ ॥ पुढिलिया

१. उदक. २. वस्त्र.

क्रियमाणाचा नव्हे लेप । आणि नासे मागील संचित पाप । द्विविध कर्मी द्विविध प्रताप । सूचविला ज्ञानाचा. ॥ ५३८ ॥ लेप नव्हे क्रियमाणाचा । या भावें बोलते **व्या**साची वाचा । कीं अकर्त्रात्मानुभव साचा । जाला तयाच्या बुद्धीस. ॥ ५३९ ॥ यालागीं पापपुण्यरूप । त्यास न स्पर्शे क्रियमाण पाप । संचित पाप जळे तो प्रताप । ज्ञानाग्नीचा. ॥ ५४० ॥ **'ज्ञानाग्निदग्धकर्माणि'** म्हणोनी । याचि भावें स्वमुखेंकरूनी । श्री**कृ**ष्ण बोलिला हें जेथूनी । प्रकरण संचितक्रियमाणनाशाचें. ॥५४१॥ एवं ज्ञानाग्नीनें जळे संचित । न करितां विस्तार त्याचा बहुत । क्रियमाणलेप नव्हे हें अद्भुत । त्याचे प्रकार नाना सांगितले. ॥ ५४२ ॥ पहिली बोलिली [1]अजगरवृत्ती । कीं ऐसियास कर्में न स्पर्शती । तदुपरि जरी सर्वकर्मी प्रवृत्ती । अकर्त्रात्मत्वें करी तरी अलिप्त. ॥ ५४३ ॥ प्रवृत्ति कर्मी कां परी । नित्यतृप्तास हे शंका त्याउपरी । तरी कर्में शरीररक्षणार्थ करी । हें बोलिलें या श्लोकीं. ॥ ५४४ ॥ कीं टाकिला सकळ परिग्रह । जयास न कुटुंब न गृह । तो करी शरीरमात्रनिर्वाह । तरी न पावे किल्बिषातें. ॥ ५४५ ॥ किल्बिष म्हणिजे पापमात्र । परि पापपुण्य संचितक्रियमाण विचित्र । पाप म्हणावें येविषयीं **ब्रह्मसूत्र** । प्रमाण म्हणोनि वाखाणिलें. ॥ ५४६ ॥ आतां यापुढें श्लोक । तो किमर्थ बोले **उ**त्तमश्लोक । त्याचें निमित्त आदीं सुज्ञ लोक । परिसोत अर्थ तदुपरि. ॥ ५४७ ॥ पूर्वश्लोकीं क्रियमाण । न लिंपे ज्यास त्याचें लक्षण । वर्णितां बोलिला **कृ**ष्ण । कीं टाकिला ज्याणें परिग्रह सर्वही. ॥ ५४८ ॥ ज्याणें टाकिला सर्व परिग्रह । ज्यास कुटुंब ना गृह । तो शरीरमात्रनिर्वाह । करितां कर्में लिप्त नव्हे. ॥ ५४९ ॥ हें पडतां कानीं । शंका उपजली **अर्जु**नाचे मनीं । कीं कुटुंबी गृहस्थ ज्ञानी । लिप्त होतो कीं काय? ॥ ५५० ॥ ज्ञानी आणि कुटुंबाचा धणी । ज्यावांचूनि त्यास पाळक नसे कोणी । त्याणें प्रवर्ततां त्याच्या रक्षणीं । काय लेप होय क्रियमाणाचा. ॥ ५५१ ॥ हें **अर्जु**नाचे मनीं । तोच अंतर्यामी समजोनी । तोही अलिप्त ऐसा म्हणोनी । बोलत असे या श्लोकीं. ॥५५२॥

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥ २२ ॥**

अगा! कुटुंबी असोनी । जो संतुष्ट यथालाभेंकरूनी । द्वंद्वमत्सररहित

---

१. उद्योग न करतां दैवानें जें मिळेल तें खाऊन असणारें अजगराप्रमाणें वर्तन. (अजगरनामक सर्पाप्रमाणें.)

ज्ञानी । बद्ध तोही कां होईल? ॥ ५५३ ॥ यदृच्छालाभाचा ऐसा अर्थ । न मागतां न इच्छितां पदार्थ । जैसे मिळाले होय सिद्धार्थ । तितकियानें. ॥५५४॥ हा यदृच्छालाभसंतोष । न मानी तोचि पुरुष । कीं ज्याचे मनीं असेल दोष । द्वंद्वमत्सराचा. ॥ ५५५ ॥ द्वंद्व म्हणिजे जोडें । ज्या जोडियांत एक सुख एक दुःख घडे । लाभ अलाभ मान अपमान रोकडे । हे जोडे नसती सुखदुःख-हेतु जयासी. ॥ ५५६ ॥ द्वंद्व इत्यादि म्हणावीं । त्यांत जो कुटुंबी गोसांवी । त्याणें पुत्रकलत्रादि पोसावीं । मुख्य अयाचितवृत्तीनें. ॥ ५५७ ॥ कुटुंबास उदंड[1] पाहिजे । त्यांत मिळती पदार्थ जे जे । तिहीं सुखी न होइजे । न मिळती तिहीं न होइजे दुःखीही. ॥ ५५८ ॥ लाभालाभद्वंद्वरहित । तो लाभें संतुष्ट अलाभें संतोषवर्जित । नव्हे ऐसें असोनि भगवंत । यदृच्छालाभसंतुष्ट तो म्हणे. ॥ ५५९ ॥ ऐसा परस्पर वाक्यविरोध । याचा करितां बरा शोध । होतो यथास्थित बोध । यदृच्छालाभसंतोषाचा. ॥ ५६० ॥ यत्नाविणें लाभ जाला । त्याणेंही संतोष त्याला । न म्हणावा कीं जयाला । संतोष एक आत्मानुभवाचा. ॥ ५६१ ॥ परंतु कुटुंबासहित स्वदेह । त्याचा क्षुधादिपरिहारनिर्वाह । नव्हतां जऱ्ही सर्व निस्पृह । अन्नादि अपेक्षा उपजेच. ॥ ५६२ ॥ कीं तृषा अथवा क्षुधा । जेव्हां अंतरीं करिती बाधा । चित्त तेव्हां सर्वात्मबोधा । न झोंबे उत्साहेंकरूनी. ॥ ५६३ ॥ त्या क्षुधादिकांचा वळसा । निवारे जैसा तैसा । यदृच्छालाभ होतां तैसा । संतुष्ट होतो. ॥ ५६४ ॥ कीं भलती तृषा क्षुधा । याणें शमतां चित्ताची बाधा । दूरी होतां त्या नित्यात्मबोधा । स्पर्शोनि असेल उत्साहें. ॥ ५६५ ॥ यदृच्छालाभें संतोष । या भावें मानी ज्ञानी पुरुष । जो पदार्थें संतोषतो अत्यंत दोष । कीं जडीं सत्यत्व सुखहेतुत्व उपजलें. ॥ ५६६ ॥ यालागीं लाभालाभसम । द्वंद्वातीत उत्तम । म्हणोनि बोलिला पुरुषोत्तम । यदृच्छालाभसंतुष्ट ऐसा असोनिही. ॥ ५६७ ॥ ऐसाच सम मानापमानीं । आणि असे निर्मत्सर होऊनी । कीं कोणाचा उत्कर्ष देखोनी । हें मज कां नाहीं म्हणेना. ॥ ५६८ ॥ ऐसा अयाचितवृत्तींकरूनी । बद्ध नव्हे कुटुंबीही ज्ञानी । कीं यदृच्छालाभसंतुष्ट म्हणोनी । आणि द्वंद्वातीत निर्मत्सर. ॥ ५६९ ॥ आतां ज्ञाताही होऊनी । कुटुंबनिर्वाह यत्नावांचूनी । नव्हे तरी काय तो ज्ञानी । लिप्त होतो क्रियमाणें? ॥ ५७० ॥ ऐशा संशयाचें स्थळ । देखोनि येथें मेघनीळ ।

---

१. पुष्कळ.

म्हणतो त्यासही बंधमूळ । नव्हे असेल जरी ऐसा. ॥ ५७१ ॥ आणि सिद्ध्यसिद्धींत सम । चित्तवृत्ति नव्हे विषम । तो करूनि कांहीं उद्यम । बद्ध नव्हे. ॥ ५७२ ॥ करितां यत्नाचा आरंभ । म्हणे होणार तोचि होईल लाभ । कार्य सिद्ध होतां हृदयकुंभ । न भरी हर्षें मृगजळाच्या. ॥ ५७३ ॥ कार्यसिद्धि नव्हे जरी । खेद न मानी कोण्हेपरी । आत्मलाभें सुख अंतरीं । अखंड त्याच्या. ॥ ५७४ ॥ एवं जो ज्ञानीं अनुभवी ब्रह्म । त्याचें ऐसें नासे त्रिविधं कर्म । म्हणूनि वर्णिलें कीं ज्ञान निष्कर्म । होतां न उरे कर्मबंध. ॥ ५७५ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं मग अर्थ. ॥ ५७६ ॥ क्रियमाणें नव्हे लिप्त । ज्ञानाग्नीनें जळे संचित । ज्याचें तो येथपर्यंत । वर्णिला ज्ञानी. ॥ ५७७ ॥ त्याणें स्वस्वरूपीं असावें । कीं ज्ञानाकारणें शरीर रक्षावें । अथवा प्रारब्धें कुटुंब पोसावें । यथालाभेंकरूनी. ॥ ५७८ ॥ अथवा प्रारब्धेंकरूनी । राज्यादि सर्वकर्मींही ज्ञानी । प्रवर्ते तथापि अकर्त्रात्मत्वेंकरूनी । तो लिप्त नव्हे. ॥ ५७९ ॥ एवं प्रारब्धानुरूप कर्म करी । कीं निर्गुणीं ध्यान धरी । म्हणूनि वर्णिला परी । सगुणभजन नाहीं वर्णिलें. ॥ ५८० ॥ तरी ज्यास अपरोक्षज्ञान जालें । ज्ञानाग्नीनें संचित जळालें । लिप्त न होतांचि गळालें । क्रियमाण ज्याचें. ॥५८१॥ जो ऐसा ज्ञानी निपुण । त्याणें काय न भजावा सगुण । किंवा सगुणभजन होतें कारण । बंधासी. ॥ ५८२ ॥ हें येथें संशयाचें स्थळ । परि सगुणभक्त ज्ञानी तोही केवळ । निर्गुणानुभवेंचि सकळ । कर्मं नाशितो. ॥५८३॥ त्यांत नियत कर्म । आणि श्रवणकीर्तनादि भजनधर्म । आणि प्रारब्धें लौकिक उद्यम । सर्व **भागवतधर्मीं** योजितो. ॥ ५८४ ॥ म्हणून याउपरी । या भावें श्रीहरी । ज्ञानीं स्वभक्त त्याचिपरी । सांगतो आतां या श्लोकीं. ॥ ५८५ ॥

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

अगा! ज्ञानी आणि भक्त निपुण । ज्ञान तंव त्याचेंही तेंचि निर्गुण । विशेष हाचि कीं सर्वकर्मार्पण । सगुणीं करीतसे. ॥५८६॥ कीं यज्ञ तो **विष्णु** सगुण । त्याकारणेंचि तो निपुण । आचरतो कर्म आणि तदर्पण । तें सर्वही करीतसे. ॥ ५८७ ॥ कीं समग्रही करणें । त्याचें **विष्णू**चकारणें । कीं जें करणें तें अ-

---

१. उद्योग. २. कर्मांचे तीन प्रकारः—(१) क्षय—नाश करणार तें, (२) वृद्धि—वाढविणारें, (३) स्थान—स्थिति राखणारें.

शेष समर्पणें । विष्णूतेंचि. ॥ ५८८ ॥ विष्णूकारणें समग्र कर्म । करणें हाचि वैष्णवधर्म । तें कर्म तों होतें अकर्म । जिज्ञासुदशेंतही. ॥ ५८९ ॥ तें ज्ञान जालियावरी । बंधक होईल काय परी । पूर्वोक्त ज्ञानियांत कोण्ही न करी । सगुणभजन. ॥ ५९० ॥ म्हणूनि त्याची ज्ञानीं स्थिती । कीं प्रारब्धें लोकीं प्रवृत्ती । दोहींत सांगितल्या रीती । संचितक्रियमाणनाशाच्या. ॥ ५९१ ॥ कीं त्यांस कळलें निर्गुण । तेव्हां तिहीं सोडिलें सगुण । त्यांची सगुणभजनाची खूण । काय वर्णावी? ॥ ५९२ ॥ कळोनिही निर्गुण । ज्ञानानुभवी न सोडी सगुण । त्याच्या कर्माचें नाशलक्षण । वर्णिलें नाहीं यास्तव येथें. ॥ ५९३ ॥ परि येथें संदेहनिर्माण । होणार कीं त्याचें क्रियमाण । नाशतें कीं नाहीं हें निरूपण । जालें नाहीं यास्तव. ॥ ५९४ ॥ म्हणूनि लागलें बोलणें । कीं त्याचें समग्र कर्म करणें । तें यज्ञा सगुणा विष्णूकारणें । तें तों प्रकर्षे विशेषें होतसे लीन. ॥ ५९५ ॥ प्रविलीयते म्हणोनी । कृष्ण म्हणे या भावेंकरूनी । लीयते इतकेंचि म्हणतां तऱ्ही त्यावरूनी । होतोच अर्थ कर्मनाशाचा. ॥ ५९६ ॥ प्रविलीयते म्हणणें । तें इतकिया कारणें । कीं विष्णूकारणें कर्म करणें । तें बंध जिज्ञासुदशेंतही करीना. ॥ ५९७ ॥ हें तों ज्ञानियाचें प्रकरण । ज्ञानी होऊनि जो सेवी सगुण । भजनरूप त्याचें क्रियमाण । प्रकर्षे विशेषें लय पावतें. ॥ ५९८ ॥ आतां कर्मनाशीं प्रकर्ष । कर्मनाशीं कोण विशेष । कर्मनाश तों निःशेष । निर्गुणोपासकांचाही होतसे. ॥ ५९९ ॥ तरी अध्याय जो द्वादश । तेथें निर्गुणोपासकां अधिक क्लेश । सगुणोपासकांपरीस हृषीकेश । बोलेल पुढें. ॥ ६०० ॥ कीं समान ज्ञान आणि मोक्षफळ । अधिक तो क्लेशचि केवळ । कीं ज्या ज्ञानसिद्धीनें कर्म समूळ । जळे तेथें कष्टती बहुयत्नें. ॥ ६०१ ॥ कीं त्यांस ईश्वर सहाय । नसतां क्लेश अत्यंत होय । यांसि इंद्रियादिजय । अनायासें कृपेनें सगुणाच्या. ॥६०२॥ त्यांस कष्टाचेंच मोल । परि त्यांत बहुत यत्न होती फोल.[१] । म्हणूनि त्यांस मी तारक ऐसा बोल । न निघे मुखांतूनि जगदीश्वराच्या. ॥ ६०३ ॥ 'ते प्राप्नुवंति मामेव'[२] । इतकेंचि म्हणे देवाधिदेव । अर्थीं दाखवी ऐसा भाव । कीं त्यांच्या यत्नेंचि ते मज पावती. ॥६०४॥ 'तेषामहं समुद्धर्ता'[३] । म्हणूनि म्हणे भक्तांचा मी सिद्धिकर्ता । हा विचार करितां पुरता । 'प्रविलीयते' या शब्दाचा अर्थ सांपडे.॥६०५॥शत्रु जाळिला एकीं नरीं । कष्टूनि पेटवूनि वैश्वानरीं । एकीं अनायासें तदंतरीं । जाळिला सुगंध तेलें स्नेहें भक्तीच्या.

---

१. व्यर्थ, निष्फळ. २. गीता—अ० १२ श्लो० ४ पद्य. ३. गीता—अ० १२ श्लो० ७ पद्य.

॥६०६॥ त्यांस सहाय त्याचें साधनपरिकर[1] । यांस सहाय सर्वेश्वर । कर्मशत्रु जाळोनि सुखकर । भक्तियोग मुक्तीपरीसही. ॥ ६०७ ॥ काष्ठ आणि चंद्रज्योती । दोन्हीही जळोनि विझती । परि प्रकर्षें विशेषें जळती । चंद्रज्योति प्रकाशें चांगल्या. ॥ ६०८ ॥ किमर्थ दृष्टांत फार । ग्रंथ होतो अपार । एवं प्रकर्षें विशेषें कर्मसंहार[2] । होतो भक्तां ज्ञानियांचा. ॥ ६०९ ॥ आत्मानुभवी नित्य नव । विश्व आपण हा अनुभव । भगवत्पद षड्गुणवैभव । प्राप्त जया. ॥ ६१० ॥ अनुभव ऐसा अंतरीं । श्रवणकीर्तनादिभक्ति करी । आपण तरोनि जग तारी । भक्त अनुभवी ऐसा. ॥ ६११ ॥ करी जनसंग्रहार्थ कर्म । सर्वकर्मीं देखे ब्रह्म । प्रारब्धें शरीरधर्म । हें सर्व करणें भगवदर्थ. ॥ ६१२ ॥ यज्ञ **वि**ष्णु तदर्पण । करायाच कारणें कर्मकरण । हें तृतीयाध्यायांत विवरण । आरूढावस्थेंत संस्कार तोचि. ॥ ६१३ ॥ एवं भक्ति आणि शरीरयात्रा । परोपदेशादिकर्ममात्रा । अर्पावया **यज्ञ**नामका **क**मलनेत्रा । आचरे जो. ॥६१४॥ **शु**द्ध निर्गुणोपासक तया । सर्वभूतीं भगवद्भावें दया । नसे जों मौनी होऊनियां । असे अजगरवृत्तीनें. ॥ ६१५ ॥ स्वयें तरले भगवद्भक्त । **शु**कादिक जीवन्मुक्त । तथापि उपदेश युक्तायुक्त । करूनि तारिती जनांसी. ॥ ६१६ ॥ भक्त **ना**रदादी । लोकांची अविद्या अनादी । हरिती जें गुह्य[3] वेदीं । ते उपदेशिती जनांसी. ॥ ६१७ ॥ श्रवणकीर्तनें करिती । प्रकट करिती भक्तीच्या रीती । **शु**काच्या उक्ति **श्रीभागवतीं** । कीं गोड भक्ति निर्गुणापरिस.॥६१८॥ **शु**क म्हणे आपण । पैरिपक्क[4] निर्गुणीं निपुण । परि **उ**त्तमश्लोकलीलागुण । चित्त हरिलें तिहीं माझें. ॥ ६१९ ॥ मग मी हें **श्री**भागवत । पिता **व्यास** त्यापाशीं निश्चित । पढता जालों जो अत्यंत । पैरिनिष्ठित[5] निर्गुणीं. ॥६२०॥

**शु**कोक्त श्लोक—**'परिनिष्ठितोऽपि नैर्गुण्ये उत्तमश्लोकलीलया ।**
**गृहीतचेता राजर्षे! आख्यानं यदधीतवान् ॥'**

ऐसे निर्गुणनिष्ठ जीवन्मुक्त । तेही सगुणब्रह्मभक्त । पूर्णसिद्ध होऊनि अनुरक्त । सगुणाचरणीं. ॥ ६२१ ॥

**श्री**मद्भागवतश्लोक—**'आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ।**
**कुर्वंत्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥'**

श्रवणमननादिसिद्ध मुनी । आत्माराम पक्कज्ञानीही होऊनी । निर्निमित्तभक्ति

---

१. साधनसामग्री. २. कर्मनाश. ३. गौप्य. ४. पूर्ण. ५. एकनिष्ठ.

मधुसूदनीं । तेंही करिती. ॥ ६२२ ॥ ऐसा हरीचा गुण । कीं ऐसेही सिद्ध निपुण । भक्ति करिती कीं या गोडीची खूण । ते ज्ञानी भक्तचि जाणती. ॥ ६२३ ॥ एवं भक्त ये रीतीं । तेच जनोद्धारही करिती । कीं संतुष्ट होतो श्रीपती । सर्वे कर्मे तयांच्या. ॥ ६२४ ॥ ते जनांमध्यें वर्तती । अधिकारियां ब्रह्म बोधिती । अनधिकारियां साधिती । अधिकार श्रवणकीर्तनें हरीच्या.॥६२५॥. सर्वभूतीं भगवद्भाव । मुखीं देवाधिदेव । ज्यां शरीरधर्मही [1]अभिनव । होतो भक्तियोगें परमेश्वराच्या. ॥ ६२६ ॥ तेंही नवमाध्यायांत । अर्जुनास श्रीभगवंत । **'यत्करोषि यदश्नासि'** या श्लो[2]कांत । स्वयें आपण वर्णील. ॥६२७॥ कीं अन्नादि भक्षणें । तेंही ज्यांस परमेश्वरीं समर्पणें । एवं सर्व कर्म करणें । त्यातेंचि समर्पावया. ॥ ६२८ ॥ एवं कर्म समग्र त्याचें । विष्णूकारणें अन्यथा कैंचें । **'यज्ञायाचरतः कर्म समग्रं'** हें साचें । वचन श्रीकृष्णाचें ये रीतीं. ॥ ६२९ ॥ कर्म समग्र विष्णूकारणें । करूनि समग्र विष्णूस अर्पणें । हें तों स्फुरण संकल्पाचें स्त्रीपणें । येथें पूर्वपक्षाचें हें स्थळ. ॥ ६३० ॥ याकारणें श्रीहरी । पूर्वार्धीं आधींच हें परिहरी । कीं गतसंग मुक्ताचें यापरी । कर्म लयातें पावतसे. ॥६३१॥ **गतसंग** म्हणिजे गेला संग । कीं मी करितों आर्पितों हा प्रसंग । न स्पर्शे कीं ज्याचें अंतरंग । जालें अकर्त्रात्मतदाकार. ॥ ६३२ ॥ हा अर्थ कशावरूनी । ऐसें म्हणती कोण्ही मनीं । तरी ज्ञानी ज्याची [3]थारली बुद्धि म्हणोनी । दुसरिया चरणीं बोलतो. ॥ ६३३ ॥ तरी शास्त्रज्ञानी बुद्धि थारली । कोण्ही ऐसी वाखाणिती हे बोली । म्हणूनि मुक्त तो ऐसी वाणी आपली । प्रकट केली येथें. ॥ ६३४ ॥ गतसंग मुक्त कीं ज्याची ज्ञानी । बुद्धि थारली ऐसा तो म्हणोनी । वर्णितां सूचवी कीं त्यापासूनी । निःशेष गळालें अहंपण. ॥ ६३५ ॥ तरी यज्ञाकारणें कर्म करी । हे घडे कैसेपरी । कोण्ही म्हणती तरी जो नित्यमुक्त हरी । तोही मी कर्ता मी करितों म्हणतसे. ॥ ६३६ ॥ तैसा तोही विष्णूनिमित्त । कर्म करी म्हणे अच्युत । परी तो तों जैसा भगवंत । वैष्णवधर्मी देह [4]चाळी. ॥ ६३७ ॥ ईश्वर जग करितो पाळितो । तैसा अकर्ता हाही देह चाळितो । संस्कारशेषातेंही पाहतो । साक्षित्वें अकर्ता. ॥६३८॥ निर्गुणोपासक जऱ्ही जाला । प्रारब्धें कर्म लागलेंचि त्याला । तैसा भक्तिसंस्कारें याला । भक्तियोगीं वर्तणें. ॥ ६३९ ॥ सकळ विष्णूकारणें । कर्म करणें आणि समर्पणें । इतकें करूनि साक्षिपणें । पाहों नये

---

१. नूतन. २. अ० ९ श्लो० २७ पहा. ३. स्थिरावली. ४. वर्तवी.

काय इतकियांसही. ॥ ६४० ॥ एवं **गतसंग** मुक्त ज्ञानस्वरूपीं । बुद्धि थारली ऐसें **कृष्ण** निरूपी । भाव कीं ऐसा तथापि । सगुणभक्त. ॥ ६४१ ॥ एवं निर्गुणोपासकाचें । निर्गुण ज्ञान तैसेंचि याचें । अधिकपण तें हेंचि साचें । कीं सगुणभक्त कृपाळू जनोद्धारक. ॥ ६४२ ॥ याकारणें द्वादशाध्यायांत[1] । म्हणेल हा स्वयें **श्री**कांत । कीं निर्गुणोपासकांपरिस अत्यंत । मज संमत युक्ततम भक्त हे. ॥ ६४३ ॥ निर्गुण कळल्यावरी । सगुणभक्ति कां परी । ऐसें म्हणणार त्यांची वैखरी[2] । ज्ञानहीन म्हणे त्या भक्तांस. ॥ ६४४ ॥ जरी भक्त ज्ञानी नसे । तरी त्याहूनि कां संमत म्हणतसे । ज्ञानी सर्वांहूनि थोर ऐसे । किती श्लोक उत्तमश्लोकाचे. ॥ ६४५ ॥ ऐसें हें बोलणें । द्वादशीं असे होणें । एवं ज्ञानानंतर सगुण टाकणें । त्यांस कष्ट बाणतां स्थिति ज्ञानाची. ॥ ६४६ ॥ एवं संचित ज्ञानें जळे । क्रियमाण अकर्त्रात्मत्वें नातळे । ऐसे ज्ञानी द्विविध वेगळे । निरूपिले या प्रकरणीं. ॥ ६४७ ॥ आतां यापुढें श्लोक किंविषयक । किमर्थ उत्तमश्लोक । बोले तें निमित्त सुज्ञ लोक । आदीं परिसोत. ॥ ६४८ ॥ गतसंग मुक्त ज्ञानी । **विष्णू**स अर्पी कर्में करूनी । त्याचें प्रैकर्षें[3] कर्म नासे म्हणोनी । पूर्वश्लोकीं भक्त ज्ञानी वर्णिला. ॥ ६४९ ॥ येथें ज्ञानवंत दक्ष । ऐसा करिती पूर्वपक्ष । कीं भजनें साध्य मोक्ष । तो ज्ञानेंचि होणार. ॥ ६५० ॥ तें ज्ञानही जालें । आणि पांकासही[4] पावलें । आतां **विष्णू**कारणें कां लागलें । कर्म करणें त्यांसही. ॥ ६५१ ॥ कीं गतसंगमुक्त ज्याची बुद्धि । ज्ञानी थारली हे प्रसिद्धि । त्याणें कां कर्मसमृद्धी । करावी **विणू**कारणें. ॥ ६५२ ॥ आतां **शु**कादिक निपुण । पक्व योगीं भजती सगुण । निर्निमित्त कीं ऐसाच गुण । **ह**रीचा ऐसें **भाग**वतीं. ॥ ६५३ ॥ तरी प्रयोजनावांचूनी । मूर्खही न प्रवर्त्ते म्हणोनी । शास्त्र बोले हें तों ज्ञानी । सगुणभजनीं प्रवर्तती किमर्थ. ॥६५४॥ आतां **ह**रीचा ऐसा अतर्क्य गुण । कीं भजती ऐसेही निपुण । तरी काय गोड नव्हे निर्गुण । जें आत्मत्वें आयतें प्रिय सर्वांस. ॥ ६५५ ॥ जरी कांहीं प्रयोजन नसे । तरी हे गोष्टी आहाच[5] दिसे । म्हणूनि म्हणतील येथें ऐसें । हें समजला सर्वज्ञ. ॥६५६॥ या गोष्टीचें प्रयोजन । तोचि जाणे भवभंजन । कीं जाणती विरळ तन्मयजन । **शु**कादिक. ॥ ६५७ ॥ कीं मोक्ष चतुर्विध । चाऱ्ही न होती विना निर्गुणात्मबोध । त्यांत कैवल्य मोक्ष तेथें शुद्ध । निर्गुणत्वेंचि उरणें. ॥ ६५८ ॥ तरी असेच आतांही निर्गुण । परी ज्ञानियांस असे निर्गुणात्मखूण । नाहींसा

---

१. अ० १२ श्लोक २ पहा. २. वाणी. ३. मुख्यत्वेंकरून. ४. परिपक्व दशेस. ५. फोल, मिथ्या, व्यर्थ.

होईल तो सत्त्वगुण । कैवल्यांत. ॥ ६५९ ॥ निर्गुण आहे आतां जैसें । पुढें याचें कैवल्यही तेंचि तैसें । अनुभवसुख सत्त्वसमरसें । कैवल्यांत तें नाहीं. ॥ ६६० ॥ जन्ममरणादिदुःखध्वंसें[1] । परी सुख अनुभवी जेव्हां परमहंस । तो स्वसुखलाभाचा अवतंस[2] । कैवल्यांत याचा असेना. ॥६६१॥ ब्रह्मीं ब्रह्मानुभव । हेंही ईश्वराचें वैभव । अमृतास स्वगोडीअनुभव । ठावा नसे तैसें कैवल्य. ॥ ६६२ ॥ एवं अनिष्टाचीच निवृत्ती । परि तेथें नसे इष्टप्राप्ती । सगुणमोक्षांत सत्त्ववृत्ती । कैवल्यमोक्षानुभवाची. ॥ ६६३ ॥ जीवन्मुक्ताचा जितां अनुभव । कैवल्यांत तें नसे वैभव । मोक्ष आणि अनुभव अभिनव[3] । सगुणमोक्षीं ज्ञानियां भक्तांसी. ॥ ६६४ ॥ जीवन्मुक्तांचा देह । तो कर्माचा निःसंदेह । भोग सरतां सोडिती निस्पृह । जे ब्रह्म होऊनि राहिले. ॥ ६६५ ॥ मग निर्गुण ब्रह्मचि उरे । आनंदानुभव न स्फुरे । सत्त्वलहरी तेही मुरे । आनंदसागरीं. ॥६६६॥ आत्मानंदानुभव । तेथें नसे हें वैभव । चुकला पुनर्भव । परि गेला अनुभव स्वसुखाचा. ॥ ६६७ ॥ चुकोनि जन्ममरण । अखंड आनंदस्फुरण । ज्ञानियां भक्तांस मोक्ष सगुण । या प्रकारें. ॥ ६६८ ॥ ते सृष्टि होतां न होती । ते प्रलयव्यथा प्रलयकाळीं न पावती । काळास अतिक्रमूनि असती । शुद्धसत्त्वें भगवदाकारेंकरूनी. ॥६६९॥ काळातें अतिक्रमूनि असती । हें चतुर्दशाध्यायारंभीं श्रीपती । प्रथम श्लोकीं निर्गुणमुक्ती । बोलोनि हें द्वितीयश्लोकीं बोलेल. ॥ ६७० ॥

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥** [अ० १४ श्लो० २.]

या ज्ञानाच्या आश्रयें । माझें समानधर्मत्व निश्चयें । ते पावले कीं जैसा मी स्वयें । तैसे तेही स्वानुभवें साकार. ॥ ६७१ ॥ सृष्टि होतां ते न होती । प्रलयकाळीं व्यथा ते न पावती । कालातीत होऊनि असती । आकारेंही साकार मी जैसा. ॥ ६७२ ॥ पद्मनाभादि माझ्या मूर्ती । सृष्टिकाळीं पवित्रकीर्ती । जैशा प्रकटती तैशा स्फूर्ती । त्यांस तेव्हां मद्रूपदेहाच्या. ॥ ६७३ ॥ प्रलयकाळीं सर्व गिळूनी । जेव्हां मी निजतों योगनिद्रेकरूनी । तेव्हां तैसेच तेही निजती म्हणोनी । प्रलयकाळीं न पावती ते व्यथा[4]. ॥ ६७४ ॥ प्रळयीं नसे ईश्वरोपाधि जैसा । सगुणमुक्तवृंदेंही[5] नसे तैसा । कालपाशाचा फांसा । जरि मज म्हणवेल तरी त्यांसही. ॥६७५॥ सेवक चरण चुरिती । त्या गुणें निजेला

---

१. नाश. २. शिरोभूषण, अलंकार. ३. नूतन. ४. दुःख. ५. समुदाय.

नृपती । तो ते क्षणीं मेला म्हणती । ते मूर्ख. ॥ ६७६ ॥ तैसा काळेंकरूनी । मी योगनिद्रें निजेलों म्हणोनी । काळें अभाव पावलों म्हणती ते सज्जनीं । तैसे मूर्ख समजावे. ॥ ६७७ ॥ मोक्ष म्हणावा तरी । कीं कालचक्र न स्पर्शे जरी । या भावें म्हणे हरी । कीं समानधर्मता माझी पावले. ॥६७८॥ याचीं साधकबाधकें । चतुर्दशाध्यायटीकेंत कौतुकें । बोलिजेतील येथें इतुकें । बोलणेंही अगत्यार्थ. ॥६७९॥ ऐशा सगुण मुक्ती । अपेक्षिल्या जिहीं जीवन्मुक्तीं । तिहीं नित्यनिजानुभवयुक्ती । केल्या भक्ति सगुणाच्या. ॥ ६८० ॥ होऊनि पक्क ज्ञानी । परिनिष्ठित सगुणध्यानीं । कीर्तनीं निर्गुणत्वें सगुणध्यानी । सगुणमोक्षीं ते सगुणातें पावले. ॥६८१॥ हा श्रुतिसिद्ध अर्थ । पुरुषार्थांत परम पुरुषार्थ । म्हणोनि जे निर्गुणानुभवें कृतार्थ । तेही यज्ञविष्णु तदर्थ कर्मे आचरती. ॥ ६८२ ॥ हा पूर्वश्लोकीं हृषीकेश । सूत्रप्राय[1] सगुणभजनलेश । पक्क ज्ञानियांस बोलिला उद्देश । सगुणमोक्षाचा जयासी. ॥ ६८३ ॥ आतां यज्ञनामकाकारणें । कोणे रीती कर्म करणें । आणि फळ कोणतें तिहीं पावणें । हें बोलतो या श्लोकीं. ॥ ६८४ ॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

कर्म करायाचें मुख्य कारण । कीं करावें सगुणयज्ञनामकातें अर्पण । या जडसंकल्पलहरींत पूर्ण । चित्समुद्र ब्रह्मचि. ॥ ६८५॥ तरंग निमाला सागरीं । अर्पण जालें यापरी । अर्पणही ब्रह्म या प्रकारीं । तयाचें. ॥ ६८६ ॥ ज्याचें अर्पण ब्रह्म । ब्रह्मचि तेंही तयाचें कर्म । तें यज्ञरूपें सगुण ब्रह्म । ब्रह्मत्वें श्रीकृष्ण वर्णितो. ॥ ६८७॥ हविर्द्रव्य ज्याणें होम । तें जो देखे ब्रह्म । अलंकारीं विना[2] हेम । काय दिसे. ॥ ६८८ ॥ अग्निही ब्रह्मचि दिसे । कीं घटाकारीं मातीच दिसे । कीं पटाआधीं तंतु गवसे । मग पटाकार. ॥ ६८९ ॥ कार्य तें कारणचि अत्यंत । हे असोत इतर दृष्टांत । अग्निब्रह्म हें तो अग्नींत । ज्वालाच सांगती अग्नीच्या. ॥६९०॥ ज्वाला अग्नीमधूनि निघती । मागुतीं त्याच अग्नींत रिघती । अग्निरूपा अग्नीनेंचि दिसती । जों असती अग्नींत. ॥६९१॥ दृष्टि न स्पर्शे अनळ[3] । तों न देखे ज्वाळ । दृष्टीस न दिसे माळ । तों सर्प कैसा भासतो ? ॥६९२॥ सर्प दिसोनी असे माळ । ज्वाळा दिसोनि आहे अनळ । अग्नि दिसोनि

१. सुताप्रमाणें सूक्ष्म. २. सुवर्णावांचून. ३. अग्नि.

आहे केवळ । ब्रह्मप्रकाशक प्रकाशाचेंही. ॥ ६९३ ॥ स्वयें दिसे सर्प साचा । असत्यास दोरावीण प्रकाश कैंचा । आकार मोळेंत सर्पाचा । जैसा ज्वालाकार अग्नींत. ॥६९४॥ ज्वाला अग्नींत अग्निरूप जैशा । अग्नि ब्रह्मीं ब्रह्मरूप तैसा । हा मैननाचा[2] मनीं ठसा । सिद्धांच्या. ॥६९५॥ एवं अग्निही ब्रह्म । त्यांत ब्रह्मचि हविरुत्तम । ब्रह्मेंचि होमिलें कीं इतकें कर्म । ज्याकरितां घडलें ब्रह्मचि तें सकळ. ॥६९६॥ '[3]अधिष्ठानं तथा कर्ता' म्हणोनी । अष्टादशाध्यायीं या श्लोकें-करूनी । पांच कर्मनिमित्तें ज्यांवांचूनी । न घडे भलती क्रिया. ॥ ६९७ ॥ त्यांत अधिष्ठानशब्दें शरीर । कर्ता अहंकार । करण नाना इंद्रियविकार । विविधचेष्टा चेष्टवी प्राणक्रियाशक्ती. ॥ ६९८ ॥ इंद्रियांचीं चाळकें दैवतें । हें पांचवें निमित्त येथें । कर्ममूळें जेथें तेथें । हींचि पांच. ॥ ६९९ ॥ पांचांमुखांची पंचारती । एकाच पितळेची आकृती । पितळ न पावतां ते विकृती । न दिसे न असे त्यावांचूनी. ॥ ७०० ॥ दिसे असे त्या धातूच करूनी । पंचारती धातूच म्हणावी त्यावरूनी । तेव्हां धातूनेंचि ओंवाळिलें म्हणूनी । कां न म्हणावें? ॥ ७०१ ॥ पांचां [4]कनकसूत्रांकरूनी । विणिला कडदोरा म्हणोनी । कनक झांकेल काय नयनीं । ब्रह्म तैसें याही पांचांत. ॥ ७०२ ॥ एवं कर्म निमित्तें पांच । असत्यें त्यांत ब्रह्मचि साच । ब्रह्मीं होमिलें त्याचा ऐसाच । अर्थ भगवद्वाक्याचा. ॥ ७०३ ॥ गतसंगमुक्तयज्ञनामकाकारणें । कर्में करी पूर्वश्लोकविवरण । तेथेंही निवारिलें अहंकर्तृत्वपण । गतसंगमुक्त म्हणोनी. ॥ ७०४ ॥ व्यतिरेक निखळ आत्मबोध । त्या अनुभवेंही त्याचा अहंकर्तृत्वविरोध । परिहरितां गेला शोध । कर्तृत्वसाक्षित्वापर्यंत. ॥ ७०५ ॥ या श्लोकीं अन्वयेंकरूनी । घटपटादि मृत्तिका तंतूचि म्हणोनी । पांचही कर्मनिमित्तें सुचवूनी । ब्रह्मेंचि होमिलें म्हणतसे. ॥ ७०६ ॥ एवं अर्पणादि चारी । अर्पण हविष्य अग्नि पांच होम करणारीं । कार्य तें कारणचि यापरी । अवघें ब्रह्म. ॥ ७०७ ॥ ऐसें कर्मी ब्रह्म । देखे जो यज्ञनामकाकारणें कर्म । करी म्हणोनि पुरुषोत्तम । पूर्वश्लोकीं वर्णी जयास. ॥७०८॥ तरि सादर कर्मी जो दिसेल । तो अपक्व म्हणावा असेल । पक्वयोगी कां ऐसा बसेल । ब्रह्मलक्षित कर्मांत. ॥ ७०९ ॥ ऐसें येथें कोण्ही म्हणती । तरी याची कृष्णास अतिप्रीती । सप्तमाध्यायांत '[5]वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः' म्हणेल. ॥ ७१० ॥ अपक्वास कैंचा हा अनुभव । हेंचि ज्ञानि-

१. हारांत. २. चिंतनाचा. ३. अ० १८. श्लो० १४ पद्य. ४. सुवर्णाच्या तारांनीं. ५. अ० ७ श्लो० १९ पद्य.

यांचें परम वैभव । तथापि अन्वय समजोनि मानव । ध्यानावांचूनि अपक्कही असती. ॥ ७११ ॥ कळलें अन्वयज्ञान । परि त्याहूनि अन्वयें विश्वात्मत्व-ध्यान । थोर म्हणोनि मधुसूदन । द्वादशाध्यायांत बोलेल. ॥ ७१२ ॥ **'ज्ञा[1]नाद्ध्यानं विशिष्यते'** म्हणोनि । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** या श्लोकेंकरूनी । द्वादशीं श्रीकृष्ण या वचनीं । म्हणेल कीं ध्यानें स्थिति बाणते[2] ज्ञानाची. ॥ ७१३ ॥ विश्व ब्रह्म या बोधीं । ज्यासि बाणे समाधी । तो पक्कज्ञानी मोक्ष साधी । जितांच देहप्रारब्धें. ॥ ७१४ ॥ प्रस्तुत ज्ञानी या श्लोकीं । जो आतां वर्णिला कीं । अर्पण हविष्यादि अवलोकी । सर्वेही ब्रह्म. ॥ ७१५ ॥ तो अपक्क नव्हे कधीं । कीं ब्रह्मचि कर्म ऐशा बोधीं । लाधला[3] योगी समाधी । कर्म म्हणिजे प्रपंचही अवघा. ॥ ७१६ ॥ कीं विश्व ईश्वराचें कर्म । तें कर्म कळलें कीं ब्रह्म । अलंकारसृष्टि अवघी हेम । कर्म हेमकाराचें[4]. ॥ ७१७ ॥ हें आधीं जालें ज्ञान । आणि विश्वात्मत्वाचें बहुध्यान । घडलें त्यास तेव्हां समाधान । चित्त पावतां समाधि त्याला बाणला. ॥ ७१८ ॥ तरीच यज्ञरूप कर्म । अर्पण हविष्यादिही ब्रह्म । कार्य तितकें कारण परम । चित्त पावलें कारणीं स्थिरत्व. ॥ ७१९ ॥ विश्व ब्रह्म हें नव्हे ज्ञान । आणि त्याचें बहुत न घडे ध्यान । तों कर्म ब्रह्मचि ऐसें समाधान । न पावे चित्त. ॥ ७२० ॥ यालागीं कर्म ब्रह्म या बोधीं । बाणला म्हणतां समाधी । हा शब्द भावार्थे साधी । अर्थ पूर्वोक्त अभ्यासाचा. ॥ ७२१ ॥ एवं ब्रह्मकर्म समाधि जयालागीं । तो हा म्हणावा लागला योगीं । देह जितांच तो भोगी । कैवल्यसुख. ॥ ७२२ ॥ तरी जीवन्मुक्त या नांवें । याणेंही आतां काय पावावें । म्हणोनी हा श्लोक चालिला ज्या भावें । तें बोलतो. ॥ ७२३ ॥ **'ब्रह्मैव तेन गंतव्यं'** म्हणोनी । सगुणब्रह्म सुचवूनी । ऐसें निर्गुणप्राप्ती करूनी । भजतां पावावें म्हणे ब्रह्म सगुण. ॥७२४॥ **'ब्रह्मैव'** या वचनीं । 'ब्रह्म' आणि 'एव' हे ऐसे शब्द दोनी । सगुणत्व 'एव' शब्दें करूनी । सूचवितो येथें. ॥ ७२५ ॥ 'एव'शब्दें निश्चय । कीं सगुण जऱ्ही मायामय । किरण जळरूप तऱ्ही निःसंशय । किरणचि ते. ॥ ७२६ ॥ जळाभास किरणींच निघे । असे दिसे त्यांतचि निघे । मायांजलविलास अवघे । स्वयें किरणचि निश्चित. ॥ ७२७ ॥ मध्यान्हीं किरणीं प्रकटे । लय पावोनि सायान्हीं न आटे । प्रतिदिनीं निघे रिघे न दाटे ।

---

१. अ० १२ श्लो० १२ पहा. २. ठसते, प्रकट होते. ३. पावला. ४. सोनाराचें.

द्वितीयत्वें रविकिरणीं. ॥ ७२८ ॥ ऐसी नित्यमुक्ताची नित्यमुक्ती । चित्स्वरूपीं शुद्ध चिच्छक्ती । ब्रह्मीं ब्रह्मानुभव अभिव्यक्ती । ते माया ब्रह्मीं ब्रह्मचि.॥७२९॥ सुवर्णाचे विकार । घडती मोडती नश्वर । तैसें ब्रह्मचि अक्षर । चराचर क्षररूपही. ॥ ७३० ॥ ऐसें चराचर क्षर । त्यांत चिदंश जीव प्रतिबिंब अक्षर । मुख्य अक्षर तो उपाधिसहित ईश्वर । तो उत्तमपुरुष [1]पंचदशीं वर्णिजेल. ॥ ७३१ ॥ प्रस्तुतीं चराचर । जैसे हेमीं अलंकार नश्वर । तैसें अक्षरब्रह्म जग क्षे[2]र । क्षराक्षरैक्य हेमा[3]लंकारदृष्टांतें. ॥ ७३२ ॥ तैसा नव्हे ईश्वरोपाधी । ज्याणें ब्रह्मीं ब्रह्मात्मसमाधी । भिन्नत्व दिसोनि नव्हे कधीं । तो उपाधि अधिष्ठानावेगळा. ॥ ७३३ ॥ अलंकाररूप मोडे । तें न घडितां पुन्हां न घडे । परि पुन्हां न भासे ऐसा न बुडे । जळाभास किरणीं. ॥ ७३४ ॥ मध्यान्हीं किरणीं जळ । उठतां स्वयेंचि प्रकटती कल्लोळ । तैसें स्वेच्छेनें केवळ । पद्मनाभादिदेह ईश्वराचे. ॥ ७३५ ॥ भ्रमयुक्त दृष्टीविना । दोरीं सर्प भासेना । न लगे किरणींच्या जीवना । द्रष्टा देखायास तैसा. ॥ ७३६ ॥ कीं किरणांस द्रष्टा जरि पाहे । तऱ्ही दिवसपूर्वभागीं जळ न वाहे । यालागीं द्रष्टा न पाहे तऱ्ही आहे । मध्यान्हीं जलाभास उष्णांत. ॥ ७३७ ॥ ये रीती अविद्याकल्पित । नव्हे ईश्वरोपाधी निश्चित । तो ब्रह्मीं ब्रह्मत्वेंचि अत्यंत । अनादिमायोपाधि सगुणाचा. ॥ ७३८ ॥ एवं उपाधियुक्तही ब्रह्म । तऱ्ही तें ब्रह्मचि परम । यालागीं म्हणे पुरुषोत्तम । **'ब्रह्मैव गंतव्यं'** म्हणोनी. ॥ ७३९ ॥ **'गंतव्यं'** म्हणिजे 'पावावें' । ज्यास तें **ब्रह्मैव** म्हणे या भावें । कीं सगुण म्हणावें नांवें । परि सगुणत्वही ब्रह्मैव. ॥ ७४० ॥ पोटीं श्रुति आणि मुखीं श्लोक । प्रतिश्लोक ऐसा उत्तमश्लोक । बोले त्याचा [4]अर्थविलोक । श्रुतिच अवधिया सूचवी. ॥ ७४१ ॥ असोनि निर्गुण ज्ञान । निर्गुणत्वें सगुणध्यान । करितां नित्यसुखानुभवनिधान । सगुणमुक्ती ऐसें श्रुति बोले. ॥ ७४२ ॥ श्रुत्यनुरूपेंचि श्लोक । वाखाणावा ऐसें उत्तमश्लोक । कोठें बोलिला एक । कीं न साधे अबाधितार्थ त्याविणें. ॥ ७४३ ॥ कीं ज्ञानें ब्रह्म पावावें । तें जरी निर्गुण म्हणावें । तरी निर्गुणात्मत्व आधीं बाणावें । तेव्हां ब्रह्मकर्मसमाधि बाणेल. ॥ ७४४ ॥ ब्रह्मकर्मसमाधिनिष्ठ परम । ज्याणें आतां पावावें म्हणतो ब्रह्म । त्यास तों नसे अविद्यावरणभ्रम । कीं ब्रह्म आपण नव्हे म्हणोनी. ॥ ७४५ ॥ जड भाग

---

१. गीतेच्या १५ व्या अध्यायांत. २. नाशिवंत. ३. सुवर्णालंकारांच्या उपमेनें (नाशिवंत). ४. अवलोकन.

अवघा निरसावा। तेंव्हां आत्मा ब्रह्मत्वें समजावा। प्रथम अनुभव हा म्हणावा। व्यतिरेकबोध. ॥ ७४६ ॥ मग अनात्मत्वें जो जडभाग। निरसूनि कळे आत्मानात्मविभाग। त्या जडास आत्मयाचा योग। पटीं तंतु ऐसा पहावा. ॥ ७४७ ॥ या नांवें अन्वय। कीं आपण ब्रह्म चराचरमय। ध्यानें बाणतां हा निश्चय। जडही ब्रह्म ऐसा बाणे समाधी. ॥ ७४८ ॥ तो हा ब्रह्मकर्मसमाधिनिष्ठ। जो आदी ब्रह्मत्व पावोनि स्पष्ट। ब्रह्म आपणचि हा उत्कृष्ट। अनुभव पावोनि यज्ञ करी. ॥ ७४९ ॥ जो पावलाच ब्रह्म निर्गुण। त्याणें आतां ब्रह्म पावावें कोण?। ऐसा विचार करितां ब्रह्म सगुण। न म्हणतां अर्थच न घडावा. ॥ ७५० ॥ आतां ब्रह्मचि त्याणें पावावें। म्हणिजे फलांतरास नव जावें। तरी ब्रह्म पावला नाहीं म्हणावें। पावावें ब्रह्मचि याउपरी. ॥ ७५१ ॥ येथें क्लिष्टकल्पना। केल्या जरी नाना। तऱ्ही तो पांडित्याचा वृथा तनाना। शब्दशक्ति ऐसी ये स्थळीं. ॥ ७५२ ॥ आतां जैसा तैसा करावा वाक्यार्थ। तरी सांपडतां प्रमाणसिद्ध मुख्यार्थ। कोण अंगिकारील बाधितार्थ। आणि क्लिष्टकल्पना. ॥ ७५३ ॥ ब्रह्मरूप यज्ञ प्रांजळ। बोलोनि बोलिलें त्याचें फळ। तो त्या यज्ञाहूनि पूर्वींच केवळ। फळचि होऊनि तो आहे. ॥ ७५४ ॥ बाधितार्थ ऐसा। सर्वज्ञ बोलेल कैसा। अर्थ वाखाणिती जैसा तैसा। वाक्यार्थ घडो म्हणोनि. ॥ ७५५ ॥ एवं पावला आहे तें निर्गुण। त्या प्राप्तीनेंचि ऐसा निपुण। यज्ञ करूनि फळ त्याचें ब्रह्म सगुण। तो पावेल. ॥ ७५६ ॥ असोनिही निर्गुण। तें आत्मत्व अनुभवी सत्त्वें निपुण। त्या सत्त्वें पावावें सगुण। सगुणसमानधर्मत्व. ॥ ७५७ ॥ निराकारीं निराकार। जें सत्त्व त्यास गुणसंस्कार। सगुण भजनें वारंवार। होतां [१]भृंगकीटकन्यायें सगुणसत्त्व. ॥ ७५८ ॥ आतां **'न स पुनरावर्त्तते'**। म्हणोनि वेदश्रुति बोलते। हा निर्गुणीं पावोनि कैसा परते। सगुणाकडे म्हणावा. ॥ ७५९ ॥ तरी निर्गुणात्मत्वास कांहीं। [२]पुनरावृत्ति दिसत नाहीं। अनुभवी ज्या सत्त्वें तेंही। न परते जीवोपाधिकत्वा. ॥ ७६० ॥ एवं पाहतां कांहीं। विरुद्ध अणुमात्र दिसत नाहीं। दूरदृष्टीं पाहतांही। सुखानुभव सगुणमोक्षींचा. ॥ ७६१ ॥ अर्थ अबाधित झाला सिद्ध। परी नव्हे श्रुतिप्रसिद्ध। तरी श्रुत्यर्थचि शुद्ध। या श्लोकीं प्रकटतो. ॥ ७६२ ॥

---

१. भृंगाच्या तीव्र ध्यानानें कीटक भृंगरूप होतो, तसें. २. पुनर्जन्म.

श्रुति—**'यदा पश्यन्पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ।**
**तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति दिव्यम्॥'**

**'विद्वान्'** म्हणिजे ज्ञानवंत । **'पश्यन्'** म्हणिजे पाहणार अत्यंत । व्यतिरेक अन्वय दोन्ही या दों शब्दांत । ब्रह्मज्ञानानुभव श्रुति बोले. ॥ ७६३ ॥ आदीं आपणास जाणे । त्यास भलतें ज्ञान बाणे । तो मूढ जो आपणास नेणे । हें सर्व शहाणे जाणती. ॥ ७६४ ॥ ज्याणें जडावेगळें आपणा । ओळखिलें तो **विद्वान्** व्यतिरेकी शाहणा । **पश्यन्** पाहणार देखणा । जो तंतु घेऊनि पट पाहे. ॥ ७६५ ॥ काय दिसतें म्हणोनी । पुसतां पट एकास दाखवूनी । पटचि दिसतो म्हणेल नयनीं । तो डोळे असोनिही आंधळा. ॥ ७६६ ॥ तंतूच दिसतो पट । दिसोनि नाहीं पट निपट । ऐसें जो बोलेल प्रकट । तोचि डोळस देखणा म्हणावा. ॥ ७६७ ॥ जर्डी ब्रह्मात्मबोधीं । बुद्धिदृष्टि स्पर्शोनि आधीं । जडविषय इंद्रियें पाहे समाधी । विश्वात्मत्वीं बाणला तयासी. ॥७६८॥ **'पश्यन्'** शब्दें देखणा । विश्व ब्रह्म पाहे जो शाहणा । ऐसा पुरुष पाहे सगुणा । रुक्मवर्णास ऐसें श्रुति बोले. ॥ ७६९ ॥ **'रुक्म'** म्हणिजे सुवर्ण । अर्थ कीं सुवर्णासारिखा ज्याचा वर्ण । कर्ता ईश पुरुष सगुण । त्यास तो ज्ञानी पाहे जो देखणा तत्त्वतां. ॥ ७७० ॥ जेव्हां ऐसा ध्यानीं । सगुण परमात्मा देखे ज्ञानीं । तेव्हां परम साम्य त्याचेंच पात्रें म्हणोनी । श्रुति बोले. ॥ ७७१ ॥ साम्य दिव्य आणि परम । म्हणिजे जैसें साकार सगुण ब्रह्म । होय हाही त्यासम । परम आणि दिव्य. ॥ ७७२ ॥ त्यासम म्हणिजे त्यासारिखें शरीर । चतुर्भुज शंखचक्रपीतांबर । परम म्हणिजे जैसा ईश्वराचा आकार । अखंडानंदानुभव सत्त्वाचा. ॥७७३॥ दिव्य म्हणजे अलौकिक । जो देह नव्हे पांचभौतिक । ऐसें दिव्य परम साम्य तो उपासक । पावे समीप परमेश्वराच्या. ॥ ७७४ ॥ **उप** म्हणजे समीप सामीप्य । साम्य समत्वें नुसतें सारूप्य । एवंच सालोक्यही प्राप्य । ज्ञानियांस ध्यानें सगुणाच्या. ॥७७५॥ कोण्ही म्हणती कीं हें कर्मफळ । तरी कर्म सारूनि सकळ । पापपुण्य पुनरावृत्तिमूळ । त्यावेगळा होऊनि हे गति पावतो. ॥७७६॥ ज्ञानें जाळूनि संचित । क्रियमाणें न होऊनि लिप्त । प्रारब्धभोगें समाप्त । करूनियां. ॥ ७७७ ॥ त्रिविधही पुण्यपाप । नाशी हा ज्ञानप्रताप । सगुणध्यानें पावे रूप । जगदीश्वरासारिखें. ॥ ७७८ ॥ पुनरावृत्ति चुकली ज्ञानें । आनंदानुभव राहिला सगुणध्यानें । सगुणभजन या अनुसंधानें । श्रुति वर्णिती ज्ञानियांचें. ॥ ७७९ ॥ निर्गुण सगुण दोनी मुक्ती ।

दोन्ही **गी**तेंत भगवदुक्ती । परी मुख्यत्वें अभिव्यक्ती । सगुणमुक्तीची. ॥ ७८० ॥ अज्ञानाचा परिहार । आणि सगुणभक्तांचा बडिवार । ज्ञानयुक्त भक्तिच वारंवार । थोर करूनि वर्णिली या **गी**तेंत. ॥ ७८१ ॥ **गी**ता संपतां **श्री**पती । हेंचि म्हणेल **अर्जुना**प्रती । कीं धर्म्यसंवाद हा ये रीती । तुझा माझा. ॥ ७८२ ॥ धर्म्यशब्दें सधर्म । जें सधर्म सगुणब्रह्म । तत्संबंधी हा परम । संवाद. ॥ ७८३ ॥ मुख्यत्वें निर्गुणसंवाद जाला असता । तरी नैर्धर्म्यसंवाद याचें नांव ठेविता । आणि निर्गुणोपासकचि थोर म्हणता । सगुणोपासकांपरिस. ॥ ७८४ ॥ द्वादशीं ज्ञानिया सगुणोपासकास । थोर म्हणेल निर्गुणोपासकापरिस । अधिक क्लेश आणि मुक्तींत ज्यास । नसे अनुभवानंदाचा. ॥ ७८५ ॥ आणि या श्लोकीं श्री**कृष्ण** । भजन बोलिला तेंही सगुण । अन्वयज्ञानीं दावी खूण । सगुणत्वाची. ॥ ७८६ ॥ राजविद्या राजगुह्यातें । सांगतां हीं धर्म्य म्हणेल त्यांतें । कीं विश्वब्रह्म या मायाशबलितातें । ज्ञानातेंही धर्म्य म्हणे. ॥७८७॥ मायामय जग । ब्रह्मीं जैसा हेमीं नग । या ज्ञानासही म्हणे **श्री**रंग । धर्म्य म्हणिजे हाचि अनुभव सगुणाचा. ॥ ७८८ ॥ धर्म्यकर्मरूप । ज्ञान नैष्कर्म्यस्वरूप । ज्ञानास धर्म्य म्हणतां विरूप । केलें जाणों ग्रंथासी. ॥७८९॥ धर्म्य कर्मचि परि त्याचें कारण । माया आणि निर्गुण । मिळोनि जैसें ब्रह्म सगुण । तैसें धर्म्य ब्रह्मज्ञान विश्वरूप. ॥ ७९० ॥ येथें अर्पण हविष्यादि सकळ । ब्रह्मचि दिसे केवळ । हविष्याद्याकार शबल । सगुण ब्रह्मत्व धर्म्य हें. ॥ ७९१ ॥ द्वादशींही याचवरूनी । **'ये[1] तु धर्म्यामृतमिदं'** म्हणोनी । धर्म्यपदेंचकरूनी । अध्यायांतीं भजन वर्णील. ॥ ७९२ ॥ येथें **'ब्रह्मैव तेन गंतव्यं'** म्हणोनी । अनन्यगतिकत्वें करूनी । श्रुत्युक्तसगुणप्राप्ति स्थापूनी । सूचविला निर्णय. ॥ ७९३ ॥ निर्गुणत्वें सगुणा । उपासिती आणि ध्यानधारणा । सगुणत्वें मद्भक्त धरिती त्या खुणा । या श्रुत्युक्तक्रमें द्वादशींही बोलेल. ॥ ७९४ ॥

> **'ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
> **अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥'** [अ० १२ श्लो० ६.]

येथें **'यज्ञायाचरतः कर्म'** । म्हणिजे सगुणीं समर्पाया करी कर्म । **'मयि सर्वाणि कर्माणि'** ऐसें द्वादशीं **पुरु**षोत्तम । हेंचि बोलेल. ॥ ७९५ ॥

---

१ अ० १२ श्लो० २० पहा.

**'अनन्येनैव योगेन'** । म्हणिजे अद्वैतयोगेंचि करून । उपासिती आणि ध्यान । श्रुत्युक्तरीतीं माझें करिती. ॥ ७९६ ॥ अनन्ययोगें उपासिती । तें अर्पण हविष्यादि ब्रह्मचि ये रीती । इत्यादि सर्वत्र **श्री**पती । ज्ञानियांस सगुणोपासनाच बोलेल. ॥ ७९७ ॥ बोलोनि निर्गुणमात्रोपासक । म्हणेल त्यांस क्लेश अधिक । हें पुढें उदंड कौतुक । स्थळोस्थळीं तो वर्णील. ॥ ७९८ ॥ निर्गुणोपासक व्यर्थ । येथें अन्यथा करिती अर्थ । बोलती अर्पणशब्दार्थ । स्रुक्स्रुवादिपात्रें म्हणोनी. ॥ ७९९ ॥ अर्पण म्हणिजे जिहीं अर्पिजे तें । अर्पिजेतें म्हणजे होमिजेतें । त्या होमपात्रांस म्हणे म्हणिजेतें । अर्पण म्हणोनी. ॥ ८०० ॥ पात्रें[1] होमाचीं ब्रह्म । तेव्हां ब्रह्म नव्हे काय अर्पणधर्म । क्लिष्टकल्पना वृथा श्रम । स्पष्ट दिसतो. ॥८०१॥ ब्रह्मत्वें वर्णिलें पात्र । तरी कां **न** वर्णिले मंत्र । आणि ब्रह्मत्वें देव विचित्र । तेंही कां नाहीं सांगीतलें ? ॥ ८०२ ॥ जैसीं हीं अनुक्तें घ्यावीं । तैसींच पात्रेंही म्हणावीं । अर्पणशब्दें कां पात्रें वाखाणावीं । क्लिष्ट कल्पितें. ॥ ८०३ ॥ ज्ञान जालियावरी । कर्म ब्रह्मीं अर्पिलें जरी । तें बाधक होईल काय परी । ज्ञानियांस सगुणभजन सिद्ध होतें हा धाक. ॥ ८०४ ॥ म्हणूनि मोडिती अर्थ । ग्रंथार्थ नाशिती व्यर्थ । त्यांसही भिऊनि किमर्थ । वाखाणावें अन्यथा. ॥ ८०५ ॥ द्वादशीं भक्त थोर म्हणोनी । वर्णिला तो म्हणे अज्ञानी । तरी श्रेष्ठ अज्ञानी ज्ञानियांहूनी । विरुद्ध बोलिला काय **भ**गवंत ? ॥ ८०६ ॥ तें **भ**गवंताचें बोलणें । अनधिकारियाच्या उत्साहाकारणें । ऐसें विरुद्धार्थ दढीकरण । श्रीकृष्णेंचि निषेधिलें शेवटीं. ॥ ८०७ ॥ **'ये[2] तु धर्म्यामृतमिदं'** या श्लोकीं । हें अध्यायांतीं बोलेल कीं । हें यथोक्तरीति लोकीं । जे उपासिती. ॥ ८०८ ॥ ते प्रिय मातें अत्यंत भक्त । कीं अध्यायांत जें पूर्वोक्त । तें उपासिती यथोक्त । जें जैसें बोलिलें तैसेंची. ॥ ८०९ ॥ हीं पुढें विवरणें । उदंड आहेत करणें । ज्ञाननिष्ठींही याकारणें । सगुणीं भजावें हा सिद्धांत. ॥ ८१० ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले **उ**त्तमश्लोक । त्याचें निमित्त आधीं सुज्ञ श्लोक । परिसोत अनुसंधानाकारणें. ॥ ८११ ॥ पूर्वश्लोकीं यज्ञरीती । वर्णिली सगुणब्रह्मस्थिती । आतां निर्गुणलय म्हणिजे सर्ववृत्ती । निर्गुणीं होमणें. ॥ ८१२ ॥ यावेगळेही यज्ञ । करिती कर्ममार्गाभिज्ञ । तेही प्रसंगें सर्वज्ञ । बोलों पाहतो या श्लोकीं. ॥ ८१३ ॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

---

१. होमपात्रें. २. अ० १२ श्लो० २० पहा.

अगा! कोण्ही कर्मयोगी । दैवयज्ञचि देवांलागीं । करिती होमिती यथाविभागीं । इंद्रादिदेवां हविष्य. ॥ ८१४ ॥ पूर्वोक्त सगुणब्रह्मयज्ञ । जो यजी ब्रह्मत्वें ब्रह्मज्ञ । तोही इंद्रादिदेवांच्या नांवें अभिज्ञ । होमीच तें हविर्द्रव्य. ॥ ८१५ ॥ परि इंद्रादि जें जें दैवत । तें तें ब्रह्मचि निश्चित । म्हणोनि मुख्य यज्ञ सर्वात्मा अच्युत । यज्ञनामक श्रीविष्णु हें जाणे. ॥ ८१६ ॥ अतएव 'अधियज्ञोऽहमेवात्र'[1] । ऐसें अष्टमीं कमलनेत्र । बोलेल कीं नाना जीव देह विचित्र । परि अधियज्ञ मीचि या देहीं ज्या त्यां-चिया. ॥८१७॥ अधिष्ठुनि सर्वही यज्ञ । देहीं साक्षी फलप्रद अधियज्ञ । तो सर्वात्मा सर्वज्ञ । तोचि सर्व देवताही यज्ञांच्या. ॥ ८१८ ॥ त्या याजकां पूर्वोक्तांहूनी । वेगळें कर्म यज्ञनिष्ठ म्हणोनी । सांगतों कीं देवांच्या उद्देशेंचि करूनी । आणखी कर्मयोगी यजिती. ॥ ८१९ ॥ पूर्वोक्त नव्हे देवताकिंकर । जो ज्ञानीं सगुणीं सादर । हें या अर्धश्लोकें दामोदर । स्पष्ट बोलिला. ॥ ८२०॥ आतां निर्गुणाचेच उपासक । त्यांचेंही विलक्षण यज्ञकौतुक । सांगोनि पूर्वोक्तांस श्रीवत्सांक । वेगळें निवडितो. ॥ ८२१ ॥ कीं पूर्वीं ज्यांस बोलिलों मी । तो ब्रह्मत्वें अग्नि देखोनि होमी । यावेगळें निर्गुणीं केवळ ब्रह्मीं । यज्ञरीतीच करूनी होमिती. ॥ ८२२ ॥ तें ब्रह्मचि केवळ । अग्नि भाविती कीं वृत्ति सकळ । हविष्यरूपें जळती म्हणोनि अनळ[2] । ब्रह्मचि भाविती. ॥८२३ ॥ परि यमनियमादिसंपन्न । त्यांसचि तो यज्ञ होय निष्पन्न । म्हणूनि सांगावी परिच्छिन्न । यमनियमसंपत्ति आधीं. ॥ ८२४ ॥ ते यज्ञरूप समाधी । साधे तो साधकचि तें आधीं । साधकांचें साधकत्व यास्तव बोधी । श्रीकृष्ण पहिलें या श्लोकीं. ॥ ८२५ ॥

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

श्रोत्रादि जें जें इंद्रिय । तें तें इच्छी आपुलाला विषय । तो विषय मेळवावा हा निश्चय । विषयनिष्ठ बुद्धीचा. ॥ ८२६ ॥ संकल्पविकल्परूपें करूनी । मनचि नानारूपें धरूनी । कल्पना करी आश्रय धरूनी । विषयनिष्ठ बुद्धीचा. ॥ ८२७ ॥ ते बुद्धि विवेकारूढ । होऊनि धरी वैराग्य दृढ । तेव्हां स्वहिततत्पर प्रौढ । आवरी मनातें. ॥८२८॥ तें आटोपितां मन । राहे विषयचिंतन । तेव्हां इंद्रियवृत्तीचें गमन । विषयांकडे घडेना. ॥ ८२९ ॥ सरली इंद्रियांची

---

१. अ० ८ श्लो० ४ पद्य. २.अग्नि.

तळमळ । राहिली मनाची डळमळ । मुख्यसंयमाचा अनळ । पेटतां ऐसा. ॥ ८३० ॥ विषयांचें करी स्मरण । तरी इंद्रियांसि इंद्रियपण । तें राहतां त्याची खूण । इंद्रियत्वें स्फुरेना. ॥ ८३१ ॥ तरी काय इंद्रियें पळालीं । तैसें नव्हे संयमाग्नींत जळालीं । स्मरणें जेधवां गळालीं । विषयाचीं. ॥ ८३२ ॥ तरी काय आपणा आपणें । जाळूनि घेतलें इंद्रियगणें । तैसें नव्हे याणें । संयमाग्नींत होमिलीं. ॥ ८३३ ॥ हा इंद्रियांचा संयम । यालाचि म्हणावें यम । येथेंचि सुचवी नियम । श्रीकृष्ण त्यांचा. ॥ ८३४ ॥ सर्वथा विषयांचा त्याग । तरीच हा साधे योग । प्रारब्धें घडे विषयभोग । तो त्यास दंड बळवंताचा. ॥८३५॥ अपेक्षेवांचूनि भोग । प्रारब्धें विषयेंद्रिययोग । तेथें नसे आग्रहाचा रोग । तो ज्ञेय उत्तरार्धीं अन्याचा. ॥ ८३६ ॥ ते रीती इतरांकडे गेली । तेव्हां यांकडे हेचि लागली । कीं सर्वथा इंद्रियें होमिलीं । संयमाग्नीं. ॥८३७॥ इंद्रियें आवरूनीच असावें । तेव्हां निर्जनस्थळीं वसावें । कडेकपाटीं वनीं बसावें । गलित[1]पर्णादि भक्षूनि. ॥ ८३८ ॥ सर्वथा इंद्रियांचा संयम । न घडे जों ऐसा नव्हे नियम । अन्यथा न घडे होम । इंद्रियांचा. ॥ ८३९ ॥ गलितपर्णादि भक्षण । तें नव्हे इंद्रियवृत्तींचें लक्षण । वासनेपासून जतन रक्षण । हाचि होम इंद्रियांचा. ॥ ८४० ॥ ऐसे यमनियम । ये जन्मीं अथवा अनेक जन्म । घडतां ब्रह्मीं वृत्तिनियम । घडे तें पुढिल्या श्लोकीं सांगणें असे. ॥८४१॥ सर्वसंगपरित्यागी । ते हे सांगितले योगी । जे विषयेंद्रियसंयोगी । होम भाविती ते एक अन्य. ॥ ८४२ ॥ ब्रह्मसमाधीची अपेक्षा । जेथें वृत्ति न येती लक्षा । त्या विरक्तांस उपेक्षा । सर्वथा विषयांची. ॥ ८४३ ॥ कुटुंबी स्वजनीं शरीर । वर्तवूनिही अत्यंत धीर । लागों नेदिती वासना[2]समीर[3] । वैराग्याच्या दीपासी. ॥ ८४४ ॥ कीं इतरांचें श्रोत्रादि जें जें इंद्रिय । त्यांचा शब्दादि जो जो विषय । त्या विषयेंद्रिययोगीं निश्चय । बुद्धि धरी रागद्वेषांची. ॥ ८४५ ॥ गोड लागतां भोग । उपजे राग म्हणिजे अनुराग । वाइटा विषयांचा होतां योग । द्वेषकांटाळा अनावडी. ॥ ८४६ ॥ विषय जेव्हां गोड वाटे । तेव्हां वासनेस फुटती फांटे । वाईट लागतां हर्ष खुंटे । आणि उपजे विषाद. ॥ ८४७ ॥ विषाद आणि हर्ष । विषयभोगी हे दोन्ही दोष । न उपजे ऐसा युक्तिविशेष । तो एक यज्ञ करिती कितीएक. ॥ ८४८ ॥ कीं अग्निरूप इंद्रियांतें । भावूनि त्यांत विषयातें । होमिती यजितां या यज्ञातें । हर्षविषादांतें नातळती. ॥ ८४९ ॥

---

१. गळलेलीं पानें इत्यादि. २. इच्छा. ३. वायु.

यांचाही इंद्रियांवरी । संयम असे याचपरी । त्यांवेगळे हे अन्य ऐसें हरी । अन्यशब्दें बोलतो. ॥ ८५० ॥ भोग घडला मला । ऐसें स्फुरे मीपणाला । तेव्हां वरी पडे घाला । रागद्वेषांचा. ॥ ८५१ ॥ इंद्रियविषयांतें जाणे । तों तो होमचि बाणे । मज भोग जाला ऐसें न म्हणे । हर्षविषाद भोगीं मग कैंचा ? ॥ ८५२ ॥ एक भोगूनिही भोग । साधिती ऐसा योग । तुटावया भवरोग । उपाय ऐसे. ॥ ८५३ ॥ ऐसे उपाय आधीं । तेव्हां साधे ब्रह्मसमाधी । तो ब्रह्मसमाधि यज्ञरूपें बोधी । श्रीकृष्ण आतां या श्लोकीं. ॥ ८५४ ॥

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

पूर्वश्लोकीं जो साधक । त्यावेगळे सिद्ध निर्गुणोपासक । त्यांचा समाधियज्ञ आतां आइक । अगा **अर्जुना** ! ॥ ८५५ ॥ कीं चित्त जें शुद्धसत्त्ववृत्ती । ज्या वृत्तीनें सर्ववृत्ति स्फुरती । जीच्या जीवनें आत्मचैतन्यें जितीं । शरीर इंद्रियें प्राण. ॥ ८५६ ॥ नेत्रीं आणि शरीरीं । दीपा एकाचेंचि तेज परी । नये नेत्रांची सरी । शरीरास. ॥ ८५७ ॥ देह आणि दीपाची ज्योती । नेत्र दोहींस पाहती । ते नेत्र दीपीं स्थिर राहती । न दिसे तेव्हां आणिक. ॥८५८॥ आत्मप्रकाशें ये रीती । सर्वा वृत्तींस जाणे चित्तवृत्ती । तीस बाणतां स्वरूपस्थिती । रजतमस्फूर्ति मग कैंच्या. ॥ ८५९ ॥ सत्त्ववृत्तीचें चपलपण । होतां चळती प्राण । तेधवां इंद्रियांचे गण । विषय घेती. ॥ ८६० ॥ चित्त स्वरूपीं मुरे । चंचलत्व प्राणांचें सरे । इंद्रियवृत्तीस न स्फुरे । विषय तेव्हां. ॥ ८६१ ॥ तें इंद्रियांचें कर्म । आणि प्राणांचे चंचलत्वधर्म । न उरती जेव्हां निखळब्रह्म । चित्त लक्षी एकाग्र. ॥ ८६२ ॥ एवं इंद्रियें आणि प्राण । दोन्ही रजोगुण । तमविषयाचें कारण । रजतम तेव्हां न स्फुरे सत्त्वासी. ॥ ८६३ ॥ कीं सत्त्वाचें सत्त्वपण । निर्गुणीं जालें निर्गुण । विना चिदात्मत्वखूण । न स्फुरे जेथें आणखी. ॥ ८६४ ॥ चित्त आत्मस्वरूपावीण । नाठवी अवलंबी तेचि स्वात्मखूण । यास म्हणती निपुण । चित्तसंयम म्हणोनि. ॥ ८६५ ॥ याच संयमालागीं । **'योग'** म्हणती पातंजलादि योगी । कीं रजतमवृत्ति वियोगी । योग चित्तचैतन्याचा. ॥ ८६६ ॥ स्पर्शोनि नित्यचैतन्य । रजतमवृत्ती स्मरे अन्य । म्हणऊनि योगी परम धन्य । योग न म्हणती तो चित्ताचा. ॥ ८६७ ॥ कीं स्पर्शोनि रज्जूस दृष्टी । तदाश्रयें मिथ्या सर्पसृष्टी । देखे वृथा होय कष्टी । नव्हे तो योग रज्जु दृष्टीचा. ॥ ८६८ ॥ एवं चित्तचैतन्ययोग । तोचि कीं

रजतमवृत्तिवियोग । रज्जुत्वें रज्जुदृष्टिसंयोग । चित्तचैतन्ययोग तो ऐसा. ॥ ८६९ ॥ ऐसेंचि योगशास्त्र । जेथें योग लक्षणें विचित्र । या निर्विकल्प योगाविषयीं सूत्र । ऐसेंची. ॥ ८७० ॥

पातंजलसूत्र—'योगश्चित्तवृत्तिनिरोधः ।'[1]

रजतमाकारवृत्ती । चित्तामाजीं ज्या स्फुरती । त्या वृत्तींच्या निरोधीं जे स्थिती । ते स्थितीच योग. ॥८७१॥ दोंचा जो संयोग । त्यास म्हणावें योग । तरी निरोधी इतर वृत्तींचा वियोग । तेव्हां चित्तचैतन्ययोग आयता. ॥ ८७२ ॥ एवंच संयमचि चित्ताचा । तो योग ऐशा शास्त्रकारांच्या वाचा । तो आत्मसंयोगचि साचा । अग्नि म्हणे श्रीकृष्ण. ॥ ८७३ ॥ ऐसा आत्मसंयम जेधवां । न स्फुरती प्राण इंद्रियें तेधवां । तीं त्या आत्मसंयमयोगाग्नींत तेव्हां । होमिलीं म्हणावीं. ॥ ८७४ ॥ कीं रजतमवृत्ती । ज्या निमित्तें स्फुरती । चिदग्नींत जाली आहुती । तयांची ही. ॥ ८७५॥ आहुति अग्नींत होमिली । ते अग्नींत अग्निरूपचि देखिली । अनुभवस्थितींत लेखिली । ब्रह्मीं तथापि. ॥ ८७६ ॥ हेचि अवस्था उन्मनी । मन ब्रह्मचि जालें म्हणोनी । हेचि शुद्ध तुर्या[2] सज्जनीं । लेखिली अवस्था. ॥ ८७७॥ विश्व दिसे नयनीं । ते जागृतीं विश्व अभिमानी । अंध बधिर यासही रसनादिकीं करूनी । रसस्पर्शें कळे जागृतींत हें विश्व. ॥ ८७८ ॥ नव्हे विश्व जे स्वप्नकृत । तें जीवोपाधिनिर्मित । ईश्वरकृत जें जाणे जागृत । निर्विकल्पसमाधींत हें स्फुरेना. ॥ ८७९ ॥ इंद्रियकर्में राहती । कैंची तेव्हां जागृती । नव्हे स्वप्नही कीं वृत्ती । न करिती कांहीं कल्पना. ॥ ८८०॥ जरी म्हणावी सुषुप्ती । तरी निरोधिली चित्तवृत्ती । स्वस्वरूपाची स्फुरे स्फूर्ती । सुषुप्तींत हे कैंची. ॥ ८८१ ॥ हा निर्विकल्पसमाध्यनुभव । यज्ञरूपें बोले माधव । निर्धर्मीं निर्गुणीं अभिनव । प्रत्ययसत्त्वेंचि आत्मत्वाचा. ॥८८२॥ अग्नि जरी स्वप्रकाश । काष्ठ पेटतां दिसे प्रकाश । तैसा निर्धर्मी हृषीकेश । चित्प्रकाश प्रत्यय सत्त्वें सूचवी. ॥ ८८३ ॥ कीं तो आत्मसंयमयोगाग्नी । ज्ञानदीपित म्हणोनी । ज्ञान म्हणिजे ज्ञानशक्तिसत्त्वें करूनी । दीपित म्हणजे प्रकाशित. ॥ ८८४ ॥ निर्विकल्प समाधिस्थिति । यज्ञरूपें वर्णी श्रीपती । निर्गुणब्रह्मयज्ञाची रीती । हे ऐसी. ॥ ८८५ ॥ ब्रह्माग्नींतचि कोणी होमिती ।

---

१. योग म्हणजे चित्ताच्या वृत्तींचा निरोध. [योगसूत्र—अध्याय १ पाद १ सूत्र २.]

२. चवथी अवस्था.

हें मागें **अर्जुना**प्रती । बोलिला त्याची रीती । वर्णिली ऐसी म्हणोनी. ॥८८६॥ एवं प्रत्यक्ष अग्नींतचि जो ब्रह्मत्वें होमी । तो सगुण भक्त पावे सगुणब्रह्मीं । हा निर्गुणोपासक गोस्वामी । जो ब्रह्मींच होमी वृत्तीतें. ॥ ८८७ ॥ हें यज्ञप्रकरण । या प्रसंगीं यज्ञाचेंच विवरण । आणिकही तें यज्ञनारायण । यज्ञनामक **अधियज्ञ** बोलतो या श्लोकीं. ॥ ८८८ ॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

सुवर्णादि धातुजाती । तांदुळादिधान्यें वस्त्रें क्षितीं । गजरथादि दाना योग्य जीं असती । तीं द्रव्यें म्हणावीं सकळही. ॥ ८८९ ॥ ऐसीं द्रव्यें समस्त । आहुति आणि सत्पात्राचे हस्त । ते अग्नि यजमान गृहस्थ । त्यांत तीं द्रव्यें होमिती. ॥ ८९० ॥ आज्यादि हविर्द्रव्य । त्यासही म्हणावें द्रव्य । परि तो ब्रह्मरूपाग्नींत यज्ञ दिव्य । आणि द्रव्ययज्ञ पूर्वीं वर्णिला. ॥ ८९१ ॥ येथें **द्रव्ययज्ञ** शब्देंकरूनी । सूचवी द्रव्यदान यज्ञ म्हणोनी । अर्थ येथें त्यावरूनी । ऐसाच युक्त. ॥ ८९२ ॥ द्रव्यदानयज्ञकर्ते ऐसे । आतां तपोयज्ञ यजमान कैसे । तपाचे प्रकार जे जैसे । ते तैसे तपस्वी म्हणावे तपोयज्ञ. ॥ ८९३ ॥ एक तप शीतोष्णादिसहन । आणि तप अनशन । न करणें अशन म्हणजे अभोजन । भोजन म्हणिजे विषयभोग. ॥ ८९४ ॥ ज्यां इंद्रियांचा जो विषय । तेंचि त्यांचें भोजन निश्चय । हा एक विषयत्यागमय । तपोयज्ञ. ॥ ८९५ ॥ तपालोचन म्हणिजे विचार । त्यांत लौकिकविचार ते वेडेचार । ब्रह्मात्मविचार तो विचार सा[१]चार । मुख्य तप तें हेंचि. ॥ ८९६ ॥ तपेंकरूनि ब्रह्म जाण । **वरुण** म्हणे **भृगू**तें पिता सुजाण । तो **भृगु** विचारें जाला जाण । अनुभवी स्वानंदाचा. ॥ ८९७ ॥ जों बाणे ब्रह्मसमाधी । तों मननादिविचाररूप तप आधीं । तो तपोयज्ञ म्हणावा जो साधी । ब्रह्मानुभव. ॥ ८९८ ॥ ब्रह्मविचारें क्रमे घडी । ते किल्ली अविद्या कवाडें उघडी । जन्मजन्मीं तपांच्या कोडी जोडी । तयीं सुचे विचार ब्रह्मात्मत्वाचा. ॥ ८९९ ॥ स्वहित करावें निश्चित । हा विवेकाग्नि होतां दीप्त । तो आहुतीनें करिती तृप्त । ब्रह्माद्वैतविचाराचिया. ॥ ९०० ॥ आतां कोण्ही योगरूपयज्ञ । करिती ते म्हणावे योगयज्ञ । जे षट्[२]चक्रें भेदूं जाणती अभिज्ञ ।

१. खरा. २. योगशास्त्रांत सांगितलेलीं देहांतील सहा स्थानें.

प्राण नेती ब्रह्मरंध्रासी. ॥ ९०१ ॥ त्यांत ज्यास आत्मा मात्र कळे । आणि अविद्यासंस्कार न जळे । त्यास ब्रह्मलोकीं मोक्षफळें । जाती सत्यलोका ब्रह्मरंध्र भेदुनी. ॥ ९०२ ॥ हटयोगी आणि आत्मज्ञानी । राहिले ज्ञानसमाधि पावोनी । ते सुटोनी मृत्युमुखापासूनी । जीवन्मुक्त होउनी राहिले. ॥ ९०३ ॥ जों आत्मज्ञान नसे । तों अविद्यावरण असे । ते हटयोगीही कैसे ? मुक्त होती. ॥ ९०४ ॥ जे हटयोग नेणती । आणि ब्रह्मात्मता बरी जाणती । ते मुक्ति जितांही पावती । परी न चुकवूं शकती मृत्यु देहाचा. ॥ ९०५ ॥ अविद्येचे इतर कर्मयोग । तैसेचि अविद्या कर्म हटयोग । न चुकती जन्ममरणभोग । ब्रह्मविद्येवांचूनी. ॥ ९०६ ॥ परि न लगतां हटयोगाच्या वाटे । देह मृत्यूपासूनि सुटे । आणि ब्रह्मविद्येवांचूनि न तुटे । पुनरावृत्ति शृंखळा. ॥ ९०७ ॥ ज्यांस दोन्ही असती । ते हटयोगें देह रक्षिती । ज्ञानयोगेंचि मोक्ष पावती । हा अर्थ श्रुतिसिद्ध. ॥ ९०८ ॥

श्रुति—'**अन्य आहुर्विद्यया अन्य आहुरविद्यया ।**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥**
**विद्या चाविद्या च यस्तद्वेदोभयं हि सः ।**
**अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥**'

श्रुति म्हणे विद्येंकरूनी । मोक्ष आहे म्हणोनी । कोणी म्हणती आणि कोण्ही । म्हणती मोक्ष अविद्येनें. ॥ ९०९ ॥ तें आम्हां वेदांचपासूनी । दोन्ही गोष्टी जाणोनी । बोलती कीं वेदवचनें दोन्ही । सारखींच दिसती. ॥ ९१० ॥ कीं हटयोगें अमृतत्व पावती । ऐसें ज्या श्रुति बोलती । त्यावरूनी अविद्येनें मोक्ष म्हणती । अविद्या म्हणजे हटयोग. ॥ ९११ ॥ मृतत्व नव्हे तें अमृतत्व म्हणावें । हें कालवंचनालक्षण गणावें । कीं मरण चुके स्वभावें । हटयोगेंच. ॥ ९१२ ॥ आणि अमृतत्व मोक्षाचेंही नांव । परी हटयोगासी तो नसे प्रभाव । कालवंचनाफलस्वभाव । यालागीं अमृतत्व श्रुति म्हणे. ॥ ९१३ ॥

श्रुति—'**शतं चैकं च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका ।**
**तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति त्रिविधगत्या क्रमेण भवंति ॥**'

शरीराच्या नाडी अनंत । त्यांत हृदयाच्या ऐकोत्तरशत[1] । त्यांत एक सु-

१. एकशें एक.

षुम्ना नाडी निश्चित । प्राण पाववी मस्तकीं ब्रह्मरंध्रासी. ॥ ९१४ ॥ जो ऐसा ऊर्ध्व जाय । त्यास फळ काय । श्रुति म्हणे अमृतत्व पावे हा निश्चय । अमृतत्व म्हणिजे नव्हे जें मृतत्व. ॥ ९१५ ॥ प्राणांत मन असे । मनीं जीवात्मा प्रतिबिंबांश वसे । तो मना प्राणांसवें जातसे । ऊर्ध्व मस्तकीं ब्रह्मरंध्रासी. ॥९१६॥ मृतत्व म्हणिजे मरण । कीं जों ब्रह्मरंध्रीं असे प्राण । तों मृतत्व नाहीं त्यास ऐसा गुण । त्या स्थळाचा. ॥९१७॥ हा हटयोगसमाधी । त्या समाधींत काळ त्यातें न बाधी । तथापि सर्वथा अमरत्व न साधी । हटयोगें देहासी. ॥९१८॥ एक समाधिस्थ बैसला । तो मेला म्हणूनि जाळिला । तुटे शस्त्रें तोडिला । समाधींतही. ॥९१९॥ पुण्य प्रारब्ध अत्यंत । तोचि हटयोगें वर्षशतें बहुत । वांचे शेवटीं निश्चित । मरे निमित्तें एका भलतिया. ॥ ९२० ॥ ब्रह्मादिकांचे देह । न राहती निःसंदेह । त्या नश्वराचा काय स्नेह । विरक्तां ज्ञानियांसी? ॥ ९२१ ॥ होतां ब्रह्मदिनप्रलय । त्रैलोक्याचा दाह होय । तेव्हां हटयोगी बापडे काय? । तृण शुष्क. ॥ ९२२ ॥ एवं देवांस म्हणावें अमर । यद्यपि बहुकाळें मरती सुर । तैसें बहुकाळ पूर्वपुण्यें शरीर । वांचे हटयोगियांचेंही. ॥ ९२३ ॥ या आयुष्याचें प्रमाण । बोलिले युगयुगानुगुण । ते गणना होतां होतो निर्माण । अकस्मात मृत्यु. ॥ ९२४ ॥ कलियुगीं वर्षशत । जरी वांचला अत्यंत । तें सरतां पावे निश्चित । मृत्यु प्राणांतें हरावया. ॥ ९२५ ॥ जरी झालें शतप्रमाण । आणि ब्रह्मरंध्रीं असला प्राण । न करवे त्याचें प्रयाण । नियतकाल मृत्यूस. ॥ ९२६ ॥ मृतत्व नाहीं ये रीती । यास अमृतत्व म्हणे श्रुती । अमृतत्व मोक्षासही म्हणती । वेद शास्त्रें पुराणें. ॥ ९२७ ॥ यावरूनी पूर्वश्रुती । म्हणे अविद्येनें कोणी मोक्षा वाखाणिती । कोण्ही विद्येनेंच म्हणती । वेदांतनिष्ठ. ॥ ९२८ ॥ ज्ञानावांचूनि मोक्ष नसे । सर्व वेद म्हणती ऐसें । अविद्या आवरण असोनि कैसे । हटयोगी मोक्ष पावती? ॥ ९२९ ॥ हटयोगियांचें अमृतत्व । तो मोक्ष नव्हे जाणावें अमरत्व । वेदांतियांचें बोलणें तत्त्व । मुक्ति अमृतत्व शब्दें. ॥ ९३० ॥ आतां हटयोगी मृत्यूपासूनि सुटती । ज्ञानयोगी मुक्ति पावती । ऐसें बोलतां, न तुटती । विवाद अन्योन्य. ॥ ९३१ ॥ सुटले मृत्यूपासोनी । ते मुक्त जालेच म्हणोनी । ऐसा श्रुतीचा आश्रय करूनी । स्वमत स्थापिती पुन्हां हटयोगी. ॥ ९३२ ॥ याकारणें श्रुती । विद्या अविद्या दोहींच्या गती । एकाच पुरुषाच्या वर्णितां तोडिती । वाद दोहीं मतांचा. ॥ ९३३ ॥ कीं विद्या एक अविद्या एक । दोन्ही जाणे जो साधक । तो अ-

विद्येनें तरोनि मृत्यूचा [1]पंक । विद्येनें अमृतत्व अनुभवी. ॥ ९३४ ॥ एवं मृत्यु तरला तरी कांहीं । मोक्ष तोंपर्यंत नाहीं । कीं ब्रह्मविद्येनें नरदेहीं । जों स्वरूप नाहीं ओळखिलें. ॥ ९३५ ॥ अविद्याशब्दें हटयोग । येथें अन्यार्थीं अविद्याशब्दप्रयोग । सर्वथा न घडे कीं इतर कर्मप्रयोग । करितां मृत्यु तरणें घडेना. ॥ ९३६ ॥ यावेगळा अर्थ । सर्व बाधित व्यर्थ । मृत्यु तरणें तेव्हां यथार्थ । अविद्याशब्दें हटयोग. ॥ ९३७ ॥ कीं अमृतत्व श्रुती । हटयोगें म्हणती । अविद्या असतां साधिती । हटयोगातें साधक. ॥ ९३८ ॥ कीं अविद्या सर्व कर्म । विद्या कर्मातीत दावी ब्रह्म । हटयोगही मायासंभ्रम । अविद्यारूप. ॥ ९३९ ॥ परी सोडवी यथाकाळें मृत्यूपासूनी । अविद्याशब्दें म्हणोनी । हटयोग येथें वेदवचनीं । वाखाणावा अबाधित. ॥ ९४० ॥ एवं हटयोगें मरण । तरोनिही मोक्षाचें कारण । ब्रह्मविद्याच तीवीण । मोक्ष नव्हे. ॥९४१॥ एवं अविद्येनें मृत्युही तरोनी । तोचि पुरुष विद्येंकरूनी । मोक्ष अनुभवी म्हणूनी । म्हणतां नुरे वादास अवकाश. ॥ ९४२ ॥ एवं हटयोगेंचि मोक्ष । हा अप्रयोजक पक्ष । न तुटे संसार विषवृक्ष । ज्ञानशस्त्रावांचूनी. ॥ ९४३ ॥ प्रस्तुतीं वर्णितां यज्ञ । इतर द्रव्यादि यज्ञही अज्ञ । जैसे करिती म्हणे **कृष्ण** सर्वज्ञ । तैसे योगयज्ञही हटयोगी. ॥ ९४४ ॥ ब्रह्मीं चित्तवृत्ति । निरोधणें हेही योगस्थिति । ते पूर्वश्लोकींच रीती । **'आत्मसंयमयोगाग्नि'** म्हणतां वर्णिली. ॥ ९४५ ॥ हे यज्ञ प्रत्येक प्रत्येक । न मेळवावे एकांत एक । वाखाणावा निःशंक । या योगयज्ञीं हटयोग. ॥ ९४६ ॥ आतां स्वाध्यायज्ञानयज्ञ । म्हणिजे वेदार्थ जाणतसे शास्त्रज्ञ । स्वाध्याय वेद त्यांचा अर्थ अभिज्ञ । वेदभाष्यें पाहती. ॥ ९४७ ॥ जरी नसे अर्थानुभव । तरी वेदार्थानुभवाचें वैभव । राजा न दिसे त्यासही [2]अभिनव । राजवैभव दिसे गजरथादि. ॥ ९४८ ॥ परी वेदार्थ जाणावया । अधिकार पाहिजे **धनंजया**! । कीं संन्यास असे जया । तोचि अधिकारी. ॥ ९४९ ॥ मुख्य वेदाचा अर्थ । तो [3]वेदांतचि यथार्थ । कर्मपरांचें पांडित्य व्यर्थ । एकदेशी. ॥ ९५० ॥ कर्मकांडें चित्तशुद्धी । ते तेंचि मानिती मुख्य सिद्धी । न [4]रिघे ज्यांची बुद्धी । ज्ञानकांडीं. ॥ ९५१ ॥ कांडत्रयसंमत । तेंचि शास्त्र वेदांत । स्वाध्यायज्ञान निश्चित । तेंचि म्हणावें. ॥ ९५२ ॥ त्या **श्रवणासी अधिकारी** । कीं संन्यासी होय जरी । संन्यासतत्त्व श्रीहरी । [5]अष्टा-

---

१. चिखल. २. नवीन, आश्चर्यकारक. ३. वेदांतशास्त्र. ४. शिरे. ५. अध्याय १८ श्लो० २ पद्य.

दशारंभीं बोलेल. ॥ ९५३ ॥ कीं काम्य तितकें कर्म । टाकणें हाचि संन्यास-धर्म । विशेषें चतुर्थाश्रम । असे तरी बराचि. ॥ ९५४ ॥ असोनिही संन्यासा-श्रम । जो आचरे काम्यकर्म । तो संन्यास वृथा श्रम । बरा काम्यत्यागी गृहस्थ. ॥ ९५५ ॥ एवं काम्यकर्मे टाकिती । तेचि म्हणावे यती । यत्नशीलास यति म्हणती । यत्न तो मोक्षयत्नचि. ॥ ९५६ ॥ शृंखला असे पायीं । ते दृढचि हो ज्या उपायीं । ते उपाय घालिती अपायीं । तैसे काम्ययत्न काम्याचे. ॥ ९५७ ॥ जो काम्यावेगळा । तोचि यत्नशील यति आगळा । काम्यफळ मत्स्याचा बँगळा । दांभिक यतिही यति नव्हे. ॥ ९५८ ॥ एवं स्वाध्यायज्ञान ज्यांचा यज्ञ । ते यति ऐसें बोले अभिज्ञ । जरी नव्हती आत्मज्ञ । श्रवण करिती तदर्थ. ॥ ९५९ ॥ ते यति शंसितव्रत । कीं वरें तीक्ष्ण ज्यांचें व्रत । म्हणिजे जे सुव्रत । न चळती व्रतापासूनी. ॥९६०॥ आतां कोण्ही प्राणायामयज्ञ । मन वश करावया करिती अभिज्ञ । ते रीति वर्णितो सर्वज्ञ । या श्लोकीं. ॥ ९६१ ॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

देहीं प्राणांची अधोवृत्ति । तीस **अपान** ऐसें म्हणती । जे प्राणाची ऊर्ध्व-गती । प्राण म्हणती तेधवां. ॥ ९६२ ॥ दडपूनि वामपुटीं प्राण । वरि जों निघों पाहे **प्राण** । त्यास तळीं रेंटिती सत्राण । सव्यनासापुटें. ॥ ९६३ ॥ प्राणांची ऊर्ध्वगती । ते बळें अपानगति करिती । या नांव अपानीं प्राण होमिती । **'पूरक'** म्हणावें यालागीं. ॥९६४॥ नासापुटें दोनी धरूनी । ते प्राणा मूळाधारीं आवरूनी । हळुहळू अपसव्य नासापुटें करूनी । सोडिती दडपूनि सव्यपुट. ॥ ९६५ ॥ तळीं कोंडितां प्राण । पावला होता अपानत्व क्षणें । त्यास पुन्हां प्राणनपण । आलें वरता नेऊनि सोडितां. ॥ ९६६ ॥ तो अपान होमिला प्राणीं । कीं हळुहळू बाहेर निघों लागला प्राणीं । या नांव **'रेचक'** परंतु कोण्हीं । म्हणती कुंभकावीण नव्हे रेचक. ॥ ९६७ ॥ कीं वायु पीडणें पूरक । तद-नंतर तो निरोधणें **'कुंभक'** । निरोधिला सोडणें तो रेचक । पूरकापुढें रेचक घडेना. ॥ ९६८ ॥ अपानीं होमिती प्राण । प्राणीं होमिती अपान । हें पूरक-रेचकाचें विवरण । तरी कुंभकाविणें रेचक घडेना. ॥९६९॥ म्हणूनि उत्तरार्धे हरी । म्हणतो कीं प्राणापान दोनी उदरीं । निरोधूनि मग वरी । अपान

---

१. बक पक्षी. २. तीव्र. ३. नाकपुड्या. ४. या नांवाचें एक चक्र=स्थान. ५. निमिषमात्र. ६ सजीवत्व.

होमिती प्राणी तो रेचक. ॥ ९७० ॥ हें प्राणायामलक्षण । हाही एक यज्ञ म्हणे नारायण । तो प्राणयामपरायण । जे प्राणायामचि करिती बहु ऐसे. ॥ ९७१ ॥ प्राणायामचि परम आश्रय । त्यांस कीं येणेंचि मनोजय । होईल ऐसा निश्चय । प्राणायामपरायणीं. ॥ ९७२ ॥ हें यज्ञप्रकरण । आणिक एका यज्ञाचें विवरण । करितो श्रीयज्ञनामक नारायण । या श्लोकीं. ॥ ९७३ ॥

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

आणखी कितीएक नर । नियत करूनि आहार । क्षुधा सर्व निरसे[1] ऐसें उदर । न भरिती अन्नें. ॥ ९७४ ॥ ते प्राणी प्राण होमिती । प्राणसंस्कृतें इंद्रियांसही म्हणती । दुसरिया प्राणशब्दें श्रीपती । वायुरूप प्राणचि सूचवी. ॥ ९७५ ॥ एवं इंद्रियें क्षीणत्वा जाती । प्राणांमाजीं ते होमिती । जे नियत[2] करिती । अल्प आहार. ॥ ९७६ ॥ कीं आहार पडतां उणा । अशक्तत्व ये प्राणां । तेव्हां इंद्रियगणां । विषयीं कैंची प्रवृत्ती. ॥ ९७७ ॥ इंद्रियांचा जय । करावा हा निश्चय । परि इंद्रियवृत्ति करिती उदय । शरीर पुष्टिबळें करूनी. ॥ ९७८ ॥ विवेक पुरुषाच्या आंगीं । औषधार्थ जरी खाय भांगी । घडी एक तिच्या रंगीं[3] । होतोच विकळ. ॥ ९७९ ॥ शरीरीं वीर्याची पुष्टी । ते स्त्रीसंगहीनास कांहीं कष्टी । करी जरी दूरचदृष्टी । आटोपिती मनासी. ॥ ९८० ॥ तें कदाचित् अनावर । होईल म्हणोनि निग्रहपर । पुष्ट होऊं नेदी शरीर । अल्प आहारादिकीं. ॥ ९८१ ॥ शरीर होतां क्षीण । अशक्त होती प्राण । स्ववश राहती इंद्रियगण । निग्रहपरांचे. ॥ ९८२ ॥ प्राणशक्तीवांचूनी । इंद्रियें निश्चळ राहती यावरूनी । प्राणांत इंद्रियें होमिलीं म्हणोनी । मानावें. ॥९८३॥ प्राणांत इंद्रियें होमिती । या भावें म्हणे श्रीपती । येथवरी सांगोनि यज्ञरीती । स्तुति करितो त्या यज्ञ करणारांची. ॥ ९८४ ॥ कीं हे सर्वयज्ञजाणते पुरुष । यज्ञें जिहीं नाशिलें कल्मष[4] । म्हणजे हे निष्पाप निर्दोष । यज्ञकर्ते सकळही. ॥ ९८५ ॥ आतां यज्ञकर्ते उत्तम । कांहीं यज्ञ न करिती ते अधम । म्हणूनि देवदेवोत्तम । बोलतो या श्लोकीं. ॥ ९८६ ॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोन्यः कुरुसत्तम ! ॥ ३१ ॥**

---

१. नष्ट होई. २. परिमित. ३. वेगांत, अमलांत. ४. पाप.

अगा ! यज्ञ करितां अवशिष्ट । अन्नादिक तें अमृत म्हणती शिष्ट । जे भक्षिती त्यांस फळ उत्कृष्ट । कीं ब्रह्म सनातन ते पावती. ॥ ९८७ ॥ कीं निष्काम यज्ञ । ईश्वरीं अर्पी अभिज्ञ । तो चित्तशुद्धीनें पावे ब्रह्म ब्रह्मज्ञ । भाव ऐसा. ॥ ९८८ ॥ आतां सकामही उत्तम परी । वाईट तो जो यज्ञ न करी । म्हणूनि उत्तरार्धें हरी । निंदितो त्यासी. ॥ ९८९ ॥ कीं यज्ञ न करी कांहीं । त्यास हा लोक तोही नाहीं । कीं पडला जनमुखप्रवाहीं । निंदेचिया. ॥९९०॥ दुसरे जन्मांतरीं । सुख न स्पर्शे त्याच्या शरीरीं । कीं पुण्यावीण कोणेपरी । सुखप्राप्ति न घडे. ॥ ९९१ ॥ एवं सुलभ इहलोक नाहीं ज्याला । परलोक कोठूनि होय त्याला । एवं सकाम भला । कांहीं न करी त्याहूनी. ॥ ९९२ ॥ दरिद्री आणि कांहीं । सदाचार जपतपही करीत नाहीं । तो श्रीकृष्णें या प्रसंगप्रवाहीं । निंदिला येथें. ॥ ९९३ ॥ कीं धनवंत न करी यज्ञ जरी । तो द्रव्यदानयज्ञ तऱ्ही करी । तितकियानेंचि तो पावे गति बरी । द्रव्ययज्ञकर्ता लेखिला यांमाजी तो. ॥ ९९४ ॥ तो अग्निहोत्रादियज्ञही जरी । न आरंभी तरी द्रव्यादि दानें करी । एवं दरिद्री आणि दुराचारी । निंदिला येथें. ॥ ९९५ ॥ अथवा धनवंत धन । न दे याचकां न करी दान । तो द्रव्यलुब्ध सत्कर्मानुष्ठान । करी तरी व्यर्थ. ॥ ९९६ ॥ कीं पदरीं धन असोनी । सांग अन्न दक्षिणेवांचोनी । शठत्व लागे यज्ञ वांया जाय म्हणोनी । अयज्ञ तोही. ॥ ९९७ ॥ एवं जप तप न करी निर्धन । आणि दातृत्व न करी सधन । दोघे अयज्ञ यांतें मधुसूदन । निंदितो ऐसें निर्णितां सांपडे तत्त्व.॥९९८॥ येविषयीं व्यासाचीही भारती । बोले याचि श्रीमहाभारतीं । कीं हे दोघेच नरकाप्रती । जाणार. ॥ ९९९ ॥

महाभारतश्लोक—**'द्वावेवाप्सु प्रवेष्टव्यौ कंठे बद्ध्वा दृढां शिलाम् ।**
**धनवंतमदातारं दरिद्रं चातपस्विनम् ॥ ३१ ॥'**

पाहोनि खोला जळा । गळां बांधोनि दृढ शिळा । बुडवावें त्यांत खळा । धनवंतास जो दातृत्व न करी. ॥ १००० ॥ आणि एक अभाग्य । तैसाचि बुडवावया योग्य । कीं दरिद्री होऊनि भाग्य । न साधी तपाचें. ॥ १००१ ॥ शक्ति नाहीं करावया दान । तरी स्नानसंध्याअनुष्ठान । करूनि मोक्षवैभवाचें निधान । नाम जपे श्रीहरीचें. ॥ १००२ ॥ एवं न तरती मनुष्यदेहनावें । तरी व्यर्थ कां भूमीस भार वांचावें । यालागीं खोल

---

१. शेष राहिलेलें. २. उक्ति. ३. नौकेनें.

जळीं बुडवावें । जडशिळा कंठीं बांधोनी. ॥ १००३ ॥ एवं कांहीं एक यज्ञ । करी तोचि अभिज्ञ । या दों प्रकारींचे अयज्ञ । दोन्ही लोक नसती ऐसियांस. ॥ १००४ ॥ हे यज्ञ बोलिला सर्वज्ञ । यांत कांहीं कर्मयज्ञ कांहीं ज्ञानयज्ञ । आतां ज्ञानयज्ञ थोर ऐसें अधियज्ञ । बोलतो दों श्लोकीं. ॥ १००५॥ त्यांत कर्मयज्ञ कर्माचपासूनी । जाले आत्मयातें न स्पर्शोनी । हें जाणतां फळ थोर म्हणोनी । जाण म्हणतो आधीं या श्लोकीं. ॥ १००६ ॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥**

यज्ञ आणिक ऐसे बहुत । वेदींच बोलिले निश्चित । परि अवघेही कर्मजनित । जाण अर्जुना ! ॥ १००७ ॥ कीं कर्मापासोनि यज्ञ जाणे । त्यास आत्मयाची अकर्तृता बाणे । कीं जे हें जाणती ते शाहणे । कीं न स्पर्शे कर्म आत्मयातें. ॥ १००८ ॥ तूं अद्यापि हें नेणसी । तें जेव्हां जाणसी । तेव्हां ऐसें जाणूनी पावसी । मोक्ष कर्मबंधापासूनी. ॥ १००९ ॥ कर्मयज्ञ ज्ञानयज्ञ सहज । मिसळोनि बोलिलों तुज । यांत कांहीं रहस्यगुज । तें सांगतों या श्लोकीं. ॥ १०१० ॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ! ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ! ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

अगा ! आज्यादिक[1] हविर्द्रव्य । ब्रह्मत्वें न जाणती दिव्य । बाह्यदृष्टिच यज्ञ कर्तव्य । ते **द्रव्यमय यज्ञ** बोलावे. ॥ १०११ ॥ ज्ञानेंकरूनि ब्रह्मस्थिती । हविर्द्रव्यादिकीं पूर्वोक्तरीती । किंवा आत्मसंयमयोगाग्नींत होमिती । सर्ववृत्ति ब्रह्मनिष्ठ. ॥ १०१२ ॥ हे म्हणावे **ज्ञानयज्ञ** । यांचे यजमान ब्रह्मवेत्ते अभिज्ञ । म्हणूनि म्हणे **कृष्ण** सर्वज्ञ । कीं बरे हे द्रव्ययज्ञांपरिस. ॥ १०१३ ॥ ज्यांत परम कल्याण । ते ज्ञानयज्ञ **अर्जुना** ! जाण । कीं द्रव्ययज्ञ होती निर्माण । कर्मापासूनी. ॥ १०१४ ॥ तें सकल कर्म लया । जातसे ज्ञानींच या । कीं संचित क्रियमाण **धनंजया** ! । ज्ञानींच लय पावतें. ॥ १०१५ ॥ ज्ञानें सर्व कर्म सरे । पुनरावृत्तीस हेतु कांहीं न उरे । हे कर्मलयप्रकार बरे । येथेंचि वर्णिले तुजप्रती. ॥ १०१६ ॥ सर्वकर्मेक्रियमाण । अखिल कर्म संचित जाण । म्हणूनि **अर्जुनासि** सूचवी सुजाण । द्विविध कर्में. ॥ १०१७ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले

---

१. तूप.

उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत अनुसंधानाकारणें. ॥ १०१८ ॥ सर्वांत थोर ज्ञान । हें पूर्वश्लोकीं बोलिला मधुसूदन । कीं अपरोक्षाकारणें अर्जुन । शरण यावा. ॥ १०१९ ॥ ज्याकारणें हृषीकेश । करितो गीतोपदेश । परि गुरुशरणागतीचा मार्गलेश । ठाउका नाहीं अर्जुनासी. ॥ १०२० ॥ कीं भाग्यें भेटती संत । आणि ज्ञानमहिमा वर्णिती अत्यंत । तेव्हां समजावें कीं भगवंत । भेटला स्वयें उद्धाराकारणें. ॥ १०२१ ॥ जन्म मरण जरा व्याधी । या संसारदुःखें संतप्त आधीं । त्यास संत भेटोनि बोलती ऐसें जधीं । तों भाग्य फळलें मानी आपुलें. ॥ १०२२ ॥ तो गुरुत्वें अंतःकरणीं । करूनि मस्तक श्रीचरणीं । ठेवूनि शरणागतीनें वाणी । प्रकट करी तत्त्वजिज्ञासेची. ॥ १०२३ ॥ इत्यादि गुरुशरणागती । अर्जुन नेणे कांहींच रीती । म्हणूनि श्रीकृपासिंधु त्याप्रती । हेंही उपदेशितो या श्लोकीं. ॥१०२४॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

अर्जुना! तें ज्ञान । जाण कैवल्यसुखनिधान[1] । तें उपदेशिती कृपाघन । संत[2] तूतें. ॥ १०२५ ॥ संत सांगती म्हणे परी । मी सांगेन ऐसें न म्हणे हरी । हें गुरुत्वलक्षण प्रकट करी । जगद्गुरू. ॥ १०२६ ॥ कीं न येतां शिष्य शरण । न धरितां अनुतापें चरण । कृपा उमजली तऱ्ही आपण । मी सांगेन ऐसें न म्हणावें. ॥ १०२७ ॥ अन्यथा ज्ञानाचें महत्त्व । आणि गुरूचें गुरुत्व । दोहींस येथें न्यूनत्व । अहंकार वाढतो शिष्याचा. ॥ १०२८ ॥ ज्यापासीं जें असे । तें त्याच्या अहंकारीं वसे । मी बुद्धिमंत धनवंत ऐसें । ठसे मनीं धनवंतादिकांच्या. ॥१०२९॥ सधनाशीं प्रीती । जे कोण्ही करूं जाती । ते उगीच प्रीति केली तऱ्ही तो चित्तीं । भावी स्वधनाशेकारणें. ॥ १०३० ॥ सुमति म्हणे माझी मती । देखोनि हे लोक करिती प्रीती । रूपवंत म्हणे प्रीति करिती । रूप माझें देखोनी. ॥ १०३१ ॥ तेही जरी आपल्या चाडेकारणें । एकाचे जाऊनि धरिती चरण । तेथें स्वधनाद्याशा अंतःकरण । न भावी नातळे अहंकारासी. ॥ १०३२ ॥ हा अनादिमायानदीप्रवाह । म्हणूनि गुरुपदवीस असावा निर्वाह । कीं कृपेनें उपजला जऱ्ही उत्साह । तरी मज शरण ये म्हणों नये. ॥ १०३३ ॥ कीं धनवंत म्हणेल माझें मन । देखोनि हा कृपेचा घन ।

---

१. मोक्षानंदाचें भांडार. २. साधु.

वर्षतो मजवरी जीवन । शरण आपण न जातां. ॥ १०३४ ॥ सुबुद्धि म्हणेल माझी बुद्धि । देखोनि मजवरी कृपासमृद्धी । केली कीं आम्हांकरितां प्रसिद्धी । होणार याच्या गुरुत्वाची. ॥ १०३५ ॥ त्याकरितां आमचा उद्धार । परि आम्हांकरितां त्याचा बडिवार । जाला ऐसा अहंकार । पदभ्रष्ट करी शिष्यासी. ॥ १०३६ ॥ एवं शिष्य न येतां शरण । दाटूनि उपदेश करणें । हें अश्रद्धेस कारण । होणार. ॥ १०३७ ॥ याची कृपा मजवरी । होय कवणेपरी । म्हणूनि जरी सेवा करी । तरीच करावा उपदेश. ॥ १०३८ ॥ जातां अधिकारी असोनी । मुमुक्षा[1] उपजली नसेल मनीं । आणि त्यास सांगावें कृपेंकरूनी । वाटलें संतातें जरी ऐसें. ॥ १०३९ ॥ ज्ञानप्रशंसा बोलावी । कीं तो मोक्षाकडे चित्त लावी । आणि त्यास वाट दाखवावी । कीं जाया शरण संतांसी. ॥ १०४० ॥ त्या शरण जायाच्या रीती । सांगाव्या तयास यथास्थिती । मग तो स्वयें जरी आपणाप्रती । शरण ये. ॥ १०४१ ॥ तरी पाहोनि सद्भाव । सांगावा ब्रह्मात्मानुभव । अतएव 'कीं तद्ब्रह्म' म्हणतां देव । उपदेश करील अष्टमाध्यायीं. ॥ १०४२ ॥ येथें गुरूस शरणागती । करावी कवणे रीती । तें सांगतों संतांचा पती । कीं शरण संतांस तूं जाई. ॥१०४३॥ **'किं तद्विद्धि'** म्हणिजे तें जाण । तुज उपदेशिती ज्ञानी सुजाण । उपदेशिती या शब्दें खूण । सूचवी ज्ञानाधिकाराची. ॥ १०४४ ॥ कीं जरी कृपावंत । तरी अनधिकारियास संत । न उपदेशिती कीं ज्ञान अत्यंत । कठिण अनधिकारियांसी. ॥ १०४५ ॥ तरी तुज उपदेशिती । कीं अधिकारी ऐसें **श्री**पती । सूचवी परि तयांप्रती । शरण जावें कैसें तें सांगतो. ॥१०४६॥ प्रथम प्रणिपातेंकरूनी । तें ज्ञान तूं जाण म्हणोनी । म्हणे कीं शरणागतीवांचूनी । न पाविजे ज्ञान. ॥ १०४७ ॥ शरणागतीचें लक्षण । प्रथम हें कीं आपण । कांहीं नेणे टोणपा[2] अविचक्षण । सर्वज्ञ तूं मज उद्धरीं. ॥ १०४८ ॥ या भावें प्रणिपात । करावा प्रकर्षें शरीराचा निपात । तो दंडवत कीं अकस्मात । पडे जैसा टोणपा. ॥ १०४९ ॥ तो टोणपा ढकलितां पडों जाणे । परी पडला तो उठों नेणे । कीं मस्तकीं पद्महस्त बाणे । उठे प्रभावें तयाच्या. ॥ १०५० ॥ अचेतन दंड पडला । तो टोणपा सचेतनें उचलिला । तैसा जडात्मत्व जाणणार याला । उचली कोण चिदात्मत्वें त्यावांचूनी. ॥ १०५१ ॥ या भावें म्हणे श्रीहरी । कीं दंडवत होय शरणागतीनें जरी । अनन्यभावें करी । तरी ते

---

१. मोक्षलाभाची इच्छा. २. मूर्ख, अज्ञ.

जिज्ञासु ऐसें समजती. ॥ १०५२ ॥ अभयहस्तें उठविती । कृपादृष्टीं पाहती । तथापि तत्त्व न सांगती । जों स्वमुखें पुसेना. ॥ १०५३ ॥ यालागीं प्रश्नेंकरूनी । तें ज्ञान जाण म्हणोनी । दुसरा प्रकार या भावेंकरूनी । सांगतो. ॥ १०५४ ॥ प्रश्न ऐसा कीं स्वामीचे चरण । तारूं करूनि मज भवसिंधु तरणें । यास काय शासन करणें । असेल तें मज शिष्यास आज्ञा करावी. ॥ १०५५ ॥ ते संत करुणाकर । परि पाहवा तुझा आदर । प्रश्नांचें देऊनि उत्तर । न करिती सद्य मुख्य उपदेश. ॥ १०५६ ॥ कीं जो कार्यार्थी असतो । आपलिया कार्याकारणें तो । अनन्यभावें भजतो । होणार कार्यसिद्धि ज्यापाशीं. ॥ १०५७ ॥ कार्योत्कंठा नाहीं मना । तो कांहीं तैसा भजेना । अजीर्णपोटी तों अन्ना । त्वरा न करी सर्वथा. ॥ १०५८ ॥ क्षुधा नाहीं पोटीं । त्याचा शिथिल यत्न अन्नासाठीं । आणावया उदक फांटीं । न धांवे सर्वथा. ॥ १०५९ ॥ क्षुधा नसायाची खूण । समजती ऐसी निपुण । क्षुधित धांवे आपण । काष्ठादि पाकसामग्रीनिमित्त. ॥ १०६० ॥ उदक म्हणतां उचली घट । गोवऱ्या वेंची स्वयें निपट । पाककर्ता सांगे ते खटपट । करी कांहीं न सांगतां. ॥ १०६१ ॥ धनार्थी धनप्राप्त्युपाय । करी चुरी दातयाचे पाय । पादरक्षा[1] घेऊनि उभा होय । गमनाभिमुख देखतां. ॥ १०६२ ॥ लौकिकक्षुद्रकाम । तेथ ऐसा सादर सकाम । ज्या ज्ञानें होय पूर्णकाम । तदर्थ काय न करावें. ॥ १०६३ ॥ अनुतापें मनीं मुमुक्षा । ज्ञानाची अती अपेक्षा[2] । सेवेंत त्याची परीक्षा । संत करिती. ॥ १०६४ ॥ या भावें म्हणे हरी । कीं प्रणिपात प्रश्न करिसी परी । जों न करिसी सेवा बरी । तों ज्ञान न उपदेशिती तुज संत. ॥ १०६५ ॥ सेवा करावी सादर । नीच सेवेसी तत्पर । वैभव असोनिही स्वशरीर । सेवेसी लावावें तयांच्या. ॥ १०६६ ॥ श्रमसाध्यकामीं आळस । धन वेंचितां कुसमुस । नसे आणि परम उल्हास । सेवेंत ज्याला. ॥ १०६७ ॥ त्यांत त्याची मुमुक्षा । ज्ञानाची अत्यंत अपेक्षा । ओळखोनि मग त्या दक्षा । ते ज्ञान उपदेशिती. ॥ १०६८ ॥ या भावें म्हणे अर्जुना । निष्कपट सेवेनें त्यां करुणाघनां । सेवूनि घे ज्ञानजीवना । त्यांपासूनी. ॥ १०६९ ॥ एवं साधक ऐसा असावा । कीं करी प्रणिपात प्रश्न सेवा । आतां जे उपदेशिती ब्रह्मात्मभावा । ते कैसे? ॥ १०७० ॥ शास्त्रें जाणती सकळ । अद्वैत बोलती प्रांजळ । अनुभव पुसतां केवळ । तोंड वांसिती. ॥ १०७१ ॥ कीं हें बोला-

---

१. पादुका, वाहणा, जोडा. २. इच्छा.

वेंचि अद्वैत । अनुभव कोणा ठाउका निश्चित । अनुभवप्रश्न उचित । नव्हे ऐसा. ॥ १०७२ ॥ आतां असोनिही अनुभव । ज्यास नाहीं शास्त्रवैभव । ते चुकविती आपुला पुनर्भव । परि उद्धरूं न शकती मुमुक्षूतें. ॥ १०७३ ॥ शिष्यसंदेह न शके हरूं । तो अनुभवीही न म्हणवे गुरू । कल्पिले पदार्थ नेदी तरू । तो कल्पतरु कैसा म्हणावा ? ॥१०७४॥ म्हणोनि शास्त्रज्ञ आणि अनुभवी । साजे त्याला गुरुत्वपदवी । तोचि जगद्गुरु गोसांवी । कीं शास्त्रज्ञ आणि अनुभवी परिपक्व. ॥ १०७५ ॥ अनुभवशास्त्रावांचूनी । कधीं न घडेच म्हणोनी । येथें शास्त्राभिमानी । बोलती ऐसें. ॥ १०७६ ॥ परि स्त्रिया आणि शूद्र नर । त्यांस वेदीं नसोनि अधिकार । ज्ञानीं असे अधिकार हा निर्धार । वेदशास्त्रपुराणांचा. ॥ १०७७ ॥ तेव्हां वेदाध्ययन । नसोनिही पावती ज्ञान । मोक्ष पावती स्त्रीशूद्रजन । तैसेच कोण्ही ब्राह्मणही. ॥ १०७८ ॥ ब्रह्म न कळे जयां । वेदार्थ ठाउका नाहीं तयां । वेदचि बोलती या । अर्थासी. ॥१०७९॥ तेचि अधिकार ज्ञानीं । स्त्रीशूद्रांस आहे म्हणोनी । वेद बोलती दोहीं वचनीं । एकवाक्यता ऐसी. ॥ १०८० ॥ संन्यासी उत्तमांत । रजस्वला स्त्री अधमांत । यांस अधिकार नाहीं हात । पाकक्रियेसि लावावया. ॥ १०८१ ॥ परि रजस्वला आणि संन्यासी । सिद्धान्नीं अधिकार यांसी । ऐसा अधिकार वेदीं स्त्रीशूद्रांसी । नसोनि ज्ञानीं असे अधिकार. ॥ १०८२ ॥ परंतु पाकक्रिया करणार । आणि आयते जेवणार । तृप्ति सर्वांची एकप्रकार । ब्रह्मानुभव तैसा. ॥ १०८३ ॥ अनुभवासि ज्ञान कारण । तेथें सम स्त्री शूद्र ब्राह्मण । थोरपण क्षुद्रपण । परोपदेशीं निवडतें. ॥ १०८४ ॥ बहुतां जनांकारणें । प्राप्त जालें पाक करणें । संन्यासी आणि रजस्वला अधिकाराविणें । तेथें न सरती. ॥ १०८५ ॥ तैसा करावया जनांचा उद्धार । स्त्रीशूद्रांसि नसे अधिकार । कीं विना वेदशास्त्रपरिहार । न करूं शकती संशयाचा. ॥ १०८६ ॥ तैसाच शास्त्राविण । जर्‍ही अनुभवी जाला ब्राह्मण । न साजे त्याला गुरुपण । कीं शिष्यसंदेह न हरी. ॥ १०८७ ॥ त्यांतही गुरुसेवातत्पर । गुरूच साक्षात् सर्वेश्वर । ऐसें मानूनि जे सादर । सेविती श्रीगुरूतें. ॥ १०८८ ॥ त्यांस सच्छास्त्रपठण । नसोनिही होय सर्वशास्त्रज्ञान । कीं श्रीगुरूचें मन । प्रसन्न जालें त्यांवरी. ॥१०८९ ॥ श्रीगुरूच्या कळा । यत्न न करितां पावे सकळा । अंजन घालितां डोळां । पदोपदीं निधानें. ॥ १०९० ॥ किंबहुना ऐकलव्य

१. डोळ्यांत एक प्रकारचें अंजन घातलें असतां मनुष्यास जमिनींत पुरलेलें द्रव्य दिसतें असा लोकांचा समज आहे. २. धनभांडार.

या नांवें । जातीचा कोळीही भक्तिभावें । गुरुप्रतिमापूजाप्रभावें । रहस्यविद्या गुरूची पावला. ॥ १०९१ ॥ हे आदिपर्वीं भारतीं कथा । विस्तारितां वृद्धि होणार या ग्रंथा । एवं गुरुशुश्रूषा सर्वथा । गुरुसामर्थ्य संपादी शिष्यातें. ॥ १०९२ ॥ परंतु गुरू असावा भला । तरीच भलेपण प्राप्त होय शिष्याला[1] । बौद्ध गुरु सद्भावें सेविला । तरी प्रौढ बौद्धचि होणार. ॥ १०९३ ॥ त्याची धरावी संगती । तो जाईल ज्या गांवांप्रती । त्याचे आश्रितही पावती । त्याच गांवांसी. ॥ १०९४ ॥ वेदविरुद्ध अनुष्ठान । तेंचि नरकाचें साधन । त्या गुरुसंगतीनें शिष्यजन । जाती तया नरकासी. ॥ १०९५ ॥ एवं गुरु असेल जैसा । शिष्यही होईल तैसा । गुरुविश्वास तरी तो ऐसा । समजोनि गुरु करावा बावा! हो! ॥ १०९६ ॥ याकारणें गुरू । अनुभवसुखाचा कल्पतरू । वेदजंबुद्वीपाचा मेरू । तोचि सेवावा. ॥ १०९७ ॥ त्यांत कोणास अनुभवमात्र । कोणास अनुभवही शास्त्र । गुरुसेवेनेंचि दोन्ही नेत्र । प्राप्त होती. ॥ १०९८ ॥ एवं अनुभवी आणि शास्त्रज्ञ । तोचि गुरू सर्वज्ञ । शास्त्र नसोनिही शास्त्ररहस्याभिज्ञ । तोही योग्य गुरुत्वासी. ॥ १०९९ ॥ कीं शिष्याचे संदेह । निरसूनि करी निःसंदेह । शास्त्र न पढोनिही निर्वाह । करी शिष्यप्रश्नाचा. ॥ ११०० ॥ एवं शास्त्र आणि अनुभव । जेथें उभयरूप वैभव । तोचि देवाधिदेव । गुरुत्वें वरावा. ॥ ११०१ ॥ या भावें संतांचा पती । जगद्गुरू म्हणतो अर्जुनाप्रती । कीं तें ज्ञान तुज उपदेशिती । ज्ञानी आणि तत्त्वदर्शी जे संत. ॥ ११०२ ॥ ज्ञानी म्हणजे शास्त्रज्ञ । तत्त्वदर्शी तत्त्वाचे अनुभवी अभिज्ञ । ते तुज उपदेशिती म्हणे सर्वज्ञ । ज्ञान तें. ॥ ११०३ ॥ आतां यानंतरें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त अभिज्ञ लोक । परिसोत अनुसंधानाकारणें. ॥ ११०४ ॥ पूर्वीं ज्ञानाचा बडिवार । बोलिला तदर्थ प्रकार । गुरुशरणागतीचा विचार । जगद्गुरु पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ ११०५ ॥ प्रसंगें गुरुलक्षण । पूर्वश्लोकींच कमलेक्षण । बोलिला परि गुरुपरीक्षण । लागेल शिष्या. ॥ ११०६ ॥ तरी शास्त्रज्ञता यथामती । ओळखेल परंतु अनुभवस्थिति । शिष्यासि कळे कवणे रीती । अंध केंवी जाणे डोळे डोळसाचे? ॥ ११०७ ॥ अंध डोळ्यांकारणें । डोळसा वैद्यासि गेला शरण । तो डोळे देतां डोळसपण । सहजचि त्यांचें दृष्टी पडेल. ॥ ११०८ ॥ जो

---

१. मोठेपणा.

शिष्याचा अनुभव । तेंचि श्रीगुरूचें वैभव । म्हणूनि तें ज्ञानलक्षण अभिनव । सांगतो आतां या श्लोकीं. ॥ ११०९ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव! ।**

**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

जें ज्ञान जाणोनि **पां**डवा! । पुन्हा या मोहा देहात्मभावा । न पावसी कीं मज ईश्वराच्या अनुभवा । पावसील. ॥ १११० ॥ कीं ज्या ज्ञानें चराचरें । जडें भूतें तूं एंकसरें । आत्मस्वरूपीं देखसी जेव्हां तूं रे! । ऐक्यें मजमाजी देखसी आपणा. ॥ ११११ ॥ श्लोकार्थ इतकाच ऐसा । परि वेदवेदांताचा आरसा । नक्षत्रांसहित चंद्र जैसा । दिसे मुदीवरिले दर्पणीं. ॥ १११२ ॥ श्लोकाच्या पूर्वार्धीं व्यतिरेक । उत्तरार्धीं कीं अनेक । ऐक्यें पाहणें हें कौतुक । अन्वयज्ञानाचें. ॥१११३॥ **व्यतिरेक** आणि **अन्वय** म्हणोनी । ब्रह्मविद्येचीं रूपें दोन्हीं । **आवरण** आणि **विक्षेप** या दों नांवेंकरूनी । दोनी रूपें अविद्येचीं. ॥ १११४ ॥ आपणास आपण । नेणे हें अविद्येचें रूप आवरण । जैसें न कळतां दोराचें दोरपण । सर्प भासे. ॥ १११५ ॥ स्वप्रकाश आत्मा स्वयें । आपण म्हणे देह इंद्रियें । हें अविद्यावरण नासे निश्चयें । साक्षात्कारें आत्मस्वरूपाच्या. ॥ १११६ ॥ देहावेगळें स्वस्वरूप । कळणें हें व्यतिरेकरूप । देहादिविश्ववास अविद्याविक्षेप । नासे अन्वयज्ञानें करूनी. ॥ १११७ ॥ आधीं व्यतिरेक बाणे । तेव्हां अन्वयज्ञानातें जाणे । कीं जों वेगळा तंतु नेणे । तंतूपटअन्वय कळेना. ॥ १११८ ॥ म्हणूनि पूर्वार्धीं प्रथम । **अर्जु**नातें म्हणे **पुरु**षोत्तम । कीं पूर्वीं शास्त्रज्ञ अनुभवी तुज उत्तम । ज्ञान उपदेशिती तें ऐसें. ॥ १११९ ॥ कीं जें जाणोनि पुन्हां । ऐसा मोह पावेसिना । आतां जैसा **अर्जु**ना! । मोहलासि देहात्मतेनें. ॥ ११२० ॥ कीं मी **पंडु**सुत । **भी**ष्मादि आजे चुलते भाऊ माझे निश्चित । मी मारणार हे मरणार ऐसे अत्यंत । देहात्मत्वें **पां**डवा! मोहलासी. ॥११२१॥ म्हणूनि इत्यादि भावें । '**पां**डवा'! म्हणूनियां नांवें । आळविलें **अर्जु**नातें देवें । या श्लोकीं. ॥ ११२२ ॥ हें मोहाचें रूप केलें । कीं **पां**डव नांवें जेव्हां आळविलें । व्यतिरेक ज्ञानें दाविलें । निरसन याचें. ॥ ११२३ ॥ कीं जें ज्ञान जाणोनी पुन्हां । ऐसा मोह तूं पावेस ना । कीं हा देहावेगळ्या जगज्जीवना । देहादिसाक्षित्वें ओळखसी. ॥ ११२४ ॥

---

१. एकदम.

होतां हा व्यतिरेकानुभव । कैंचा पंडु कैंचा पांडव ? । जडाभिमानाचें तांडव । मग ऐसें न करिशी. ॥ ११२५ ॥ हा जडचैतन्य विवेक । पूर्वार्धीं सूचविला व्यतिरेक । आतां एकीं एकत्वें अनेक । पाहणें हा अन्वयबोध उत्तरार्धीं.॥ ११२६ ॥ ज्या ज्ञानें पंचभूतें । आणि पंचभूतांचीं शरीरें बहुतें । चतुर्दशभुवनें ईश्वरासहितें । आत्मस्वरूपीं देखसी. ॥ ११२७ ॥ अशेष देखसी म्हणता । ब्रह्मांडा सावरणा सहिता । सुचविलें जडा सर्वभूतां । चतुर्दशभुवनांसहित. ॥ ११२८ ॥ आत्मयासि देखसी म्हणतां । आत्मयावांचूनि त्या जडां भूतां । कोण जाणेल त्या प्रकाशरहितां । जडांतें ? ॥ ११२९ ॥ जडां भूतांची खूण । प्रत्यया न ये आत्मयाविण । आत्मयास आत्मयावांचूनि कवण । आणी प्रत्यया. ॥ ११३० ॥ तंतूवांचूनि पट । अनुभवा न ये निपट । मातीवांचूनि घट । स्वयें दिसेना. ॥ ११३१ ॥ तरंगां उदकावीण । मृगजळ विनाकिरण । कीं सर्पाभासाची खूण । कळेल दोरावांचूनी. ॥ ११३२ ॥ एक दिसतो दोरावरी । एक निघे वारुळाबाहेरी । तो वारुळांतील स्वयें दिसे परी । दोरावरील दोरावीण दिसेना. ॥ ११३३ ॥ दों सर्पांत कोण खरा । कोण लटिका हा बरा । विचार करितां चतुरा । सत्यत्व मिथ्यात्व उमजे. ॥ ११३४ ॥ वारुळींचा सर्प सत्य । दोरावरील असत्य । एवं मिथ्यात्व त्यास साधे अगत्य । जें दिसे आश्रयें एकाच्या. ॥ ११३५ ॥ एकाकरितां दिसे । आणि तें सत्य असे । ऐसा एक पदार्थ नसे । चराचरीं. ॥ ११३६ ॥ एवं दोरीं दोराच करितां दिसे । तो नसोनि दोरीं वसे । तेव्हां कालत्रयीं रज्जूच असे । सर्पाकारही रज्जूच. ॥ ११३७ ॥ तैसें आत्मयांत अशेष । अर्जुना ! देखसी भूतांचे विशेष । ब्रह्मांडासहित विराटपुरुष । आत्माच तुझा. ॥ ११३८ ॥ तूं आत्मा तुजवीण । प्रकाशेल जड भूतांश कवण ? । या अनुभवें बाणेल जाण । कीं जडप्रकाशकचि मी सर्व. ॥ ११३९ ॥ एथें कोणी म्हणती । कीं विना सूर्य चंद्राग्नि ज्योती । चराचरें न दिसती । तरी ऐक्य तयां कां घडेना ? ॥ ११४० ॥ याचें उत्तर श्रीपती । पंचदशीं[1] अर्जुनाप्रती । देईल परी येथें ही किमपि रीती । न बोलतां राहेल संदेह. ॥ ११४१ ॥ कीं शब्द स्पर्श रूप रस गंध पांच । मिळोनि अवघा प्रपंच । त्यांत एक रूप मात्र दिसतें साच । नेत्रांस सूर्यादिकां करितां. ॥ ११४२ ॥ शब्द स्पर्श रस गंध । इंद्रियांस यांचा संबंध । अंधकारींहि घडे आणि अंध । नेत्रही नव्हती अंधकारीं. ॥ ११४३ ॥ पदार्थाचें रूपचि न दिसे । परि अंधकार

---

१. गीतेच्या १५ व्या अध्यायांत.

तों दिसतसे । सूर्यादि तेजावांचूनी कैसे । न प्रकाशती म्हणावे नेत्र ?॥११४४॥ आतां सूर्य नेत्राभिमानी । नेत्रीं असेच म्हणोनी । पूर्वपक्ष कोणी कोरूनी । काढिती येथें. ॥११४५॥ तरी दिग्देवता कानीं, । अश्विनीसुत घ्राणीं, वरुण रसनीं, । तैसाच सूर्यही नयनीं, । आत्मया एकावीण व्यर्थ सर्व. ॥ ११४६ ॥ दृष्टांत एकदेशी । तथापि अर्थसिद्धि ऐसी । कीं इंद्रियें दैवतें शवें जैसीं । आत्मयावीण. ॥ ११४७ ॥ नेत्रीं प्रकाशक रवी । तरी रात्रीं दीप कां हो रूप दावी । रसनेसही रस चाखवी । हस्त ऐसेंही म्हणावें. ॥ ११४८ ॥ फणसास लागे रसना । तों आड त्वचा ते आंतील रस देना । हातें त्वचा काढितां मना । रसनाद्वारा रस कळे. ॥ ११४९ ॥ रसनेंत रसनाभिमानी । वरुण आधिदैवत असोनी । फणसरस हातें करूनी । कळला त्वचा आडील काढितां. ॥ ११५० ॥ तैसा नेत्राभिमानी । सूर्य नेत्रीं असोनी । अंधकाराचा पडदा दीपें करूनी । निघतां रूप नेत्रीं देखिलें.॥११५१॥वस्त्र झांकिलें ज्या रूपावरी । तें रूप न दिसे परी । वस्त्र दिसे ऐसेपरी । रूप न दिसे परि दिसे अंधार. ॥ ११५२ ॥ वस्त्र काढिती कर । अंधकार सूर्य चंद्र वैश्वानर । जैसा अंधार तैसें आड अंबर । सूर्यचंद्रवैश्वानरकर तैसे. ॥ ११५३ ॥ नेत्रप्रकाशका ज्योती । हे गोष्टीही अपुरती । एवं जडें सर्वथा न प्रकाशती । आत्मसत्तेवांचूनी. ॥११५४॥ ज्या तत्त्वें तत्त्वें जडें । प्रकाशती तें सबाह्यांतर उघडें । तंतूस झांकील लुगडें । घडे काय? ॥ ११५५ ॥ एवं सोनियांत अलंकार । कीं झाडाच्या खोडावरी पुरुषाकार । कीं शिंपींत रुपें ऐसीं भूतें चराचर । अर्जुना! देखसी आत्मयांत. ॥ ११५६ ॥ तत्त्वदर्शी संत तूतें । उपदेशिती त्या ज्ञानातें । पूर्वश्लोकीं बोलिलों आपणातें । अनुभवीं लक्षण कळे तयांचें. ॥११५७॥ अगा! यातेंचि म्हणावें ज्ञान । आणि तेचि गुरु कीं जें हें स्वजीवन । शिष्यास देती अनंत धन । जें न वेचे देतांही कदापी. ॥ ११५८ ॥ अगा! ऐसे अनुभवी नर । ते नर म्हणावे ईश्वर । अतएव स्वानुभवें चतुर । शिष्य ईश्वर म्हणती गुरूसी. ॥ ११५९ ॥ कीं ते ईश्वरीं आपण । भिन्न नसों ऐसे निपुण । देखती तेन्हां ईश्वरपण । ओळखती गुरूचें. ॥ ११६० ॥ याभावें सर्वेश्वर । म्हणे अर्जुना! जेन्हां चराचर । आपणांत देखसी चतुर । होसी अनुभवी. ॥११६१॥ मग यानंतर । जो मी श्रीकृष्ण परमेश्वर । मजमाजी ऐक्यें

---

१. अग्नि.

निरंतर । देखसी आपणा. ॥ ११६२ ॥ कीं विश्व ब्रह्मांडासहित । आणि ब्रह्मांडाचीं आवरणें सात । हीं भूतें देखसी आत्मयांत । पुढें आत्माचि देखसी. ॥ ११६३ ॥ ऐशा ब्रह्मांडाच्या कोटी । माझ्या साक्षित्वाच्या पोटीं । मी त्या सर्वांत जैसा पटीं । एक तंतू. ॥ ११६४ ॥ हें माझें वैभव । तुज याचा होतां अनुभव । मग मजशीं ऐक्याचें अभिनव । काय असे. ॥ ११६५ ॥ ब्रह्मांडकोटीचे कल्लोळ । ज्या चित्समुद्रीं तो केवळ । तूं स्वयें ऐसा प्रांजळ । अनुभवी होसी जेधवां. ॥ ११६६ ॥ मग माझ्या एकपणीं । कोण गोष्टी असे उणी । कीं मीही स्वस्वरूपीं निर्गुणीं । ब्रह्मांडकोटी देखतों. ॥११६७॥ आतां सृष्ट्यादिरचना । आणि सर्वज्ञत्वादि अर्जुना! । म्हणसी हें कां मज येना । सामर्थ्य तुझें. ॥ ११६८ ॥ तरी अगा! एकी डाहाळी । वृक्षाची लवली फळीं । एकीस थोडीं फळें म्हणोनि वेगळी । म्हणवेल काय ते शाखा? ॥ ११६९ ॥ अगा! अविद्या मालवली । वेगळीक तेव्हां बोळवली । माझ्या अनुभवें केळवली । बुद्धि जेव्हां. ॥ ११७० ॥ एवं मजशीं ऐक्य तेधवां । कीं स्वस्वरूपीं सर्व भूतें जेधवां । दिसती तुज पांडवा । तरंग जैसे समुद्रीं. ॥ ११७१ ॥ पूर्वोक्त संतांचा अनुभव । तेव्हां कळेल कीं माझें वैभव । त्यांच्या प्रसादें अभिनव । अनुभविसी जेधवां. ॥ ११७२ ॥ तेव्हां तूं चतुर । त्यांस म्हणसीच ईश्वर । परि आदीं शरण जावें सादर । शास्त्रदृष्टीं ईश्वरत्वें. ॥ ११७३ ॥ आतां यानंतर श्लोक । किमर्थ बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत अनुसंधानाकारणें. ॥ ११७४ ॥ ऐसी ज्ञानाची प्रशंसा । आयकोनिही भाव ऐसा । उमजे कीं चरण शिरसा[1] । वंदूनि मागावा तो प्रसाद. ॥ ११७५ ॥ कीं भीष्मादिवधीं दोष । तुज नाहीं ऐसे परमपुरुष । बोलिला तऱ्ही कर्म या किल्बिष[2] । वाटेच मागुतीं अर्जुना. ॥ ११७६ ॥ भीष्मादिवधाचें पाप । कैसें चुके हाचि संताप । आयकोनिही ज्ञानदीप । जिज्ञासा धरीना. ॥ ११७७ ॥ पाप नव्हे म्हणोनी । पूर्वीं पाहिलें बोलोनी । परि ते गोष्टी मनीं । धरिलीच नाहीं. ॥ ११७८ ॥ आतां हें पापही जऱ्ही होणार । तऱ्ही या ज्ञानेंचि नाशणार । ऐसा करोनि अर्धांगीकार । पापपरिहार बोलों पाहतो. ॥ ११७९ ॥ ज्ञानें क्रियमाणें न लिंपती । आणि संचितें भस्म होती । या पूर्वीं बोलिल्या जरी रीती । या प्रसंगीं पुन्हां बोलतो. ॥ ११८० ॥ कीं उत्तम तत्त्वविचार । बोलावा वारंवार । यास म्हणती शास्त्रकार । 'अभ्यास' म्हणोनी. ॥११८१॥

---

१. मस्तकानें. 'शिरसा' हें तृतीयेचें एकवचन आहे. २. पाप.

कीं 'तत्त्वमसि' हे श्रुती । नऊवार श्वेतकेतूप्रती । उपदेशिली परी प्रसंगरीती । वेगळाल्या. ॥ ११८२ ॥ भीष्मादिवधें पाप । अर्जुनास वाटे अनुताप । तो हरावया पूर्वोक्त ज्ञानप्रताप । प्रकारांतरें बोलतो दों श्लोकीं. ॥ ११८३ ॥ क्रियमाणाचा न्हे लेप[1] । आणि जळे संचित पाप । त्यांत क्रियमाणलेप न्हे हें रूप । आधीं बोलतो या श्लोकीं. ॥ ११८४ ॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

अगा! तूं पातकी जरी केवळ । होसी हें क्रियमाण मानूनि ओंगळ । तरी तो पापसागर सकळ । तरसी नावेनें या ज्ञानाचिया. ॥ ११८५ ॥ पृथ्वीवरील पापी । त्याहूनि थोर तूं होसील तथापी । या ज्ञाननावेनें कदापी । न बुडतां, तरसी समुद्र पापाचा. ॥ ११८६ ॥ जरी थोर पापी होसी । तरी बरे रीतीं पापाब्धि[2] तरसी । गोष्टी बोलतां ऐसी । क्रियमाण सुचवी दृष्टांतें. ॥ ११८७ ॥ कीं कर्मे करीत असावें । आपणास अकर्त्रात्मत्वें पाहावें । नखही ओलें न व्हावें । त्या जळें पापाचिया. ॥ ११८८ ॥ जो बसे बळकट नावे । त्याच्या नखासही उदक न शिवे । कीं वृत्ति कधीं न उद्भवे । अहंकर्तृतेची. ॥ ११८९ ॥ नावेंत जो बैसे । त्यास सर्वत्र जळ दिसे । ज्ञानी क्रियमाणीं तरती ऐसे । कीं कर्तृत्व न स्पर्शोनि कर्मे आचरती. ॥ ११९० ॥ जे ज्ञाननावेनें तरती । त्यांस अन्य प्रायश्चित्तीं । अधिकार नाहीं कीं गंगातटीं[3] वसती । ते कां जाती तीर्थांतरा[4]. ॥ ११९१ ॥ ज्ञानियांस अन्य उपाय । ते जाणावे अपाय । तो पापसमुद्र तरोनि जाय । ज्ञानेंचि. ॥ ११९२ ॥ आतां अर्जुना! हें तरणें किती । अरे! कोटिजन्में संचितें जळती । म्हणूनि म्हणतो संतांचा पती । या श्लोकें. ॥ ११९३ ॥

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन! ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

अर्जुना! जैसीं काष्ठें । ओलीं कोरडीं यथेष्टें । पेटला अग्नि अवशिष्टें । न उरवी करीच भस्म. ॥ ११९४ ॥ तैसा जो ज्ञानाचा अनळ । पेटला होतां अभ्यासबळ । तो पापपुण्यरूप सकळ । भस्म करी कर्मे संचितें. ॥ ११९५ ॥ या दों श्लोकीं द्विविध पाप । त्यांत एका पापाचा न्हे लेप ।

१. स्पर्श. २. पापसमुद्र. ३. नदीच्या तीरीं. ४. दुसऱ्या तीर्थास.

दुसरें संचित जळे प्रताप । द्विविध श्लोकीं ज्ञानाच्या. ॥ ११९६ ॥ येथें बोलती कितीएक । कीं पूर्वश्लोकीं तरती पातक । हें बोलोनि सशंक । होऊनि दुसरा दृष्टांत बोलिला या श्लोकीं. ॥ ११९७ ॥ कीं तरला समुद्रनीर । परी उरला असे सागर । तैसें पापही अपार । उरलें हा अर्थ होतो या दृष्टांतें. ॥ ११९८ ॥ यालागीं दुसरा श्लोक । बोलिला श्रीवत्सांक । कीं ज्ञानाग्नींत जळतें पातक । म्हणोनी. ॥ ११९९ ॥ हाही अर्थ बरा । परंतु सर्वेश्वरा । अयोग्य दृष्टांत बोलोनि दुसरा । योग्य दृष्टांत बोलणें कां लागे? ॥ १२०० ॥ वक्ता सर्वज्ञशिरोमणी । आणि मिळाली अणीस अणी । ते समयीं बोलोनि अयोग्य वाणी । दुसरिया श्लोकीं सांवरी हेंचि अयोग्य. ॥ १२०१ ॥ आतां यानंतर श्लोक । कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तहि सुज्ञलोक । परिसोत. ॥ १२०२ ॥ **'सर्वं ज्ञानप्लवेनैव'** । म्हणूनि पूर्वश्लोकीं देव । दाखवी ऐसा भाव । एवंशब्दीं. ॥ १२०३ ॥ कीं ज्ञानेंचि ज्ञानी तरे । इतर उपाय नव्हती बरे । गंगावासी तीर्थें फिरे । मूर्ख जैसा. ॥ १२०४ ॥ ज्ञानामृताचें पान । करूनि कर्मकांजीचें ध्यान । करी तेव्हां तोहि अज्ञान । म्हणावा कीं. ॥ १२०५ ॥ एवं पापनाशकें बहुतें । शास्त्रीं बोलिलीं प्रायश्चित्तें । परमपवित्रें अद्भुतें । परि सरी नये ज्ञानाची. ॥ १२०६ ॥ पवित्राहूनि पवित्र । आणि सुलभत्व अतिविचित्र । म्हणूनि बोलतो कमलनेत्र । आतां या श्लोकीं. ॥ १२०७ ॥

**नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥**

अगा! वेद आणि वेदाश्रितें । धर्मशास्त्रेंही बहुतें । बोलती प्रायश्चित्तें । पवित्रें नाना. ॥ १२०८ ॥ परंतु या श्रुतिस्मृतींच्या अन्वयांत । ज्ञानासारिखें अत्यंत । पवित्र कांहीं नसे निश्चित । अर्जुना! ॥ १२०९ ॥ अगा! हस्तीस धुतलें जळीं । तो पाण्यांतही चांचपे धुळी । तीरास येतां कवळी । धुळी शुंडाग्रेंकरूनी. ॥ १२१० ॥ ऐसें शुद्धिनिमित्त । केलें जरी कर्मप्रायश्चित्त । तथापि पापीं प्रवर्ते चित्त । पुनःपुन्हा. ॥ १२११ ॥ ज्ञान कर्माचीं मुळेंचि तोडी । सोडवी चित्ताच्या अनादि खोडी । लावूनि ब्रह्मसुखामृताची गोडी । कंटाळा आणी विषयकांजीचा. ॥ १२१२ ॥ क्रियमाण कोणे काळीं । स्पर्शों

---

१. श्रीकृष्णास. २. टोकास टोक. ३. पेज. ४. समता, बरोबरी. ५. ग्रहण करी, माखी.

नेदी आणि संचितें जाळी । अहंकर्तृत्वाच्या विटाळीं । ओंवळें होऊं नेदी मनातें. ॥ १२१३ ॥ नाहीं नाहीं नाहीं । ज्ञानासारिखें पवित्र कांहीं । संसारदुःखसरिताप्रवाहीं । तारूं न असे यासारिखें. ॥ १२१४ ॥ गंगा पवित्र परी । पापमात्रातेंचि संहरी । आणि पुण्यसुवर्णशृंखळा[1] करी । दृढ अत्यंत. ॥१२१५॥ गंगा क्रियमाणें न टाळी । आणि संचितें न जाळी । पापमात्राची करी होळी । एकाच जन्माचिया. ॥ १२१६ ॥ तेही पाप नाशी परी । ते गंगा देशांतरीं । जे वसती तीरीं । दुरी कांहीं तयांसही. ॥ १२१७ ॥ तैसें नव्हे हें ज्ञान । अगा! जे जे इच्छिती जिज्ञासुजन । ते स्वयेंचि तें कैवल्यधन । पद परम साम्राज्याचें. ॥ १२१८ ॥ राज्यभ्रष्ट राजा स्वप्नीं । मी राजा कधीं होईन म्हणोनी । तळमळ करीत होता मनीं । जागृत होतां स्वयें तोचि सार्वभौम. ॥ १२१९ ॥ पवित्रां सर्वांहूनि पवित्र । आणि सुलभ तरी अतिविचित्र । कीं दूरी नसे अणुमात्र । जो जाणे तो स्वयेंचि तें ज्ञान. ॥ १२२० ॥ 'तत्स्वयं' म्हणोनी । श्रीकृष्ण या वचनीं । हा अर्थ बोले कीं ज्ञानी । स्वयेंचि तें ज्ञान. ॥१२२१॥ ऐसें तें स्वयें स्वस्वरूप परी । चित्तास अज्ञानेंकरूनि होतें दुरी । दृष्टीस सर्प भासतां दोरीं । दोर नसे असोनि दृष्टींत. ॥ १२२२ ॥ तो कळला जरी स्वात्मदोर । अनाद्यहंकार सर्पसंस्कार । क्षण विसरतां तो अहंकार । सर्प होय आत्मा रज्जूंत. ॥ १२२३ ॥ म्हणूनि करावा अभ्यास । लक्षावें निरहंकारस्वरूपास । आणि देहावेगळें आपणास । साक्षित्वें पाहावें सर्वदा. ॥ १२२४ ॥ हा व्यतिरेकअभ्यास । दुसरा अन्वयाचा विलास । कीं स्वात्मकिरणीं जडलाभास । आत्मकिरणत्वेंचि लक्षावा. ॥ १२२५ ॥ तंतूनें स्फुरे पट । तो पट तंतूचि निपट[2] । मातीवेगळा कैंचा घट? । आत्माचि जड जग सकळही. ॥ १२२६ ॥ या जडचैतन्यअन्वयें । जड नसे चैतन्यचि असे या निश्चयें । सर्वभूतीं नांदतो आपण स्वयें । जडतरंगीं चित्समुद्र. ॥ १२२७ ॥ आपली बुद्धि आपलीं इंद्रियें । त्या मृगजळीं किरण स्वयें । तैसाचि शब्दादिविषयांतही निश्चयें । आपणासि आपणचि लक्षावें. ॥ १२२८ ॥ पांचा विषयांचा प्रपंच । त्यास जाणती इंद्रियें पांच । हे मृगजलप्राय होती अहाच । स्वात्मकिरण पाहतां यामाजीं. ॥ १२२९ ॥ हे उभय प्रकार योग । उभयत्र चित्तचैतन्यसंयोग । बहुत काल या अभ्यासें वियोग । होय अज्ञानसंस्काराचा. ॥१२३०॥

---

१. पुण्यरूप सोन्याची बेडी. २. निखालस.

यालागीं म्हणतो सर्वेश्वर। कीं जो योगसंसिद्ध नर। कालेंकरूनि त्यास विसर। पडतो पूर्वसंस्काराचा. ॥ १२३१ ॥ तेव्हां [१]बाणलें म्हणावें ज्ञान। सांपडोनि [२]जेतन जालें स्वधन। सर्प न वाटतां निर्भय मन। स्वात्मरज्जूच्या दृढाभ्यासें. ॥ १२३२ ॥ जेव्हां चित्त स्वरूपीं जागे। जडीं जड प्रकाशातें पाहों लागे। अनायासें चित्त वागे। आत्मतंतुदृष्टीं जडपटीं. ॥ १२३३ ॥ तेव्हां प्राप्त जालें निश्चयें। जरी तें ज्ञान हा आहे स्वयें। म्हणोनि बोलिलें अद्वयें। कीं योगसंसिद्ध कालें तें पावे. ॥ १२३४ ॥ आतां ज्ञान चित्तेंकरूनी। तें चित्त आत्मा नव्हे म्हणोनी। ज्ञान तें स्वयें ज्ञाताचि या वचनीं। संशय उपजेल. ॥ १२३५ ॥ याकारणें म्हणतो हरी। कीं तें ज्ञान [३]बिंबतें चित्ताच्या अंतरीं। कीं चित्त नव्हे तें ज्ञान परी। चित्तामाजी चित्तेंचि कळतसे. ॥ १२३६ ॥ तेव्हां चित्तासि वेगळेपण आलें। ज्ञान चित्तापासूनि भिन्न जालें। तथापि तें [४]निर्धर्म उगलें। चित्तावीण नये [५]प्रत्ययासी. ॥१२३७॥ अंधकार अग्नीनेंचि नासे। परि काष्ठादिविना स्वयें न दिसे। तैसा चित्तावांचूनि न गवसे। [६]आत्मप्रत्यय आत्मयाचा. ॥ १२३८ ॥ काष्ठ जाळितां काष्ठीं दिसे। तरी प्रकाशक अग्निच असे। तैसें चित्त प्रकाशितां चित्तीं गवसे। तें ज्ञान स्वस्वरूपरूप. ॥ १२३९ ॥ ज्ञाताचि तो जैसा ज्ञेय। ज्ञाताचि ज्ञानही हा निश्चय। कीं [७]त्रिपुटी गिळून अद्वय। आत्मा स्फुरे तें ज्ञान. ॥ १२४० ॥ यालागीं तें ज्ञान। स्वयें म्हणे मधुसूदन। ज्ञान एथें आत्माचि चिद्धन। श्रीकृष्ण ऐसें बोलिला. ॥१२४१॥ कोणी म्हणती ऐसें। कीं स्वयमेव म्हणिजे अनायासें। तें ज्ञान पावे म्हणोनि श्रीनिवासें। या भावें बोलिलें स्वयमेव. ॥ १२४२ ॥ आतां हा अर्थ नव्हे सिद्ध। कीं तें ज्ञान पावे योगसंसिद्ध। ऐसें बोलिले प्रसिद्ध। म्हणोनि हेंहि तदनुकूल वाखाणिती. ॥१२४३॥ कीं एथें जो बोलिला योग। तो म्हणावा कर्मयोग। तो करितां कर्मयोगप्रयोग। सिद्ध होतो म्हणिजे पावतो योगत्व. ॥१२४४॥ मग तो योगसंसिद्ध। अनायासें ज्ञानें होतो सिद्ध। ऐसेंही कोणी प्रबुद्ध। बोलती. ॥ १२४५ ॥ तरी कर्मयोगें सिद्ध झाला। गुरुशरणागती लागेच त्याला। [८]प्रणिपात प्रश्न सेवा जयाला। प्रस्तुतींत या प्रकरणीं बोलिली. ॥ १२४६ ॥ या प्रकारें तो अर्थ। विचारितां होतो व्यर्थ। कीं यत्नाविणें स्वयें कृतार्थ। कोण जाला. ॥१२४७॥

---

१. ठसलें. २. रक्षण. ३. ठसतें. ४. प्रकाररहित. ५. अनुभवास. ६. आत्मसाक्षात्कार. ७. ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय मिळून. ८. नमस्कार.

आतां गुरु तो ज्ञान उपदेशितो । तेंव्हां अनायासें तें पावतो । शोध काढितां हा अर्थ येतो । एथवरी. ॥ १२४८ ॥ तरी कोण्या निमित्तेंकरूनि । अनायासें पावतो म्हणोनि । पुसतां उत्तर एथूनि । देतील ऐसें. ॥ १२४९ ॥ कीं ज्याचें ज्ञान हें । तो आत्मा आपणचि आहे । आपणास आपण पाहे । अनायासें. ॥ १२५० ॥ ऐसें बोलतां पुसावें । कीं आत्मा स्वयेंचि या भावें । आत्मज्ञान सुलभ म्हणावें । तरी आत्मा ज्ञेय हें ज्ञान वेगळें कीं. ॥ १२५१ ॥ जेंव्हां वेगळेपण आलें । तेंव्हां अनायासत्व उडालें । आयासत्व प्राप्त जालें । वेगळेपणें ज्ञानासी. ॥ १२५२ ॥ आत्मा आपण स्वयें निःसंशय । परी नव्हे ज्ञान[1] तो ज्ञेय । ज्ञान वेगळें तेंव्हां प्राप्त होय । आयासपण[2] साधितां तें ज्ञान. ॥ १२५३ ॥ तेंव्हां म्हणाल कीं ज्ञान । स्वयें आत्माचि चिद्घन[3] । कीं ज्ञान करितां भिन्न । बाध येतो. ॥ १२५४ ॥ ज्ञान वेगळें म्हणाल । तरी ज्ञाता ज्ञेयावेगळा पडेल । ज्ञाता ज्ञेय एक मानाल । तरी ज्ञान वेगळें मग कैंचें? ॥ १२५५ ॥ ज्ञाताचि तो ज्ञेय । तेंव्हां ज्ञानही तोचि निःसंशय । त्रिपुटी गिळोनि अद्वय । ज्ञान प्रकाशे स्वस्वरूप. ॥ १२५६ ॥ आतां ज्ञानही ज्ञाता हाचि स्वयें । ज्ञानास अनायासत्व या निश्चयें । एवं ज्ञान स्वयें तरी कोण्या संशयें । आढेवेढे घेतां. ॥ १२५७ ॥ स्वयें ज्ञाताचि होतें ज्ञान । ऐसेंचि कां न वाखाणावें हें वचन । आढेवेढे घेऊनि वदन । कां शिणवावें? ॥१२५८॥ स्वयें म्हणजे आपण । मुख्य अर्थ नव्हे अनायासपण । मुख्य अर्थ सोडूनि गौण । अंगीकारावा कां परी? ॥ १२५९ ॥ आणि स्वयंशब्दें अनायासत्व असिद्ध । कीं तो पावे पुरुष होऊनि योगसंसिद्ध । म्हणोनि म्हणती हें तों प्रसिद्ध । योग यत्नें साधावा. ॥ १२६० ॥ आतां स्वयें म्हणजे अनायासें । व्याख्यान जेंव्हां केलें ऐसें । तेंव्हां योग म्हणतां आयासें । म्हणावें लागेल. ॥१२६१॥ आणि आत्मयोगही ते न मानिती । आत्मा कळतांचि मुक्त म्हणती । ते या योगशब्दें वाखाणिती । कर्मयोग. ॥ १२६२ ॥ कीं कर्मयोगें होतो शुद्ध । मग तो ज्ञान पावतो समृद्ध । योगसंसिद्ध म्हणजे योग्यतेनें सिद्ध । कर्मयोगें होतो म्हणूनि म्हणती. ॥ १२६३ ॥ योग्यतेनें सिद्ध जाला । तो साधकचि तरी बोलिला । सिद्धही न म्हणावा संसिद्ध त्याला । कां म्हणे श्रीकृष्ण. ॥ १२६४ ॥ आणि योगचित्ताची एकाग्रता । त्या योगें बरी सिद्धता । ज्यास तो योगसंसिद्ध तत्त्वतां । हाही मुख्यार्थ कां टाकावा? ॥ १२६५ ॥ गुरुमुखें

---

१. ज्ञानाई. २. श्रमत्व. ३. ज्ञानपूर्ण.

आत्मा कळला । तरी अनादिसंस्कार आहे लागला । वेदीं[1] पुराणीं योग बोलिला । याचिलागीं. ॥ १२६६ ॥ बुद्धीस आत्मसत्ता कळली । तरी जों स्वरूपीं नाहीं मिसळली । निर्गुणीं निर्गुणत्वें जों नाहीं थारली[2] । तोंवरी नव्हे ज्ञान परिपक्क. ॥ १२६७ ॥ हा निर्विकल्पयोग । बुद्धीस आत्मयास ऐक्यें संयोग । आत्मसागरीं मुरे तरंग । बुद्धीचा. ॥ १२६८ ॥ अथवा तरंग चराचर । त्यांत एक आत्मसत्ता सागर । हा सविकल्पयोग निरंतर । जेव्हां बाणे. ॥ १२६९ ॥ तेव्हां पुरुष योगसंसिद्ध । ज्ञान तेव्हांच जालें सिद्ध । हा सोडूनि अर्थ प्रसिद्ध । कां वाखाणावें अन्यथा? ॥ १२७० ॥ एवं ज्ञाता तोचि ज्ञान स्वयें । कीं ज्ञेयही तोचि निःसंशयें । परि चित्तचैतन्ययोगाश्रयें । बाणतसे[2] हें ज्ञान. ॥ १२७१ ॥ गुरुमुखें आत्मा कळे । आणि तत्काल चित्त योग वळे । तो जन्मांतरीं योग कळे । यत्न करीत होता म्हणावा. ॥१२७२॥ परि अनाद्यविद्यासंस्कार । चित्त स्वरूपीं वारंवार । न योजितां न तुटे हा निर्धार । सकळ वेदांचा. ॥१२७३॥ आत्मा कळला निश्चित । अभ्यास न करी चित्त । त्यास देहात्मत्व अत्यंत । करीच मोह. ॥ १२७४ ॥ चिदात्मत्वस्मरण नाहीं । तेव्हां वाटेच आत्मत्व देहीं । तिसरा अवलंब तो नसे कांहीं । आत्मत्वाचा बुद्धीस. ॥ १२७५ ॥ देहात्मत्वप्रवाहीं । ब्रह्मात्मता तों स्फुरत नाहीं । काळ ऐसा लोटतां कांहीं । गुरुवचनही न आठवे. ॥ १२७६ ॥ एवं देहात्मसंस्कार मोडे । ब्रह्मात्मसंस्कार जोडे । अभ्यासावांचूनि न घडे । हे स्थिति. ॥ १२७७ ॥ ज्यास हे स्थिति बाणे । तोचि म्हणावा तें ज्ञान जाणे । अन्यथा[3] जाणतो तोही नेणे । ज्ञान नाहीं म्हणावें तयाला. ॥ १२७८ ॥ एवं ब्रह्मात्मत्वस्मरणाभ्यास । हा योग साधे जयास । त्या योगसंसिद्धास । ज्ञानलभ्य तें स्वयेंचि तो. ॥ १२७९ ॥ अर्थ हाचि बरा । बाधित अर्थ दुसरा । टाकूनियां मत्सरा । विचारिती त्यांस हाचि अर्थ. ॥ १२८० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत. ॥ १२८१ ॥ ज्ञानाची प्रशंसा फार । कृष्ण बोलिला वारंवार । कोणास त्या ज्ञानीं अधिकार । तें वर्णितो या श्लोकीं. ॥ १२८२ ॥

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

---

१. स्थिरावली. २. ठरत असतें. ३. असें न मानल्यास.

अगा ! हें ज्ञान तो । श्रीगुरुमुखें पावतो । कीं जो श्रद्धा धरितो । वेदीं आणि गुरुवचनीं. ॥ १२८३ ॥ अनुभवगम्य अद्वैत । जों अनुभवा ये अत्यंत । तोंवरी वेदवेदांत । बोलती तेंचि मानावें. ॥ १२८४ ॥ ऐक्य जीवा ईश्वरा । ब्रह्मैक्य जडा चराचरा । प्रपंच मिथ्या जो प्रत्यक्ष खरा । हें सर्व कारण अश्रद्धेस. ॥ १२८५ ॥ बुद्धीस आस्तिकता । ते श्रद्धा म्हणावी तत्वतां । आस्तिक्य म्हणजे सत्यता । भल्याच्या वाक्याची मानणें. ॥ १२८६ ॥ अनादि ईश्वरवचनें वेद । ते उपपादिती अभेद । तेव्हां मिथ्या सर्व भेद । हे आस्तिकता श्रद्धा जयाला. ॥ १२८७ ॥ तोचि अधिकारी ज्ञानासी । कीं प्रमाण मानी वेदवेदार्थासी । हें न घडे म्हणोनि मानसीं । अश्रद्धा धरीना. ॥ १२८८ ॥ आधीं परोक्षरीती । शास्त्रश्रवण जिज्ञासु[1] करिती । तेथें जे श्रद्धा धरिती । तेचि अधिकारी अपरोक्षानुभवा. ॥ १२८९ ॥ दृष्टांतें मोडूनियां द्वैत । वेद उपदेशिती अद्वैत । परंतु जितका दृष्टांत । तितका एकदेशी. ॥ १२९० ॥ घटादि नाना पात्रजाती । लटकी त्यांत साच[2] माती । तैसें ब्रह्म सर्वभूतीं । सत्य आणि मिथ्या भूतें श्रुति म्हणे. ॥ १२९१ ॥ सत्य मृत्तिका, मिथ्या पात्र । दृष्टांतीं साधे इतुकेंचि मात्र । येथें अनधिकारी अपवित्र । कुतर्कें धरिती अश्रद्धा. ॥ १२९२ ॥ कीं वेगळाले मृत्पिंड । करितां घडिती जाती उदंड[3] । तरी काय ब्रह्मांडीं खंडखंड । भूतें होतां होतसे ? ॥ १२९३ ॥ वेगळे मृत्पिंड गोळे निघती । यांस परिच्छिन्नत्व म्हणती । ब्रह्मापरिच्छिन्नत्व या दृष्टांतीं । न वर्णिती वेद. ॥ १२९४ ॥ कमलासारिखे नयन । हें सुंदरत्वाविषयीं वचन । येथें कमल दृष्टिहीन । म्हणोनि दृष्टांत घडे कैसा म्हणावा ? ॥ १२९५ ॥ दर्शनपटुत्व[4] नयनीं । वर्णितां कमलासारिखे म्हणोनी । दृष्टांत बोलतां वचनीं । बाध मानावा. ॥ १२९६ ॥ बुबुळें नाहींत कमळा । कमलासारिखा न म्हणवे डोळा । तैसा हा कुतर्कांचा चाळा । बुद्धि अनधिकारियाची ये रीती. ॥ १२९७ ॥ सत्यत्व मिथ्यात्ममात्र विचार । तेथें परिच्छिन्नत्वादिप्रकार । म्हणूनि वेदांचा मुख्य निर्धार । तेथें अश्रद्धा अनधिकारिया. ॥ १२९८ ॥ जीवेश्वरीं अभेद । **'तत्त्वमसि'** म्हणती वेद । अश्रद्दधान म्हणती संसारखेद । दुःख भोक्तृत्व न घडे तेधवां. ॥ १२९९ ॥ प्रतिबिंबत्वें दुःखभोग । अन्यथा जीवेश्वरां ऐक्ययोग । हें आयकोनिही नव्हे वियोग । संशयाचा. ॥ १३०० ॥ ऐसा अश्रद्दधान । वेदीं वेदांतीं श्रद्धाहीन । तो कधीं

१. ज्ञानेच्छु. २. खरें. ३. पुष्कळ. ४. पाहण्याचें सामर्थ्य.

न लाहे[1] ज्ञान । श्रद्धा न धरी तो अद्वैतीं. ॥ १३०१ ॥ वेदीं श्रद्धा धरूनी । नाना दृष्टांतेंकरूनी । शास्त्रश्रवणकाळीं धरी मनीं । श्रद्धा अद्वैततत्त्वाची. ॥ १३०२ ॥ तो म्हणावा श्रद्धावंत । तो ज्ञान पावतो म्हणे भगवंत । एवं जों अनुभवा ये अद्वैत । तों श्रद्धा आधीं असावी. ॥ १३०३ ॥ तो श्रद्धावंत नर । ज्ञान पावोनि तत्पर । होय कीं अत्यंत सादर । अभ्यासीं स्वरूपानुसंधानाच्या. ॥ १३०४ ॥ त्या अभ्यासास इंद्रियें । विघ्नकारक निश्चयें । म्हणोनि संयतेंद्रिय स्वयें । जो तत्पर होतसे. ॥ १३०५ ॥ तो परम शांती । थोडियाच काळें म्हणे श्रीपती । पावतो येथें संतांचा पती । पूर्वश्लोकें संदेहही[2] हरितसे. ॥ १३०६ ॥ कीं योगसंसिद्ध काळेंकरूनी । तें ज्ञान पावतो म्हणोनी । पूर्वश्लोकीं बोलिला त्या वचनीं । विलंब योगसिद्धींत अर्जुन मानील. ॥ १३०७ ॥ ज्ञान बिंबे काळेंकरूनी । मी बोलिलों यावरूनी । सिद्धीस विलंब झणी[3] मनीं । मानिसी अर्जुना ! ॥ १३०८ ॥ तरी अगा ! परम शांती । थोडियाच काळें बाणे स्थिति । 'अचिरेण' म्हणोनि संतांचा पति । या भावें बोलिला. ॥ १३०९ ॥ कीं ज्ञानी संयतेंद्रिय[4] । आणि तत्पर म्हणजे अभ्यासीं कृतनिश्चय । त्यासि परम शांति प्राप्त होय । स्वल्पचि काळें. ॥ १३१० ॥ आणि म्हणतां परमशांती । द्विविध शांति येथें श्रीपती । सूचवी कीं जों बाणली ज्ञानस्थिती । तोंवरी शांति ते परमशांति म्हणवेना. ॥ १३११ ॥ कीं कामक्रोधादि वैरी । अनावर असोनि बळें आवरी । ब्रह्मानंद बरवा[5] जोंवरी । अनुभविला नाहीं. ॥ १३१२ ॥ जो क्षुधाक्रांत । तो मन घाली भलत्याच्या अन्नांत । परि अग्राह्य टाकी मनांत । इच्छा उपजोनिही. ॥ १३१३ ॥ तोचि जेवूनि तृप्त जाला । मग कांहींच अन्न नलगे त्याला । तैसा ब्रह्मानंदें धाला[6] । तो स्मरणही न करी विषयाचें. ॥ १३१४ ॥ जेथें नाहीं काम । क्रोधाचें नाठवे नाम । काममूळचि दुर्गुणग्राम[7] । त्यावेगळे लोभादि दोष न उपजती. ॥ १३१५ ॥ राहतां वासनासमीर[8] । अचल मानसाचें नीर[9] । भगवत्पदपद्महंसधीर । कामादि तरंग दृष्टीं न देखती. ॥ १३१६ ॥ हे म्हणावी परम शांती । पूर्व शांतीची अन्य रीती । अभ्यासपर हे स्थिति । शीघ्रचि पावती. ॥ १३१७ ॥ परंतु अभ्याससाधन । तेव्हां जेव्हां गुरुमुखें कळे ज्ञान । त्यास अधिकारी तो कीं जो श्रद्दधान । अद्वैततत्त्वीं. ॥ १३१८ ॥ एवं ज्ञानासि अधिकारी । तो वर्णिला या प्रकारीं । आतां जे अनधिकारी । ते वर्णितसे या श्लोकीं. ॥ १३१९ ॥

---

१. लाभे, पावे. २. संशय. ३. अवश्य. ४. इंद्रियें ज्याच्या स्वाधीन. ५. उत्तम. ६. तृप्त झाला. ७. वाईट खोडींचा समुदाय. ८. इच्छारूप वायु. ९. उदक.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

अगा! या ज्ञानास अनधिकारी । ते जाणावे तीं प्रकारीं । एक अज्ञ दुसरा अश्रद्दधान याउपरी । संशयात्मा तो तीसरा. ॥ १३२० ॥ सहज लोक अज्ञानी । तेहीं म्हणावे अज्ञ म्हणोनी । परि हा अज्ञ तो जो गुरुमुखेंकरूनी । आइकोनि नेणे स्वरूपातें. ॥ १३२१ ॥ गुरु समजावी परी । ¹उकल नव्हे अंतरीं । वर्षे पालथ्या घटावरी । गुरुकृपामेघ. ॥ १३२२ ॥ मागें दुसरिया अध्यायांत । '²**आश्चर्यवत्पश्यति**' या श्लोकांत । याचें अनधिकारित्व **श्री**कांत । बोलिला चतुर्थचरणीं. ॥ १३२३ ॥

**'श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्'** [अध्याय २ श्लो० २९.]

कोणी गुरुमुखें श्रवण करूनिही । या आत्मायास जाणत नाहीं । हें द्वितीयाध्यायांतही कांहीं । याचेंचि अनधिकारित्व वर्णिलें. ॥ १३२४ ॥ कीं गुरुकृपाघन । शरणागतावरी ³ज्ञानजीवन । वर्षे परंतु पाषाण ज्याचें मन । तृणही तेथें उगवेना. ॥ १३२५ ॥ अनधिकारी जन । जरी करवते सज्ञान । तरी कृपाळू संत त्रिभुवन । मुक्तचि करिते. ॥ १३२६ ॥ संतकृपा नव्हे समर्थ । बोलों नये ऐसा अर्थ । ज्ञान न कळे तरी कृतार्थ । करतीच ते. ॥ १३२७ ॥ कीं जो करितां प्रकार । त्यास जोडे अधिकार । तो त्यास सांगती विचार । चित्तशुद्धीचा. ॥ १३२८ ॥ परंतु जरी यथापूर्व असेल शरण । तत्त्व न कळे तरी न सोडी चरण । जो टाकीच त्याचें शिष्यपण । तोचि नासे सन्मार्गापासुनी. ॥ १३२९ ॥ दुसरा अनधिकारी जन । तो कीं जो अश्रद्दधान । कीं कांहीं समजोनिही ज्ञान । श्रद्धा धरीचना. ॥ १३३० ॥ गेली विपरीत भावना । तों उभी राहिली असंभावना । कीं मी देह हे भावना । विपरीत भावना म्हणावी. ॥ १३३१ ॥ देह आणि आपण एक । हा दुरी जाला अविवेक । होतां जडचैतन्यविवेक । गुरुमुखें. ॥ १३३२ ॥ व्यतिरेकें आत्मा कळे । तो म्हणतां आत्मा ब्रह्मबुद्धि खवळे । ते वळितांही न वळे । अश्रद्दधानाची. ॥ १३३३ ॥ कीं चैतन्यावांचूनी । जडास भोक्तृत्व न घडे म्हणोनी । अद्वैतीं अश्रद्धा धरूनी । सन्मार्गापासूनि जो ⁴च्यवे. ॥ १३३४ ॥ अद्वैतशास्त्र सोडी । शासन गुरूचें मोडी । न तुटतां संसारबेडी । नाश पावे ये रीतीं. ॥ १३३५ ॥

---

१. निवाडा, उमज. २. अध्याय २, श्लो० २९ पहा. ३. ज्ञानोदक. ४. भ्रष्ट होई.

व्यतिरेकज्ञान मात्र । होतां कोणी अपवित्र । सोडूनि मार्ग पवित्र । नाशती द्वैतमार्गीं भरोनी.[1] ॥ १३३६ ॥ कर्ते भेदशास्त्राचे । जडचैतन्यविभागही वाचे । वर्णूनि अद्वैतानुभवाचे । मार्ग दूषिती. ॥ १३३७॥ देहात्मता विपरीतभावना । त्याची जाऊनिही असंभावना । उपजली कीं हें घडों शकेना । हे भावना असंभावना म्हणावी. ॥ १३३८ ॥ कीं देहावेगळा द्रष्टा जडाचा । हा सुख-दुःखभोक्ता साचा[2] । यासि ब्रह्म म्हणेल त्याची वाचा । काय प्रमाण?॥१३३९॥ म्हणोनि व्यतिरेक ज्ञान । होतां ऐसें अश्रद्धधान । पांडित्यबळें द्वैत अज्ञान । तेंचि ज्ञान अद्वैत म्हणोनि स्थापिती. ॥ १३४० ॥ जरी कळता अन्वय । तरी तुटते[3] सर्व संशय । अद्वैत सत्य हा निश्चय । बाणता रूपाचा. ॥१३४१॥ सर्वत्र आत्मा दिसे । जड चैतन्य एकत्वें समरसे । तेव्हां चित्तीं दृढ बसे । ठसा अद्वैताचा. ॥ १३४२ ॥ एका देहीं आपण । तो देहावेगळा हे कळली खूण । तों खरेंचि भोक्तृत्वपण । त्या प्रतिबिंबचैतन्यास. ॥ १३४३ ॥ ज्ञान झालें तथापि । सुखदुःख पूर्वपुण्यपापीं । उपजलें तें कदापी । न टळे भोगि-ल्यावांचूनि. ॥ १३४४ ॥ तोचि भोक्ता म्हणावा । तोचि ब्रह्मत्वें गणावा । तेव्हां संशय काय लागला आणावा । देशांतरा जाऊनी. ॥ १३४५ ॥ ऐसा संशय पडोनिही । जो गुरुचरण सोडीत नाहीं । तो न पडतां अविद्याप्रवाहीं । होतोच सिद्ध. ॥ १३४६ ॥ कीं अन्वयज्ञानीं दृष्टी पडे । आणि अभ्यासें सर्वात्मता सांपडे । संशयाचें मूळ न उडे[6] । कां मग तयाचें. ॥ १३४७ ॥ परंतु कळतां व्यतिरेक । अश्रद्धधान जाले कितीएक । नाशती म्हणे उत्तमश्लोक । ते अश्र-द्धधान. ॥ १३४८ ॥ कळोनि श्रद्धा न धरी । तो अश्रद्धधान ऐसेपरी । कीं समजेचिना त्यातें हरी । बोले अज्ञ म्हणोनी. ॥ १३४९ ॥ सहज अज्ञत्व ना-सेल । हें सांगणें काय नवल । ज्ञानाचा नव्हे उकल । तो अज्ञ एथें बोलिला. ॥ १३५० ॥ आतां संशयबुद्धि तिसरा । ज्याच्या बुद्धींत संशयाचाच थारा । प्रत्यक्षावांचूनि खरा । अर्थ कोणी न वाटे. ॥ १३५१ ॥ वेदशास्त्रीं विश्वास । आणि संशय वाटे मनास । तो अश्रद्धधान तयास । मागेंचि वर्णिलें. ॥१३५२॥ वेदशास्त्र तरी मानी । परी सर्वत्र संशय मनीं । कीं स्वर्गनरकजन्मांतर नयनीं । देखे ऐसा कोण आहे. ॥ १३५३ ॥ तेव्हां कैंचा ईश्वर । हा उगाच शा-स्त्रांचा पसर । परि सोडितां वेदशास्त्रांचा पदर । नास्तिक म्हणती मज लोक.

---

१. ईश्वरभेदाच्या अभिमानास पेटून. २. खरा. ३. नाश पावते. ४. ठसता. ५. मि-सळे. ६. नाश पावे.

॥ १३५४ ॥ म्हणोनि वेदमार्गीं असे । कर्मानुष्ठान करितांही दिसे । आणि जाउनिही सादर बसे । वेदांत आइकती त्यांमाजी. ॥ १३५५ ॥ खरें नाणें असे । त्यांत खोटेंही तैसेंचि दिसे । परीक्षा होय तों येतसे । खऱ्या सांगातें गणनेस. ॥ १३५६ ॥ शास्त्रश्रवणकाळीं । त्याची प्रकृति न दिसे निराळी । अपरोक्षउपदेशींही कळी । [1]उकले खोटेपणाची. ॥ १३५७ ॥ प्रत्यक्षा एकावींचुनी । कांहींच नाहीं म्हणोनी । हा निश्चय ज्याचे मनीं । अपरोक्ष कळेल काय त्याला. ॥ १३५८ ॥ परि संतसंगीं वसे । वरील पाषाण ओलासा दिसे । वेदाचे अर्थ समजेही तैसे । तरी संशयें अंतर भिजेना. ॥ १३५९ ॥ एवं जैसे अज्ञ आणि अश्रद्दधान । [2]च्यवती सन्मार्गापासून । तैसा हाही च्यवे ऐसें मधुसूदन । [3]सगट आधीं बोलिला. ॥ १३६० ॥ कीं तिघेही मोक्षमार्गापासूनि । समान च्यवती म्हणोनि । तिघे सगट आधीं बोलोनि । संशयबुद्धि वेगळा निवडितो. ॥ १३६१ ॥ कीं अज्ञ आणि अश्रद्दधान । एक न समजे एक न उमजे म्हणोन । वायां गेले परी जरी गुरुभजन । न सोडित होती काळें कांहीं कृतार्थ. ॥ १३६२ ॥ अथवा ज्ञानमार्गापासूनी । च्यवले तरी काम्यानुष्ठानेंकरूनी । इहलोक परलोक साधिती म्हणोनी । हा त्यावेगळा निवडिला. ॥ १३६३ ॥ कीं यास इहलोक । अथवा नाहीं परलोक । अथवा न सुख कांहीं तरी एक । यासी. ॥ १३६४ ॥ दानपुण्याचें फळ । तें अदृष्ट कीं दृष्टीस अकळ । तेथें संशयें डळमळ । याच्या मना. ॥ १३६५ ॥ दान अतिथिपूजन । न करी न वेंची धन । तें अपकीर्तिसाधन । सर्वत्र संशयबुद्धि जो त्याला. ॥ १३६६ ॥ सत्कीर्ति बोलती लोक । त्यासचि साधला इहलोक । म्हणोनि म्हणे उत्तमश्लोक । कीं इहलोक न असे तयाला. ॥ १३६७ ॥ वेदोक्त स्वर्गसुख । साधे करितां [4]दानमख । संशयबुद्धीस्तव जो विमुख । यज्ञदानीं. ॥ १३६८ ॥ त्यास परलोक [5]कैंचा । ज्यास संशयें वेदवाचा । मिथ्या वाटती साचा । प्रत्यक्ष वादचि ज्यासी. ॥ १३६९ ॥ एवं न इहलोक । अथवा न परलोक । अथवा न सुख कांहीं एक । तया संशयबुद्धीसी. ॥ १३७० ॥ सुखी एक मूढ अत्यंत । किंवा सुखी संत । मूढ उन्मत्तपणें निश्चित । संत स्वहित साधूनी. ॥ १३७१ ॥ जो सर्व पांडित्य जाणे । आणि संशयें स्वहित करणें न बाणे । त्यास म्हणती परम शहाणे । अत्यंत दुःखी म्हणोनी. ॥ १३७२ ॥ कीं खांदियावरी शूळ । गळां

---

१. उलगडा होई. २. भ्रष्ट होतात. ३. बरोबर, साधारण अभिन्नपणें. ४. दानयज्ञ. ५. खऱ्या त्या खोट्या वाटतात.

माळा तोंडीं गूळ । प्रतिपाउलास मृत्युस्थळ । जवळी होतें. ॥ १३७३॥ माळा गळां घालिती । खारिका खोबरें चारिती । तथापि ठाउकें कीं आतां मारिती । वधस्थळीं. ॥ १३७४ ॥ जेथें रोंविती शूळ । दृष्टीस दिसे तें स्थळ । त्यास ते भोग सकळ । काय सुख होती. ॥ १३७५ ॥ तैसा हा संशयबुद्धि । संशयें न करोनि परलोकसिद्धि । भोग भोगूनिही समृद्धी । मृत्युभयाची मनांत. ॥ १३७६ ॥ कीं संशयबुद्धि परी जाणता । नव्हे केवळ उन्मत्त नेणता । मरण तों आहेच तत्त्वतां । हें जाणे. ॥ १३७७ ॥ ज्यांची बुद्धि निःसंशय । जिहीं केला स्वहितसंचय । त्यांच्या बुद्धीस निश्चय । कीं मेलों तरी गति आम्हां. ॥ १३७८ ॥ यांस आत्मा तरी अतिप्रिय । तोचि नासेल हा निश्चय । का प्रत्यक्षावेगळा संशय । सर्वत्र ज्यांला. ॥ १३७९ ॥ एवं भोगूनिही विषय । शूलस्कंधासारिखें मृत्युभय । प्रवर्तोनि सन्मार्गींही संशय । ज्यास तो दुःखीच सर्वत्रही. ॥ १३८० ॥ एवं अज्ञ आणि अश्रद्धधान । त्यांस न होउनीही ज्ञान । होय करितां साधन । इहलोक परलोक आणि सुखही. ॥ १३८१ ॥ कीं न बिंबलें ज्ञान । तरी वेदीं ते श्रद्धधान । असोनिही अज्ञान । इहलोक परलोक साधिती. ॥ १३८२ ॥ ऐसा पाहतां निर्णय । ज्याच्या बुद्धींत बोलिला संशय । हा वेदमार्गी असोनिही होय । गुप्त चार्वाक[१]. ॥ १३८३ ॥ ते दोघे अनधिकारी । परी न बिंबोनिहि ज्ञान जरी । गुरुशुश्रूषा करिती बरी । अधिकार पावोनि पावती ज्ञान. ॥ १३८४ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञश्लोक । परिसोत याउपरी. ॥ १३८५ ॥ संशयबुद्धि सर्वथा । नासे हे पूर्वश्लोकीं कथा । कानीं पडतां पार्था । चिंता उपजली स्वविषयीं. ॥ १३८६ ॥ कीं भीष्मादिवधें निरय[२] । हा आपणातें निश्चय । आणि कृष्ण म्हणतो निःसंशय । पाप नाहीं. ॥ १३८७ ॥ मज हें वाटे अहाच । पापचि वाटे साच । तेव्हां मीही तैसाच । संशयात्मा. ॥ १३८८ ॥ ऐशा संशयें याला । मारूं जरी तरी मजला । दोन्ही लोक नाहींत कीं बोलिला । कृष्ण संशयबुद्धीस गति ऐशी. ॥ १३८९ ॥ तेव्हां मी संशयमती । झगडतांही नसे उभयलोकगती । आणि यांस मारायाची प्रवृत्ती । न उपजे मला.॥१३९०॥ तरी कां मारूं यांला । कां न राहों उगला । कीं मारितांही यांस मला । न दिसती उभय लोक. ॥ १३९१ ॥ हा भाव धरितां मनीं । सर्वसाक्षी स-

१. नास्तिक, निरीश्वरवादी. २. नरक.

मजोनी । तूं तैसा न होसी म्हणोनी । 'युद्ध करीं' म्हणतो दों श्लोकीं. ॥१३९२॥ कीं न होसी तूं प्रत्यक्षवादी । तुज विश्वास वेदीं । वेदाश्रितांसही संवादीं । उपजती संशय उदंड. ॥ १३९३ ॥ कर्मी बंध निश्चित । आणि अज्ञानें संशयही अगणित । परि जे वेदीं विश्वासरत[1] । ते दोंहीपासोनि सुटती. ॥१३९४॥ म्हणोनि तूं युद्ध करीं । हें पुढिल्या श्लोकीं बोलेल हरी । वेदविश्वासरत ज्यापरी । तरती तें बोलतो या श्लोकीं. ॥ १३९५ ॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ! ॥ ४१ ॥**

अगा! जो वेदोक्त कर्म । करितो वर्णाश्रमोचित धर्म । करूनि ईश्वराराधनयोग परम । त्या योगीं जो समर्पितो. ॥ १३९६ ॥ वेदीं विश्वास धरूनी । ईश्वरीं अर्पी कर्में करूनी । तरी अनादि अज्ञानें मनीं । संशय असती अपार. ॥ १३९७ ॥ मनीं असले संशय । तरी तो काय वायां जाय । कीं चित्त अज्ञानमय । अनादि असे. ॥ १३९८ ॥ परी कर्में ईश्वरीं अर्पितां । प्रसाद ईश्वराचा होतां । शरण जातां संतां । ज्ञान होय. ॥ १३९९ ॥ त्या ज्ञानें सकळ । संशय तुटती समूळ । मग तो बुद्धिमंत केवळ । अर्जुना! होतो. ॥ १४०० ॥ तेव्हां कर्में तया । कांहीं न बाधती धनंजया! । संचितें जळतां जया । मोक्ष सरतां प्रारब्ध. ॥ १४०१ ॥ एवं बद्ध नव्हे सुजाण । ज्या कर्में तें नव्हे क्रियमाण । संचित जळे प्रारब्धभोगें सरे हे खूण । सुचविली यावरूनि पूर्वोक्त. ॥ १४०२ ॥ म्हणूनि आतां अर्जुना! । तूं मानूनि माझ्या वचना । ऊठ झगड[2] पांडुनंदना! । या प्रकारें म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ १४०३ ॥

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ! ॥ ४२ ॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मब्रह्मार्पणयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥**

अगा! जो झाला ज्ञानी । त्यास कर्में न बाधों शकती म्हणोनी । बोलिलों तूतें पूर्वश्लोकेंकरूनी । याकारणें. ॥ १४०४ ॥ कीं तूंही ज्ञानी । अगा! होऊनी । होय अलिप्त कर्में करूनी । अगा! अर्जुना! ॥ १४०५ ॥ तस्मा-

---

१. दृढविश्वासी. २. युद्ध कर.

त्कारण **धनं**जया ! । या अज्ञानसंभवा संशया । छेदीं ज्ञानखड्गेंकरूनियां । जो हृदयीं तुझ्याच वसतो. ॥ १४०६ ॥ मी एक साचा मारणार । हे एक साचे मरणार । या संशयाचा छेद करणार । एकचि खड्ग ज्ञानाचा. ॥ १४०७ ॥ तरी ज्ञानखड्गें या संशया । छेदूनि अगा ! **धनं**जया ! । ऊठ आणि योगा या। अनुष्ठीं[1]. ॥ १४०८ ॥ ज्ञान जालियाहीवरी । **अर्जु**ना ! तूं हा कर्मयोग करीं । म्हणूनि म्हणतो **ह**री । या भावें. ॥ १४०९ ॥ कीं व्यतिरेकअन्वय । उभय प्रकारें अद्वैताचा निश्चय । करीं आणि हा नानात्वसंशय । छेदीं त्या ज्ञानें. ॥ १४१० ॥ कीं पावोनि अद्वैतखुणे । सर्वात्मत्वही जरी होणें । तरी तें अभ्यासें बाणे । मोडूनि पूर्वसंस्कारातें. ॥ १४११ ॥ तें ब्राणायास साधन । ईश्वराचें आराधन । स्वकृतकर्मार्पण भजन । थोर एथें. ॥ १४१२ ॥ **'ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य'** म्हणोनी । द्वादशीं श्रीकृष्ण बोलेल कीं ज्ञानी । भक्त सर्व कर्मे मज अर्पिती. ॥ १४१३ ॥ त्या अभिप्रायेंकरूनी । ज्ञानें निःसंशय होऊनी । योग अनुष्ठीं म्हणोनी । म्हणतो एथें. ॥ १४१४ ॥ अनुष्ठीं योग । म्हणजे करीं कर्मयोग । कर्मयोग तो कीं निःसंग । ईश्वरीं समर्पी. ॥ १४१५ ॥ **'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र'** । पूर्वाध्यायांत हा निर्णय पवित्र । बोलिला **क**मलनेत्र । कीं बंध या वेगळ्या कर्ममात्रीं. ॥ १४१६ ॥ कर्मयोगाचें लक्षण । दोन अध्यायीं **क**मलेक्षण । बोलिला कीं निष्काम ईश्वरार्पण । तोचि कर्मयोग. ॥ १४१७ ॥ एवं जालियाही ज्ञान । विहित **गी**तेंत सगुणभजन । हें विचारून सज्जन । अभिमानातें दवडूनी. ॥ १४१८ ॥ ऐसा हा अध्याय चतुर्थ । एथें बोलिला समर्थ । कीं ज्ञान होऊनिही यथार्थ । करावें सगुणभजन. ॥ १४१९ ॥ **'जन्मकर्म च मे दिव्यं'** म्हणोनी । या श्लोकीं तत्त्वज्ञानेंकरूनी । माझें जन्मकर्म दिव्य जाणे तो देह सोडूनी । मातें पावे जन्मा पुन्हा नये हें बोलिला. ॥ १४२० ॥ इत्यादि सगुणपर । अध्यायारंभ करी ईश्वर । ब्रह्मार्पणश्लोकें **च**क्रधर । सगुणप्राप्ति बोले ज्ञानियासी. ॥ १४२१ ॥ **'ब्रह्मैव तेन गंतव्यं'** म्हणोनी । ब्रह्मचि जाला जो ज्ञानी । त्यासही सगुणब्रह्मप्राप्ति स्ववचनीं । अनन्यगतिकत्वें बोलिला. ॥ १४२२ ॥ कीं स्थिरतां[3] ब्रह्मानंदानुभव । ज्ञानियास देह असतां जें वैभव । तें नसे तेव्हां स्वयें एकमेव । ब्रह्ममात्र आहे तैसेंच उरतें. ॥ १४२३ ॥ या भावें श्रीकृष्ण ऐसें बोलिला । कीं ज्ञानी निर्गुणचि जो आहे जाला । मागुती ब्रह्म पावणें त्याला । ते सगुणब्रह्मप्राप्तीच. ॥ १४२४ ॥ **'यज्ञायाचरतः कर्म'** । इत्यादि

---

१. खरा, शूर. २. आचरें. ३. स्थिर होतां.

अध्यायभागीं सर्वोत्तम । ज्ञानियास सगुणभजन परम । बोलिला शीघ्र सिद्धिप्रदत्वें. ॥ १४२५ ॥ अंतीं या शेवटिल्या श्लोकीं । उत्तमश्लोक बोलिला कीं । ज्ञानखड्गें संशय छेदूनि टाकीं । आणि ऊठ अनुष्ठीं योगातें. ॥१४२६॥ योगी म्हणजे ईश्वराराधनेचे ठायीं । कर्म अर्पणें ईश्वराचे पायीं । कीं या मागिल्या श्लोकीं शेषशायी । हाचि बोलिला योगशब्दार्थ. ॥ १४२७ ॥ **'योगसंन्यस्तकर्माणं'** म्हणोनी । या चरणें हेंचि सुचवूनी । बोलिला त्याचिवरूनी । हा अर्थ एथेंही साधतो. ॥ १४२८ ॥ योगी कर्मं समर्पी जो बैरवा[1] । तो **'योगसंन्यस्तकर्मा'** म्हणावा । आणि ज्ञानें संछिन्न पांडवा ! । संशय ज्याचे. ॥१४२९॥ त्यासि कर्में न बाधती । म्हणूनि या श्लोकीं अर्जुनाप्रती । तस्मात् तूंही योग करीं म्हणे श्रीपती । ज्ञानखड्गें छेदूनि संशयातें. ॥१४३०॥ **योगसंन्यस्तकर्मा** म्हणजे । योगीं समर्पी कर्मवृंद[2] करि जे जे । तेव्हां योगशब्दें घेतलें पाहिजे । ईश्वराराधन. ॥ १४३१ ॥ कीं कर्में अर्पी ईश्वराराधनेचे ठायीं । एवं करणें आराधन अर्पणें पायीं । त्या पुरुषास म्हणे शेषशायी । ज्ञानसंछिन्नसंशय म्हणोनी. ॥ १४३२ ॥ तस्मात्कारण तूं ज्ञानखड्गेंकरूनी । या संशयातें छेदूनी । योग करीं म्हणजे स्वधर्म आचरोनी । ईश्वराराधन हें मानीं. ॥ १४३३ ॥ जें करिसी अर्जुना ! । तें अर्पीं मज मधुसूदना । हें नवमाध्यायीं पंडुनंदना । बोलणार या भावें एथें बोले. ॥ १४३४ ॥ एवं जालियाही ज्ञान । ज्ञानी भक्त भगवद्भजन । करिती हें जगज्जीवन । सप्तमीं द्वादशीं सर्वत्र बोलेल. ॥ १४३५ ॥ सर्वात्मभाव मनीं । कृष्णकृपेनें दिनयामिनी । दृढ असोनिही वामनीं । आवडी सगुणभक्तीची. ॥ १४३६ ॥ ऐसा गीतार्थ बिंबला मनीं । तेचि टीका जाली वामनी । जे पाहती दिनयामिनी[3] । कृष्णकृपापात्र ते होती. ॥ १४३७ ॥ क्लेश स्वल्प महत्फल । ज्ञानें सेवितां कृष्णपदकमल । मोक्षमार्ग हा अति निर्मल । वामन म्हणे. ॥ १४३८ ॥ सकलही श्रीकृष्णकरणी । तोचि आत्मा स्फुरे अंतःकरणीं । तथापि हे टीका त्याच्या चरणीं । भक्तिरसें समर्पी वामन. ॥ १४३९ ॥

**स धर्मः समर्थः पुमर्थश्चतुर्थः कृतार्थोऽयमध्याय एवं चतुर्थः ।**
**यथार्थः सदर्थः सतां भूसुराणां प्रियः किं कदर्थो गिरा वा सुराणाम्. ॥**

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ।

१. चांगला. २. कर्मसमूह. ३. दिवसरात्र.